# आत्मविद्या

हा ग्रंथ,

हरि गणेश गोडबोले, बी. ए.
माजी हेडमास्तर, हायस्कूल सातारा

ह्यांनीं लिहिला.

प्रकाशक

बळवंत गणेश दाभोळकर

४६८ नारायण पेठ, पुणें सिटी.



( सुधारून वाढविलेली आवृत्ति तिसरी )

पुणें पेठ शनिवार मेहुणपुरा एथें केशव रावजी गोंधळेकर
ह्यानीं आपले "जगद्धितेच्छु" छापखान्यांत छापिला.

शकवर्ष १८३३-इ० सन १९११

---

( श्लोक )

अनुभूतेरभावेऽपि ब्रह्मास्मीत्येव चिंत्यताम् ॥
अप्यसत्प्राप्यते ध्यानान्नित्याप्तं ब्रह्म किं पुनः ॥ १

—विद्यारण्य

( आर्या )

अनुभव नसोनिया मी ब्रह्म असें सर्वदाचि चिंतावें ॥
नसतें पावे ध्यानें नित्य ब्रह्मीं कदा न शंकावें ॥ १

# शिल्लक असलेले ग्रंथ

१. न्यायतत्त्वें–किं० २ रु०.
२. ज्योतिर्विलास–किं० १॥ रु०.
३. संसारसुख–किं० १।॥ रु०.
४. नीतिसिद्धान्त–किं० १।॥ रु०.
५. धर्ममीमांसा ( पुस्तक १ )–किं० २॥ रु०.
६. धर्ममीमांसा ( पुस्तक २ )–किं० २॥ रु०.
७. राजनीतीचीं मूलतत्त्वें–किं० २॥ रु०.
८. जीवनशास्त्राचीं सामान्य तत्त्वें–किं० १।॥ रु०.
९. ज्ञेयमीयांसा ( पूर्वार्ध )–किं० २॥ रु०.
१०. ज्ञेयमीमांसा ( उत्तरार्ध )–किं० २॥ रु०.
११. राणीच्या राज्याचा इतिहास–किं० २ रु०.
१२. आत्मविद्या–किं० २॥ रु०.
१३. समाजशास्त्राचे मूलसिद्धान्त–किं० १।॥ रु०.
१४. समाजशास्त्राचे अनुभवजन्य सिद्धान्त व गृहसंस्था–किं० २॥ रु०.
१५. जननमरणमीमांसा–किं० १।॥ रु०.
१६. राजकीय संस्था–किं० २॥ रु०.
१७. निबंधरत्नमाला–किं० २॥ रु०.
१८. विधिसंस्था व धर्मविषयक संस्था–किं० २॥ रु०.
१९. उद्योगसंस्था व धंदेसंस्था–किं० २॥ रु०.
२०. सुख आणि शांति–किं. २॥ रु०.

☞ प्रत्येक ग्रंथास टपालखर्च ८३ पडेल.

४६८ नारायण पेठ, पुणें सिटी. — बळवंत गणेश दाभोळकर, ग्रंथप्रकाशक.

# प्रस्तावना



सन १८९९ सालीं नाशिक येथील हायस्कुलावर आक्टिंग हेडमास्तर या हुद्द्यावर आमची नेमणूक झाल्यावर एक अपूर्व व चिरस्मरणीय असा योग घडून आला. त्या वेळेस यात्राप्रसंगानें पंचवटींत राधाकृष्णाचे देवालयांत श्रीमान् योगानंद सरस्वती या नामेंकरून प्रसिद्ध संन्यासी रहात होते. ते सर्वशास्त्रपारंगत असून न्याय, पूर्वमीमांसा, वेदान्त व योग या शास्त्रांत तर अत्यंत निष्णात होते. ते द्रवीड देशांतील राहणारे असून त्यानीं कांची नगरींत अध्ययन केलें होतें. तीव्र वैराग्यसंपन्न असल्यामुळें ब्रह्मचर्याश्रम संपतांच त्यानीं संन्यासदीक्षा घेतली होती. स्वामींची कीर्ति ऐकून वे० शा० सं० हरिशास्त्री फडके, कै० मनोहर मामा, रा० रा० शालिग्राम, कै० भालचंद्र शास्त्री जोशी वगैरे बरेच पंडितलोक त्यांजकडे अध्ययन निमित्तानें जाऊं लागले व आह्मीहि त्यांजबरोबर जाऊं लागलों. स्वामींची जन्मभाषा संस्कृत असून, त्यांस तेलगू, तामील, कानडी ह्या भाषा येत होत्या; तथापि मराठी भाषा त्यांस बोलतां येत नसे व थोडीच समजत असे म्हणून अध्ययन सुरू केलें तेव्हां पाठाची भाषा व एकंदर व्यवहाराची भाषा संस्कृतच चाले.

स्वामी अद्वैतशास्त्रांत प्रवीण असल्यामुळें आह्मां शिष्यवर्गाशीं त्या शास्त्रावर रोज चर्चा होई. अद्वैत मतासच वेदान्तशास्त्र कां म्हणावें व रामानुज, माध्व, वल्लभी,

शैव, शाक्त इत्यादि पंथांस वेदान्तमतें कां म्हणूं नये ह्या-बद्दलचा बोध प्रथम त्यानीं आह्मांस करून दिला. रामानुजादि पंथ केवळ उपासनाविशेष असून देह सत्य मानून विषयोपभोगाकडे प्रवृत्ति करणारे आहेत व आत्मज्ञानाकडे त्यांचा ओढा कमी. श्रुतींतील ज्ञानकांडामध्यें केवळ आत्मोपासना व आत्मप्रतीति होण्याचे उपाय सांगितले आहेत व हा लाभ त्या पंथाअन्वयें चालून होणार नाहीं. उपासना केवळ साधन असून आत्मसाक्षात्कार साध्य होय. अद्वैत ही द्वैताच्या पुढची पायरी. ही श्रेष्ठ पायरी प्राप्त होण्यास सगुणोपासनेच्या पुढची जी निर्गुण उपासना ती साध्य झाली म्हणजे मग अद्वैतस्थितीस पोहोंचण्याची गोष्ट काढावी. परंतु रामानुजादि पंथांत तर सगुणाचीच उपासना आहे. शिवाय ब्रह्मसूत्रांचा, उपनिषदांचा, व गीतेचा अर्थ जर विष्णुपर, शिवपर, शक्तिपर करितां येईल तर जितक्या देवता तितकीं वेदान्तमतें होऊन सर्वत्र अनास्था होईल.

वेदान्तदर्शनाशिवाय इतर दर्शनें केवळ अनात्मशास्त्रें होत हेंहि स्वामीनीं आह्मांस समजून दिलें. न्यायवैशेषिकादि दर्शनांत आत्मविचार प्रसंगवशात् जरी केलेला आहे, तरी आत्मज्ञान व आत्मैक्यभावना हा त्यांचा विशिष्ट विषय नाहीं. तथापि हीं दर्शनें वेदान्तशास्त्रास अत्यंत उपकारक आहेत. आत्मा हा पदार्थ असून पदार्थज्ञान उत्कृष्ट करून देणारें तर्कशास्त्राशिवाय दुसरें साधन नाहीं. याकरितां त्यानीं न्यायशास्त्राचें अध्यापन करण्यास सुरवात केली व तर्कदीपिका, नीलकंठी, मुक्तावलि, दिनकरी हे ग्रंथ शिकविले. स्वामींस गदाधरी

मुखोद्गत होती व वक्तृत्वशक्तींत त्यांची तोड करणारे कै० नारायणाचार्य गजेंद्रगडकर व श्रीमत् शृंगेरीमठाधिपति यांशिवाय आह्मीं कोणी पाहिलेले नाहींत. नित्य तीन तास पाठ चाले व तो संपल्यावर भाट्टदीपिका, अद्वैतसिद्धि, योगवासिष्ठ इत्यादि ग्रंथांवर चर्चा होई.

अशा रीतीनें आह्मांस अपूर्व ज्ञानाचा लाभ झाला, व नौकरीची मुदत संपून नाशिक सोडल्यावर, श्रीमत् शंकराचार्य व श्रीमत् विद्यारण्यस्वामी यांचे ग्रंथ, योगवासिष्ठ, महाराष्ट्र कविता, मद्रास एथें प्रसिद्ध होत असलेलें 'ब्रह्मवादिन्' मासिक पुस्तक, विचारसागर, योगकल्पद्रुम वगैरे हिंदी ग्रंथ इत्यादिकांचे परिशीलनानें व गुरूनें दाखविलेल्या मार्गानें जे विचार झाले ते मनन, निदिध्यासन या साधनसंपत्तीकरितां आह्मीं ग्रथित केले, आणि अद्वैतसिद्धान्ताचा अभ्यास करणाऱ्यांस व जनसमुदायास उपयोगीं पडतील अशा समजुतीनें प्रसिद्ध केले आहेत.

या ग्रंथांत एकंदर सोळा प्रकरणें आहेत. उपोद्घातांत आत्मविद्याप्राविण्य हा भरतखंडाचा भेददर्शक धर्म कसा होतो याची चर्चा, आत्मस्वरूप, आत्मसाक्षात्कार व अद्वैतमताचे मुख्य प्रवर्तक श्रीमत् शंकराचार्य व श्रीमत् विद्यारण्य स्वामी यांचीं अल्प चरित्रें हे प्रधान विषय आहेत.

दुसऱ्या प्रकरणांत वर्णाश्रमधर्मानें चालावें हें जें वेद्प्रतिपादित मत आहे त्याप्रमाणें वागून प्रपंच व परमार्थ हीं दोन्ही साधितां येतात हें मनावर ठसण्यासाठीं महाशय गौरीशंकर उदेशंकर यांच्या चरित्राचा स्वच्छ बि-

छोरी आरसा आह्मीं वाचकांपुढें मांडिला आहे. त्यांत संन्यासग्रहणापूर्वी **गौरीशंकर** यानीं भट्ट **मोक्षमूलर** यांस लिहिलेल्या पत्रांत जो आनंद व्यक्त केला आहे आणि ती अवस्था प्राप्त झाल्यावर तुमचा आमचा पत्रव्यवहार आतां होणार नाहीं असें जें अखेरचें कळविलें आहे, तो भाग खरोखर रमणीय व विचारार्ह आहे.

तिसऱ्या प्रकरणांत वेदान्तशास्त्राचें पुनरुज्जीवन व उपयुक्तता हा विषय आहे. जसजसा काळ लोटेल तसतशी प्रत्येक शास्त्रांत जगाची प्रगति झालीच पाहिजे असें जें आधुनिक पंडितांचें मत आहे, त्या मताचा अद्वैतशास्त्रापुढें कांहीं पाड नाहीं हें या प्रकरणांत दाखविलें आहे. तसेंच हजारों वर्षांपूर्वींचीं जुनीं मतें आर्यलोक पोटाशीं धरून बसले आहेत व त्यांस प्रगति देतच नाहींत असा जो कोणी कोणी जबर अक्षेप घेतात तो निदान आत्मविद्येसंबंधानें तरी व्यर्थ आहे. ‘Thus far and no further’ अशी समुद्राला ईश्वराची आज्ञा असल्याबद्दल एका ठिकाणीं आंग्लेलखकानें ह्टलें आहे त्याप्रमाणेंच पारमार्थिक ज्ञानाची जी मर्यादा श्रुतींनीं दाखविली आहे, तिच्यापुढें कधींहि प्रगति होणें शक्य नाहीं, श्रुतींतील विचार परमावधीचे आहेत, त्यांपुढें विचाराची सीमा रहात नाहीं हें या निबंधावरून कळेल.

चवथ्या प्रकरणांत पुनर्जन्माविषयीं विचार केला आहे. आर्यतत्त्वज्ञानाचीं व आर्यधर्माचीं जीं अनेक प्रमेयें आहेत, त्यांपैकीं जन्मांतर हें मुख्य प्रमेय होय. या विषयाचें ऐतिहासिक दृष्टीनें विवेचन करून व तत्संबंधानें अनेक मतांचें परीक्षण करून, या मताची सिद्धि केली आहे.

पांचव्या प्रकरणांत ‘ पुनर्जन्म ’ या विषयाशीं संलग्न झालेलें संचित, प्रारब्ध व क्रियमाण एतद्विषयक आर्यतत्त्वज्ञानांतील जें दुसरें प्रमेय, त्याचा विचार केला आहे. ब्रह्मसूत्रें, योगवासिष्ठ, अपरोक्षानुभूति इत्यादि ग्रंथांतील मतें देऊन, श्रीमत् शंकराचार्य व श्रीमत् विद्यारण्य स्वामी यांनीं आपआपल्या भाष्यांत प्रस्थानत्रयाचा आधार घेऊन विषय सिद्ध करण्याची जी पद्धति स्वीकारिली आहे, तिचा अवलंब या निबंधांत केला आहे.

सहापासून पंधरापर्यंत दहा प्रकरणांत महासाधु श्री रंगनाथ स्वामी यानीं दाखविलेल्या दिशेनें योगवासिष्ठाचा आधार घेऊन अद्वैतसिद्धान्तप्रतिपादक स्वतंत्र प्रबन्ध रचिला आहे. वैराग्य प्रकरणांत, वेदान्तशास्त्राचा अधिकारी कोण, वैराग्य म्हणजे काय, वैराग्य होण्याचीं कारणें इत्यादि विषयांचा समावेश केला आहे.

जगन्मिथ्यात्व प्रकरणांत न्यायवैशेषिक इत्यादि दर्शनांतर्गत मतांचें निरीक्षण करून श्रीमत् शंकराचार्यनिरूपित जें अद्वैत मत त्या अन्वयें या विषयाचें प्रतिपादन केलें आहे.

मनोलय प्रकरणांत योगविद्येचें उपपादन केलें आहे. योगशास्त्राचा अनुभव प्रत्येकानें घेण्यासारखा आहे, कारण या शास्त्राचा आपल्या दिनचर्येशीं व शारीर स्थितीशीं अति निकट संबंध आहे. शिवाय उपासनामार्ग याच शास्त्रांत उत्कृष्ट रीतीनें वर्णिलेला आहे.

वासनोपशम प्रकरणांत, आत्मानात्मविचारानें वासनांचा उपशम होतो, त्याचे मुख्य उपाय म्हटले म्हणजे साधुसमागम व सच्छास्त्रश्रवण हे होत; महावाक्याचा

बोध झाला म्हणजे वासनांचा जोर कमी होतो आणि आत्मज्ञान होण्याची योग्यता प्राप्त होते इत्यादि विषयांचें निरूपण केलें आहे.

आत्ममनन, शुद्धनिरूपण, आत्मार्चन व आत्मनिरूपण ह्या चार प्रकरणांचा उद्देश, दोन असंभावना व एक विपरीत भावना यांचा क्षय होण्यास मार्ग कोणते, हे ठरविणें होय. सद्गुरूनें महावाक्याचा बोध जरी केला, व सर्व जगत् मिथ्या आणि ब्रह्म सत्य हें जरी कळलें, तथापि प्रमाणासंभावना प्रथम उत्पन्न होते. प्रमाणासंभावना म्हणजे श्रुति व गुरु जें सांगतात तें खरें कशावरून? अशी शंका उत्पन्न होते. ही शंका वेदान्तशास्त्रश्रवणाच्या योगानें नष्ट होते. अशा रीतीनें ही शंका जरी दूर झाली, तरी प्रमेयासंभावना उत्पन्न होते. प्रमेयासंभावना म्हणजे मी ब्रह्म कसा? हीच हुरहूर मनाला लागते. ती आत्ममननानें नाहींशी होते. मी शुद्धबुद्ध असून स्वप्रकाश आहें, मला उपाधि मुळींच नाहींत इत्यादि रीतींनीं अनेक भावना केल्या असतां आत्ममनन दृढ होऊन प्रमेयासंभावना क्षय पावते. इतकी स्थिति झाली तरी अनेक जन्मांच्या संस्कारांमुळें देहादिक प्रपंच खरा भासतो व तेणेंकरून स्वस्वरूपापासून आपली च्युति होते. ह्याचेंच नांव विपरीतभावना, व ती निदिध्यासनाचे योगानें दूर होते. हें निदिध्यासन कसें करावें तें, शुद्धनिरूपण, आत्मार्चन व आत्मनिरूपण ह्या प्रकरणांत साधार दाखविलें आहे.

जीवन्मुक्ति प्रकरणांत, असंभावना व विपरीतभावना क्षय पावल्यानंतर आत्मस्थिति बाणली असतां जीव-

न्मुक्तावस्था कशी प्राप्त होते तें प्रतिपादिलें आहे. शिवाय ज्ञानाच्या सात भूमिका, जीवन्मुक्त कोणास म्हणावें, तो बोलतो कसा, वागतो कसा, इत्यादि विषयांचें निरूपण या प्रकरणात केलें आहे.

निर्वाण प्रकरणांत मनोलय व वासनोपशम संपादण्यासाठीं जे अनेक उपाय सांगितले आहेत त्यांचा अवलंब न करितां सहजस्थिति कशी प्राप्त होते ह्याबद्दल विवेचन केलें आहे.

सोळाव्या म्हणजे उपसंहार प्रकरणांत, महाराष्ट्र साधुकवींनीं आपल्या ग्रंथांत अद्वैत निरूपण केलें आहे किंवा भागवतधर्म म्हणजे भक्तिमार्ग तेवढा वर्णिला आहे याचें निरीक्षण करून, मराठी साधुकवि अद्वैतमताचे असून लोकसंग्रहाकरितां व अद्वैतास द्वैताचें सहाय्य अवश्य पाहिजे म्हणून त्यांनीं भक्तिमार्ग स्वीकारिला हें सिद्ध केलें आहे.

ह० ग० गोडबोले

# नव्या आवृत्तीची प्रस्तावना

या ग्रंथाची दुसरी आवृत्ति छापण्यापूर्वीं त्यांत सुधारणा करण्याची संधी मिळाली नाहीं, म्हणून ही नवी आवत्ति प्रसिद्ध करतांना शक्य तेवढी दुरस्ती करण्याचा आह्मीं यत्न केला आहे.

पूर्व व पश्चिम यांचा दिवसेंदिवस अति निकट संबंध घडून येत असल्यामुळें भरतखंडांत अनेक प्रकारच्या क्रांत्या नजरेस येत आहेत, व या सर्व प्रकारांचा अन्योन्याश्रय असल्यामुळें, आध्यात्मिक विषयहि सांप्रतच्या संक्रमणावस्थेस पात्र होत आहेत. तेव्हां हें स्थित्यन्तर नीट लक्षांत यावें म्हणून कांहीं नवीन प्रकरणांचा दुसऱ्या भागांत समावेश करून तो भाग पूर्वीं प्रसिद्ध झालेल्या सोळा प्रकरणांचा पहिला भाग कल्पून त्यास या आवृत्तींत जोडिला आहे.

हीं नवीन प्रकरणें व एकंदर सर्व ग्रंथ अद्वैत सिद्धान्तांचा अभ्यास करण्यास व प्राचीन वैदिक मार्गाचा अवलंब करण्यास उपयोगीं पडेल असें वाटतें.

ह० ग० गोडबोले

# अनुक्रमणिका

भाग १ ला



भाग २ रा

# प्रकरण पहिलें

## उपोद्घात

अद्वैते स्थैर्यमायाते द्वैते च प्रशमं गते ॥
योगिनः कर्म कुर्वन्ति पश्यन्ति स्वप्नवज्जगत् ॥ १

—योगवासिष्ठ

प्राचीन ग्रीक लोक असें म्हणत कीं, सृष्टिसौंदर्य आणि भव्य देखावे हे उदात्त विचाराचे जनक होत, व हें म्हणणें भरतखंडास उत्कृष्ट लागू पडतें. मानवी बुद्धीस आकलन झालेलीं जितकीं शास्त्रें आहेत व जितक्या कला आहेत तितक्या सर्व शास्त्रांची व कलांची प्रगल्भदशा अतिप्राचीन कालापासून ह्या देशांत नजरेस येते. त्यांत विशेषेंकरून आत्मविद्येंत आर्यांचें जें वैभव दृष्टीस पडतें त्याची बरोबरी पृथ्वीवरील कोणत्याहि राष्ट्रास करवत नाहीं. प्रत्येक जातींत (Class) समान वर्गांहून भेद दाखविणारा गुण आढळतो, तसेंच प्रत्येक जातींत कांहीं व्यक्तींमध्यें इतर व्यक्तींपासून भेद दाखविणारा गुण असतो. हा भेददर्शक गुण त्या त्या जातींचें किंवा व्यक्तीचें लक्षण होय. या दृष्टीनें पहातां आत्मविद्या हा भरतखंडाचा भेददर्शक गुण होय. आत्मविद्येचीं मुख्य अंगें तत्त्वज्ञान (Philosophy) व धर्म (Religion) हीं होत व या दोहोंचाहि प्रसार अनेक देशांत झालेला आहे, तथापि तात्त्विक ज्ञानाचें व धर्माचें अत्यन्त उदात्त व रमणीय स्वरूप याच देशांत व्यक्त होतें. जेथें यूरोपीय पंडितांचे विचार थकले तेथें आर्यांनीं मार्ग काढिला. यूरोपीय तत्त्ववेत्त्यांस न सुट-

णारीं कोडीं आर्य लोकांनीं उलगडून दिली. जगाचा तत्त्वज्ञानाचा इतिहास अवलोकन करितां, आर्यतत्त्वज्ञानांतर्गत सिद्धान्तांच्या खालोखाल तरी विचार कांहीं देशांत पुढें आलेले आहेत, परंतु धर्मसंबंधानें पहातां आर्य धर्मांत एक अपूर्व गुण आढळतो. एकंदर धर्मांची उत्पत्ति पहातां असें दिसतें कीं, एशिया हें धर्मांचें मूलपीठ होय. टर्की इन् एशिया, अरबस्थान व हिंदुस्थान या प्रत्येक देशांत एकेक धर्म उत्पन्न झाला व त्यांतील धर्ममतांची तुलना करितां एकट्या हिंदुस्थानांत मात्र अद्वैतमत असून इतर देशांतील धर्म हे केवळ उपासनाविशेष होत. यावरून अद्वैतमतास उपासनेची अपेक्षा नाहीं असें न समजतां, अद्वैतमत ही उपासनेच्या पुढील पायरी होय, इतकाच बोध घ्यावा. आर्यतत्त्वज्ञानांत ज्ञानाच्या निरनिराळ्या भूमिका वर्णिल्या आहेत व तशाच आर्यधर्मांतहि आहेत. कर्म, उपासना, ज्ञान ह्या जशा धर्मांच्या पायऱ्या, तशा शुभेच्छा, विचारणा, तनुमानसा, सत्त्वापत्ति असंसक्ति, पदार्थाभाविनी, तुर्यगा, ह्या ज्ञानाच्या पायऱ्या होत. सांप्रतकालीं भूमितीचे सिद्धान्त जसे बहुतेकांस अवगत आहेत, तसें ज्ञानाच्या व धर्मांच्या भूमिकांचें अभ्यसन पूर्वीं भरतखंडांत होत असे. योगवासिष्ठांत वसिष्ठ ऋषींनीं ज्ञानभूमिकांचा बोध रामचंद्रास करितांना असें सांगितलें कीं, या भूमिकांचें नुसतें वर्णनच ऐकलें असतां कृतकृत्यता वाटेल. कर्म, उपासना; ज्ञान 'यांपैकीं ज्ञान म्हणजेच अद्वैतज्ञान होय. या रीतीनें पहातां आत्मविद्या हें भरतखंडाचें लक्षण ( Differentiea ) होय.

तेव्हां भरतखंडांत हा विशेष कां असावा, असा प्रश्न

साहजिक उत्पन्न होतो व याचें उत्तर एवढेंच कीं, अफगाण लोकांत जसें शौर्य, इंग्रज लोकांत जसें व्यवहारचातुर्य, जर्मन लोकांत जसें युद्धकौशल्य, तशी आर्य लोकांत अद्वैतलक्ष्मी :होय. लक्ष्मीच्या चंचल स्वभावानुरूप आर्य लोकांचें भौतिकवैभव पृथ्वीवरील बहुतेक लोक उपभोगीत आहेत, तथापि त्यांच्या आत्मविद्येस कोणाच्यानें फारसा धक्का लाववणार नाहीं. अद्वैतमत वेदप्रतिपादित असून बादरायणानी सूत्ररूपानें ग्रथित केलें, व शंकराचार्यांनीं इसवी सनाच्या आठव्या शतकांत भरतखंडांत स्थापित केल्यावर विद्यारण्य स्वामींनीं चवदाव्या शतकांत सोप्या व व्यावहारिक भाषेनें लोकादरास पात्र केलें. ज्ञानेश्वरानीं तेराव्या शतकांत मराठी भाषेंत ही विद्या प्रकट केली व नंतर महाराष्ट्रकविवर्यांनीं तिचा फैलाव सर्व प्रकारच्या लोकांत केला. म्हणून भौतिक वैभव अनिश्चित झाल्यामुळें आत्मविद्या हें आर्यांचें पारमार्थिक वतनच बनून गेलें आहे.

कर्म, उपासना व ज्ञान या धर्माच्या तीनहि अंगांत इतर देशांपेक्षां भरतखंडांत विशेष आढळतो; कारण एथें कर्म व उपासना या दोन्हींवर अद्वैताची छाया दृष्टीस पडते. प्रत्येक धर्मांत कर्माची योग्यता मानलेली आहेच, तथापि फल ईश्वरार्पण करून कर्म करणें हा चमत्कार आर्यधर्मांतच आहे. तसेंच प्रत्येक धर्मांत कोणती तरी उपास्य देवता मानून तिची भक्ति करण्यांत येते, तथापि उपासनेंतील दैवत आपल्या हृदयांत असून सर्वत्र व्यापून राहतें, ही बुद्धि केवळ आर्यांतच आहे. उपासनेंत व्यक्त होणारे जे भक्त आणि भक्तिविषय तेच ज्ञानभू-

मिकेंतील जीवात्मा व परमात्मा होत. सामवेदांतील ‘ तत्त्वमसि ’ हें महावाक्य अद्वैतमताचें उत्कृष्ट समर्थक असून उपासनामार्गांत सर्वत्र त्याची व्याप्ति नजरेस येते. श्रुतींतील कर्म, उपासना व ज्ञान हे विभाग भगवद्गीतेंतहि असून ते अनुक्रमें त्वंपदार्थ, तत्पदार्थ व त्यांचें ऐक्य यांचे दर्शक आहेत.

आर्यधर्मांत अशा रीतीचा अद्वैतप्रकर्ष असण्याचीं अनेक कारणें आहेत व त्यांच्या अस्तित्वामुळें परधर्मीयांस व अमच्यांतील अज्ञानी लोकांस अद्वैतमताचें ज्ञान न होऊन ते त्यावर दूषण देण्यास प्रवृत्त होतात. प्रथमतः देह हा आत्मा नव्हे व विषयोपभोगांत खरें सुख नाहीं, हीं मतें तर आत्मविद्येचा पाया असून सामान्य लोकांस अगदीं अग्राह्य वाटतात. उघडच आहे कीं, सर्व जगाची प्रवृत्ति, विषयोपभोगाचीं साधनें वृद्धिंगत करून देहाची पुष्टि करण्याकडेच असल्यामुळें, ह्या मतांचा अव्हेर होतो आणि परमानन्दाची प्राप्ति होत नाहीं. अद्वैतशास्त्रान्तर्गत आत्म्याचें लक्षण सर्वांस इष्ट जें सुख त्याच्या द्वारें सहज व्यक्त करितां येतें. आनन्द हें आत्म्याचें मुख्य स्वरूप असून विषयानन्द हा त्याचा लेशमात्र आहे.

अथात्र विषयानन्दो ब्रह्मानन्दांशरूपभाक् ॥
निरूप्यते द्वारभूतस्तदंशत्वं श्रुतिर्जगौ ॥ १
एषोऽस्य परमानन्दो योऽखंडैकरसात्मकः ॥
अन्यानि भूतान्येतस्य मात्रामेवोपभुंजते ॥ २

—पूर्वाचार्याः

म्हणजे आनन्द जो म्हणतात तो आत्म्यासच होतो, विषयानन्द हा आत्मानन्दाचा यःकश्चित् अंश असून त्या-

च्या द्वारें आत्म्याची ओळख होते, आत्मानन्द अखंड असून त्याचा लेश मात्र अज्ञानी लोकांस प्राप्त होतो. विषयोपभोगांत तृप्तीचे वेळीं नित्यानन्दाचा किंचित् अनुभव प्राणिमात्रास होतो. वासना जीवापासून निघून विषयावर जाते व तृप्ति झाल्यावर परत फिरते. तृप्तिकालीं वासनेस आत्मस्वरूपाची सन्मुखता होते, परमात्म्याचें प्रतिबिंब वासनेंत पडतें आणि जीवास आनन्द होतो. परंतु मूढ जीव तोहि विषयानन्दच समजून विसरतो आणि वासना दुसऱ्या व्यापारास लागते. एवंच, अज्ञानी लोक विषयानन्दास भुलतात व योगी मात्र ब्रह्मानन्दाचा अनुभव घेतात. याकरितां, देहपुष्टि हें सर्वस्व मानून विषयोपभोगामागें लागलेले व भौतिकवैभव संपादन करण्यांत गर्क झालेले जे लोक त्यांस आत्मविषयक अद्वैतानुभव येणें अशक्य आहे.

आत्मज्ञानी पुरुष आत्मव्यापारांत सदा निमग्न असतात.

आत्मक्रीड आत्मरतिः क्रियावानेष ब्रह्मविदां वरिष्ठः ॥

—**मुंडकोपनिषद्**

म्हणजे योगीलोक आत्म्याशीं खेळत असतात व आत्मस्वरूपांत सर्वदा रममाण होतात, तथापि त्यांचें नित्यनैमित्तिक कर्मानुष्ठान सुटत नाहीं. आत्म्याशीं खेळणें म्हणजे आत्मा स्वप्रकाश व अद्वितीय आहे अशाबद्दल साधक श्रुतींचें व युक्तींचें प्राबल्य व विरुद्ध श्रुतियुक्तींचें दौर्बल्य सिद्ध करणें होय. अशा रीतीचा आत्मव्यापार ज्ञानी पुरुषाचा चालला असतां तो बाह्यव्यापाराविषयीं विमुख होतो. त्यास कांहीं कर्तव्य उरतच नाहीं.

यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ॥
आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥ १

—भगवद्गीता

म्हणजे जो पुरुष आत्मस्वरूपीं रममाण होतो, तो नेहमीं तृप्त व संतुष्ट असतो. त्याला अमुक एक कार्य करावयाचें राहिलें आहे असें नाहीं. असा कृतकृत्य झालेला जो योगी त्याच्या अन्तःकरणांत सर्वदा आनंद भरलेला असतो.

रसो वै सः । रस ँ ह्येवायं लब्ध्वानन्दी भवति ।

—तैत्तिरीयारण्यक

या श्रुतिवचनांत सत्, चित्, आनन्द ह्या परमात्म्याच्या स्वरूपांपैकीं आनन्दांशाचें वर्णन आहे. परमात्मा आनन्दस्वरूपच असून योग्यास परमात्म्याची प्राप्ति झाल्याबरोबर पराकाष्ठेचा आनन्द होतो. या विद्याजन्य हर्षाचें उदाहरण पुढील सामांत उत्कृष्ट आढळतें.

इमाँल्लोकान्कामान्नीकामरूप्यनुसंचरन् । एतत्साम गायन्नास्ते । हा ३ वु हा ३ वु हा ३ वु । अहमन्नमहमन्नमहमन्नम् । अहमन्नादोऽ ३ हमन्नादोऽ ३ हमन्नादः । अह ँ श्लोक कृदह ँ श्लोक कृदह ँ श्लोक कृत्

—तैत्तिरीयारण्यक

म्हणजे प्राणिमात्राकरितां सर्व अन्नाची इच्छा करणारा, देवमनुष्यांतील पाहिजे त्याचें रूप माझेंच आहे असें मानणारा व सर्व लोकीं संचार करणारा असा योगी पुढील सामाचें गायन करितो. अहाहा ! व्रीहि, यव, गोधूम इत्यादिक सर्व अन्न मीच आहें, पशुपक्ष्यादि जें जें अन्न खातात तें तें त्यांच्याच मुखानें मी खातों, सर्व काव्यनाटकांचा कर्ता मीच आहें.—सर्व पृथ्वीवरील पदार्थ

आत्मरूपानें जो पहातो त्या ब्रह्मनिष्ठाची भावना अशी होते, आणि यालाच अद्वैतानुभव म्हणतात.

ज्ञानकान्डाचा कर्मकान्डाशीं साध्यसाधनभाव—संबंध आहे, म्हणजे ज्ञान साध्य असून कर्म हें साधन होय. कर्मापासून फक्त चित्तशुद्धि होते किंवा चित्तशुद्धि होऊन विविदिषा उत्पन्न होते. विविदिषा हा शब्द जिज्ञासा शब्दाचाच पर्याय आहे, तथापि दोहोंत अन्तर आहे. जिज्ञासा शब्द व्यवहारांतील कोणत्याहि वस्तूचें ज्ञान करून घेण्याच्या इच्छेला लावितात, आणि विविदिषा ह्या शब्दाचा प्रयोग आत्मज्ञान करून घेण्याची जी इच्छा त्या अर्थीं मात्र केला जातो.

तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति ।
यज्ञेन दानेन तपसाऽनाशकेन ।

—बृहदारण्यक

म्हणजे यज्ञ, दान, तप इत्यादिकांच्या आचरणानें श्रुतींत सांगितल्याप्रमाणें आत्मज्ञान करून घेण्याची इच्छा उत्पन्न होते. म्हणून वर्णाश्रमविहित नित्यनैमित्तिक कर्मे यथासांग करून ईश्वरार्पण केल्याशिवाय आत्मज्ञानाचा मार्ग दाखविणारी ही विविदिषा उदय पावत नाहीं. संध्यावन्दनादि नित्यकर्मे करून कांहींएक फायदा होत नाहीं, अशी कांहीं लोकांची एकप्रकारची गैरसमजूत झालेली असते, परंतु शास्त्रदृष्ट्या ती समजूत चुकीची आहे. आत्मज्ञान व्हावयास पाहिजे असल्यास अविद्येचा नाश झाला पाहिजे. अविद्येचा नाश होण्यास ज्ञान प्राप्त झालें पाहिजे. ज्ञान होण्यास शमदमादिकांची अत्यन्त अवश्यकता आहे. शमदमादि साध्य होण्यास

शुद्धबुद्धि पाहिजे. आणि ही शुद्धबुद्धि वर्णाश्रमविहित नित्यनैमित्तिक कर्में केलीं तरच प्राप्त होते, एरव्हीं होत नाहीं. शिवाय ही विविदिषा अत्यन्त उपयुक्त आहे, असें श्रुत्यर्थ मनांत आणिल्यानें जरी समजलें, तथापि मनुष्याच्या कर्मानें तें ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न करावा, असें त्याच्या मनांत देखील येत नाहीं. मध्यें पाप आडवें येतें व तेणेंकरून ज्ञानाविषयीं अरुचि उत्पन्न होते. ह्याला व्यावहारिक उदाहरण म्हटलें म्हणजे असें आहे कीं, एकादा पुरुष खिरीचा मोठा भोक्ता असतो, परंतु पित्तप्रकोप झाला असतां तीच क्षीर त्याला नकोशी होते. पुढें औषधिक्रियेनें पित्तशमन झाल्यावर ती क्षीर त्याला गोड लागते. विविदिषेबद्दल अशीच स्थिति आहे. नित्यनैमित्तिक कर्में करण्याची व श्रवणमननादि साधनांचा अवलंब करण्याची संवय मनोनिग्रहानें व उत्साहानें लावून घेण्यास शिकलें पाहिजे, म्हणजे विविदिषा उत्पन्न होऊन वर लिहिलेल्या परंपरेनें अविद्येचा नाश होतो आणि आत्मज्ञान होतें.

ज्ञानमुत्पद्यते पुंसां क्षयात्पापस्य कर्मणः ॥

—वार्तिक

म्हणजे शुद्धाचरणानें पापाचा क्षय झाल्यावर ज्ञान उत्पन्न होतें.

आत्मा शब्दस्पर्शादिरहित असल्यामुळें त्याचें ज्ञान स्थूलबुद्धीनें होत नाहीं, याकरितां अत्यन्त सूक्ष्म व कुशाग्र बुद्धि आवश्यक आहे.

दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः ॥

—कठोपनिषद्

म्हणजे अत्यन्त सूक्ष्म अशा बुद्धीनेंच आत्मदर्शन

होतें. तसेंच लौकिकव्यवहारांत गुंतलेली बुद्धि अन्तर्मुख झाली तरच आत्मविचारास योग्य होते. मन आणि वासना या नेहमीं अनात्मपदार्थांशीं संलग्न झाल्यामुळें आत्मबोध घडत नाहीं, याकरितां त्यांचा निरोध केला पाहिजे. हा निरोध उपासनेशिवाय घडत नाहीं. नित्यनैमित्तिक कर्मानुष्ठानानें चित्तशुद्धि झाल्यावर उपासना साध्य होते, व उपासनेनें मनवासनांचा निरोध व्हावा एतदर्थ योगशास्त्राची भरतखंडांत प्रवृत्ति झाली. अद्वैतमताशीं योगशास्त्राचा निकट संबंध असून, चित्तवृत्तिनिरोधानें ऐकाग्र्य संपादणें हाच योगाचा उद्देश होय. योगशास्त्रांतील शेवटचीं तीन अंगें ध्यान, धारणा, समाधि हीं उपासनाविषयक असून त्यांस 'संयम' अशी संज्ञा आहे, व पूर्वांगें संयमास उपकारक होत. अशा रीतीनें पहातां उपासनेचा उद्देश मन व वासना यांचा निरोध करून आत्मबोध व आत्मप्रतीति साध्य होणें एवढाच आहे. परंतु इतर धर्मांत उपासना हेंच अखेरचें अंग समजतात व या देशांतील द्वैतवादी त्याच मताचा स्वीकार करितात. हा विशेष फार महत्त्वाचा असून आर्य तत्त्वज्ञानाचा व आर्य धर्माचा श्रेष्ठपणा उत्कृष्ट तऱ्हेनें स्थापित करितो. आत्मविद्येचीं तत्त्वज्ञान व धर्म हीं दोन अंगें आहेत, असें पूर्वींच सांगितलें आहे, त्यांपैकीं तत्त्वज्ञान हें अंतरंग व धर्म हें बहिरंग होय. तत्त्वज्ञान हें उपपत्तिप्रतिपादक असून धर्म हें व्यावहारिक स्वरूप होय. आत्माविष्करण हा आर्यतत्त्वज्ञानाचा विषय व आत्मप्रतीति हा आर्यधर्माचा विषय होय. इतर देशांतील तत्त्वज्ञानाची व धर्माची उडी एथपर्यंत पोहोंचली नाहीं.

कोणत्या तरी देवाची भक्ति करून सुखप्राप्ति करून घेणें, हा उद्देश इतर धर्मांत व या देशांतील द्वैतप्रतिपादक धर्मांत आढळून येतो, व जोंपर्यंत देह हा आत्मा नव्हे व विषयोपभोगांत खरा आनन्द नाहीं या सिद्धान्ताचा अनुभव घडला नाहीं, तोंपर्यंत एवढाच उद्देश असणें स्वाभाविक आहे.

वरील विवेचनावरून असें लक्षांत येईल कीं, अद्वैतमत ही तत्त्वज्ञानाची शेवटची पायरी असून ज्या अवस्थेंत आत्मैकभावना परिपूर्ण होते ती सहजस्थिति धर्माची अखेरची पायरी होय. इतर देशांतील तत्त्वज्ञानांत व धर्मांत तितकी प्रगति कां झाली नाहीं याचीं कारणें वर निर्दिष्ट केलीं आहेत, आणि ह्या देशांत उत्पन्न झालेल्या रामानुज, माध्वी, वल्लभी, शैव, शाक्त इत्यादि पंथांसहि तींच लागू आहेत; व या पन्थांस वेदांतमतें अशी संज्ञा देण्याचा प्रघात कोठें कोठें नजरेस येतो, परंतु तो अयोग्य आहे. कारण या पंथांत फार झालें तर विशिष्ट देवतांची आराधना करून सुखप्राप्ति करून घेण्याचा मार्ग सांगितला आहे. परंतु अद्वैतमतांशीं तुलना करून पहातां हा मार्ग गौण समजला पाहिजे. अद्वैतमतीं सर्व पदार्थांमध्यें आत्म्याचें श्रेष्ठत्व गणिलें आहे. आत्म्याइतकी आवडती वस्तु कोणतीहि नाहीं.

> तदेतत्प्रेयः पुत्रात्प्रेयो वित्तात्प्रेयोन्यस्मात्सर्वस्मा-
> दन्तरतरं यदयमात्मा ।
>
> —बृहदारण्यक

म्हणजे 'मी' या संज्ञेनें अनुभवास येणारा, देह व इंद्रियें यांचा साक्षी, असा जो आत्मा त्याचें स्वरूप गूढ अ-

सून पुत्रापेक्षां, संपत्तीपेक्षां व इतर सर्व वस्तूंपेक्षां तो प्राणिमात्रास अधिक प्रिय आहे. वार्तिककार असें म्हण-तात कीं,

> वित्तात्पुत्रः प्रियः पुत्रात्पिंडः पिंडात्तथेंद्रियम् ॥
> इंद्रियाच्च प्रियः प्राणः प्राणदात्मा परः प्रियः ॥ १

म्हणजे द्रव्यापेक्षां पुत्र प्रिय, पुत्रापेक्षां देह, देहापेक्षां इंद्रिय, इंद्रियापेक्षां प्राण आणि प्राणापेक्षांहि अधिक प्रिय जी वस्तु ती आत्मा होय. आणखी असा चमत्कार आ-हे कीं, आत्म्याहून इतर पदार्थांवर जी आपली प्रीति असते ती सोपाधिक होय. म्हणजे ते पदार्थ आपणांस उपयोगीं पडतात म्हणून. परंतु आत्म्यावर जें आपलें प्रेम असतें तें केवळ निरुपाधिक होय. इंग्रजी भाषेंतील "Love virtue for its own sake" म्हणजे सदाचर-णावर त्यापासून होणाऱ्या फायद्याकडे लक्ष न देतां प्रेम ठेवावें—या वाक्यांत ज्या प्रकारचें प्रेम वर्णिलें आहे, त्याच प्रकारचें निरुपाधिक प्रेम आत्म्यावर असलें पाहिजे

> न वा अरे पुत्राणां कामाय पुत्राः प्रिया भवन्ति ।
> आत्मनस्तु कामाय पुत्राः प्रिया भवन्ति ॥
>
> —बृहदारण्यक

म्हणजे पुत्रांच्या इच्छेकरितां पुत्र प्रिय होत नाहींत, तर आत्म्याच्या सुखाकरितां पुत्र प्रिय होतात.

असा सर्वांत प्रिय व विलोभनीय जो आत्मा त्याचें स्वरूप समजणें व त्याचा साक्षात्कार होणें, हाच आत्म-विद्येचा विषय होय. ही विद्या विशेषेंकरून वेदाच्या शेवटच्या कान्डांत वर्णिली आहे म्हणून तिला वेदान्तद-र्शन असें म्हणतात. व ह्या विद्येंत आत्मैक्य भासतें

म्हणून अद्वैतविद्या हाहि पर्यायशब्द आहे. प्राचीन आर्यांनीं ही विद्या पूर्णपणें संपादन केली होती. कर्मानुष्ठानानें चित्तशुद्धि झाल्यावर आत्मज्ञानास विघातक जीं मन आणि वासना त्यांचा निरोध उपासनेनें होतो. तसेंच उपासनेनें आत्मसाक्षात्कार होतो. यावरून उपासनेचें महत्त्व सहज ध्यानांत येण्यासारखें आहे. मन व वासना यांच्या निरोधाकरितां कोणत्याहि देवतेची उपासना केली असतां चालते. परंतु आत्मसाक्षात्कारास आत्म्याचीच उपासना करावी लागते.

आत्मैक प्रत्ययो यावत्स्वभावात्संततो भवेत् ॥
कुर्यादुपासनं तावत्क्षीयंते वासनास्ततः ॥ १

—**वार्तिकसार**

म्हणजे आत्मैकभावना स्वाहजिकपणें सतत होऊं लागेपर्यंत उपासना केली पाहिजे, व तेणेंकरून वासना क्षय पावतात. सर्वत्र आत्मैक्यभावना झाली म्हणजे निराळी उपासना करावी लागत नाहीं. कारण आत्मप्रतीति सर्वत्र होऊं लागली म्हणजे तेंच आत्मभजन समजावें. भरतखंडांत उपासनामार्ग आणि अद्वैतविद्या यांचें अपूर्व संमेलन अशा रीतीनें झाल्यामुळें, महाराष्ट्रकवींच्या ग्रंथांस अत्यन्त मोहकपणा आला आहे. छांदोग्य उपनिषदांत श्वेतकेतूस अनेक उपासना सांगून शेवटीं आत्म्याची उपासना वर्णिली आहे. सांप्रतकालीं कर्माप्रमाणेंच उपासनेचाहि अभाव झाल्यामुळें या सिद्धान्ताची योग्यता कळत नाहीं. या देशांत पूर्वपद्धतीनें जितके पंडित तयार झाले त्यांपैकीं बहुतेक उपासक होते. अप्पय्या दीक्षित महाशैव होते. कुप्पाशास्त्री कामेश्वरीचे उपासक

होते. उपासनेनें शास्त्रीय ग्रंथ मुखोद्गत रहातात, व धारणाशक्ति तीव्र होते. परंतु एवढें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, एकाद्या देवतेची उपासना सिद्ध झाली तरी आपलें कार्य संपलें नाहीं; कारण विष्णु, शिव, शक्ति इत्यादि देवता परमात्म्याचीं सोपाधिक रूपें होत. म्हणून उपासना केवळ साधन असून, साध्य वस्तु म्हटल्या म्हणजे आत्मज्ञान व आत्मसाक्षात्कार ह्याच होत. यावरून ख्रिस्ती धर्म, महम्मदी धर्म, व रामानुज, माध्व, वल्लभी, शैव, शाक्त इत्यादि हे पूर्णत्वास आलेले धर्ममार्ग नसून केवळ आत्मप्रतीतीस उपकारक होत, असें समजावें. विचारसागर नामक हिंदी ग्रंथांत पुढील दोहरा आढळतो:—

अब्धि अपार स्वरूप मम । लहरी विष्नु महेस ॥
रवि विधि चंदा वरून यम । सक्ति धनेस गनेस ॥ १

म्हणजे विष्णु, शिव, सूर्य इत्यादि देवता आत्मारूप अपार समुद्राच्या लहरी होत.

आत्मविद्येचा पाया वेद असून, वेद अनादि, अनन्त व नित्य आहेत. वेद हे परमेश्वराचे निःश्वसित होत, हा सिद्धान्त वेदभाष्याचे आरंभीं सायणाचार्यांनीं स्पष्ट लिहिला आहे, शिवाय शास्त्रग्रंथांत वेदांचे अनादित्वाबद्दल पदोपदीं उल्लेख आढळतो. परमेश्वराचे निःश्वसित म्हणून वेद अपौरुषेय ठरतात. आणि जर त्यांस पौरुषेय म्हणावयाचें असेल तर त्याचा अर्थ मनुष्यांनीं केलेले असा न घेतां ईश्वरोक्त असाच समजला पाहिजे; कारण, पुरुष ही संज्ञा श्रुतींत व दर्शनांत ईश्वरास लाविली आहे. वेदांचें अनन्तत्व तैत्तिरीय ब्राह्मणांतील भरद्वाजाच्या कथेवरून चांगलें ध्यानांत येईल.

भरद्वाजो ह त्रिभिरायुर्भिर्ब्रह्मचर्यमुवास। त ँ ह जीर्ण ँ स्थविर ँ शयानमिंद्र उपव्रज्योवाच। भरद्वाज यत्ते चतुर्थमायुर्दद्याम्। किमेनेन कुर्या इति ब्रह्मचर्यमेवैनेन चरेयमिति होवाच। त ँ ह त्रीन् गिरिरूपानविज्ञातानिव दर्शयांचकार। तेषा ँ हैकैकस्मान्मुष्टिनाददे। स होवाच। भरद्वाजेत्यामंत्र्य। वेदा वा एते। अनन्ता वै वेदाः।

म्हणजे, भरद्वाज ऋषि तीन जन्मपर्यंत ब्रह्मचर्यानें म्हणजे वेदाध्ययन करून राहिला. तिसऱ्या जन्मीं जेव्हां तो जरेनें व्याप्त असा पडला होता, तेव्हां इंद्र जवळ जाऊन म्हणाला कीं, हे भरद्वाजा, तुला आणखी एक जन्म दिला तर तूं काय करशील? ऋषीनें उत्तर केलें कीं, ब्रह्मचर्यानेंच मी राहीन. तेव्हां इंद्रानें त्यास तीन पर्वत दाखविले आणि तिन्ही पर्वतांतून एकेक मूठ माती हातांत घेऊन म्हणाला कीं, तूं अध्ययन केलेले वेद एवढेच आहेत, बाकीचे वेद अनन्त व पर्वतप्राय पडले आहेत. वेद नित्य म्हणजे त्रिकालाबाधित असून, त्यांतील सिद्धान्त सर्वव्यापक आहेत. अनादिकालापासून सांप्रतकालापर्यंत व भविष्यत्कालींहि ज्या ज्या गोष्टी घडल्या व घडतील, आणि जीं जीं मतें स्थापित झालीं व होतील त्या सर्वांचीं प्रमेयें वेदांत येऊन गेलेलींच आहेत. अनेक आचार्यांनीं जीं तत्त्वें प्रतिपादन केलीं व महाराष्ट्रकविवर्यांनीं ज्या सिद्धान्तांचा प्रसार केला त्या सर्वांचें मायपोट वेद हेंच आहे. ह्या वेदांचे नित्यत्वामुळें आर्यलोकांस अपूर्व पारमार्थिक वतन प्राप्त झालें आहे.

या अनन्त वेदांपैकीं जितके उपलब्ध झाले तितके एकत्र करून शाखोपशाखा, कांडें इत्यादि वर्गीकरण व्या-

सानीं केलें. श्रुतीचा व मुख्यत्वेंकरून ज्ञानकांडाचा मुख्य विषय म्हटला म्हणजे अद्वैतनिरूपण होय. कोणत्याहि शास्त्राचा विषय होण्यास त्याचे ठायीं अनन्यलभ्यत्व हा गुण पाहिजे, म्हणजे, तो विषय दुसऱ्या साधनांनीं उपलब्ध होतां कामा नये. रोगाची चिकित्सा करून औषधोपाय योजणें हा वैद्यकाचा उद्देश जसा अन्य रीतीनें सिद्ध होत नाहीं, किंवा ग्रह, तारे इत्यादिकांच्या गतीचें व स्वरूपांचें ज्ञान ज्योतिःशास्त्राशिवाय होत नाहीं, त्याप्रमाणें अद्वैतमताचें निरूपण फक्त श्रुतीमध्येंच नजरेस येतें.

नावेदविन्मनुते तं बृहन्तम् ।

—तैत्तिरीय ब्राह्मण

तं त्वौपनिषदं पुरुषं पृच्छामि ।

—बृहदारण्यक

म्हणजे बृहत् असा जो आत्मा त्याचें ज्ञान वेद न जाणणारास होत नाहीं. उपनिषदांत वर्णिलेला जो पुरुष त्यासच आत्मस्वरूप विचारितों. आत्म्याचें ज्ञान वेदनिरूपित मार्गानेंच संभवतें; म्हणून प्रत्यक्ष, अनुमान, उपमान व शाब्द या प्रमाणांपैकीं आगमानेंच आत्मप्रतीति होते.

वेदाः प्रमाणम्

हें तत्त्व फारच महत्त्वाचें असून, त्यावरून वेदांचें स्वतःप्रामाण्य सिद्ध होतें; म्हणजे श्रुतिप्रदिपादित मतांच्या सिद्धीकरितां अन्य साधनांची गरज नाहीं. तर्कशास्त्रांत प्रामाण्यवाद फार मोठा असून, त्यांत श्रुतींचें स्वतःप्रामाण्य उत्कृष्ट रीतीनें निरूपित केलें आहे.

वैदिकं वाक्यं ईश्वरोक्तत्वात् सर्वमेव प्रमाणम् ।

—तर्कसंग्रह

म्हणजे वेदवाणी ईश्वरापासून निघाली, याकरितां ती प्रमाणभूत मानिली पाहिजे. हें प्रमेय इतकें महत्त्वाचें आहे कीं, वेद पौरुषेय म्हणजे मनुष्यांनीं केले असें जर कोणी म्हणेल किंवा श्रुतीशिवाय इतर आधारांनीं आत्मा सिद्ध होतो असें म्हणेल तर त्यास अद्वैतमताचें व आर्यधर्माचें तात्पर्य समजलें नाहीं, असें म्हणणें भाग आहे. आतां शारीरक भाष्यांत सर्वत्र अनुमान-प्रमाणाचा जो अंगीकार केला आहे, त्याचा उद्देश इतकाच कीं, तेणेंकरून श्रुतिवाक्याचा अर्थ दृढ व्हावा व शिकणाऱ्याच्या बुद्धीमध्यें आरूढ व्हावा. आत्मसिद्धि केवळ अनुमानानें सिद्ध होत नाहीं. कारण,

निर्विकल्पमनन्तं च हेतुदृष्टांतवर्जितम्

—**अमृतबिंदूपनिषद्**

म्हणजे सर्वव्यापक असा आत्म्यामध्यें कांहींएक धर्म राहत नसल्यामुळें तर्कशास्त्राप्रमाणें प्रतिज्ञा, हेतु, दृष्टान्त, उपनय व निगमन या पांच अवयवांची Syllogism घटना न होऊन इष्टसिद्धि होत नाहीं; कारण आत्मा निर्धर्मक असल्यामुळें हेतु संभवत नाहीं आणि अद्वितीय असल्यामुळें दृष्टान्त सांपडत नाहीं. तेव्हां श्रुतिवचनांवरून आत्मस्वरूप समजून घेऊन अनुमानानें तदर्थ दृढ करून अनुभव घ्यावा.

आत्मा वाऽरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यः

—**बृहदारण्यक**

या वचनांत साक्षात्कार करण्यास योग्य असा जो आत्मा त्याचें श्रुतिवाक्यांवरून श्रवण करून अनुमानानें मनन करावें, असें सांगितलें आहे. शिवाय अनुमा-

नानें फार झालें तर सामान्यस्वरूप समजेल परंतु विशिष्ट लक्षण कळत नाहीं.

क्षित्यादिकं सकर्तृकं । कार्यत्वात् । घटवत् ।

ही हेतुदृष्टान्तयुक्त प्रतिज्ञा आहे. पृथिवी हें घटाप्रमाणें कार्य आहे, म्हणून घटाचा जसा कुंभार हा कर्ता तसा पृथिवीचाहि कोणी असला पाहिजे. या अनुमानावरून जरी सामान्यत्वेंकरून ईश्वराची सिद्धि झाली, तरी स्वप्रकाशकत्वादि विशेषांचें निरूपण होत नाहीं.

रूपलिंगादिराहित्यान्नास्य मान्तरयोग्यता ॥
तं त्वौपनिषदेत्यादौ प्रोक्ता वेदैकमेयता ॥

—न्यायसंग्रह

म्हणजे आत्म्यास रूपादि लक्षणें नसल्यामुळें इतर प्रमाणें लागू पडत नाहींत, याकरितां ' तं त्वौपनिषदं पृच्छामि ' इत्यादि श्रुतिवचनांवरूनच आत्मा प्रमितीस पात्र होतो.

असा जो अतींद्रिय आत्मा तो श्रुतीचाच विषय असून, त्याचा साक्षात्कार विशेष उपासना केल्याशिवाय घडत नाहीं. तैत्तिरीय उपनिषदांत अन्न, प्राण, मन, विज्ञान आणि आनन्द अशा क्रमानें उपासना सांगितल्या आहेत. बृहदारण्यक उपनिषदांत प्रणव, हृदय, सत्य, मन, विद्युत्, वाक्, वैश्वानराग्नि, तप, अन्न, प्राण हा क्रम वर्णिला आहे. छांदोग्य उपनिषदांत तेवीस उपासनाविषय वर्णिले असून, सनत्कुमार ऋषीनें नारदास ध्यानाची उपासना करण्यास उपदेश केला आहे.

ध्यायतीव पृथिवी ध्यायतीवान्तरिक्षं ध्यायतीव द्यौः
ध्यायंतीवापो । ध्यायंतीव पर्वताः...... ध्यानमुपासस्व ।

—छांदोग्य उपनिषद्

3143

म्हणजे हे नारदा, पृथिवी, आकाश, स्वर्ग, उदक, पर्वत इत्यादि सर्व पदार्थ जणूं काय ध्यानच करीत आहेत, याकरितां तूं ध्यानाची उपासना कर. ही उपासनांची परंपरा अत्यन्त मनोवेधक असून त्यावरून प्राचीन ऋषिवर्यांची आत्मज्ञानप्रवीणता व्यक्त होते. कर्म आणि उपासना यांमध्यें दृढ असल्याशिवाय ब्रह्मसूत्रांचें किंवा उपनिषदांचें विज्ञानच होत नाहीं. उपनिषदांत वर्णिलेले उपासनाविषय फारच कठिण आहेत, म्हणून प्रथमतः नेत्रादि इंद्रियांस ग्राह्य अशा पौराणिक सगुण देवतांची बाह्योपचारांनीं उपासना करावी, नन्तर निर्गुण उपासनेचा अभ्यास करावा. शिव, विष्णु इत्यादि देवता परमात्म्याचीं सोपाधिक रूपें असून, त्यांच्या उपासनेनें आत्मसाक्षात्काराची भूमिका तयार होते. जसें एकाद्या पुलाच्या कमानी तयार करावयाच्या असल्यास प्रथम दगडांच्या राशि करितात व कमान झाल्यावर ती राशि मोडून टाकितात, तद्वत् प्रतिमापूजेची गोष्ट आहे. उपासना हें योगाचें प्रधान अंग असल्यामुळें योगाभ्यासाची प्रतिष्ठा अद्वैतशास्त्रांत फार सांगितली आहे.

तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ॥
कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥ १

—भगवद्गीता

म्हणजे तपस्वी, ज्ञानी व कर्मठ यांपेक्षा योगी अधिक आहे. आधुनिक कालीं प्राणायाम करून कुंभकावस्था ज्याची पुष्कळ वेळ टिकते त्यालाच योगी म्हणण्याची चाल पडून गेली आहे, तथापि योगी म्हणजे उपासक समजावा. कर्मानें जशी चित्तशुद्धि होते, तशी उपासनेनें मन

व वासना यांचा निरोध होऊन आत्मप्रतीति होते.

आतां शरीरांतील ‘ मी ’ म्हणणारा, ‘तत्वमसि’ या महावाक्यांतर्गत त्वं पदार्थानें उपलक्षित जो आत्मा तो कोण आहे याचा विचार करूं. देह हाच आत्मा आहे, असें भरतखंडांत चार्वाकानुयायी मात्र म्हणतात, त्याशिवाय इतर मतवादी देहास आत्मा समजत नाहींत.

अशब्दमस्पर्शमरूपमव्ययम्। तथाऽरसं नित्यमगंधवच्चयत् ॥१

याप्रमाणें कठोपनिषदांत आत्म्याचें वर्णन आहे. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे धर्म आत्म्यामध्यें मुळींच नसल्यामुळें, पंचमहाभूतात्मक जो देह त्याला आत्मा म्हणतां येत नाहीं. शब्द आकाशाचा गुण असून श्रोत्रानें ग्राह्य होतो, स्पर्श वायूचा धर्म असून त्वचेचा विषय होतो, रूप तेजाचा गुण असून चक्षुरिंद्रियानें त्याचें ज्ञान होतें, रस उदकाचा धर्म असून जिव्हेनें चाखतां येतो व गंध पृथ्वीचा गुण असून त्याचें ग्रहण घ्राणेंद्रियानें होतें. शिवाय ‘ माझा’ देह असें आपण म्हणतों यावरून ‘मी’ म्हणणाराहून देह निराळा व देहाचा स्वामी आत्मा हें सिद्ध होतें. आतां ‘ मी ’ प्रभाकर, ‘ मी ’ ब्राह्मण, ‘मी’ सोनार, ‘मी’ संन्यासी इत्यादि वचनांत नाम, वर्ण, व्यवसाय, आश्रम हे स्थूलदेहाचेच निरनिराळे धर्म असून आत्म्यास लागू होत नाहींत, आणि हे धर्म नष्ट केले असतांहि आत्मा कायम राहतो. ‘ मी ’ पुष्ट, ‘ मी ’ कृश, या वचनांत देहाशीं अभिन्नत्वाचा प्रत्यय जो येतो, तो केवळ देहाच्या अध्यासामुळेंच उत्पन्न होतो.

देह जसा आत्मा नव्हे, तशीं इंद्रियेंहि आत्मा नसून केवळ ज्ञानाचीं साधनें आहेत. कारण चक्षु, कर्ण इत्या-

दि ‘ माझे ’ आहेत असें आपण म्हणतों, यावरूनच आत्मा निराळा असें सिद्ध होतें. शिवाय एकादें इंद्रिय नष्ट झालें तरी मीपणा कायम रहातो. इंद्रियसमुदायास जर आत्मा म्हणावें, तर एक इंद्रिय नष्ट झाल्याबरोबर आत्मबुद्धि नाहींशी झाली पाहिजे. जर प्रत्येक इंद्रिय आत्मा आहे असें म्हटलें, तर बहुनामकत्वामुळें विरुद्ध क्रिया आवश्यक होऊन शरीराचा नाश होईल.

मन व बुद्धि हीं आत्मा नव्हत, कारण दोन्ही इंद्रियें आहेत व दोहोंचाहि अभाव झाला तरी आत्मत्व क्षय पावत नाहीं.

अन्यत्रमना अभूवन्नादर्शमन्यत्र मना अभूवन्नाश्रौषम् ।

—बृहदारण्यक

म्हणजे माझें मन जाग्यावर नव्हतें, म्हणून मीं पाहिलें नाहीं, माझी बुद्धि ठिकाणावर नव्हती, म्हणून मीं ऐकिलें नाहीं, इत्यादि प्रयोगांवरून आत्मा निराळाच असला पाहिजे. अहंकार देखील आत्मा नव्हे, कारण एथें ‘अहं’ या पदानन्तर क्रियावाचक पद असल्यामुळें ‘ अहं असें करणें ’ हा अर्थ निष्पन्न होतो, म्हणून तो आत्म्याचा वाचक होऊं शकत नाहीं. आतां सर्व इंद्रियांचा लोप होतो, अशा सुषुप्ति अवस्थेंत प्राण कायम असतो, तथापि त्यासहि आत्मा म्हणणें योग्य नाहीं; कारण प्राण आपोमय असल्यामुळें जडधर्मविशिष्ट होतो; आत्मा तर अजड आहे.

आतां चक्षुरादि ज्ञानेंद्रियांनीं मी जाणतों, वागादि कर्मेंद्रियांनीं अभिवन्दनादि क्रिया करितों, मनानें सुखदुःखांचा उपभोग घेतों, पुण्याचरणानें स्वर्गास जातों, पापाचरणा-

नें नरकांत पडतों—या स्थलीं ‘ मी ’ म्हणणारा कोण? एथें असें ध्यानांत आणिलें पाहिजे कीं, आत्म्याचा देहाशीं जो संबंध घडतो तो कर्मनिमित्त होतो.

अस्ति खल्वन्योऽवरो भूताख्यः । योऽयं सितासितैः
कमफलैराभि भूयमानः सदसद्योनिमापद्यते ।

—**मैत्रेयी ब्राह्मण**

स्थूलदेहाशिवाय प्राण्यास लिंगदेह म्हणून प्राप्त होत असतो. मरण आल्याबरोबर, जीवात्मा लिंगदेहामध्यें प्रविष्ट होतो. पृथिवी इत्यादिकांचे सूक्ष्म परमाणू पंच ज्ञानेंद्रियें, पंच कर्मेंद्रियें, पंच प्राण, मन, बुद्धि इत्यादिकांचीं सूक्ष्म रूपें इतकीं मिळून लिंगदेह बनतो. हा गौण भूतात्मा अंतर्गत पूर्वसंस्काराच्या योगानें पुण्यपापादि कर्में करून सुखदुःखाचा अनुभव घेत घेत या देहांतून त्या देहांत प्रवेश करितो. म्हणून ज्ञानेंद्रियांनीं जाणणारा, कर्मेंद्रियांनीं क्रिया करणारा, ‘ मी ’ कर्ता ‘ मी ’ भोक्ता, असें म्हणणारा मुख्य आत्मा नसून मिथ्यात्मा होय. अशा रीतीनें पहातां जीवात्मा सर्व इंद्रियांचे द्वारा कर्ता व विषयभोक्ता ‘ मी ’ अशा अहंभावानें बद्ध होऊन कर्तृत्वभोक्तृत्वभाव आपले शिरावर बळेंच ओढून पराधीन होऊन बसतो. जीवात्मा ‘ मी ’ आंधळा, ‘ मी ’ पंगू, असें म्हणतो. खरोखर पहातां आंधळे झाले डोळे, व पंगू झाले पाय; हीं दोन्ही इंद्रियें आत्म्याहून निराळीं असून इंद्रियांचा भाव आपले शिरावर घेऊन बळेंच ‘ मी ’ आंधळा, ‘ मी ’ पांगळा बनतो. दुसऱ्याची मालमत्ता व अधिकार कोणी उगीच बळकावूं इच्छिल्यास परिणामीं मार खाणें कपाळीं-

च आहे. त्याप्रमाणें कर्ता भोक्ता निराळाच असून जीव कर्तृत्वभोक्तृत्व आपल्यावर ओढून व्यर्थ सुखदु:खाचा अनुभव घेतो. स्थूलदेहास कोणत्याहि कार्याकडे नेणारा हा लिंगदेहप्रधान भूतात्मा संकल्प व अहंकार यांनीं वेष्टिलेला असून त्याचें वास्तव्य हृदयकमलामध्यें असतें.

हृदि ह्येष आत्मा । —प्रश्नोपनिषद्

म्हणजे हा भूतात्मा हृदयांत रहातो, म्हणून रावापासून रंकापर्यंत व महापंडितापासून अक्षरक्षत्रूपर्यंत, कोणासहि 'तूं कोण?' असें विचारिलें असतां जो तो अमुक असें सांगून हृदयावर हात ठेवितो. आणखी असा चमत्कार आहे कीं, लिंगदेहास स्त्रीपुंभाव मुळींच नसतो.

नैव स्त्री न पुमानेष नैव चायं नपुंसकः ॥
यद्यच्छरीरमादत्ते तेन तेन सयुज्यते ॥ १

—श्वेताश्वतर उपनिषद्

म्हणजे जीवात्मा स्त्री पुरुष वगैरे कांहींएक नसतो, तर ज्या देहाशीं संलग्न होतो त्या देहाच्या स्त्रीपुंभावामुळें आपणावर स्त्रीत्वाचा किंवा पुरुषत्वाचा आरोप करितो. मुक्ताबाई नग्न नाहतांना पाहून चांगदेव परत फिरला असतां तिनें त्याची कशी निर्भत्सना केली तें इतिहासज्ञांस ठाऊक आहे. ज्ञानी लोक देहातीत असल्यामुळें त्यांची स्त्रीपुंभावबुद्धि समूळ नष्ट होते.

यावरून असें लक्षांत येईल कीं, स्थूलदेह व लिंगदेह यांहून विलक्षण जो तो मुख्यात्मा जाणावा. हाच अद्वितीय व स्वप्रकाशक असून श्रुतीचा प्रधान विषय होय. आत्मसाक्षात्कार होण्यास आत्म्याची उपासना केली पाहिजे.

नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन ।

यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनूं स्वाम्।

—मुंडकोपनिषद्

फक्त श्रुतिवचनांवरून आत्मप्रातीति होत नाहीं, बुद्धीनें होत नाहीं, व अनेक ग्रंथ वाचल्यानेंहि होत नाहीं. जो आत्म्याची स्वतंत्र उपासना करितो, त्याच्यापुढें आत्मा स्वकीयरूप व्यक्त आहे.

सत्येन लभ्यस्तपसा ह्येष आत्मा सम्यग्ज्ञानेन ब्रह्मचर्येणनित्यम्॥
अन्तःशरीरे ज्योतिर्मयोहि शुभ्रौ यं पश्यंति यतयःक्षीणदोषाः॥ १

—मुंडकोपनिषद्

सत्य, इंद्रियें आणि मन यांचा जय, वास्तविक ज्ञान, ब्रह्मचर्य, इत्यादि साधनांच्या सतत अभ्यासानें आत्मा प्राप्त होतो. क्रोधादि चित्ताचे मल धुऊन टाकून स्वप्रकाश व तेजस्वी अशा आत्म्यास योगी हृदयकमलामध्यें पहातात.

आत्मविद्येचे मुख्य प्रवर्तक श्रीमत् शंकराचार्य व विद्यारण्यस्वामी होत. वेदांचा अर्थ व तदन्तर्गत सिद्धांतांची एकवाक्यता हें कठिण काम या महापुरुषांनीं केलें. या महापुरुषांनीं हे अवघड प्रयत्न सिद्धीस नेले नसते, तर जनसमुदायास श्रुतींचें रहस्य कधींच कळलें नसतें. सर्व वेद, कल्प, सूत्रें, षड्दर्शनें इत्यादि अवगत असल्याशिवाय व वेदप्रतिपादित तत्त्वांचा प्रत्यक्ष अनुभव घेतल्याशिवाय श्रुत्यर्थ ठरविणें अशक्य होय. म्हणून आत्मविद्येची ऐतिहासिक माहिती होण्यास या विभूतींचा वृत्तांत समजणें अवश्य आहे.

अद्वैतमतावर आजपर्यंत जे जे आक्षेप आले व पुढें येतील त्यांचें निरसन बहुधा शंकराचार्यांचे अलौकिक चरित्रावरूनच होईल. त्यांच्या आयुष्याची मर्यादा जर

अल्पावधीची होती, तरी तितक्या अवधींतच प्रचलित मतांचें व दर्शनाचें खंडन झालें. आचार्यांचें चरित्र अत्यंत मनोवेधक व केवळ अध्यात्म असून, त्यांचा बहुतेक काल अद्वैतमतांचें प्रतिपादन करण्यांत व अनेक मतवाद्यांशीं वाद करण्यांतच गेला. परमतखंडनास व स्वकीयमतसमर्थनास आवश्यक जें तर्कशास्त्र त्यामध्यें त्यांचें नैपुण्य अप्रातम होतें. पूर्वमीमांसक, सांख्यवादी, तार्किक, पातंजल, आर्हत, शैव, वैष्णव इत्यादि सर्व पंडितांशीं वाद चालतांना काय काय पूर्वपक्ष उत्तरपक्ष झाले हें समजणें फार महत्त्वाचें असल्यामुळें पुढील चरित्रांत मुख्यत्त्वेंकरून त्यांचेंच दिग्दर्शन होईल. तेणेंकरून आचार्यांनीं श्रुति, युक्ति व अनुभव या तिन्ही साधनांचा अवलंब करून स्वपक्षाची कशी सिद्धी केली हें सहज ध्यानांत येईल.

शंकराचार्यांचा आजा विद्याधिराज हा तैत्तिरीय शाखाध्यायी ब्राह्मण केरल देशांत कालटी नांवाच्या गांवांत रहात असे. त्याचा पुत्र ज्ञानानें शिवाप्रमाणें व बुद्धीनें बृहस्पतीप्रमाणें असल्यामुळें ‘ शिवगुरु ’ हें त्याचें अन्वर्थ नाम होतें. ब्रह्मचर्याश्रमांत गुरूची अनन्य भावानें भक्ति, प्रातःकाळीं व सायंकाळीं अग्नीची सेवा, वेदाध्ययन, वेदार्थविचार इत्यादि रीतीनें शिवगुरु कालक्षेप करी. ब्राह्मणाची मुख्य देवता जो आदित्य त्याची उपासना तो नैष्ठिकपणें चालवी.

उद्यन्तमस्तंयन्तमादित्यमभिध्यायन् कुर्वन् ।
ब्राह्मणो विद्वान् सकलं भद्रमश्नुते ।

—तैत्तिरीयारण्यक

सूर्य उदयास येतांना व अस्तास जातांना त्याचें ध्यान करणाऱ्या ज्ञानी ब्राह्मणास कैवल्याची प्राप्ति होते. गायत्रीमंत्रांत निर्दिष्ट केलेला सविता सगुणदृष्टीनें सूर्य असून निर्गुणदृष्टीनें ब्रह्म होतो.

याप्रमाणें कालक्रमण चाललें असतां शिवगुरूची षडंग वेदविद्या परिपूर्ण झाली व गुरूनें त्यास घरीं जाण्यास आज्ञा केली. परंतु शिवगुरूचें वैराग्य अखंड होतें. गुरूनें त्यास सांगितलें कीं गृहिणीसमवेत धर्माचरण करून व संतति उत्पन्न करून पितृऋणांतून मुक्त होणें अवश्य आहे. यावर शिवगुरूनें उत्तर केलें कीं,

ब्रह्मचर्यं समाप्य गृही भवेद्गृहाद्वनीभूत्वा प्रव्रजेत ।

म्हणजे ब्रह्मचर्य समाप्त करून, गृहस्थाश्रमाचा अवलंब करावा, नंतर वानप्रस्थाश्रम संपवून संन्यास घ्यावा हा नियम मध्यमाधिकारी पुरुषासच लागू आहे, परंतु मुख्याधिकारी पुरुष शुद्धसत्त्व आणि उत्कृष्ट विरागवान् असतो, म्हणून त्यास हा क्रम लागू नाहीं. शिवगुरूची अशी विरक्त स्थिति झाली असतां, विद्याधिराज तेथें येऊन मोठ्या कष्टानें मुलाचें मन वळवून त्यास घरीं घेऊन गेला. नैष्कर्म्यसिद्धि या ग्रंथांत असें म्हटलें आहे कीः—

शोध्यमानं तु तच्चित्तमीश्वरार्पितकर्मभिः ॥
वैराग्यं ब्रह्मलोकादौ व्यनक्त्यथ सुनिर्मलम् ॥ १

म्हणजे ईश्वरार्पित कर्में करून चित्तशुद्धि झाली म्हणजे पापाचा क्षय होऊन फिरून पापाकडे प्रवृत्तिच घडत नाहीं, आणि अखंड वैराग्य उत्पन्न होणें हें पापक्षयाचें मुख्य चिन्ह होय. गृहीं गेल्यावर विद्याधिराजानें पुत्राच्या अध्यायनाची परीक्षा केली. शिवगुरूनें जटान्त वेद म्हणून

दाखविलें आणि भट्टपाद, प्रभाकर, गौतम, कणाद, पतंजलि यांच्या शास्त्रांत पूर्वपक्ष करून समाधानेंहि तात्काल केलीं, तेणेंकरून विद्याधिराजास अत्यन्त सामाधान वाटलें.

नन्तर शिवगुरूचा विवाह झाला, स्त्रियेचें नांव अम्बा असें होतें. शिवगुरु धनसंपन्न असून गृहस्थाश्रमामध्यें त्यानें आपला काळ परोपकारांत, वेदपठनांत, आणि श्रुतिस्मृतिप्रतिपादित कर्में करण्यांत घालविला. त्यास या आश्रमांत दुःख होण्यास एकच कारण होतें, तें संततीचा अभाव हें होय. अशा स्थितींत निम्में आयुष्य गेल्यावर शिवगुरु अम्बा यांनीं शंकराची आराधना अत्यंत भक्तीनें केली. तेव्हा एके रात्रीं देवानें त्यांच्या स्वप्नांत येऊन विचारिलें कीं सर्वगुणसंपन्न व सर्वज्ञ परंतु अल्पायुषी असा एक पुत्र पाहिजे किंवा अवगुणी व अज्ञ असे पुष्कळ पुत्र पाहिजेत? तेव्हां शिवगुरुनें सर्वज्ञ व जगविख्यात असा एकच पुत्र मागितला, आणि ‘ तथास्तु ’ असें बोलून देव अंतर्धान पावले. प्रातःकालीं त्यानें सर्व वृत्तांत स्त्रियेस निवेदन केला. मग त्यांनीं अतिथीपूजन, अन्नदान वगैरे मोठ्या प्रेमानें केलें आणि ईश्वरकृपेनें अम्बेस गर्भधारण झालें. माध्याह्नीचा सूर्यताप जसा सर्व जगास प्रखर भासतो, तसा गर्भ वृद्धि पावूं लागला असतां तिला अधिकाधिक असह्य वाटूं लागला. पुष्पहार किंवा दागिने ह्यांचें तिला ओझें होऊं लागलें, व दोहद असे तीव्र झाले कीं चित्तास कांहीं केल्या समाधान होईना. एक पदार्थ मागावा, तो आणून दिल्यावर दुसराच मागावा, दुसरा प्राप्त झाल्यावर तिसऱ्याची अपेक्षा करावी, अशी स्थिति झाली. तिला नानाप्रकारचीं स्वप्नें पडूं लागलीं. श्वेतवृ-

पभावर मी बसलें आहें, गंधर्व भोंवतालीं उभे राहून स्तुति करीत आहेत, सरस्वतीच्या सिंहासनावर बसून अनेक मतवाद्यांचा पराजय मी करीत आहें असें तिला वाटे.

समानता सात्त्विकवृत्तिभाजां । विरागता वैषयिक प्रवृत्तौ ॥

—विद्यारण्य

अशी तिची वृत्ति बनली. सत्त्वगुणसंपन्न जेवढें असेल तेवढें तिला आवडे आणि विषयाचा तिटकारा येई. अशी स्थितींत नवमास पूर्ण होतांच ती प्रसूत झाली, पुत्र झाला. प्रसवकालीं सूर्य मेषस्थ, मंगळ मकरस्थ, शनि तुलास्थ, गुरु केंद्रस्थ अशा प्रकारें बहुतेक ग्रह उच्चीचे होते. प्रसवादिवशीं साहजिक वैर करणारे प्राणि म्ह० सर्प नकुल, व्याघ्र मृग, मार्जार मूषक इत्यादिक एकत्र संचार करूं लागले. ते दिवशीं वृक्षलतांनीं फलपुष्पांचा वर्षाव केला. नद्यांचें पाणी भिंगाप्रमाणें स्वच्छ दिसूं लागलें, अद्वैतमताचा आव्हेर करणाऱ्या पंडितांच्या हातून पुस्तकें गळून पडलीं, वेदान्ती हसूं लागले, आणि वेदव्यासास हर्ष झाला. ज्योतिर्विदांनीं जन्मकुंडलि पाहून वर्तविलें कीं

सर्वज्ञ एव भविता रचयिष्यते च ।
शास्त्रं स्वतंत्रमथ वागधिपांश्च जेता ॥

—विद्यारण्य

म्हणजे हा मुलगा सर्वज्ञ होईल, स्वतंत्र शास्त्र रचील, महापंडितांस जिंकील आणि जगप्रसिद्ध होईल.

हा मुलगा शंकराचार्य होय. आचार्यांस दुसरें वर्ष लागतांच अक्षरज्ञान झालें. तिसरे वर्षीं काव्य पुराणें इत्यादि वाङ्मयांत प्रवेश झाला. त्यांच्या बुद्धीची तीव्रता अशी होती कीं, एक वेळ गुरूनें सांगितलें कीं पाठ झा-

लेंच. चवथ्या वर्षीं त्यांची गति साहित्यशास्त्रांत झाली व अत्यन्त कठिण जें न्यायशास्त्र त्यामध्यें ते प्रवीण झाले. न्यायशास्त्र हें वादविवादास अत्यन्त अवश्य असून अध्यात्म शास्त्रांत तर त्यावांचून प्रवेश होणें दुर्लभ आहे. तर्कशास्त्रांत आचार्यांचें वाग्वैभव अपूर्व नजरेस येऊं लागलें. वाणीस न्यायशास्त्राच्या अभ्यासानें अद्भुत तरतरी येते हें अधुनिक कालीं अनेक उदाहरणांनीं स्पष्ट झालें आहे.

या समयास शिवगुरूचें प्राणोत्क्रमण झालें. नंतर उपनयनविधि होऊन आचार्य गुरुगृहीं गेले. त्यांचें अलौकिक बुद्धिमत्त्व पाहून गुरूंस परम हर्ष झाला. चारहि वेद व षडंगें यांत प्रवीण होऊन अनेक शास्त्रांत त्यांची उत्कृष्ट गति झाली. शंकराचार्य वेदविद्येंत ब्रह्मदेवाप्रमाणें होते. शिक्षादि वेदांगामध्यें गार्ग्यप्रमाणें, वेदवेदांगांतील कथांचें तात्पर्य समजून अर्थ करण्यांत बृहस्पतीप्रमाणें, वेदोक्तकर्माचे विवेचनांत जैमिनीप्रमाणें, आणि वेदवचनांपासून प्राप्त होणारें जें तत्त्वज्ञान त्यामध्यें व्यासाप्रमाणें होते. व्यासाचें जें वाग्वैभव, शब्दचातुर्य व अर्थगांभीर्य तें आचार्यांमध्यें पहिल्या प्रतीचें होतें. आचार्यांच्या वाणीचा ओघ चालला, म्हणजे मूर्तिमान् व्यासच आहेत कीं काय असें वाटे. आचार्यांनीं तर्कशास्त्राचें उत्तम अध्ययन केलें होतें, सांख्यशास्त्राशीं त्यांचा अप्रतिम परिचय होता, योगविद्येंत ते निष्णात होते, आणि भट्टपाद ( कुमारिल ) ह्यानीं रचिलेल्या शांबर भाष्यावरील वार्तिकांचें अर्थतत्त्व त्यांस पूर्ण कळलें होतें. परंतु या सर्व विद्यांपासून व दर्शनांपासून जें सुख प्राप्त तें अद्वैतविद्येपासून होणाऱ्या आनन्दापुढें कस्पटा-

समान समजलें पाहिजे. अद्वैतविद्येंत आचार्यांचें प्राविण्य लोकोत्तर होतें. अद्वैतविद्या सर्व विद्यांमध्यें श्रेष्ठ आहे व ती विद्या एकदां प्राप्त झाली म्हणजे कधींहि विसरत नाहीं.

सर्वा बहिःकला जन्तोरनभ्यासेन नश्यति ॥
इयं ज्ञानकला राम सकृज्जाताऽभिवर्धते ॥ १

—**योगवासिष्ठ**

म्हणजे, वारंवार अभ्यास जर केला नाहीं तर सर्व बहिरंग कला विसरून जातात, परंतु ज्ञानकला एकदां उत्पन्न झाली म्हणजे ती क्षय न पावतां वाढतच जाते. याकरितां अद्वैतविद्येस अन्तःकला असें म्हणतात. शिवाय अद्वैतविद्या अशा प्रकारची आहे कीं ती आली असतां इतर सर्व विद्यांचें सहज ज्ञान होतें. याविषयीं छांदोग्य उपनिषदांत श्वेतकेतूची कथा आहे. गुरूपाशीं जाऊन ब्रह्मचर्यव्रतानें राहून विद्या संपादन करण्यास उद्दालकऋषींनें श्वेतकेतूस सांगितलें. तेव्हां श्वेतकेतु बारा वर्षें गुरूपाशीं राहून चार वेद सार्थ पठन करून परत आला. तो घरीं आला तेव्हां त्याची वृत्ति चमत्कारिक आढळून आली. ती अशी कीं कोणाशीं भाषण न करितां स्तब्ध राहून अभिमानांत सदा गर्क असा तो दिसे. ही विलक्षण स्थिति पाहून उद्दालकानें मुलास विचारिलें कीं जो उपदेश ऐकिला असतां न ऐकिलेल्या गोष्टीहि ऐकूं येतात, जो जाणिला असतां न जाणिलेल्या वस्तुहि जाणतां येतात, असा उपदेश गुरूपासून मिळाला काय? कारण, अशा तऱ्हेचा उपदेश जर मिळाला नाहीं, तर सर्व वेद व शास्त्रें शिकून कांहींएक उपयोग नाहीं. ही अद्भुत गोष्ट श्रवण केल्यावर श्वेतकेतूनें बापास

विचारिलें कीं हें कसें होईल ? तेव्हां उद्दालक म्हणाले कीं मृत्तिकेचें ज्ञान झालें म्हणजे सर्व घटादिकांचें ज्ञान होतें, सुवर्णाचें ज्ञान झालें म्हणजे सर्व सुवर्णालंकारांचें ज्ञान होतें, लोहाचें ज्ञान झालें म्हणजे सर्व लोहपात्रांचें ज्ञान होतें, तद्वत् संपूर्ण जगताचें उपादान कारण जो आत्मा त्याचें ज्ञान झालें असतां सर्व जगाचें ज्ञान होतें. अशा रीतीनें अद्वैतविद्येचें रहस्य समजतांच अभिमान नष्ट होऊन श्वेतकेतूस परमानंदाचा अनुभव प्राप्त झाला.

याप्रमाणें गुरुगृहीं ब्रह्मचर्यानें राहून वेद, शास्त्र, इतिहास, पुराण या चतुरंग विद्यांमध्यें आचार्य निपुण झाले. महाभारतान्तर्गत शान्तिपर्वांतील वचनांचा अभ्यास करून आचार्यांची अन्तरबाह्य शुद्धि झाली होती. पूर्वमीमांसादि दर्शनें पंडितांबरोबर पुनःपुनः वाचून त्यांस सर्वज्ञ ही पदवी प्राप्त झाली. नंतर आचार्य घरीं आले व त्यानीं मातृसमागमांत कांहीं काल घालविला. मातृसेवा, वेदपठन, अग्नि व सूर्य या देवतांचें सायंप्रातः पूजन इत्यादि कर्मांत ते निमग्न झाले. आचार्य रूपगुणसंपन्न असून बाल-तरुण-वृद्धांस अत्यंत प्रिय झाले. नंतर आचार्यांनीं संन्यास घेण्याकरितां मातेची आज्ञा मागितली. तेव्हां शोकाकुल होऊन माता म्हणाली:—

त्यज बुद्धिमिमां शृणुष्व मे गृहमेधी भवपुत्रमाप्नुहि ॥
यज चक्रतुभिस्ततो यतिर्भवितास्यंग सतामयं क्रमः ॥ १

—विद्यारण्य

बाळा, ही सन्यासबुद्धि टाकून दे, गृहस्थाश्रम घे. पुत्रोत्पत्ति होऊं दे. आणि नंतर संन्यास घे. शहाण्या लोकांचा हाच मार्ग आहे. बाळा, तूं माझा एकटा मुलगा अ-

सून संन्यस्त झालास तर मीं कसे रे दिवस कंठावे? वृद्धापकालीं मला टाकून कसा रे जातोस? मी मृत झालें असतां और्ध्वदेहिक क्रिया कोण करील? ज्ञानी असून तुला माझी दया कशी रे येत नाहीं? त्यावेळीं आचार्य कांहीं न बोलतां माध्याह्नस्नानास नदीवर गेले आणि योगबलानें सुसर उत्पन्न केली. सुसरीनें पाय धरिला असतां 'आई, आई' म्हणत ते मोठ्यानें रडूं लागले. अम्बाबाईस वर्तमान समजतांच ती धांवत आली व फारच शोक करूं लागली, तेव्हां आचार्य म्हणाले कीं सर्वसंन्यास केला असतां सुसर पाय सोडील. कारण

धर्मेण पापमपनुदति । तस्माद्धर्मं परमं वदन्ति ॥

—नारायणोपनिषद्

म्हणजे, दुःख हें केवळ पापाचें फल होय, धर्माचरणानें पाप दूर होतें, याकरितां धर्माचरणाची फार प्रतिष्ठा सांगितली आहे. तर, आई, मला लवकर आज्ञा दे. हें मुलाचें भाषण ऐकून आईनें विचार केला कीं पुत्र जिवंत राहिल्यास केव्हां तरी दृष्टीस पडेल, पण आतांच सुसरीनें गिळिला तर फिरून दिसण्याचाहि संभव नाहीं. म्हणून निरुपायास्तव तिनें लागलींच आज्ञा दिली. आज्ञा मिळतांच सर्वज्ञ शंकराचार्यांनीं विरजाहोमादि विधि भावनेनेंच केले.

प्राणापानव्यानोदानसमाना मे शुध्यन्ताम् । पृथिव्यप्तेजोवायुराकाशा मे शुद्धन्ताम् । शब्दस्पर्शरूपरसगन्धा मे शुद्धन्ताम् । ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासँ स्वाहा ।

—नारायणोपनिषद्

प्राणापानादि पंचप्राण, पृथिव्यादि महाभूतें, शब्दस्प-

शब्दादि महाभूतांचे इंद्रियग्राह्य गुण, इत्यादि माझे सर्व अवयव आज्यहोमानें शुद्ध होवोत, पापरहित व पापकारणीभूत रजोगुणरहित होऊन जगत्कारण जें परब्रह्म तद्रूप मी व्हावें म्हणून हवन करितों. इत्यादि परमप्राप्तिसाधक मंत्र म्हणून भावनेनेंच आचार्यांनीं हवन केलें आणि मनानेंच संकल्प करून संन्यास घेतला. कारण

यद्यातुरः स्यान्मनसा वाचा वा संन्यसेत् ।

—**आम्नाय**

म्हणजे, कोणींहि आतुरस्थितींत मनानें किंवा वाणीनें संन्यास ग्रहण करावा. याप्रमाणें आतुरसंन्यास घेतल्याबरोबर सुसरीनें पाय सोडिला आणि आचार्य नदीच्या कांठीं येऊन मातोश्रीसह घरीं गेले. घरीं गेल्यावर तिचें नानाप्रकारानें समाधान करून व 'जेव्हां स्मरण करशील तेव्हां येईन' असें अभिवचन देऊन आचार्य स्वीकृत कार्यासाठीं उत्तरेकडे निघाले.

आचार्य जेव्हां घरून निघाले तेव्हां त्यांच्यामध्यें पूर्ण वैराग्य बाणलें होतें. सद्गुरूचा प्रसाद केव्हां होईल व जगद्विजय केव्हां करीन अशी त्यांस तळमळ लागली होती. कितीहि पंडित असला तरी सद्गुरूवांचून गति नाहीं. आर्यधर्मांत श्रुतिप्रामाण्याची व गुरुप्रसादाची जी प्रतिष्ठा मानिली आहे ती खरोखर विलक्षण आहे व तिच्यामुळें अद्‌भुत कार्य घडून आलें आहे. सर्व पदार्थांत श्रेष्ठ जो आत्मा तो अतींद्रिय असल्यामुळें त्याचें ज्ञान फक्त आगमप्रमाणानें होतें, अनुमानानें होत नाहीं, हें वर सांगितलेंच आहे.

नैषा तर्केण मतिरापनेया । —**कठोपनिषद्**

म्हणजे श्रुतींवरून आत्म्याचें जसें विज्ञान होतें, तसें नुसत्या तर्कानें कधींहि होत नाहीं. म्हणून

तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत् । समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम्
—**मुंडकोपनिषद्**

वेदप्रतिपाद्य जो आत्मा त्याचें अनुभवपूर्वक ज्ञान संपादण्याकरितां समित्पाणि होऊन शमदमादिसंपन्न ब्रह्मनिष्ठाकडे जावें, तरच ज्ञानप्राप्ति होईल. आत्म्याविषयीं नानाप्रकारचे तर्क केल्यानें बुद्धि संशयापन्न होऊन विचित्र भ्रमांत घोटाळून जाते व अद्वैतशास्त्रास अवश्य जी निश्चयात्मकबुद्धि तिचा अभाव होतो. श्रुतिप्रामाण्य मानिल्यापासून व गुरुभक्तीपासून निश्चितबुद्धि होते इतकेंच नव्हे, तर आत्मज्ञानास अवश्य जी श्रद्धा ती उत्पन्न होते. श्रद्धेचें महात्म्य भगवद्गीतेंत पदोपदीं आढळतें.

श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः ॥
ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ॥ १

म्हणजे श्रद्धायुक्त, जितेंद्रिय व भगवद्भक्त अशा पुरुषास आत्मज्ञान सहज होतें व तें ज्ञान मिळालें म्हणजे त्याच्या चित्तास शांति प्राप्त होते. श्रुतीमध्यें नानाप्रकारच्या रूपकांनीं व अलंकारांनीं अनेक प्रमेयें सिद्ध केलेलीं आढळतात, त्यांपैकीं पुढील वचनांत श्रद्धेचें स्वरूप स्पष्ट केलें आहे.

तस्यैवं विदुषो यज्ञस्यात्मा यजमानः श्रद्धापत्नी शरीरमिध्म मुरो वेदिर्लोमानि बर्हिर्वेदः शिखा हृदयं यूपः काम आज्यं मन्युः पशुस्तपोऽग्निर्दमः शमयिता दक्षिणा वाग्घोता प्राण उद्गाता चक्षुरध्वर्युर्मनो ब्रह्मा श्रोत्रमग्नीत् । —**नारायणोपनिषद्**

या वचनांत ब्रह्मनिष्ठ जो योगी त्याचे अवयव य-

ज्ञांगद्रव्यें आहेत असें वर्णन केलें आहे. आत्मा हा यज्ञांतील यजमान होय, आम्याची पत्नी श्रद्धा होय इत्यादि. एथें सर्वेंद्रियसाक्षी जो आत्मा त्या यजमानाची पत्नी श्रद्धा मानिली असल्यामुळें आत्मज्ञानास श्रद्धेची अवश्यकता किती आहे हें सहज कळून येतें.

अद्वैतशास्त्र व योगशास्त्र यांमध्यें तर विद्यासंप्रदायाची अत्यंत अवश्यकता आहे. विद्यासंप्रदाय म्हणजे गुरूपासून ज्ञान संपादन करून शिष्यपरंपरेनें त्याचा प्रसार करणें होय. योगदर्शन व वेदान्तदर्शन हीं विद्यासंप्रदायानेंच आजपर्यंत अविच्छिन्न राहिलीं आहेत. गुरुपरंपरेचें महत्त्व यूरोपीय पंडितांसहि समजून आलें आहे. नागोजीभट्टकृत परिभाषेंदुशेखराचें इंग्रजी भाषांतर प्रसिद्ध करितांना, डाक्तर कीलहार्न यानीं प्रस्तावनेंत अनंतशास्त्री पेंढारकर व चिंतामणशास्त्री थत्ते यांची गुरुपरंपरा नागोजीभट्टापर्यंत पोहोंचविली आहे. तेव्हां अद्वैतविद्या व तिच्याशीं निकटसंबंध असलेली जी योगविद्या या संबंधानें शंकराचार्यांची गुरुपरंपरा पहाणें जरूर आहे, व तेणेंकरून बादरायणकृत ब्रह्मसूत्रांचा अर्थ आचार्यांस न कळतां उगीच कांहीं तरी तर्क लढविले आहेत असे जे आक्षेप प्रिन्सिपाल थीबो यानीं घेतले आहेत त्यांचें निरसन होईल. अद्वैतविद्येचा पाया वेद व विशेषेंकरून उपनिषदें होत, तथापि व्याससूत्रांवरून या विद्येची प्रसिद्धि झाली. व्यासांचे शिष्य शुक, शुकाचार्यांचे शिष्य गौडपादाचार्य, त्यांचे शिष्य गोविंदनाथ व गोविंदनाथांपासून ही विद्या आचार्यांस प्राप्त झाली. ब्राह्मणांच्या नित्य स्नानसंध्येंत पुढील नमन आढळतें:—

शंकरं शंकराचार्यं केशवं बादरायणम् ॥
सूत्रभाष्यकृतौ वन्दे भगवन्तौ पुनःपुनः ॥ १

विष्णूचा अवतार बादरायण ब्रह्मसूत्रकार व शंकराचा अवतार भाष्यकार शंकराचार्य या भगवंतांस नमस्कार असो.

योगविद्येचा पाया वेद आणि मुख्यत्वेंकरून श्वेताश्वतरादि उपनिषदें होत, तथापि, पातंजल योगसूत्रांवरून ही विद्या प्रसिद्ध झाली. शेषापासून ही विद्या प्रथम पतंजलीस प्राप्त झाली, पतंजलीचे शिष्य गौडपादाचार्य, त्यांचे शिष्य गोविन्दनाथ, व गोविन्दनाथाचे शंकराचार्य होत. शिवाय या विद्येसंबंधानें नाथसंप्रदाय प्रसिद्ध असून ब्राह्मणांच्या स्नानसंध्येंतहि तोच आढळतो.

आदिनाथं तु मत्स्येंद्रं गोरक्षं गाहिनिं तथा ॥
निवृत्ति ज्ञानदेवंच नमामि भवतारकम् ॥ १

आदिनाथ जो शंकर त्यापासून मत्स्येंद्रनाथास योगविद्या प्राप्त झाली. त्यांचे शिष्य गोरखनाथ, त्यांचे गहिनीनाथ, त्यांचे निवृत्तिनाथ, त्यांचे ज्ञानदेव व ज्ञानेश्वरांचे मुखानें सामान्यजनांसहि महाराष्ट्रभाषाद्वारें तिचें ज्ञान झालें आहे. आदिनाथापासून मत्स्येंद्रनाथास ही विद्या कशी प्राप्त झाली याविषयीं एक कथाभाग विश्रुत आहे. शंकर पार्वतीस एका बेटांत योगशास्त्र सांगत होते आणि तेथें एक मत्स्य तो उपदेश ऐकत होता. योगविद्या व अद्वैतविद्या पराकाष्ठेच्या चित्ताकर्षक व आनन्दकारक असल्यामुळें, श्रीशंकराचें प्रवचन चाललें असतां तो मस्त्यहि एकाग्रचित्त होऊन निश्चलशरीर झाला. तें शंकरानीं पाहून त्यावर उदकसिंचन केलें व

मत्स्याचें दिव्य शरीर होऊन मत्स्येंद्रनाथ उत्पन्न झाले.

असो. गुरुसंप्रदायानें अद्वैतविद्येचें व योगविद्येचें रहस्य प्राप्त करून घेण्याकरितां आचार्य उत्तरेकडे निघाले. तेव्हां त्यांचें वय दहा वर्षांचें होतें. ते मार्ग क्रमीत असतां

विजनता-वनिता-परितोषितो । विधि वितीर्ण कृतात्मतनुस्थितिः॥
परिहरन् ममतां गृहगोचरां । हृदयगेन शिवेन समं ययौ ॥ १

—विद्यारण्य

म्हणजे, त्यांचेबरोबर सेवा करण्यास विजनता हीच स्त्री होती. कंदमूलादि भक्षण करून शरीरव्यापार चालत होते, गृहसंबंधी सर्व चिंता पळाली होती व हृदयामध्यें अखंड परमात्मा भरला होता.

गच्छन् वनानि सरितो नगराणि शैलान् ।
ग्रामान् जनानपि पशून् पथि सोऽप्यपश्यत् ॥
नन्वैंद्रजालिक इवाद्भुतमिंद्रजालं ।
ब्रह्मैवमेव परिदर्शयतीति मेने ॥ १

—विद्यारण्य

म्हणजे, गारुडी ज्याप्रमाणें नानाप्रकारचे खेळ करून दाखवितो, त्याप्रमाणें वनें, नद्या, शहरें, पर्वत, गांवें, लोक, पशु वगैरे जें जें मार्गांत दृष्टीस पडे तें केवळ परमात्म्याचे मायेचा पसारा होय असें त्यांस वाटे. व्यासानीं ब्राह्मणाचें लक्षण अशाच प्रकारचें केलें आहेः—

कन्थाकौपीनवासास्तु दण्डधृग्ध्यानतत्परः ॥
एकाकी रमते नित्यं तं देवा ब्राह्मणं विदुः ॥ १
येन केन चिदाच्छन्नो येन केन चिदाशितः ॥
यत्र क्वचनशायी स्यात्तं देवा ब्राह्मणं विदुः ॥ २
येन पूर्णमिवाकाशं भवत्येकेन सर्वदा ॥
शून्यं यस्य जनाकीर्णं तं देवा ब्राह्मणं विदुः ॥ ३

म्हणजे अंगावर कफणी व लंगोटी, हातांत दंड, आत्मोपास्तीमध्यें निमग्न, सर्वदा एकटा व आनन्दांत असणारा अशीं ज्याचीं लक्षणें आहेत त्यास 'ब्राह्मण' असें देव म्हणतात. अशा पुरुषास अंगावर कांहीं असलें तरी चालतें, खाण्यास कांहीं मिळालें तरी हरकत नाहीं व कोणतेहि स्थलीं निद्रा येते. आकाशाप्रमाणें सर्वत्र आत्मा व्यापून राहिला आहे असें त्याच्या प्रत्ययास येतें व लोकसमुदाय जेथें जमलेला आहे तें स्थान त्यास शून्यवत् भासतें.

आचार्यांनीं संन्यासलक्षण म्हणून हातांत जो दंड घेतला होता, तो जणूं काय अनेक पाखंडी लोकांनीं हव्या त्या रस्त्यांनीं नेऊन कृश केलेली जी श्रुतिरूप कामधेनु तिला अद्वैतलक्षण जी तिची खरी दिशा त्या दिशेनें नेण्याकरितांच घेतला होता कीं काय असें वाटे. यतिलक्षणास उचित अशी भगवीं वस्त्रें परिधान केलेली आचार्यांची मूर्ति नर्मदातीरास पोहोंचली. नदीच्या कांठीं एका वनांत श्री गोविन्दनाथांचा आश्रम होता. तेथें वृक्षावर मृगचर्म व वल्कलें लटकत होतीं, आणि वीतभर रुंदीचें एक गुहेचें द्वार त्यांच्या दृष्टीस पडलें. त्या ठिकाणीं अनेक शिष्य योगाभ्यासांत निमग्न झालेले पाहून, हीच गुहा गोविन्दनाथांची असावी असा आचार्यांचा निश्चय झाला. नंतर गुहेस त्रिवार प्रदक्षिणा करून आचार्यांनीं परमसंतोषानें गुहाद्वारीं साष्टांग नमस्कार घातला, आणि व्याकरणमहाभाष्य, योगदर्शन, चरक, परमार्थसार इत्यादि ग्रंथांचा कर्ता जो पतंजलि तोच साक्षात् तूं आहेस अशी गोविन्दनाथांची स्तुति केली. हा स्तव ऐकून, तूं कोण आहेस? असा गोविन्दनाथांनीं

प्रश्न केला, तेव्हां आचार्यांनीं पुढील उत्तर दिलें:—

स्वामिन्नहं न पृथिवी न जलं न तेजो ।
न स्पर्शनो न गगनं न च तद्‌गुणा वा ॥
नापींद्रियाण्यपि तु विद्धि ततोऽवशिष्टो ।
यः केवलोऽस्ति परमः स शिवोऽहमस्मि ॥ १

—विद्यारण्य

म्हणजे, हे स्वामिन्, मी पृथ्वी, जल, तेज, वायु, आकाश यांपैकीं कोणीहि नाहीं; तसेंच गंध, रस, रूप, स्पर्श, शब्द हे जे त्या पांच महाभूतांचे गुण त्यांपैकींहि कोणी नव्हें; त्याप्रमाणें घ्राण, जिव्हा, चक्षु, त्वक्, कर्ण हीं जीं त्या गुणांचीं ग्राहक इंद्रियें त्यांपैकींहि कोणी नव्हें; तरी ह्या सर्वांचा निरास करून अवशिष्ट राहिलेला जो केवल परमात्मा तोच मी आहें. या आचार्यांच्या उत्तरांत अद्वैतमताचें उत्कृष्ट विवरण केलें आहे. मी पृथिवी इत्यादि नव्हें ह्या वाक्यांतील उद्देश्य व विधायक पदांचा व्युत्क्रम करूनहि अर्थ लाविला पाहिजे. म्हणजे, पृथिवी, जल इत्यादिकांपैकीं कोणीहि मी नाहीं, असाहि अर्थ केल्यावर, दोन्ही प्रकारच्या सिद्धान्तांवरून पृथिवी, जल इत्यादि पदार्थ आणि मी ह्यांची कणाद—गौतम-मताप्रमाणें व्यावृत्ति होते.

या पृथिवी साऽहं न भवामि । योऽहं स पृथिवी न भवति ॥

म्हणजे, पृथिवी मी नाहीं व मी पृथिवी नाहीं, अशा रीतीनें योजना केली असतां ‘ पृथिवी ’ व ‘मी’ हे शब्द परस्पर व्यावर्तक होतात. तसेंच ही योजना केली असतां यूरोपीय तर्कशास्त्राप्रमाणें या शब्दांत पूर्ण विरोध स्थापित होतो. दुसरें उपनिषत्प्रतिपाद्य जो आत्मा त्याचें

विज्ञान व्यक्त करण्याकरितां इतर मतवाल्यांचें खंडन या श्लोकांत फार सुरेख प्रकारानें केलें आहे. स्थूलदेह पंचमहाभूतात्मक असून तोच आत्मा आहे असें चार्वाकादि पाखंडी लोकांचें जें मत त्याचा निरास पृथिवीपासून तद्गुणा एथपर्यंतच्या दलानें होतो, तसेंच क्रियाशक्तिप्रधान जो प्राण व ज्ञानशक्तिप्रधान जें मन त्यांमध्यें भूतकार्य दृष्टीस पडतें, म्हणून प्राणाचे व मनाचे ठायीं जें आत्मत्व भासतें त्याचा निरास होतो.

आपोमयः प्राणोऽन्नमयं हि सोम्य मनः । —**छांदोग्य**

म्हणजे, हे प्रियकरा, प्राण हा आपोमय अतएव जड होय, आणि मन हें अन्नमय म्हणून जड होय. या रीतीनें क्षणिकविज्ञानवादि पंडितांचें खंडन होतें. 'न गगनं' या वचनानें शून्यवादि माध्यमिकांचें खंडन होतें. मी आंधळा, मी बहिरा, इत्यादि प्रयोगांवरून इन्द्रियांचे ठिकाणीं आत्मत्व भासतें, याचा निरास 'नापीन्द्रियाणि' या दलानें होतो. तेव्हां इतक्या सर्वांचा निरास करून अवशिष्ट जो कर्तृत्वभोक्तृत्वरहित साक्षी तो मी आहें. याप्रमाणें, तूं कोण या प्रश्नाचें आचार्यांनीं अद्वैतासिद्धिपर उत्तर दिलें. निर्वाणदशकामध्यें असेंच उपपादन आढळतें.

न भूमिर्नतोयं न तेजो न वायु-
र्न खं नेन्द्रियं वा न तेषां समूहः ॥

म्हणजे, पृथिवी, जल, तेज, वायु, आकाश, इंद्रिय, किंवा त्यांचा समूह मी नाहीं.—हें अद्वैतसाक्षात्कारदर्शक उत्तर ऐकण्याबरोबर, गोविंदनाथ हर्षित होऊन म्हणालेः

स प्राह शंकर स शंकर एव साक्षा-
ज्जातस्त्वमित्यहमवैमि समाधिदृष्ट्या ॥

—**विद्यारण्य**

म्हणजे, हे शंकरा, तूं साक्षात् शंकराचा अवतार आहेस, असें मला ज्ञानदृष्टीनें समजलें. मग **गोविंदनाथ** गुहेबाहेर आल्यावर आचार्यांनीं त्यांची पादपूजा केली. नंतर उपनिषत्प्रसिद्ध अखंडैकरस परमात्म्याचें संपूर्ण विज्ञान होण्याकरितां **गोविंदनाथाची** अनन्यभावानें सेवा केली. गुरूशिवाय ज्ञानप्राप्ति नाहीं हें मत भरतखंडांत प्रसिद्ध आहे.

यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ॥
तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाश्यन्ते महात्मनः ॥ १

**—श्वेताश्वतर**

म्हणजे, ज्याची ईश्वरावर अनन्य भक्ति असते, व जशी देवावर तशी गुरूवरहि असते, त्या महात्म्या पुरुषास हे (उपनिषत्प्रतिपादित )सिद्धान्त प्रकाशमान् होतात.

**शंकराचार्यांनीं** भक्तिपुरःसर केलेल्या सेवेनें **गोविंदनाथ** संतुष्ट होऊन वेदचतुष्टयांतील वचनांनीं ब्रह्मोपदेश केला. तीं वचनें येणेंप्रमाणें होतः—ऋग्वेदांतील ‘ प्रज्ञानं ब्रह्म ’, यजुर्वेदांतील ‘ अहं ब्रह्मास्मि ’, सामवेदांतील ‘ तत्त्वमसि ’, आणि अथर्ववेदांतील ‘ अयमात्मा ब्रह्म’. **व्यासापासून** गुरूपरंपरेनें प्राप्त झालेलें ब्रह्मसूत्रांचें विज्ञान **गोविंदनाथानें** आचार्यांस करून दिलें. शिवाय योगादि सर्व शास्त्रांचा अभ्यास त्यानीं केला. नन्तर गुरूनीं सर्व निगमांचें सार जीं व्यासमूत्रें त्यांवर भाष्य लिहिण्यास आचार्यांस आज्ञा केली. गुरु म्हणाले कीं, हे सर्वज्ञा शंकरा, तुझ्यासारिखा बुद्धिमान् भूमंडळावर कोणी नाहीं, म्हणून सर्व जगाचा उद्धार करण्याकरितां काशीस जा. याप्रमाणें गुरूची अनुज्ञा मिळाल्यावर, गुरूचे पाय वंदून हृदयांत दृढ धरून आचार्य काशीस गेले. तेथें

विश्वेश्वराचें दर्शन घेऊन कांहीं काल त्या पवित्र क्षेत्रांत त्यानीं वास केला. तेथें अध्ययननिमित्तानें अनेक शिष्य जमले, त्यांमध्यें पद्मपाद (सनन्दन), आनन्दगिरि, चित्सुख इत्यादि प्रमुख होते. एके दिवशीं आचार्य माध्याह्नसंध्येस भागीरथीच्या तीरीं चालले असतां, चार कुत्रे बरोबर घेऊन एक अंत्यज समोरून येतांना दृष्टीस पडला. त्यास 'दूर हो' असें आचार्यांनीं म्हटलें असतां तो म्हणालाः—

अद्वितीयमनवद्यमसंगं सत्यबोधसुखरूपमखंडम् ॥
आमनान्ति शतशो निगमान्तास्तत्र भेदकलना तव चित्रम् ॥१
दंडमंडितकरा धृतकुंडाः पाटलाम्बरसनाः पटुवाचः ॥
ज्ञानगंधरहिता गृहसंस्थान्वंचयन्ति किल केचन वेषैः ॥ २
गच्छ दूरमिति देहमुताहो देहिनं परिजिहीर्षसि विद्वन् ॥
भिद्यतेन्नमयतोन्नमयं किं साक्षिणश्च यतिपुंगव साक्षी ॥ ३

—विद्यारण्य

म्हणजे, हे यतिराज, 'दूर हो' असें जें म्हणतोस तें अयोग्य आहे. कारण तुझ्यांत आणि माझ्यांत कांहीं भेद नाहीं.

एकमेवाद्वितीयम् । एष आत्माऽपहतपाप्मा । निरवद्यं निरंजनम् । असंगो ह्ययं पुरुषः । सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म । विज्ञानमानंदम् ।

इत्यादि श्रुतिवचनांमध्यें अद्वितीय, निर्दोष, संगशून्य, सत्यसुख, बोधरूप असा अखंड आत्मा आहे असें वर्णन आहे, तथापि तूं अद्वैतवादी असून भेदबुद्धि बाळगितोस हा चमत्कार आहे. हातांत दंडकमंडलु, अंगावर भगवीं वस्त्रें, असा वेष घेऊन गोडगोड बोलून गृहस्थांस फसविणारे ज्ञानशून्य असे पुष्कळ यति असतात त्यांपैकींच तूं आहेस. 'दूर हो' शब्द कोणाला अनुल-

क्षून बोलतोस, देहाला किंवा आत्म्याला ? जर देहाला अनुलक्षून म्हणशील, तर अन्नमय देहानें अन्नमय देहाला ‘ दूर हो ’ असें म्हणणें शोभत नाहीं, आणि जर आत्म्याला अनुलक्षून म्हणशील तर साक्षिस्वरूप आत्म्यानें साक्षिस्वरूप आत्म्याला ‘ दूर हो ’ असें म्हणणें अयोग्य आहे. अद्वैतवादी जो तूं त्या तुला ब्राह्मण किंवा अंत्यज हा भेद करणें उचित नाहीं. सूर्याचें प्रतिबिंब भागीरथीमध्यें पडलें किंवा मद्यामध्यें पडलें, म्हणून त्यांत काय फरक आहे ? हे मुनिवर्या, शुद्ध ब्राह्मण आणि अमंगल अंत्यज हे एक कसे होतील, असें जर विचारशील, तर असें पहा कीं, अनेक शरीरें जरी असलीं तरी शरीराहून सर्व तऱ्हेनें भिन्न असा जो आत्मा तो सर्वांचे ठिकाणीं एकच आहे. मुक्ति प्राप्त करून देणारी अशी विद्या असून तुच्छ लौकिकाची इच्छा तूं बाळगितोस, तेव्हां असें म्हणणें भाग आहे कीं अखिल मायेचा अधिपति जो परमात्मा त्याच्या मायेमध्यें तुझ्यासारखे बुद्धिमान् पंडित देखील गर्क होतात.

अशा प्रकारचें अद्वैतविद्याप्रतिपादक चांडालाचें ज्ञान पाहून आचार्यांस पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें आणि म्हणाले कीं, तूं बोललास हें सर्व सत्य आहे, तूं आत्मज्ञ आहेस तेव्हां तुझ्याविषयीं अंत्यजबुद्धि मी टाकून देतों. ज्याला सर्व जगांत आत्म्यावांचून काहीं दिसतच नाहीं, तो, चांडाल असो किंवा ब्राह्मण असो, सर्वत्र वंदनीयच आहे.

ईश्वरो जीवकलया प्रविष्टो भगवानिति ॥
प्रणमेद्दंडवद्भूमावश्वचांडालगोखरम् ॥ १

—स्मृति

सर्व प्राण्यांमध्यें जीवरूपानें ईश्वर भरलेला आहे अशी ज्याची बुद्धि झाली त्यानें प्राणिमात्रांस साष्टांग प्रणिपात करावा, मग तो प्राणी अश्व, चांडाल, गाय किंवा गर्दभ, कोणीहि असो. जो जो विषय इंद्रियास गोचर होतो तो तो मिथ्याभूत आहे असें समजून, सर्व उपाधींचा त्याग करून, मी केवल ज्ञानस्वरूप आहें, माझ्याशिवाय दुसरा पदार्थच नाहीं अशी ज्याची बुद्धि झाली, तो माझा गुरु आहे.

आचार्यांचें असें भाषण झाल्यावर, चांडाल व कुत्रे नाहींसे होऊन चार वेदांसहित महादेव प्रकट झाले, तेव्हां आचार्य परमहर्षानें म्हणाले:—

दासस्तेऽहं देहदृष्ट्यास्मि शंभो—जातस्तेंऽशो जीवदृष्ट्या त्रिदृष्टे ॥
सर्वस्यात्मन्नामदृष्ट्या त्वमेवेत्येवं मे धीर्निश्चिता सर्वशास्त्रैः ॥ १

—विद्यारण्य

म्हणजे हे शंभो, देहदृष्टीनें मी तुझा दास आहें, जीवदृष्टीनें मी तुझा अंश आहें, आत्मदृष्टीनें मी तूंच आहें, असा माझा निश्चय सर्वशास्त्रावलोकनानें झाला आहे.

यस्य भासा सर्वमिदं विभाति । —मुंडकोपनिषद्

या श्रुतिवचनाप्रमाणें, हे शंभो, तुझ्या प्रकाशानें चोहोंकडे अंतर्बाह्य प्रकाश व्यक्त होतो. सर्व वस्तूंमध्यें शास्त्राची प्रतिष्ठा अधिक, गुरुकृपेशिवाय शास्त्र व्यर्थ, तत्त्वज्ञानाचा उदय न झाला तर गुरुकृपाहि निरुपयोगी, म्हणून तत्त्वज्ञानाचा आश्रयीभूत जो परमात्मा त्या तुला नमस्कार असो. नंतर महादेव म्हणाले:—

संविभज्य सकलश्रुतिजालं ब्रह्मसूत्रमकरोदनुशिष्टः ॥
यत्र काणभुजसांख्यपुरोगाण्युद्धृतानि कुमतानि समूलम् ॥ १

तत्र मूढमतयः कलिदोषादद्वित्रवेदवचनोद्धलितानि ॥
भाष्यकाण्यरचयन् बहुबुद्धैर्दूष्यतामुपगतानिच कैश्चित् ॥ २
तद्भवान्विदितवेदशिखार्थस्तानि दुर्मतिमतानि निरस्य ॥
सूत्रभाष्यमधुना विदधातु श्रुत्युपोद्बलितयुक्त्यभियुक्तम् ॥ ३
भास्कराभिनवगुप्तपुरोगान्नीलकंठगुरुमंडनमुख्यान् ॥
पंडितानथ विजित्य जगत्यां ख्यापयाद्वयमते परतत्त्वम् ॥ ४

—**विद्यारण्य**

हे शंकराचार्या, सर्व वेदांचा प्रविभाग करणारा, शिष्टाग्रणी जो **व्यास** त्यानें काणाद, सांख्य, पातंजल इत्यादि दर्शनांचें समूल खंडन करून अद्वैतसिद्धीकरितां ब्रह्मसूत्रें रचिलीं. त्यावर मूर्ख पंडितांनीं एकादे दुसरे वेदवचनाचाच आधार घेऊन भलतीं भाष्यें लिहिलीं आहेत. तूं वेदान्तशिरोमणी आहेस, म्हणून समग्र श्रुतिवचनांचा आधार घेऊन तर्कशास्त्रास अनुसरून त्या सर्व दुर्मतांचा निरास करण्याकरितां सूत्रभाष्याची रचना कर. नंतर भेदाभेदवादि **भास्कर**, शक्त्युपासक **अभिनवगुप्त**, भेदवादि **नील-कंठ**, शैव—भाट्ट मतानुयायी गुरु **प्रभाकर**, **मंडनमिश्र**, **मुरारिमिश्र** इत्यादिकांस जिंकून अद्वैतमतप्रतिपादक जें परमतत्त्व त्याचा प्रसार कर. आणि निरनिराळे मठ स्थापून त्यांवर श्रेष्ठमताची प्रसिद्धि करण्याकरितां शिष्य नेमून अवतारसमाप्ति कर. याप्रमाणें आज्ञा करून चार वेदांसहित महादेव अंतर्धान पावले.

नंतर आचार्य गंगास्नानास गेले व आह्निक विधि आटोपून **गोविन्दनाथ** व महादेव यांचें ध्यान करीत बसले. परत आल्यावर विश्वेश्वराचा अनुग्रह संपादून सर्व लोकांचे हिताकरितां भाष्याचें चिंतन करीत आचार्य काशीहून निघाले ते थेट बदरीकाश्रमास पोहोंचले. यावेळेस

त्यांचें वय बारा वर्षांचें होतें. त्या पुण्यक्षेत्रांत अनेक ब्रह्मनिष्ठ तपस्वी होते, त्यांजबरोबर श्रुतीचें शिर जीं उपनिषदें त्यांची वारंवार चर्चा करून आचार्यांनीं भव्य, गंभीर व मधुर असें भाष्य निर्माण केलें. या भाष्यांत चार्वाक, आर्हत, सौत्रांतिक, वैभाषिक, योगाचार वगैरे नास्तिक पाखंडी, गौतम, कणाद, कपिल, जैमिनी, पतंजलि हे दर्शनकार, शाक्त, भास्कर इत्यादिकांच्या मतांचा निरास केलेला आहे. या भाष्यांतील अर्थगांभीर्य व शब्दसौष्ठव आणि परमतखंडनार्थ योजिलेलें तर्कशास्त्रप्राविण्य पाहून आचार्यांचा अवतार सूत्रभाष्य रचून दुर्मतांचा विध्वंस करण्याकरितांच होता असें वाटणें साहजिक आहे. नंतर ईश, कठ, केन, प्रश्न, मुंडक, मांडूक्य, तैत्तिरीय, ऐतरेय, छांदोग्य, बृहदारण्यक—या दशोपनिषदांवर आणि निखिल वेदार्थप्रकाशक भगवद्गीतेवर आचार्यांनीं भाष्यें लिहिलीं. या भाष्यांच्या अभ्यासानें अद्वितीय जो आत्मा त्याचें स्वरूप करतलामलकवत् भासतें, आणि अनेक जन्मांपासून संचित झालेला व अनादि असा व्यामोह नष्ट होतो. उपनिषत्प्रतिपादित ब्रह्मविद्येचा असा महिमा आहे कीं, प्रत्यगात्म्याचे उत्कृष्ट ज्ञान होऊन सर्व अनर्थांचें मूलभूत जी अविद्या तिचें उन्मूलन होतें आणि देहाभिमानापासून होणारी दुःखें निश्चयानें दूर होतात. हीं भाष्यें प्रसिद्ध झाल्यावर, रवीचा उदय झाला असतां जसा अंधकार पळून जातो, त्याप्रमाणें भेदवादिप्रभृति पंडितांनीं केलेल्या व्याख्या नष्ट झाल्या. सूर्यकिरणांनीं समुद्र जसा शोषला जात नाहीं, तसें आचार्यविरचित भाष्यें व उपदेशसाहस्री

इत्यादि ग्रंथ परकीय तर्कांनीं यत्किंचित्हि डगमगत नाहींत. पद्मपाद, आनंदगिरि, चित्सुख वगैरे शिष्यांस आचार्यांनीं भाष्यादि ग्रंथ शिकविले आणि त्यांच्याकडून वेदान्तशास्त्रांतील कठिण शब्दांचा कोश पाठ करविला.

शंकराचार्यांनीं अद्वैतमताची स्थापना करून श्रुतिवचनांची योग्य व्यवस्था लावून दिली आणि आत्म्याचें खरें ज्ञान प्रकट केलें. ह्या आचार्यांच्या कामगिरीचें वर्णन अनेक प्रकारच्या रूपकादि अलंकारांनीं मंडित असून, त्यापासून तत्कालीन आर्यतत्त्वज्ञानाची उत्कृष्ट माहिती होते.

मिथ्या वक्तीति कैश्चित्परुषमुपनिषद्दूरमुत्सारिताभू-
दन्यैरस्मिन्नियोज्यं परिचरितुमसावर्हतीति प्रणुन्ना ॥
अर्थाभासं दधानैर्मृदुभिरिवपरैर्वंचिताचोरितार्थै-
र्विन्दत्यानन्दमेषा सुचिरमशरणा शंकरार्यं प्रपन्ना ॥ १

—विद्यारण्य

उपनिषद्रूप गाईची कशी अवहेलना होत गेली ती पहा. माध्यमिकादि वेदबाह्य लोकांनीं उपनिषदांतर्गत सिद्धांत खोटे आहेत असें ठरविलें. भाट्टमतानुयायी प्रभाकरादि मीमांसक असें म्हणूं लागले कीं, उपनिषदांतील वचनांचा अर्थ कर्मपरच लावितां येतो, ज्ञानपर मुळींच लागत नाहीं. तार्किक लोक अशी कोटि लढवीत कीं, ‘ तत्त्वमसि ’ या महावाक्याचा

तदभिन्नस्त्वमसि

असा प्रयोग न करितां

तस्य त्वमसि । तस्मात्त्वमसि । तस्मै त्वमसि ।

असाहि पदांचा अन्वय करावा. असा नानाप्रकारचा छल होऊं लागला, तेव्हां श्रुतिकामधेनू आचार्यांस शरण आली तेव्हां तीस सुख झालें.

हन्तुं बौद्धोऽन्वधावत्तदनु कथमपि स्वात्मलाभः कणादा-
ज्जातः कौमारिलार्यैर्निजपदगमने दर्शितं मार्गमात्रम् ॥
सांख्यैर्दुःखं विनीतं परमथ रचिता प्राणधृत्यर्हताऽन्यै-
रित्थं खिन्नं पुमांसं व्यधितकरुणया शंकरार्यः परेशम् ॥ १

—विद्यारण्य

वेदप्रतिपाद्य पुरुष जो आत्मा त्याची कशी स्थिति झाली पहा. शून्यवादि बौद्ध त्याला ठार मारावयास धांवले. काणादांनीं त्याचा थोडा जीव रक्षण केला. म्हणजे बुद्धि, सुख, दुःख, इच्छा, द्वेष, प्रयत्न, धर्म, अधर्म, संस्कार ( भावना ) हे आत्म्याचे विशेष गुण, व संख्या, परिमिति, पृथक्त्व, संयोग, विभाग हे सामान्य गुण असून, आत्मा विभु आहे असें काणाद मानितात. भट्टपाद जो कुमारिल त्यानें असें प्रतिपादन केलें कीं, कर्मानुष्ठानानें चित्तशुद्धि झाली असतां ईश्वरप्राप्ति होते, आणि तेणें-करून परमपदप्राप्तीचा फक्त मार्ग दाखविला, परंतु परमपद प्राप्त करून दिलें नाहीं. सांख्यवादीनें त्या पुरुषाचें फक्त दुःख दूर केलें, म्हणजे, पुरुष ( आत्मा ) चेतन असून नित्य, साक्षी, कर्तृत्वशून्य आहे आणि प्रकृति अचेतन असून जगाचा कर्ता आहे असें सांख्यवादि मानितात. पातंजलांनीं प्राणनिरोध करून हठयोग मार्गानें कुंभकादिद्वारा व राजयोगमार्गानें उपासनाद्वारा त्या पुरुषाची योग्यता सिद्ध केली. अशा रीतीनें खिन्न झालेल्या पुरुषास आचार्यांनीं परमात्मपदाप्रत पोहोंचविलें.

ग्रस्तं भूतैर्नदेवं कतिचन ददृशुः केच दृष्ट्वाऽप्यधीराः ।
केचिद्भूतैर्वियुक्तं व्यधुरथ कृतिनः केऽपि सर्वैर्विमुक्तम् ॥
किंत्वेतेषामसत्त्वं न विदधुरजहन्नैव भीतिं ततोऽसौ ।
तेषामुच्छिद्य सत्तामभयमकृत तं शंकरः शंकरांशः ॥ १

चार्वाकादि पाखंडी लोकांनीं आत्मा केवळ पंचमहाभूतात्मक असें निरूपण करून, आत्मा पंचमहाभूतांनीं ग्रस्त करून टाकिला, व त्यांस खऱ्या आत्म्याचें ज्ञान झालें नाहीं. योगाचारादिकांना आत्म्याचें ज्ञान होऊन देखील, ते अधीरपणें

क्षणिकविज्ञानमात्मा

असें प्रतिपादन करूं लागले. तार्किक व मीमांसक हे मात्र पंचमहाभूतें आत्मा नव्हत असें म्हणत, परंतु तीं भूतें मिथ्या आहेत असें त्यांनीं कबूल केलें नाहीं. सांख्यवादि लोक आत्मा पंचमहाभूतलक्षणी नसून शब्दरसादि गुणरूपीहि नाहीं असें जरी म्हणत, तरी त्यांचें मिथ्यात्व कबूल करीत नसत. अशा रीतीनें भयभीत झालेल्या पुरुषास ( आत्म्यास ), महाभूतांचें मिथ्यात्व सिद्ध करून आचार्यांनीं निर्भय केलें.

चार्वाकैर्निन्हुतः प्राग्बालंभरथ मृषारूपमासाद्य गुप्तः ।
काणादैर्हा नियोज्यो व्यरचि बलवताऽकृष्य कौमारिलेन ॥
सांख्यैराकृष्य हृत्वा मलमपि रचितो यः प्रधानैकतंत्रः ।
कृष्ट्वा सर्वेश्वरं तं व्यतनुत पुरुषं शंकरः शंकरांशः ॥ १

**—विद्यारण्य**

चार्वाकादिकांनीं देहात्मवाद करून खरा आत्मा लपविला असतां, काणादांनीं त्यावर कर्तृत्वादि मिथ्यारोप करून व ज्ञान हा त्याचा गुण दाखवून आत्म्याचें कांहीं संरक्षण केलें. तोंच कुमारिलमतवादि मीमांसकांनीं पंचमहाभूतांपासून आत्म्याला ओढून,

स्वर्गकामो यजेत् ।

म्हणजे स्वर्गाची इच्छा असेल त्यानें यज्ञ करावा, इ-

त्यादि विधींमध्यें त्याला दास करून टाकिला. इतक्यांत सांख्यवादींनीं तो दोष ( दासपणा ) आत्म्याचा काढिला. तरी त्यास प्रधान जी प्रकृति तिचा गुलाम बनविला. या सर्वांपासून पुरुषास आचार्योनीं सोडवून, सर्वांचा नियामक व त्रिविधपरिच्छेदशून्य आत्मा असें सिद्ध केलें.

बदरीकाश्रमीं एके दिवशीं सूत्रभाष्याचा पाठ संपून आचार्य व शिष्यमंडळी माध्याह्नस्नानास निघणार इतक्यांत एक वृद्ध ब्राह्मण तेथें येऊन कसला पाठ चालला आहे असा त्यानें प्रश्न केला. शिष्यांनीं उत्तर दिलें कीं, हे आमचे भगवान् गुरु आहेत, यानीं सर्व उपनिषदांतील तात्पर्याचा अनुभव घेऊन सर्व भेदवाद्यांचें खंडन करून शारीरक सूत्रभाष्य रचिलें आहे. असें ऐकून तो ब्राह्मण म्हणाला, हे यते, तूं बादरायणाच्या सूत्रांवर भाष्य लिहिलेंस असें शिष्य म्हणतात, तर एकादें सूत्र घेऊन त्याचें विवेचन करावें. आपले सूत्रार्थाचे गुरु जे **गो**विंदपाद त्यांस नमस्कार करून आचार्य बोलले कीं, मी कांहीं सूत्रज्ञ नाहीं, तथापि एकादें सूत्र विचारिलें असतां मी विवरण करीन. ब्राह्मणानें तिसऱ्या अध्यायांतील पहिलें सूत्र

तदन्तरप्रतिपत्तौ रंहति । संपरिष्वक्तः प्रश्ननिरूपणाभ्याम् ।

याचा अर्थ करण्यास सांगितलें. आचार्य म्हणाले कीं, सर्व इंद्रियें गलित झाल्यावर लिंगदेहात्मक सूक्ष्मरूपानें युक्त असा जीव एक देह सोडून दुसऱ्या देहामध्यें प्रवेश करितो. तांडिश्रुतीमध्यें **गो**तम व जैवली यांचीं जीं प्रश्नोत्तरें झालीं त्यांचा या सिद्धांतास आधार आहे. तीं प्रश्नोत्तरें येणेंप्रमाणें आहेतः—

**प्रश्न**—वेत्थ यथा पंचम्यामाहुतावापः पुरुषवचसो भवन्ति ।

म्हणजे, पांचवी आहुति दिल्यावर, लिंगदेह पुरुषाप्रत पावतो, तर त्या आहुति कोणत्या ?

**उत्तर**--द्युपर्जन्यपृथिवीपुरुषयोषित्सु पंचस्वग्निषु श्रद्धासोमवृष्ट्यन्नरेतोरूपाः

म्हणजे, स्वर्ग, पर्जन्य, पृथिवी, पुरुष, स्त्री या पांच अग्नींमध्यें अनुक्रमानें श्रद्धा, सोम, वृष्टि, अन्न, रेत ह्या आहुति होत.—आचार्यांनीं असें उत्तर दिल्यावर, त्या ब्राह्मणानें अशा शंका काढिल्या कीं, केवळ आत्मा नवीन देहांत जातो व तेथें नवीं इंद्रियें प्राप्त होतात, किंवा जीव बरोबर इंद्रियें घेऊन जातो ? किंवा एकटें मनच नवीन शरीरांत प्रवेश करितें ? किंवा राघू जसा एका झाडावरून दुसऱ्या झाडावर जातो, तसा एकटा जीवच देहांतरी शिरतो ? सर्व इंद्रियें जीवाबरोबर जातात हें म्हणणें असत्य होय.

यत्रास्य पुरुषस्य मृतस्याग्निं वागप्येति
वातं प्राणश्चक्षुरादित्यं मनश्चंद्रमसं दिशः श्रोत्रम् ।

**—बृहदारण्यक**

म्हणजे, पुरुष मृत झाला असतां, त्याची वाणी अग्नींत, प्राण वायूमध्यें, चक्षु सूर्यामध्यें, मन चंद्रामध्यें, आणि श्रोत्र दिशांमध्यें प्रवेश करितात. यावर आचार्यांनीं उत्तर केलें कीं, ह्या कल्पना सांख्य, बौद्ध, वैशेषिक, दिगंबर इत्यादि मतवाद्यांच्या आहेत, म्हणून त्यांचा आदर करूं नये. असा प्रस्ताव करून सर्व शंकांचें निरसन केलें. त्यावरहि ब्राह्मणानें अनेक आक्षेप घेतले व त्यांचेंहि निरसन आचार्यांनीं केलें. अशा रीतीनें दोघांचा वाद आठ दिवस चालला, तरी कोणीहि हरेना, असें पाहून पद्मपाद आचार्यांस म्हणालेः—

आचार्यमाहेति महीसुरोऽयं व्यासो हि वेदान्तरहस्यवेत्ता ॥
त्वं शांकरः शंकर एव साक्षाद्व्यासस्तु नारायण एव नूनम् ॥ १

—विद्यारण्य

म्हणजे, हे गुरो, वेदान्तरहस्य जाणणारे हे साक्षात् विष्णूचा अवतार **व्यास** होत. आपण तर साक्षात् शंकर आहां. तेव्हां तुम्हां दोघांमध्यें जर वाद सुरू झाला, तर आह्मां गरीबांचें कसें होईल? हें ऐकून आचार्यांनीं नमन करून **व्यासांची** स्तुति केली व सूत्रभाष्य त्यांच्या हातीं दिलें, तें वाचून **व्यास** म्हणाले:—

मीमांसकानामपि मुख्यभूतो वेत्थाखिलव्याकरणानि विद्वन् ।
विनिःसरेत्ते वदनायतींदो गोविंदशिष्यस्य कथं दुरुक्तम् ॥ १

—विद्यारण्य

हे **शंकराचार्या**, मीमांसकांमध्यें तूं श्रेष्ठ आहेस व व्याकरणावरील सर्व ग्रंथ जाणतोस. तूं **गोविंदनाथाचा** शिष्य आहेस. तेव्हां तुझ्या तोंडांतून अपशब्द कसा निघेल! सांख्य, मीमांसक, तार्किक इत्यादिकांनीं केलेले विपरीत अर्थ खोडून श्रुतिवचनांचा खरा अर्थ करणारा तुझ्याशिवाय कोण समर्थ आहे?

व्याख्याप्यसंख्यैः कविभिः पुरैतद् व्याख्यास्यते कैश्चिदितः परं च ॥
भवानिवास्मध्दृदयं किमेते सर्वज्ञ विज्ञातुमलं निगूढम् ॥ १

—विद्यारण्य

ब्रह्मसूत्रावर अनेक पंडितांनीं व्याख्या केल्या आहेत व पुढेंहि होतील. परंतु, हे सर्वज्ञा, तुझ्याप्रमाणें आमचें हृदय कोणास तरी कळेल काय? या वेळेस आचार्यांचें वय सोळा वर्षांचें होतें, व भाष्यादि सर्व ग्रंथ पुरे झाले होते. तेव्हां देह सोडण्यास त्यानीं **व्यासांची** आज्ञा मागितल्यावर, **व्यास** म्हणाले कीं, नुसते ग्रंथ करून काम

पुरें होत नाहीं, तर अनेक मतवाद्यांचें खंडन करून दिग्विजय करणें अवश्य आहे.

आचार्यांस ब्रह्मसूत्रांचा व उपनिषदांचा खरा अर्थ न समजून त्यानीं भलतीच विधानें केलीं आहेत असे जे आक्षेप प्रिन्सिपाल थीबो वगैरे यूरोपीय पंडितांनीं घेतले आहेत, त्यांचे उत्कृष्ट निरसन ह्या विशिष्ट प्रसंगांवरून होतें. तसेंच, व्यास हे चिरंजीवि आहेत हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे. चिरंजीवि कोण आहेत हें पुढील श्लोकावरून कळेल:—

अश्वत्थामा बलिर्व्यासो हनुमांश्च बिभीषणः ॥
कृपः परशुरामश्च सप्तैते चिरजीविनः ॥ १

याप्रमाणें व्यासांची आज्ञा झाल्यावर, आचार्य दिग्विजय करण्याकरितां बदरिकाश्रमाहून निघाले व प्रथम कुमारिलभट्टाकडून भाष्यावर वार्तिकें करण्याकरितां दक्षिणेकडे वळले. आचार्य प्रयागास पोहोंचले व भागीरथीच्या तीरीं स्नानसंध्या करीत असतां त्यांस असें समजलें कीं कुमारीलभट्ट देहत्यागाच्या तयारींत आहेत. आचार्य लागलींच तिकडे गेले, तो भट्टपाद तुषाग्नीमध्यें प्रवेश करण्याच्या बेतांत होते व प्रभाकर, मुरारिमिश्र, पार्थसारथि वगैरे त्यांचे शिष्य जमले होते. आचार्यांस पहातांच भट्टपादास आनंद झाला व त्यानें आचार्यांची पूजा केली. आचार्यांनीं त्यास सूत्रभाष्य दाखवून त्यावर वार्तिकें लिहिण्यास सांगितलें. परंतु कुमारिलभट्ट म्हणाले कीं, ह्या कामास मी सर्वथैव अयोग्य आहे, कारण मजकडून दोन पापें घडलीं आहेत, एक गुरुद्रोह व दुसरा ईश्वरनिरास. बुद्धापासून विद्या शिकून त्यांचें खंडन केलें

यांत गुरुद्रोह झाला, आणि जैमिनेय मताप्रमाणें वेदांचें स्वतःप्रामाण्य सिद्ध करण्याकरितां ईश्वराची निंदा केली यांत ईश्वरनिरास झाला. म्हणून या पापांचे प्रायश्चित्तार्थ अग्निप्रवेशच उचित होय. भट्टपादांनें आचार्यांस आणखी सांगितलें कीं, अद्वैतमार्गाची पूर्ण स्थापना करण्याकरितां मंडनमिश्रास आधीं जिंकिलें पाहिजे. कारण

सदावदन् योगपदं च सांप्रतं स विश्वरूपः प्रथितो महीतले ॥
महागृही वैदिकमार्गतत्परः प्रवृत्तिशास्त्रे निरतः सुकर्मठः ॥ १
निवृत्तिशास्त्रे न कृतादरःस्वयं केनाप्युपायेन वशं स नीयताम् ॥
वशंगते तत्र भवेन्मनोरथस्तदंतिकं गच्छतुमाचिरं भवान् ॥ २

—विद्यारण

हे शंकराचार्या, विश्वरूप जो मंडनमिश्र तो नेहमीं गृहस्थाश्रमामध्यें राहून वैदिकमार्गांत तत्पर असतो व प्रवृत्तिशास्त्राचा प्रसार करण्याकरितां कर्मयोगाची प्रशंसा करितो. त्यास निवृत्तमार्ग मुळींच संमत नाहीं, म्हणून त्याचा पराजय केला असतां अद्वैतमत प्रस्थापित होईल. नंतर आचार्यांनीं कुमारिलास तारकोपदेश केल्यावर, त्यानें अग्निप्रवेश केला.

कुमारिलभट्टांनें सांगितल्याप्रमाणें आचार्य माहिष्मती नगरीस गेले व तेथें रेवा नदीचे कांठीं कदंबसाल वृक्षांच्या छायेखालीं एका देवालयामध्यें मंडनमिश्राशीं वाद सुरू झाला. मंडनामिश्राची स्त्री सरस्वती सर्व विद्यांमध्यें पारंगत असून, तिला सभानायक (.पंच ) नेमिलें होतें. वादाचे आरंभीं आचार्यांनीं पुढील प्रतिज्ञा केली:—

ब्रह्मैकं परमार्थसच्चिदमलं विश्वप्रपंचात्मना ।
शुक्तीरूप्यपरात्मनेव बहलाज्ञानावृतं भासते ॥

तज्ज्ञानान्निखिलप्रपंचनिलया स्वात्मव्यवस्था परं ।
निर्वाणं जनिमुक्तमभ्युपगतं मानं श्रुतेर्मस्तकम् ॥ १

—विद्यारण्य

निर्मल असें सच्चिदानंद ब्रह्म एकच आहे. जसें भ्रमानें शुक्ति रूप्याकार भासतें, तसें अनादि मायेच्या योगानें तेंच ब्रह्म जगदाकार दिसतें. त्या परमात्म्याचें वास्तविक ज्ञान झालें म्हणजे सर्व प्रपंचाचा लय होतो, आणि जन्ममरणापासून मुक्त होऊन मोक्षप्राप्ति होते. यास प्रमाण उपनिषदें होत. जीवशिवांत भेद नाहीं, व कर्मापासून मुक्ति नसून, ती केवळ आत्मज्ञानापासून मिळते. या वादामध्यें जर माझा पराजय झाला, तर भगवीं वस्त्रें टाकून देऊन गृहस्थाश्रमास उचित अशीं शुभ्रवस्त्रें ग्रहण करीन. मंडनमिश्रानें पुढील प्रतिज्ञा केली:—

वेदान्ता न प्रमाणं चिति वपुषि पदे तत्र संगत्ययोगात् ।
पूर्वो भागः प्रमाणं पदचयगमिते कार्यवस्तुन्यशेषे ॥
शब्दानां कार्यमात्रं प्रति समधिगता शक्तिरभ्युन्नतानां ।
कर्मभ्यो मुक्तिरिष्टा तदिह तनुभृतामायुषः स्यात्समाप्तेः ॥१

—विद्यारण्य

उपनिषदांचा अर्थ चित्स्वरूप परमात्मपर जुळत नाहीं. श्रुतीचा पूर्वभाग म्हणजे कर्मकांड तेवढें प्रमाण समजावें.

घटमानय

म्हणजे घट आण, इत्यादि प्रयोगासारखे उपनिषदांतील शब्दांचे अर्थ क्रियापर जाणावे. म्हणून

यावज्जीवमग्निहोत्रं जुहुयात् ।

म्हणजे, देहांत प्राण आहे तोंपर्यंत अग्निहोत्राचें पालन करावें, या वचनांत निर्दिष्ट केल्याप्रमाणें आमरणान्त कर्म केलेंच पाहिजे. मुक्ति फक्त कर्मापासून प्राप्त

. या वादांत जर माझा पराजय झाला, तर शुभ्रवस्त्रें टाकून देऊन संन्यासास उचित अशीं भगवीं वस्त्रें परिधान करीन. याप्रमाणें दोघांच्या प्रतिज्ञा झाल्यावर, वाद सुरू झाला. त्या वादाची रीति येणेंप्रमाणें होती:—प्रातःकालीं स्नानसंध्यादि कर्मे आटोपून दोघांनीं वादास बसावें व माध्याह्नकाल होईतोंपर्यंत तो चालवावा. त्यावेळेस सरस्वती पतीस भोजनास व आचार्यांस भिक्षेस बोलावून नेत असे. नंतर सायंकालचा दहा घटिका दिवस उरला म्हणजे वादास फिरून आरंभ होई व तो सूर्यास्तापर्यंत चाले. दोघांसहि श्रुतिवचनें प्रमाण असत. वादी व प्रतिवादी समोरासमोर सिद्धासन, पद्मासन किंवा दुसरें एकादें आसन घालून बसत, व नानाप्रकारचे पूर्वपक्ष उत्तरपक्ष होत. वाद चालतांना दोघांचीं मुखें मंदहास्ययुक्त व प्रफुल्लित अशीं असत. वाद चालत असतांना कोणासहि घाम सुटला नाहीं किंवा शरीरकम्प झाला नाहीं. समाधान सुचलें नाहीं तर कोणीहि आकाशाकडे दृष्टि देऊन बसला नाहीं, तसेंच, योग्य उत्तर आढळलें नाहीं म्हणून छलवाद केला नाहीं. वादामध्यें उत्तर सुचेनासें झालें म्हणजे वितंडवाद करण्याची जगाची रीत आहे व हा जो असत् उत्तर करण्याचा प्रकार त्यास तर्कशास्त्रांत जाति असें म्हणतात. वितंडवाद व छल हीं एकच होत. छल म्हणजे बोलणारानें एकादा शब्द विशिष्ट अर्थी योजिला असतां त्या शब्दाचा भलताच अर्थ करून दाखविणें होय. उदाहरणार्थ,

नवकंबलोऽयं देवदत्तः

असें एकाद्यानें म्हटलें असतां, ‘ नव ’ शब्दाचा ‘ नूतन’

हा अर्थ सोडून देऊन, नवत्व संख्याविशिष्ट असा अर्थ करून,

नास्य नव कंबलाः सन्ति अतिदरिद्रत्वात्

म्हणजे, देवदत्तापाशीं नऊ घोंगड्या नाहींत, कारण तो अतिदरिद्री आहे. ह्या प्रकारास छल म्हणावें. असा छलवाद कोणींहि केला नाहीं.

वादामध्यें कोणते पूर्वपक्ष झाले व त्यांचीं समाधानें कशीं झालीं हा प्रकार प्रश्नोत्तररूपानें पुढें दिला आहे:—

( सर्वांस आधार विद्यारण्य )

**मंडनमिश्रः**—

भो भो यतिक्ष्माधिपते भवद्भिर्जीवेशयो र्वास्तवमेकरूप्यम् ॥
विशुद्धमंगींक्रियते हि तत्र, प्रमाणमेवं न वयं प्रतीमः ॥ १

हे यतिराज, जीव आणि शिव एकच आहेत असें जें आपण प्रतिपादन करितां त्याचें प्रमाण आमचे प्रत्ययास येत नाहीं, म्हणून या सिद्धांतास कांहीं प्रमाण नाहीं असें आह्मांस वाटतें.

**शंकराचार्यः**—

स प्रत्यवादीदिदमेव मानं । यच्छ्वेतकेतुप्रमुखान्विनेयान् ॥
उद्यालकाद्या गुरवो महान्तः । संग्राहयन्त्यात्मतया परेशम् ॥१

जीव आणि शिव यांच्या ऐक्यास प्रमाण हेंच कीं उद्दालक, जनक, याज्ञवल्क्य इत्यादि गुरूंनीं श्वेतकेतु वगैरे शिष्यांस परमात्मदर्शन म्हणजे जीवात्मा व परमात्मा यांचे ऐक्याचा अनुभव साक्षात् करून दिला. हें ऐक्य जर खरोखर नसेल, तर श्वतकेतुप्रभृतीस अद्वितीय आत्म्याचा अनुभव आला नसता.

**मंडनमिश्रः**—

वेदावसानेषु हि तत्त्वमादि । वचांसि जप्यान्यघमर्षणानि ॥
हुंफण्मुखानीव वचांसि योगीन्नैषां विवक्षास्ति कुहस्विदर्थे ॥ १

वेदांचे ज्ञानकांडांतील 'तत्त्वमसि' इत्यादि वचनें हुं-फट् इत्यादि मंत्राप्रमाणें केवळ जपार्थ व पापनाशनार्थ होत. त्या वचनांमध्यें दुसरा कांहीं अर्थ नाहीं.

**शंकराचार्यः—**

अर्थाप्रतीतौ किल हुंफडादेर्जपोपयोगित्वमभाणि विज्ञैः ॥
अर्थप्रतीतौ स्फुटमत्र सत्यां कथं भवेत्प्राज्ञ जपार्थतैव ॥ १

हुंफट् इत्यादि वचनांत कांहींएक अर्थ नसून, तीं फक्त जपाकरितांच उपयोगी आहेत असें ज्ञात्यांनीं सांगितलें आहे. परंतु

तत्त्वमसि

इत्यादि वाक्यांत अर्थ असून तीं केवळ जपाकरितां आहेत हें म्हणणें कसें शोभेल ?

**मंडनमिश्रः—**

आपाततस्तत्त्वमसीतिवाक्याद्यतीश जीवेश्वरयोरभेदः ॥
प्रतीयतेऽथापि मखादिकर्तृप्रशंसया स्याद्विधिशेष एव ॥ १

प्रथमदर्शनीं 'तत्त्वमसि' इत्यादि वाक्यांवरून जीव आणि शिव हे एकच आहेत असा जरी भास होतो, तथापि तो अर्थ खरा नाहीं. कारण

आम्नायस्य क्रियार्थत्वादानर्थक्यमतदर्थानाम् ।

म्हणजे, सर्व श्रुतिवचनें क्रियापर आहेत व जीं तशीं नसतील तीं व्यर्थ होत. असा जैमिनेयसूत्रांत पूर्वपक्ष करून

विधिना त्वेकवाक्यत्वात् स्तुत्यर्थेन विधीनां स्युः ।

म्हणजे, अशीं वचनें विधिपर मानून एकवाक्यता करावी. आणि त्या वचनांत स्तुति आहे असें समजावें. या जैमिनेय सूत्रांत विधिपर अर्थ करण्याविषयीं प्रामाण्य दिलें

आहे. म्हणून ‘ तत्त्वमसि ’ इत्यादि वाक्यांत यज्ञकर्ता ईश्वराहून भिन्न नाहीं अशा अर्थानें यज्ञकर्त्याची प्रशंसा आहे.

**शंकराचार्यः—**

क्रत्वंगयूपादिकमर्यमादिदेवात्मना वाक्यगणः प्रशंसन् ॥
शेषः क्रियाकांडगतो यदि स्यात्कांडान्तरस्थोऽपि भवेत्कथं सः ॥१
आदित्यो यूपः । यजमानः प्रस्तरः ।

इत्यादि कर्मकांडांतर्गत वाक्यें विधिवाचक आहेत. कारण, त्यांमध्यें यूपाची आदित्यरूपानें व प्रस्तराची यजमानरूपानें प्रशंसा केलेली आहे. परंतु कर्मकांडाहून भिन्न जें ज्ञानकांड त्यामध्यें निर्दिष्ट केलेलीं जीं

तत्त्वमसि । एकमेवाद्वितीयम् । सत्यं ज्ञानमनन्तम् । तरति शोकमात्मवित् । विज्ञानमानन्दं ब्रह्म ।

इत्यादि वाक्यें तीं विधिपर कशीं होतील ?

**मंडनमिश्रः—**

तर्ह्यस्तु जीवे परमात्मदृष्टिर्विधायकः कर्मसमृद्धयेऽर्हन् ॥
अब्रह्मणि ब्रह्मधियं विधत्ते । यथा मनोन्नार्कनभस्वदादौ ॥ १

तर मग जीवाच्या ठिकाणीं परमात्मदृष्टिविधायक ‘ तत्त्वमसि ’ इत्यादि वाक्यें आहेत असें मानावें. कारण असें केलें असतां कर्माचीच वृद्धि होईल.

मनो ब्रह्म । अन्नं ब्रह्म । आदित्यो ब्रह्म । वायुर्वाव संवर्गः ।

इत्यादि वचनांमध्यें परमात्मभिन्न जें मन, अन्न, आदित्य व वायु यांच्या ठिकाणीं परमात्मबुद्धि ज्याप्रमाणें करितात त्याप्रमाणें उपासनेच्या द्वारें जीवाचे ठायीं परमात्म्याचा आरोप केला आहे असें समजावें. उदाहरणार्थ,

यदेव विद्यया करोति श्रद्धयोपनिषदा तदेव वीर्यवत्तरं भवति ।

या वचनामध्यें लट्प्रत्ययान्त क्रियापद असतांहि त्याचा लिङ्प्रत्ययान्त विधिपर अर्थ करणें अवश्य आहे.

म्हणजे, कोणतेंहि यज्ञकर्म ज्ञानविज्ञानपूर्वक आणि श्रद्धापूर्वक करावें असा विधि सांगितला आहे.

**शंकराचार्यः—**

संश्रुयतेऽन्यत्र यथालिङादिर्विधत्यको ब्रह्मविभावनाय ॥
तथाविधेरश्रवणान्मनीषिन्संजाघटीत्यत्र कथं विधानम् ॥ १

इतर ठिकाणीं 'मनो ब्रह्मेत्युपासीत' इत्यादि वाक्यांत लिङ्प्रत्ययान्ताचा मुद्दाम उपयोग केला आहे, यास्तव तीं वचनें विधिपर आहेत असें म्हणणें योग्य आहे. परंतु

तत्त्वमसि

इत्यादि वाक्यांत लिङ्प्रत्ययान्ताचा उपयोग नसल्यानें येथें विधिपर अर्थ मुळींच संभवत नाहीं, म्हणजे जीवानें ब्रह्माची उपासना करावी असा अर्थ संभवत नाहीं.

**मंडनमिश्रः—**

यद्वत्प्रतिष्ठाफलदर्शनेन निधिर्यतीनां वर रात्रिसत्रे ॥
प्रकल्प्यते तद्वदिहापि मुक्तिः फलश्रुतेः कल्पयितुं स युक्तः ॥१

प्रतितिष्ठन्ति हवा य । एता रात्रीरुपयन्ति ।

म्हणजे ज्यांस प्रतिष्ठा पाहिजे असेल, त्यांनीं सोमयाग करावे. या वचनामध्यें 'उपयन्ति' हें जरी लट् प्रत्ययान्त क्रियापद आहे, तथापि येथें लिङ्प्रत्ययान्त विधिपर अर्थ करावा लागतो. त्याप्रमाणें 'तत्त्वमसि' इत्यादि वाक्यांत मुक्ति हें फल निर्दिष्ट केलें असल्यामुळें येथें विधिपर अर्थ केला पाहिजे. तत्त्वमस्यादि वाक्यांत विध्यर्थ जरी स्पष्ट नाहीं; तथापि येथें विधिकल्पना केलीच पाहिजे. कारण

रज्जुरियं न सर्पः

असें सांगतांच, सर्पभ्रांति नष्ट होऊन तत्काल भय

नाहींसें होतें. तसें ‘ तत्त्वमसि ’ हें वाक्य ऐकतांच परमात्म्याशीं ऐक्य घडत नाहीं. शिवाय

आत्मा वाऽरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यः

या वचनामध्यें श्रवणानन्तर मनन सांगितलें आहे, त्यापेक्षां तत्काल फल होत नाहीं, म्हणून उपासनापर विध्यर्थच घेतला पाहिजे.

**शंकराचार्यः—**

तर्हि क्रियाजन्यतया विमुक्तिः स्वर्गादिवद्धन्त विनिश्वरा स्यात् ।
उपासना कर्तृमकर्तुमन्यथा वा कर्तुमर्हा मनसः क्रियैव ॥ १

स्वर्गप्राप्ति हें जसें क्रियाजन्य फल असून नश्वर आहे त्याप्रमाणें

तत्त्वमसि

इत्यादि वाक्यांचा विधिपर अर्थ केला असतां मुक्ति देखील विनश्वर होऊं लागेल. तसेंच, उपासनेचे मार्ग अनेक असल्यामुळें, मानसिक क्रिया जशी अनित्य आहे, त्याप्रमाणें मुक्ति सुद्धां नश्वर होईल. यास प्रमाणः—

भावनाजं फलं यत्स्यात् यच्चस्यात्कर्मणः फलं ॥
न तत्स्थास्त्वित्वति मन्तव्यम् पण्यस्त्रीसंगतं यथा ॥ १

**—वार्तिक**

म्हणजे केवळ भावनेनें जें फल मिळतें, किंवा कर्में करून जें फल प्राप्त होतें तें नित्य असें कधीं मानूं नये. याकरितां

तत्त्वमसि.

या वाक्यांत जीवशिवाचें ऐक्यच प्रतिपादित आहे हें सिद्ध होतें.

**मंडनमिश्रः—**

माभूदिदं तत्त्वमसीतिवाक्यमुपासनापर्यवसायि कामम् ॥
किंत्वस्य जीवस्य परेण साम्यप्रत्यायकं सत्तम बोभवीतु ॥ १

बरें, ' तत्त्वमसि ' हें वाक्य उपासनापर न होवो, तथापि ऐक्यपर होत नाहीं. कारण, जीव आणि शिव हे सदृश आहेत असाच अर्थ करितां येतो. मुंडकोपनिषदांतहि असेंच साम्य वर्णिलें आहे:—

विद्वान् पुण्यपापे विधूय निरंजनः परमसाम्यमुपैति ।
—मुंडकोपनिषद्

म्हणजे, ज्ञानी पुरुष पापपुण्याचा नाश करून निरुपाधिक होऊन परमात्म्याशीं साम्य पावतो.

**शंकराचार्यः—**

किं चेतनत्वेन विवक्षितं साम्यं सार्वज्ञसार्वात्म्यमुखैर्गुणैर्वा ॥
आद्ये प्रसिद्धं न खलूपदेश्यमन्तेस्वसिद्धान्तविरुद्धताच ॥ १

परमात्म्याचें जीवात्म्याशीं साम्य आहे असें जर म्हणावें, तर तें चेतनत्वामुळें आहे किंवा सर्वज्ञत्व सर्वात्मत्व इत्यादि मुख्य गुणांमुळें आहे? जर चेतनत्वामुळें म्हणशील, तर तो धर्म प्रसिद्ध असल्यामुळें सांगण्यांत कांहीं अर्थ नाहीं. सर्वज्ञत्व इत्यादि गुणामुळें म्हणशील, तर तुझ्याच सिद्धान्ताला बाध येतो.

**मंडनमिश्रः—**

नित्यत्वमात्रेण मुने परात्मगुणोपमानैः सुखबोधपूर्वैः ॥
गुणैरविद्यावृतितोऽप्रतीतैः साम्यं ब्रवीत्वस्य ततो न दोषः ॥१

अविद्येमुळें न भासणारें नित्यत्व, अनन्तत्व, आनंद, ज्ञान इत्यादि गुणांनीं साम्य होतें असें म्हटलें असतां दोष येत नाहीं.

**शंकराचार्यः—**

यद्येवमेतस्य परत्वमेव प्रत्याययत्वत्र दुराग्रहः कः ॥
त्वयैव तस्य प्रतिभासशंका विद्वन्नविद्यावरणान्निरस्ता ॥ १

असें आहे तर भिन्नत्वशंका मायेमुळें उत्पन्न होते असें तूंच कबूल करितोस. मग दोहोंचें ऐक्य मानण्यास काय हरकत आहे ?

**मंडनामिश्रः—**

भोश्चेतनत्वेन शरीरिसाम्यमावेद्यतामस्य जगत्प्रसूतेः ॥
चिदुस्थितत्वेन परोदितस्याप्यणुप्रधानप्रभृतेर्निरासः ॥ १

जगत्कारण जो परमात्मा त्याशीं चेतनधर्मानेंच जीवाचें साम्य होतें, कारण विज्ञानरूपी चैतन्यापासून जगताची उत्पत्ति होते असें म्हटलें म्हणजे, जगाची उत्पत्ति आणूपासून होते असें म्हणणारे वैशेषिक व प्रधानापासून होते असें म्हणणारे सांख्य यांचें खंडन होतें.

**शंकराचार्यः—**

हन्तैवमस्तीति तदा प्रयोगः स्यात्त्वन्मते तत्त्वमसीति न स्यात्।
तदैक्षतेत्यत्र जडत्वशंकाव्यावर्तनाच्चात्र पुनर्न चोद्यम् ॥ १

असें म्हणशील तर

तत्त्वत्सदृशमस्ति

म्हणजे, परमात्मा जीवात्म्यासारिखा आहे—असा प्रयोग होऊन

तत्सदृशस्त्वमसि

म्हणजे, परमात्म्यासारिखा जीवात्मा आहे—असा प्रयोग होणार नाहीं. शिवाय

तदैक्षत बहु स्यां प्रजायेय ।

—छांदोग्य उपनिषद्

म्हणजे, सत् यास असें वाटलें कीं, आपण पुष्कळ

व्हावें, व आपली विशेषेंकरून उत्पत्ति व्हावी—या वचनांत ‘ ईक्षण ’ ह्या चेतनत्वप्रतिपादक पदाच्या उपन्यासानेंच जगत्कारण जडाची व्यावृत्ति होते. म्हणून अणु, प्रधान यांचा निराळा निरास करण्याचें कारण नाहीं.

**मंडनमिश्रः—**

नन्वेवमप्यैक्यपरत्वमस्य प्रत्यक्षपूर्वप्रमितिप्रकोपात् ॥
न युज्यते तज्जपमात्रयोगि स्वाध्यायविध्याश्रितमभ्युपेयम् ॥ १

बरें साम्य न होवो, तथापि

नाहमीश्वरः

म्हणजे, मी ईश्वर नाहीं असा प्रत्यक्ष अनुभव येत असल्यामुळें ऐक्य संभवत नाहीं. याकरितां

स्वाध्यायोऽध्येतव्यः

या वचनांतील विधीस अनुसरून ‘ तत्त्वमसि ’ हा जपार्थ मंत्रच आहे.

**शंकराचार्यः—**

अक्षेणचेद्भेदमितिस्तदा स्यादभेदवादिश्रुतिवाक्यबाधः ॥
असंनिकर्षान्न भवेद्धि भेदप्रमैव तेनास्य कुतो विरोधः ॥ १

भेदज्ञानाचा प्रत्यक्ष अनुभव येतो असें म्हणतोस तर विचार कर कीं,

इंद्रियार्थसन्निकर्षजन्यं ज्ञानं प्रत्यक्षं

म्हणजे इंद्रियांचा विषयाशीं संयोग होऊन जें ज्ञान उत्पन्न होतें तें प्रत्यक्ष होय. परंतु इंद्रियांस आत्मा गोचर नाहीं, म्हणून आत्म्याचें प्रत्यक्ष ज्ञान संभवत नाहीं. यास्तव अभेदवादिश्रुतीशीं विरोध येत नाहीं.

**मंडनमिश्रः—**

भेदप्रमा नेंद्रियजास्तु तर्हि साक्षिस्वरूपैव तथापि योगिन् ॥
तया विरोधात्परमात्मजीवाभेदं कथं बोधयितुं प्रमाणम् ॥ १

बरें, इंद्रियानें जीवशिवभेदाचें ज्ञान न होवो, तथापि साक्षिस्वरूपाने तें होईलच. तर मग साक्षिस्वरूपानें विरुद्ध ज्ञान होत असून, जीवाशिवांच्या अभेदास प्रमाण काय?

**शंकराचार्यः**—

प्रत्यक्षमात्मेश्वरयोरविद्या मायायुजोर्द्योतयति प्रभेदम् ॥
श्रुतिस्तयोः केवलयोरभेदं भिन्नाश्रयत्वान्न तयोर्विरोधः ॥ १

'अविद्योपाधि' जीव आणि 'मायोपाधि' ईश्वर यांचा भेद साक्षिस्वरूप प्रत्यक्षावरून प्रतीतीस येतो. श्रुतीमध्यें तर या उपाधींचा त्याग करून ऐक्य प्रतिपादन केलें आहे. तेव्हां साक्षि प्रत्यक्ष आणि श्रुति यांचा आश्रय भिन्न असल्यामुळें विरोध येत नसून जीवाशिवांचें ऐक्य सिद्ध होतें.

अशा रीतीनें अनेक शंकासमाधानें होऊन मंडनमिश्राचा पराजय झाल्यावर, सरस्वतीनें आचार्यांच्या सर्वज्ञतेस बाध आणण्याकरितां कामकलांसंबंधी प्रश्न केले. तेव्हां आचार्यांनीं एक महिन्याची मुदत मागून घेऊन अमरक राजाच्या निर्जीव देहांत योगबलानें प्रवेश करून कामशास्त्रांत नैपुण्य संपादिलें, आणि सरस्वतीच्या प्रश्नांचीं उत्तरें दिलीं. पूर्वप्रतिज्ञेप्रमाणें मंडनमिश्रानें संन्यासदीक्षा घेतली व 'सुरेश्वर' या पदवीनें आचार्यांच्या सर्व शिष्यांत श्रेष्ठ होऊन सूत्रभाष्यावर त्यानें वार्तिकें केलीं.

नंतर आचार्य दक्षिणेकडे वळले, प्रथमतः महाराष्ट्रांत स्वकीय ग्रंथांचा प्रसार करून श्रीशैल्य, गोकर्ण, श्रीवली एथील देवतांचें दर्शन घेत घेत ऋष्यशृंगास गेले. शृंगेरीस मठ स्थापून सुरेश्वराचार्यांची त्या पीठावर स्थापना

केली. वाटेनें जे जे प्रांत लागले त्या त्या प्रांतांत काणाद, सांख्य, शैव, पाशुपत, आर्हत, सुगत, शाक्त, नैयायिक, कामारिल वगैरे मतवादींशीं वाद करून आचार्य अद्वैतमताची प्रतिष्ठा करीत, तेणेंकरून त्यांचा शिष्यसंप्रदायहि वाढत चालला. पद्मपाद, हस्तामलक, तोटक, आनंदगिरि, चित्सुख वगैरे शिष्य बरोबर असत. ऋष्यश्रृंगीं असतां मातोश्री मुमूर्षु असल्याचें समजतांच आचार्य कालटीस गेले व मातेस आसन्नमरण पाहून तत्त्वोपदेश केला. तेव्हां अम्बा म्हणाली:—

सौम्यागुणे मे रमते न चित्तं रम्यं वदत्वं सगुणं तु देवम् ॥
न बुद्धिमारोहति तत्त्वमात्रं यदेकमस्थूलमनण्वगोत्रम् ॥ १

—विद्यारण्य

हे शंकरा, अस्थूल, अनणु, अगोत्र अशा प्रकारचें निर्गुण, व केवल ज्ञानस्वरूप अशा ब्रह्माचे ठिकाणीं माझें चित्त रमत नाहीं.

अद्वैतीं तों माझें नाहीं समाधान । —तुकाराम

याकरितां रम्य अशा सगुण देवाचे ठिकाणीं माझें चित्त लावून दे. तेव्हां आचार्यांनीं शिवाची उपासना सांगितली, परंतु शूलधारी, पिनाकपणी, सर्पभूषण अशी शंकराची मूर्ति मातेस प्रिय होईना, म्हणून शंखचक्रादिविभूषित अशा विष्णूच्या ठायीं तिचें ध्यान लावतांच, सुखसंपन्न होऊन तिनें प्राण सोडिला. नंतर अनेक शिष्यसमवेत आचार्य रामेश्वरीं गेले; व तेथें शाक्तांशीं मोठा वाद होऊन त्यांस पंचपूजापर केलें. पांड्य, चौल, द्रविड, आंध्र, कर्णाट इत्यादि प्रदेशांत पाशुपत, भैरव, प्रभाकर, वगैरे पंतितांशीं वाद झाला, व वेदान्तदर्शनाचा

प्रसार झाला. गोकर्णमहाबळेश्वरी आचार्यांचा व शैववर्य नीलकंठ पंडिताचा मोठा वाद झाला. त्यावेळीं जीं प्रश्नोत्तरें झालीं तीं येणेंप्रमाणें:—

( सर्वांस आधार विद्यारण्य )

**नीलकंठ:**—

प्रशमिंस्तदसीति यत्त्रयीकैः कथितोऽर्थः स न युज्यते त्वदिष्टः ॥
अभिदा तिमिरप्रकाशयोः किं घटते हन्त विरुद्धधर्मतत्त्वात् ॥ १

हे यतिवर्या, 'तत्त्वमसि' इत्यादि वाक्यांत इष्ट अर्थाचें निरूपण केलें आहे असें जें म्हणतोस तें योग्य नाहीं. कारण जीव आणि शिव यांचे धर्म, प्रकाश व अंधकार यांप्रमाणें, परस्परविरुद्ध आहेत.

**आचार्य:**—

ननुवाच्यगता विरुद्धताधीरिह सोऽसावितिवद्विरोधहाने ॥
अविरोधि तु वाच्यमाददैक्यं पदयुग्मं स्फुटमाह को विरोधः ॥ १

कोणत्याहि वाक्याचा अर्थ करितांना वाच्यांश आणि लक्ष्यांश स्पष्ट ध्यानांत आणले पाहिजेत.

सोऽयं देवदत्तः

या वाक्यांतील योजनेप्रमाणें जहदजहल्लक्षणा करून जीवशिवांतील विरोध वाच्यगत आहे म्हणून तो टाकून दिला पाहिजे, आणि अविरोध जें जीवशिवांतील लक्ष्यैक्य तेंच निवडून घ्यावें, म्हणजे विरोध कोठें राहिला?

**नीलकंठ:**—

नहि मानशतैःस्थितस्य बाधाऽपरस्था दत्त जलांजलिर्भिदास्यात् ॥
विपरीत हयत्वगोत्वबाधाद्वयपश्वोर्निजरूपकैक्ययुक्त्या ॥ १

शेंकडों प्रमाणांनीं सिद्ध वस्तूचा बाध कधीं होणार नाहीं. जर होईल तर भेद कोठेंहि रहाणार नाहीं. विप-

रीत जे घोडा आणि गाय त्यांचाहि अशा रीतीनें अभेद होऊन जाईल.

**आचार्यः—**

यदिहोक्तमतिप्रसंजनं भो न भवेन्नोहि गवाश्वयोः प्रमाणम् ॥
अभिदा-घटकं ततोर्यतः स्यादुभयोर्लक्षणयाऽभिदानुभूतिः ॥ १

हा जो अतिप्रसंग केला आहे तो संभवत नाहीं, म्हणजे, गाय आणि घोडा यांचें प्रमाण बरोबर नाहीं. कारण जेणेंकरून त्यांच्या अभेदाचा अनुभव येईल असें त्यांचें ऐक्यघटक लक्षण कांहींच दिसत नाहीं.

**नीलकंठः—**

ननु मौढ्य समस्तवित्त्वधर्मान्वितजीवेश्वररूपतोऽतिरिक्तम् ॥
उभयोः परिनिष्ठितं स्वरूपं बर्तं नास्त्येबयतोऽत्र लक्षणा स्यात् ॥ १

जीवगत मौढ्य व ईश्वरगत सर्वज्ञत्व हीं टाकून देऊन दोहोंतील वास्तविक ऐक्यप्रतिपादक धर्मच नाहीं, म्हणून एथें जहदजहल्लक्षणा लागू पडत नाहीं.

**आचार्यः—**

इति चेन्न समीक्ष्यमाणजीवेश्वररूपस्य च कल्पितत्वयुक्त्या ॥
तदधिष्ठितसत्यवस्तुनोऽद्धा नियमेनेव सदाऽभ्युपेयतायाः ॥ १

हें म्हणणें अयोग्य आहे. कारण, मौढ्य आणि सर्वज्ञत्व हीं कल्पित आहेत असें मानून, अधिष्ठानांतील सत्य वस्तु नियमानें अनुभवास येते.

**नीलकंठः—**

भवतापि तथाहि दृश्यदेहाद्यहमन्तस्य जडत्वमभ्युपेयम् ॥
परिशिष्टमुपेयमेकरूपं ननु किंचिद्धि तदेव तस्य रूपम् ॥ १

त्याप्रमाणें दृश्यदेहापासून अहंकारापर्यंत सर्व जड

आहे असें मानावें आणि बाकी राहिलेलें जें चिद्रूप तें सत्य असें समजावें.

**नीलकंठः—**

यदि चात्मन एकता तदानीमतिदुःखी युवराजसौख्यमीयात् ॥
अमुकःससुखोऽमुकस्तु दुःखीत्यनुभूतिर्न भवेत्तयोरभेदात् ॥ १

जर सर्वांचा आत्मा एकच आहे तर अतिदुःखी पुरुषास युवराजाचें सौख्य प्राप्त होईल. व अमुक सुखी, अमुक दुःखी असा अनुभव येणार नाहीं. कारण आत्मत्वदृष्टीनें ते एकच आहेत.

**आचार्यः—**

इतिचेन्न सुखादिविचित्रताया मनसो धर्मतयाऽत्मभेदकत्वम् ॥
न कथंचन युज्यते पुनः सा घटयेत्प्रत्युत मानसीयभेदम् ॥ १

हें म्हणणें योग्य नाहीं. मनाचे धर्म वेगळाले म्हणून सुखदुःखादि विचित्रता दिसते. यावरून आत्म्याचा भेद सिद्ध होत नाहीं. या विचित्रतेनें फार झालें तर मनोनिष्ठ भेद होतील. उघडच आहे कीं,

कामः संकल्पो विचिकित्सा श्रद्धा धृतिरधृतिर्ह्रीर्धीर्भीरित्येतत्सर्वं मन एव ।

ह्या श्रुतिवचनावरून मनाचीं भिन्नरूपें व्यक्त होतात.

**नीलकंठः—**

पुरुषार्थ इहैव दुःखनाशः सकलस्यापि सुखस्य दुःखयुक्त्वात् ॥
अति-हेयतया पुमर्थता नो विषपृक्तान्नवदित्यभेद्ययुक्तेः ॥ १

सर्व प्रकारचीं सुखें दुःखयुक्त असल्यामुळें दुःखनाश हाच पुरुषार्थ असून सुखप्राप्ति हा नव्हे. विषानें भरलेलें अन्न जसें टाकून देतात, तसें, दुःखानें युक्त सुख कोणीहि भोगण्यास तयार होणार नाहीं. याकरितां मोक्षाची कल्पना अयोग्य आहे.

आचार्यः—

विषयोत्थसुखस्य दुःखयुक्त्वेऽप्यलयं ब्रह्मसुखं न दुःखयुक्तम् ॥
पुरुषार्थतया तदैव गम्यं न पुनस्तुच्छक-दुःखनाशमात्रम् ॥ १

विषयापासून होणारें सुख जरी दुःखयुक्त असलें, तरी अविनाशि ब्रह्मसुख दुःखयुक्त नाहीं.

आनन्दं ब्रह्मणो विद्वान् न बिभेति कुतश्चन ।

—तैत्तिरीयारण्यक

म्हणजे, ब्रह्मसुख जाणणारास दुःखाची भीति नाहीं, या वचनावरून ब्रह्मसुखप्राप्ति हाच पुरुषार्थ असून तुच्छ दुःखाचा नाश एवढाच नव्हे.

ह्याप्रमाणें नीलकंठ पंडिताचें खंडन करून, सुराष्ट्र ( काठेवाड ) देशांत भाष्यादि ग्रंथ प्रचलित करून आचार्य द्वारावतीस गेले. तेथें पंचरात्रादि वैष्णवांशीं वाद झाला, व त्यांस जिंकून अवंतीस आचार्य गेले, व तेथें भट्ट भास्करास पराजित केलें. नंतर बाल्हीक, पांचाल, कोसल, अंग, गौड इत्यादि देशांत माध्यामिक, आर्हत, गुरु, मुरारिमिश्र अभिनवगुप्त, धर्मगुप्त,इत्यादि पंडितांशीं वाद होऊन अद्वैतमताची सर्वत्र स्थापना झाली. मग काश्मीरांतील शारदापीठावर आरूढ होऊन, शेवटीं बदरिकाश्रमीं जाऊन आचार्यांनीं बत्तिसावे वर्षीं देहविसर्जन केलें.

शंकराचार्यांनीं अद्वैतमताची स्थापना करून वेदान्तशास्त्र पूर्णदशेला आणिलें व त्यालाच सर्व लोकांना समजेल असें व्यावहारिक स्वरूप देऊन राष्ट्रधर्म करून सोडिला. हें जें महत्कार्य त्यानीं आठव्या शतकांत केलें त्याच्याच तोडीचें कार्य त्यांच्याचसारख्या सर्वज्ञ विभूतीनें चवदाव्या शतकांत घडवून आणिलें. ही विभूति म्हणजे विद्यारण्यस्वामी होत. यांचें पूर्वाश्रमीचें नांव सायण

असून, **मा**धवाचार्य त्यांचे वडील बंधु होत. हे दोघे बंधु तैत्तिरीयशाखाध्यायी महापंडित असून विजयानगरीची प्रधानकी, त्यांच्याकडे कुलपरंपरागत होती. त्यांचे वडील **मायण** हे **सं**गम राजाच्या कारकीर्दीत प्रधान होते व **मा**धवाचार्यांनीं **वीर**बुक्क व हरिहर या दोघां राजांची दिवाणगिरी केली होती. ताम्रपटावरून यांचा कालनिर्णय करण्याला बरीच मदत होते. इसवी सन १३६६ च्या सुमारास **मा**धवाचार्य **वीर**बुक्क राजाचे प्रधान असावे असें एका ताम्रपटांतील कलमावरून सिद्ध होतें. तें कलम येणेंप्रमाणें:—

> स्वस्तिश्री शके १२८८ प्रजापतिनामसंवत्सरे वैशाख कृष्ण अमावास्यायां बुधवासरे सूर्योपरागपुण्यकाले उपनिषन्मार्गप्रवर्तकाचार्यः श्रीमन्माधवाचार्यः बुक्करनामानं ग्रामं माधवपुरं चतुर्विंशतिसंख्येभ्यो ब्राह्मणेभ्यः अग्रहारं कृतवान्

**सा**यणाचार्यांनीं चतुर्थाश्रम घेतल्यावर, त्यांना शृंगेरी एथील श्रीमच्छंकराचार्यांचे मठांत पट्टाभिषेक झाला, व मठाधिपतींच्या परंपरेंत ते सव्विसावे होते. चतुर्थाश्रमांतील त्यांचे गुरु **शं**करानंद स्वामी होत.

या दोघां पंडितांच्या नांवावर जे ग्रंथ प्रसिद्ध आहेत त्यांपैकीं **मा**धवाचार्यांनीं कोणते लिहिले व **सायणा**चार्यांनीं कोणते लिहिले याचा पक्का निर्णय होत नाहीं. कारण, कांहीं ग्रंथांवर ‘ माधवामात्यविरचिते ’, कांहींवर ‘ सायणाचार्यविरचिते ’, कांहींवर ‘ विद्यारण्यविरचिते ’, कांहींवर ‘ सायणमाधवीये ’ व कांहींवर ‘ सायणाचार्यविरचिते माधवविद्यारण्यसंबंधि ’ अशा प्रकारचे निरनिराळे उल्लेख आढळतात. तसेंच **मा**धवाचार्यांनीं संन्यास घेतला किंवा **सा**यणाचार्यांनीं घेतला याबद्दलहि संशय

आहे. तथापि दोघेहि महापंडित होते व माधवाचार्य राज्यकारभार करीत होते यांत कांहीं संशय नाहीं. माधवाचार्यांच्या प्रोत्साहनानें सायणाचार्यांनीं ग्रंथ लिहिले, व विद्यारण्य या संज्ञेनें मठाधिपति सायणाचार्य होते असा अनेक विद्वान् लोकांचा अभिप्राय आहे.

शंकराचार्यांनीं भरतखंडांतील अनेक पंडितांशीं वाद करून अद्वैतमताचा प्रसार केला, व विद्यारण्यस्वामीनीं त्याच मतास बळकटी आणून राष्ट्रधर्माची जोपासना केली. आचार्यांच्या नंतर सहा शतकांनीं विद्यारण्य स्वामी झाले, तथापि दोघांची परिस्थिति बहुतेक सारखीच होती; म्हणजे सांख्य, वैशेषिक, पातंजल, आर्हत, चार्वाक, पाशुपत, पांचरात्र इत्यादि मतवाद्यांचें खंडन जसें आचार्यांस करावें लागलें, तसेंच विद्यारण्य स्वामीनींहि केलें आहे. आचार्यांनीं ब्रह्मसूत्रांवरील भाष्यांत या सर्व मतांचा विचार केला आहे, त्याप्रमाणें अधिकरणरत्नमालेच्या आधारानें स्वामीनीं या सर्व मतांचा उहापोह करून अद्वैतसिद्धि केली आहे. आचार्य व स्वामी यांच्यामधील काळांत सुप्रसिद्ध अशीं दोन नवीन मतें उत्पन्न झालीं होतीं, त्यांचे प्रवर्तक रामानुज व मध्वाचार्य होत. रामानुजाच्या मतास विशिष्टाद्वैत हें जरी नांव दिलें आहे तरी रामानुज असें प्रसिद्धपणें म्हणत कीं, वस्तुमात्राचा कर्ता व आद्यकारण असा एकच परमेश्वर आहे व त्यालाच विष्णु ही संज्ञा आहे. रामानुजांच्या मतीं ईश्वर सगुण असून जीवहि सगुण आहे व जीव मुक्त झाला म्हणजे ईश्वरतुल्य होतो. एवढ्यावरूनच त्या मतास विशिष्टाद्वैत असें म्हणतात. परंतु मध्वांच्या प्रमाणें सगुण ईश्वर व

त्याची भक्ति हे विशिष्ट मुद्दे रामानुज पंथांत असल्यामुळें, त्यास अद्वैत हें नांव न देतां उपासनाविशेष मानावें हें योग्य आहे. विद्यारण्य स्वामी शृंगेरीमठाधिपति असतां, रामानुजमतानुयायी अक्षोभ्य मुनीचा व स्वामींचा मोठा वाद झाला. सन ११५० चे सुमारास रामानुजानीं शैव पंथाचें खंडन सुरू केलें होतें, त्यामुळें त्यांच्या मतास फार महत्त्व आलें होतें. मध्वाचार्यांनींहि बाराव्या शतकांत नवीन वैष्णवी पंथ काढिला, व ते असें म्हणत कीं, जगत्कर्ता पुरुषविशेष असून सर्वथैव सेवा करण्यास योग्य आहे आणि जीवास त्याची योग्यता कधींहि येणार नाहीं. विद्यारण्य स्वामींच्या सर्वदर्शनसंग्रहांत 'पूर्णप्रज्ञ' या सदराखालीं माध्वमताचा व स्वतंत्रतेनें रामानुजमताचा विचार केला आहे. या दोन्ही मतांचा विशेष उहापोह अप्पय्या दीक्षितांच्या अद्वैतासिद्धि नामक ग्रंथांत केलेला आढळतो.

ग्रंथांच्या संख्येच्या मानानें पहातां आचार्यांच्या ग्रंथांपेक्षां स्वामींचे ग्रंथ अधिक आहेत, शिवाय त्यांच्या ग्रंथांत विषयवैचित्र्य आहे. स्वामींनीं चारहि वेदांवर भाष्यें लिहून, षड्दर्शनांवर टीका केली आहे. त्यांच्या काळीं प्रचलित असलेल्या सर्व शास्त्रांवर त्यानीं उत्कृष्ट ग्रंथ रचिले व ते ग्रंथ त्या त्या शास्त्रांत प्रमाण होऊन बसले आहेत. न्याय, मीमांसा, व्याकरण, वैद्यशास्त्र इत्यादि विषयांवर त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत, व या ग्रंथविस्तारावरून त्यांच्या विशाल बुद्धिमत्तेची थोडीशी तरी कल्पना आपणांला करितां येईल. जैमिनेय न्यायमाला, सर्वदर्शनसंग्रह, पंचदशी, जीवन्मुक्तिविवेक, धातुवृत्ति, माधवनिदान, का-

लमाधव, अनुभूतिप्रकाश, सूतसंहिता इत्यादि अनेक विषयांवर त्यांचे ग्रंथ आहेत. यांशिवाय श्रीमच्छंकरदिग्विजय हा त्यांचा एक चरित्रविषयक ग्रंथ आहे. या ग्रंथांत शंकराचार्यांचें चरित्र मोठ्या गोड भाषेंत लिहिलें आहे. या ग्रंथांतील वर्णनशैलीवरून असें दिसून येतें कीं, स्वामींच्या अंगीं कविकुलगुरु कालिदासाच्या अंगीं असलेली नैसर्गिक कवित्वशक्ति वास करीत होती. भाषेच्या संबंधानें पाहतां, स्वामींच्या लिहिण्याची पद्धति फार सुलभ असून आचार्यांच्या भाषेप्रमाणें तींत काठिण्य आढळत नाहीं. सूत्रभाष्यांत व इतर ग्रंथांत आचार्योनीं जीं मतें प्रतिपादन केलीं आहेत तींच स्वामीनीं सर्व लोकांस समजेल अशा सोप्या भाषेंत निरूपण केलीं आहेत. त्यानीं केलेली रचना केवळ प्रासादिक होय. व ज्या कोणाला वेदांचें रहस्य समजून घ्यावयाचें असेल त्यानें सायणभाष्याचें लक्षपूर्वक अध्ययन करावें. आणि ज्याला अद्वैत मत पूर्ण अवगत करून घेणें असेल त्यानें जीवन्मुक्तिविवेक या ग्रंथाचें परिशीलन करावें. जीवन्मुक्तिविवेक हा ग्रंथ वीरबुक्क राजाच्या आज्ञेनें उपनिषदें, भगवद्गीता, योगवासिष्ठ इत्यादि ग्रंथांतून प्रमाणभूत वचनें घेऊन मुद्दाम रचिला होता.

शंकराचार्योनीं अद्वैतमताची स्थापना करून या देशांतील लोकांस निरुद्योगी केलें व तेणेंकरून देशाची हानि मात्र झाली अशा प्रकारचे निरर्गल प्रलाप ऐकूं येतात.

आणखी कोणी असेंहि म्हणतात कीं, आचार्योनीं इतर मतांचा फक्त निरास केला. म्हणजे त्यांचा उद्योग विघटनात्मक ( destructive ) मात्र होता. अशा प्र-

कारचे जे अनेक आक्षेप घेतले जातात त्यांचा विचार करूं.

आचार्यांनीं सांख्य, वैशेषिक, पातंजल, मीमांसक, नैय्यायिक या मतांचें निरीक्षण करून पातंजल, मीमांसक व नैय्यायिक ह्यांचें अद्वैतमतास उपकारत्व कसें होतें हें दाखविलें आहे. त्यांचा कटाक्ष विशेषेंकरून सांख्य व वैशेषिक या दोन दर्शनांवर होता. सूत्रभाष्यांत श्रुति व युक्ति या दोन्ही प्रकारांनीं प्रथम सांख्य व वैशेषिक या दर्शनांचेंच खंडन केलें आहे. नंतर वेदबाह्य जीं जैन व बुद्ध मतें यांचें परीक्षण केलें आहे. सांख्य व वैशेषिक हीं मतें अनीश्वरवादी आहेत व त्यांपासून चार्वाकादि पाखंडी मतें निर्माण झालीं असें मानिलें आहे.

सांख्यवादी असें मानितात कीं, या जगताचें कारण तीन गुणांनीं युक्त व चैतन्यरहित असें आहे. त्याचें नांव ‘ प्रधान ’ होय. अचेतनापासून सचेतन सृष्टि कशी उत्पन्न झाली ह्या शंकेस सांख्यवादी असें उत्तर देतात कीं, प्रधानाच्या अंगीं सत्त्वगुण आहे व सत्त्वगुणापासून ज्ञान उत्पन्न होतें. यास आधार

सत्त्वात्संजायते ज्ञानं ।

हें गीतावाक्य होय.

ह्या मताचे खंडनाचे प्रकार येणें प्रमाणें:—प्रथमतः असा सिद्धांत आहे कीं, कार्यामध्यें जे गुण दृष्टीस पडतात ते कारणामध्यें अवश्य असले पाहिजेत.

तदनन्यत्वं आरंभण शब्दादिभ्यः । —**ब्रह्मसूत्र**

म्हणजे, कारणाहून कार्य भिन्न नसतें. या ब्रह्मसूत्राप्रमाणें कारणामध्यें कांहीं गुण असल्याशिवाय ते कार्यामध्यें गोचर होणार नाहींत. तसेंच अचेतन प्रधानामध्यें

प्रवृत्ति नसून जगतामध्यें सर्वत्र प्रवृत्ति ( Energy ) दिसते. उदाहरणार्थ, एकादी गाडी घेतली तर तिला चलन दिल्याशिवाय तिच्यामध्यें गति उत्पन्न होणार नाहीं. श्रुतीमध्यें सृष्टीचा प्रकार येणेंप्रमाणें आहेः—

( १ ) सदेव सोम्य इदमग्र आसीत् । एकमेवाद्वितीयम् ।

—**छांदोग्य**

म्हणजे, हे सोम्य, प्रारंभीं सत् हेंच एक असून अद्वितीय होतें.

( २ ) स ईक्षां चक्रे । बहुस्यां प्रजायेयेति । तत्तेजोऽसृजत ।

—**छांदोग्य**

म्हणजे सत् यास असें वाटलें कीं, आपण पुष्कळ व्हावें व आपली विशेषेंकरून उत्पत्ति व्हावी. त्यानें तेज उत्पन्न केलें.

( ३ ) स ईक्षां चक्रे । सप्रमाणसृजत ।—**प्रश्नोपनिषद्**

म्हणजे, त्याला वाटलें. त्यानें प्राण उत्पन्न केला.

या वचनांवरून ‘ ईक्षण ’ ही क्रिया चैतन्यद्योतक आहे असें सिद्ध होतें.

वैशेषिक मताचे प्रवर्तक कणाद ऋषि होत. सांख्य मतास श्रुति व स्मृति यांमध्यें कांहीं आधार आहेत असें भासतें; परंतु काणाद मतास तर तसा आधार आढळत नाहीं. वैशेषिक मत असें आहे कीं, हें जग परमाणूंच्या संयोगानें बनलें आहे. परमेश्वरास जेव्हां सृष्टि उत्पन्न करण्याची इच्छा होते, तेव्हां प्राण्यांच्या प्रारब्धकर्मानुसार निश्चल असे जे परमाणु त्यांमध्यें आपोआप क्रिया सुरू होते. ती क्रिया येणेंप्रमाणें:—एक परमाणु दुसऱ्या परमाणूंशीं संयोग पावतो, व या संयोगापासून

द्व्यणुक उत्पन्न होतें; अशा प्रकारचे तीन द्व्यणुक एकत्र होऊन त्र्यणुक बनतें; व अशा क्रमानें सर्व जगताची उत्पत्ति होते. यावरून वैशेषिकवादी असें म्हणतात कीं, परमाणु हेच जगत् उत्पन्न करितात.

या मताचा खंडनप्रकार येणेंप्रमाणें आहे:—अणु एकत्र होण्यास जी क्रिया लागते ती सनिमित्त आहे किंवा अनिमित्त आहे असा पहिला प्रश्न उत्पन्न होतो. जर ही क्रिया अनिमित्त म्हणावी तर नियामकाच्या अभावामुळें हे परमाणु सर्वदा उत्पन्न राहून त्यांचा प्रलय कधींहि होणार नाहीं असा प्रसंग येतो. आतां जर ही क्रिया सनिमित्त आहे असें म्हणावें, तर तें निमित्त दृष्ट आहे किंवा अदृष्ट आहे असा दुसरा प्रश्न उत्पन्न होतो. कोणत्याहि शरीराच्या उत्पत्तीच्या अगोदर त्याच्या हातून प्रयत्न होणें अशक्य असल्यामुळें अर्थात् दृष्ट निमित्त संभवत नाहीं. दुसऱ्या पक्षीं प्रथम क्रियेचें कारण जर अदृष्ट मानिलें तर आत्म्याशीं समवायसंबंधेंकरून राहणारें जें अदृष्ट त्याचा परमाणूशीं कांहींएक संबंध नाहीं हा तर सिद्धांतच आहे. म्हणून आद्यक्रियेचा संभव नसल्यामुळें वैशेषिकांनीं मानिलेला परमाणूंचा संयोगच घडत नाहीं. याकरितां परमाणु आपोआप एकत्र होऊन जगताची उत्पत्ति होते हें मत मिथ्या होय असें सिद्ध होतें.

आद्यक्रियेचें कारण अदृष्ट आहे असें जर मानिलें, तर पुनरपि असा प्रश्न उद्भवतो कीं, हें अदृष्ट आत्म्याशीं समवायसंबंधेंकरून राहतें किंवा अणूशीं समवायसंबंधेंकरून राहतें ?

उभयथाऽपि न कर्माऽतस्तदभावः ।—ब्रह्मसूत्र

म्हणजे, उभय पक्षीं अदृष्ट हें परमाणूंच्या आद्यक्रियेचें कारण होणें शक्य नाहीं, म्हणून सृष्टि व प्रलय यांचा अभाव होतो. कारण, अदृष्ट हें अचेतन आहे आणि कोणतीहि अचेतन वस्तु, सचेतन वस्तूनें प्रेरित केल्याशिवाय स्वतंत्रतेनें प्रवृत्त होत नाहीं किंवा दुसऱ्या वस्तूला प्रवर्तक होत नाहीं.

बाकी राहिलेलीं जीं न्याय, योग व पूर्वमीमांसा हीं तीन दर्शनें त्यांपासून आत्मज्ञान पूर्ण न होऊन आत्मप्रतीतीस तीं उपकारक आहेत अशा दृष्टीनें आचार्यांनीं त्यांचें गौणत्व सिद्ध केलें आहे. याविषयीं आतां विचार करूं.

न्यायदर्शनावरून पदार्थज्ञान उत्कृष्ट होतें आणि इतर पदार्थ उत्कृष्ट समजले म्हणजे आत्म्याचें विज्ञान होण्यास अडचण पडत नाहीं. आणखी न्यायशास्त्र अनुमानप्रतिपादक असून केवळ अनुमानानें आत्मसिद्धि होत नाहीं. शिवाय श्रुतिवचनाशीं विरोध होत नसेल तर तर्काचें प्रामाण्य मानून, आत्मज्ञान वेदान्तवाक्यांनींच करून घ्यावें व तीं वाक्यें बुद्धीमध्यें आरूढ होण्याकरितां अनुमानाचा अवश्य उपयोग केला पाहिजे असा आचार्यांचा अभिप्राय आहे.

हीच गोष्ट योगदर्शनास लागू असून, आत्मप्रतीतीच्या संबंधानें पहातां या दर्शनाची उपयुक्तता फारच आहे.

एतेन योगः प्रत्युक्तः। —ब्रह्मसूत्र

या सूत्रावरील भाष्य मनांत आणितां पातंजल दर्शनाचें निराकरण आचार्यांनीं केलें आहे असें वाटण्याचा पुष्कळ संभव आहे. परंतु वास्तविक प्रकार असा आहे कीं, वेदान्तशास्त्रविरुद्ध जे योगदर्शनांत सिद्धांत आढळ-

तात त्यांचें मात्र खंडन आचार्यांनीं केलें आहे. ईश्वर तटस्थ असून, प्रकृति स्वतंत्रतेनें जगताचें कारण आहे, जीव ईश्वराहून भिन्न आहे, इत्यादि योगदर्शनांतर्गत प्रमेयांचेंच प्रत्याख्यान शारीरक भाष्यांत आढळतें; परंतु यमनियमनादि योगांगांचें निरसन आढळत नाहीं. श्रुतींत व विशेषकरून श्वेताश्वतरोपनिषदांत योगाचें वर्णन पुष्कळ आहे, शिवाय सूत्रकार व्यासानीं

दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः ॥

—**कठोपनिषद्**

या श्रुतिवचनाप्रमाणें चित्तैकाग्र्यद्वारा आत्मसाक्षात्कारास योगदर्शनाचा उपयोग होतो असें अनेक ठिकाणीं ध्वनित केलें आहे.

ज्ञानं वदन्तीह विमोक्षकारणं तज्जायते नैव विलोलचेतसि ॥
लौल्यं न योगेन विना प्रशाम्यति तस्यात्तदर्थेहि यतेत साधकः॥१

—**योगकल्पद्रुम**

मोक्षप्राप्तीचें साधन आत्मज्ञान होय, तथापि ज्याचें चित्त चंचल आहे अशा पुरुषास तें साधत नाहीं, म्हणून चित्तस्थैर्याचें आदिकारण जो योग त्याचा अवलंब केला पाहिजे. उघडच आहे कीं, जल जर वायुवेगानें हलत असेल तर त्यांत मुखाचें प्रतिबिंब जसें नीट पडत नाहीं, त्याप्रमाणें संकल्पविकल्परूप वायुवेगानें बुद्धिरूप जल क्षुब्ध होऊं लागलें, तर आत्मारूप मुखाचें दर्शन होत नाहीं. आणखी ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, स्वतः प्रीतिपूर्वक अंगीकार केलेल्या वस्तूची निंदा करण्यास मनुष्य सहसा झटत नाहीं.

तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ॥
कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥ १

**—भगवद्गीता**

या गीतावाक्यांत योगाची श्रेष्ठता दाखविल्याप्रमाणें व्यास व शंकराचार्य, म्हणजे सूत्रकार व सूत्रभाष्यकार हेच जर महान् योगी होते, तर त्यांचे हातून योगाची निंदा होईल हें असंभाव्य आहे. आचार्यांनीं मंडनमिश्राच्या घरांत जो प्रवेश केला तो आकाशमार्गानें गवाक्षांतून केला, व अमरक राजाचे शरीरांत शिरून कामशास्त्रप्राविण्य संपादन केलें, ह्या गोष्टी विश्रुत आहेत. नारद पराशर, वसिष्ठ, सनत्कुमार, शुकाचार्य, याज्ञवल्क्य, उद्दालक वगैरे महान् योगी होते. कोणत्याहि विद्येंत योगाभ्यासाशिवाय सिद्धि झालेली अढळत नाहीं. यावरून पाहतां

न निन्दा निंद्यं निन्दितुं प्रवर्तते अपि तु विधेयं स्तोतुम् ।

या न्यायानें सूत्रभाष्यांत जी योगाची निन्दा आढळते ती अद्वैतमताची वरची पायरी सिद्ध करण्याकरितांच आहे असें समजावें.

पूर्वमीमांसादर्शनास हाच नियम लागू पडतो. आचार्यांनीं कर्ममार्ग बुडविला असें म्हणण्याची पुष्कळ चाल आहे, परंतु ही चुकी आहे. श्रुतीचा अर्थ ब्राह्मण, कल्प व सूत्रें यांच्या साहाय्यानें कसा लावावा हें तर आपणांस पूर्वमीमांसकांनीं शिकविलें. कुमारिलभट्टाचा प्रियशिष्य जो मंडनमिश्र त्यानें पूर्वमीमांसेचा प्रचार इतका केला होता कीं, त्याच्या घरचे राघू देखील जैमिनेय सिद्धांतावर परस्परांशीं वाद करीत असत. एका राघूनें श्रुतींचे स्वतःप्रामाण्याची सिद्धि केली, तर दुसरा लागलींच वेदांचें परतःप्रामाण्य स्थापित करी. कर्मापा-

सूनच सुखदुःखादि फलें प्राप्त होतात असें एका राव्रूनें म्हटलें, तर दुसरा लागलींच म्हणे कीं फल देणारा ईश्वराशिवाय कोणी नाहीं. एकानें जग सत्य म्हटल्याबरोबर जग मिथ्या असें लगेच दुसरा प्रतिपादन करी. वादांत मंडनमिश्रास आचार्यांनीं जिंकिल्यावर, त्यानें असा प्रश्न केला कीं, वेदांतील वचनांचा अर्थ जर अद्वैतपर होतो तर भूतभविष्य जाणणारे जे जैमिनि त्यांस तो कसा समजला नाहीं ? यावर आचार्य म्हणाले कीं

अभिसंधिमानपि परे विषयप्रसरन्मतौ ननु जिघृक्षुरसौ ॥
तदवाप्तिसाधनतया सकलं सुकृतं न्यरूपयदितिस्म परम् ॥१

—विद्यारण्य

म्हणजे, सर्व जगाची प्रवृत्ति विषयाकडे असल्यामुळें आत्मप्रतिपादक वचनांपासून कांहींएक बोध होत नाहीं, याकरितां आत्मप्राप्तीचें मुख्य साधन जें पुण्य त्याच्या लाभाकरितां कर्माची प्रशंसा जैमिनीनें केली आहे.

तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति ।
यज्ञेन दानेन तपसाऽनाशकेन ।

—बृहदारण्यक

म्हणजे यज्ञ, दान आणि कैवल्यदायक तप यांच्या वेदोक्त अनुष्ठानानें आत्मसाक्षात्काराची इच्छा ज्ञानी पुरुषांत उत्पन्न होते. ह्या वचनावरून ब्रह्मचर्य, स्वाध्याय इत्यादिकांच्या अनुष्ठानानें चित्तशुद्धि होऊन ज्ञानप्राप्ति व्हावी अशी मनीषा होण्याकरितां सर्व कर्मे मोक्षप्राप्तीकरितां आहेत, व दुसऱ्या फलांकरितां कर्माची अपेक्षा नाहीं असें प्रतिपादन केलें आहे. नंतर मंडनमिश्रानें फिरून अशी शंका केली कीं, अखिल वेदवचनांचा अर्थ चित्तशुद्धिद्वारा सच्चिदानंदपर जर होतो, तर ईश्वराहून भिन्न

जें कर्म तेंच फल देतें असें सांगून जैमिनीनीं परमेश्वराचा निरास कशाकरितां केला? यावर आचार्यांनीं उत्तर दिलें कीं

इदं जगत्कर्तृपूर्वकं । कार्यत्वात् । घटवत् ।

या अनुमानावरूनच आगमाच्या मदतीशिवाय परमेश्वराचें अस्तित्व सिद्ध होत असून श्रुतींत फक्त या अनुमानाचाच अनुवाद केलेला आहे असें काणाद मतानुयायी म्हणतात, परंतु

नावेदविन्मनुते तं बृहन्तम् । —**तैत्तिरीय ब्राह्मण**

तं त्वौपनिषदं पुरुषं पृच्छामि । —**बृहदारण्यक**

इत्यादि श्रुतिवचनांअन्वयें उपनिषत्प्रतिपादित परमात्म्याचें ज्ञान वेद जाणणाराशिवाय इतरांस होणें नाहीं, म्हणून वर लिहिलेल्या कणादाचे अनुमानावरून परमेश्वराचें स्वरूप कळणें शक्य नाहीं. हा अभिप्राय मनांत आणून ईश्वरपर अनुमानाचें निरसन करण्याकरितां ईश्वरापासून कर्माचें फल मिळतें ह्या मताचेंहि प्रत्याख्यान जैमिनीनें केलें आहे. हें रहस्य ध्यानांत आणलें म्हणजे जैमिनी अनीश्वरवादी होते असा जो त्यांच्या मतांत दोष आढळतो तो दूर होईल. फक्त परमेश्वरपर अनुमानाचें खंडन केल्यानें आत्मनिष्ठ जे जैमिनी त्यांस अनीश्वरवादी म्हणणें अयोग्य आहे. ह्या आचार्यांच्या उत्तरावरून पूर्वमीमांसेचें आत्मज्ञानास किती उपकारकत्व आहे हें सिद्ध होतें. आचार्यांनीं पूर्वमीमांसेवर जो आक्षेप आणला आहे तो असा कीं, कर्में फलाशेनें केलीं असतां देहाभिमान वाढून मोक्षप्राप्तीला मोठें विघ्न होतें. याकरितां चित्तशुद्धि साध्य होण्याकरितां कर्में ईश्वरार्पित केलीं पाहिजेत. व हाच प्रकार भगवद्गीतेंत सर्वत्र आढळतो. कर्म स्थूलदेहाक-

रितां, उपसना लिंगदेहाकरितां, व ज्ञान कारणदेहाकरितां होय असें आत्मज्ञानी समजतात.

आचार्यांनीं भरतखंडांत बौद्धांचें खंडन करून अद्वैतमताची स्थापना केली असा बहुतेक लोकांचा समज आढळतो, परंतु वस्तुस्थिति तशी नाहीं. आचार्यांचा अवतार होण्यापूर्वींच बौद्धमताचा भरतखंडांत ऱ्हास झालेला होता. अशोक, कनिष्क इत्यादि राजांनीं बौद्धधर्मास राजाश्रय देऊन तो राष्ट्रधर्म बनविण्याचे जारीनें प्रयत्न केले होते, तथापि वैदिकधर्माचा लोप कधींच झाला नाहीं. इसवी सनापूर्वीं २५० पासून इसवी सन ९०० पर्यंत म्हणजे १००० वर्षांपेक्षां कांहीं जास्त कालपर्यंत हे दोन्ही धर्म एकाच ठिकाणीं चालू होते. बौद्ध लोकांचे विहार व ब्राह्मणांचीं देवालयें जवळ जवळ दृष्टीस पडत. इसवी सन ६३४ त शिलादित्यानें, बौद्धधर्माचा प्रसार व्हावा म्हणून, चोहोंकडचे लोक बोलावून मोठी सभा भरविली. त्या वेळीं एकवीस मांडलिक राजे व त्यांच्या राज्यांतील मोठेमोठे विद्वान् बौद्धधर्मातील भिक्षु आणि ब्राह्मण हे त्या सभेस आले होते. बौद्ध व वैदिक ह्या दोहों धर्मांच्या सत्यासत्यतेचा विचार करावा हाहि त्या सभेचा उद्देश होता, व त्याप्रमाणें बौद्ध आणि ब्राह्मण ह्यांच्यामध्यें मोठा वादविवाद झाला. अशा रीतीचे अनेक प्रसंग होऊन सातव्या शतकाच्या अखेरीस व आठव्या शतकांत वैदिक धर्म अधिकाधिक बळावत चालला. ज्या ब्राह्मण पंडितांनीं बौद्धांस जिंकिलें त्यांपैकीं कुमारिलभट्ट हा पहिला होय. कुमारिलानें सर्व वेदांचें अध्ययन केलें होतें व सर्व शास्त्रांत प्राविण्य संपादन केलें होतें. त्यानें बौद्ध पंडितांपा-

शीं अध्ययन करून बौद्धमतांचें उत्कृष्ट ज्ञान मिळविलें होतें व तेंच त्यास बौद्धांशीं वाद करितांना फार उपयोगीं पडलें. त्यानें पूर्वमीमांसेचें परिशीलन उत्तम करून शाबरभाष्यावर वार्तिकें लिहिलीं होतीं. जैमिनेय सूत्रें, ब्राह्मण व कल्प यांच्या अनुरोधानें श्रुतींचे अर्थ विधिपर दाखवून त्यानें प्रथम कर्मकांडाची सिद्धि केली व तेणेंकरून बौद्धांस जिंकून टाकिलें. यामुळें कुमारिलाची कीर्ति भरतखंडभर पसरली होती. इसवी सनाच्या आठव्या शतकांत तो आपल्या मताचा लोकांस उपदेश करूं लागला. इच्छामात्रेंकरून सर्व सृष्टि उत्पन्न करून तिचें नियमन करणारा असा एक परमेश्वर आहे असें जें प्राचीन वैदिकमत त्याचा कुमारिलानें प्रसार केला. बौद्ध लोक हे स्वतंत्र नियंता असा कोणी देव आहे असें मानीत नसत. कुमारिलाचें व्रत त्याच्या पट्टशिष्यांनीं मोठ्या नेटानें चालवून बौद्धधर्माचा भरतखंडांत बींमोड करून टाकिला होता. हे शिष्य म्हटले म्हणजे गुरु, प्रभाकर, मंडनमिश्र, मुरारिमिश्र, पार्थसारथि वगैरे होत. यावरून पहातां शंकराचार्यांस बौद्ध लोकांशीं वाद करण्याचें प्रयोजनच राहिलें नव्हतें. त्यानीं इतर दर्शनांची वेदान्तशास्त्राशीं संगति दाखवून, त्या शास्त्रास पूर्णदशेला आणिलें व त्यालाच सर्व लोकांना समजेल असें रूप देऊन त्याचा राष्ट्रधर्म बनवून सोडिला, व चवदाव्या शतकांत विद्यारण्य स्वामीनीं हेंच काम पूर्णपणें तडीस नेलें. शंकरचार्यानीं शारीरकभाष्यांत. जैन, बौद्ध, चार्वाक, लोकायतिक वगैरे वेदबाह्य मतांचें असें समर्पक निराकरण केलें आहे कीं, त्यांच्यामागून जे जे पंथ निघाले, त्यांतील

प्रत्येकाला कोणी परमेश्वर नियंता आहे असें ग्रहण करून चालावें लागे. उच्च वर्णाच्या तत्त्ववेत्त्यांचें समाधान होईल असे आचार्यांचे विचार असून त्यांची विचारसरणी हीन वर्णाच्या लाखो लोकांस समजेल व त्यांची भक्ति बसेल अशी असे. त्यानीं जन्मभर जो उद्योग केला त्यापासून दोन फलें उत्पन्न झालीं, त्यांपैकीं एक जुटीचा ब्राह्मण पंथ, व दुसरें, सर्व लोकांत ज्याचा प्रसार होईल असा धर्म.

एथवर आचार्यांनीं तत्कालीन मतवादींशीं वाद करून अद्वैतमतास कित्येक मतांचें उपकारकत्व कसें सिद्ध केलें हें दाखविलें. आतां शाक्त, शैव, वैष्णव इत्यादि देवतोपासकांचीं त्यानीं कशी व्यावस्था लाविली तें पाहूं. शंकराचार्यांनीं सर्व लोकांत शिवाची उपासना प्रचलित करण्याचा यत्न केला अशी कित्येक लोकांची समजूत झालेली दिसते, परंतु ही समजूत बरोबर नाहीं.

अब्धि अपार स्वरूप मम । लहरी विष्नु महेस ।
विधि रवि चंदा वरुन यम । सक्ति धनेस गनेस ॥ १

ह्या विचारसागर ग्रंथांतील दोहऱ्याप्रमाणें आचार्यांचें देवतांविषयीं मत होतें. विष्णु, शिव, ब्रह्मा, सूर्य, चंद्र, वरुण, यम, शक्ति, धनेश, गणेश इत्यादि देवता परमात्मारूप समुद्राच्या केवळ लाटा आहेत, म्हणजे मूळ अधिष्ठान आत्मा असून देवता हीं फक्त उपास्यें होत असें या दोहऱ्याचें तात्पर्य आहे. आचार्यांनीं महाशैव जो नीलकंठ पंडित त्याशीं वाद केला ह्या गोष्टीवरून शिवोपासना त्यांस इष्ट होती' या समजुतीचें निरसन होतें. हरिशंकरास गेल्यावर आचार्यांनीं त्या देवाची द्व्यर्थक जी स्तुति केली, ती भेदवादादि लोकांचा भ्रम दूर करण्याक-

रितांच केली होती हें सुप्रसिद्ध आहे. भरतखंडांत मुख्य पांच देवतांची उपासना होते, व त्या देवता शिव, विष्णु, शक्ति, सूर्य, गणपति होत. शैव, वैष्णव, शाक्त, सौर, गाणपत अशा लोकांशीं वाद करून आचार्यांनीं त्यांचा पराजय केला, यावरून शिव, विष्णु इत्यादि देवतांची उपासना करणें व्यर्थ आहे हा आचार्यांचा अभिप्राय होता असें समजूं नये. उपासनामार्ग एवढाच पुरुषार्थ नसून, त्याचें पर्यवसान अद्वैतप्रतीतींत कसें करावें हें आचार्यांनीं सर्व मतवादींस समजून दिलें. उपास्य व उपासक यांमधील सेव्यसेवकभाव घालवून जीवशिवांचें ऐक्य कसें होतें ह्याची फोड सर्व उपासकांस त्यानीं करून दिली. उदाहरणार्थ, शाक्तानें शक्तीची उपसना करून, शक्ति हाच परमात्मा आहे अशी भावना करावी, नंतर

साऽहमस्मि । ब्रह्माऽहमस्मि ।

अशा भावनेचा अभ्यास करावा, म्हणजे महावाक्य जें 'तत्त्वमसि' त्याचा अनुभव येऊं लागतो. अशा तऱ्हेचा आत्मसाक्षात्काराचा मार्ग सर्व उपासकांस शिकवून, निरनिराळया उपासकांमधील द्वेष मोडण्याकरितां पंचायतनपूजेचा प्रकार आचार्यांनीं सुरू केला. म्हणजे शिव, विष्ण, शक्ति, सूर्य व गणपति या पांच देवतांपैकीं ज्याची जी उपास्य असेल ती त्यानें मध्यें मांडून चार कोपऱ्यांत बाकीच्या चार ठेवाव्या. ही व्यवस्था फार सुरेख असून उपासकांतील स्पर्धा नाहींशी करण्याचें उत्कृष्ट साधन होय. अन्तर्यामीं अद्वैतभावना व बाहेर स्थूलदेहाकरितां पंचपूजा, या रीतीनें अंतर्बाह्य ईश्वरव्यापकता घडवून आणण्यांत अलौकिक चातुर्य नजरेस येतें यांत संशय नाहीं.

महाराष्ट्र कवींच्या ग्रंथांत जो अपूर्व प्रसाद अनुभवास येतो, तो याच रचनेमुळें होय. सर्व महाराष्ट्र कवि अद्वैती असून त्यांस आत्मसाक्षात्कार होता, शिवाय ते भगवद्भक्त होते. हा विशेष मनांत न आणितां ह्या कवींचा केवळ भागवतधर्मप्रसारार्थ अवतार होता, असें जें कित्येक लोकांचें मत आहे तें चुकी आहे याविषयीं विशेष निरूपण उपसंहारांत होईलच.

या एकंदर विवेचनावरून शंकराचार्यांनीं या देशाची केवढी कामगिरी केली आहे हें सहज ध्यानांत येईल. फक्त वेदान्तदर्शन तेवढें आत्मशास्त्र असून, इतर सर्व विद्या अनात्मविद्या होत, तथापि इतर विद्यांचें आत्मज्ञानास कसें साहाय्य होतें तें आचार्यांनीं उत्कृष्ट दाखविलें आहे. सामान्य दृष्टीने पहातां पूर्वमीमांसा, न्याय व वैशेषिक या दर्शनांमध्यें मुख्यात्म्याचें ज्ञान स्पष्ट केलेलें नाहीं, कारण लिंगदेहाधिष्ठित जो भूतात्मा त्यावर चैतन्याची छाया पडल्यामुळें ' मी कर्ता, मी भोक्ता ' असा भास होतो, तेणेंकरून तो मिथ्यात्मा असून मुख्यात्म्याप्रमाणें या दर्शनांत मानिला आहे. तथापि न्याय व वैशेषिक दर्शनांपासून Categories पदार्थज्ञान उत्कृष्ट होतें, आणि इतर पदार्थ उत्कृष्ट कळले म्हणजे आत्मा हा पदार्थ उत्तम समजतो. शिवाय हीं दोन्ही शास्त्रें अनुमानप्रतिपादक असून आत्म्यची सिद्धि अनुमानानें होत नाहीं, याकरितां हीं शास्त्रें गौण असें निरूपण केलें आहे. तसेंच सांख्यदर्शनाचें शारीरकभाष्यांत विशेष खंडन आढळतें, कारण अचेतन प्रधानापासून सृष्टीची उत्पत्ति होऊं शकत नाहीं, व या शास्त्राची उडी चिदात्म्यापर्यं-

तत्र जाते आणि आत्म्याचें आनंदमयत्व स्थापित होत नाहीं. पूर्वमीमांसादर्शनांत कर्मानेंच फलप्राप्ति होते असें जें प्रतिपादिलें आहे तो दोष आहे, तथापि कर्माशिवाय चित्तशुद्धि होत नाहीं या दृष्टीनें आत्मज्ञानास त्या शास्त्राचें उपकारकत्व होतें. योगशास्त्राचा उद्देश चित्तवृत्तींचा निरोध एवढाच असल्यामुळें त्याची मर्यादा तेथपर्यंत होऊन अद्वैतरसाचा अनुभव या दर्शनानें पूर्ण होत नाहीं, हा जरी दोष आहे तरी त्यापासून आत्मसाक्षात्कारास फार मदत होऊन उपासनामार्ग वाढतो. उपासना ज्याची त्यानेंच केली पाहिजे, समाजांत आत्मोपासना पूर्ण होत नाहीं. एकंदर दर्शनांची याप्रमाणें व्यवस्था लावून, राष्ट्रधर्म स्थापण्याकरितां निरनिराळ्या देवतांच्या उपासनेनें अद्वैतसाक्षात्कार करून देण्यांत दाखविलेलें चातुर्य खरोखर अवर्णनीय आहे. पंचायतनपूजेचा अवलंब केल्यानें उपासना वडून अद्वैतभावनेचा अनुभव येतो व परस्परस्पर्धा नष्ट होते, या तत्त्वाची प्रवृत्ति फार मनोहर आहे. तेव्हां राष्ट्रकल्याणाच्या दृष्टीनें पाहतां शंकराचार्यांच्या या अद्भुत कामागिरीला विघटनात्मक (Destructive) न म्हणतां घटनामक (Constructive )असें म्हणणें भाग आहे. शंकराचार्य व विद्यारण्य ह्या विभूति भरतखंडांत जर उत्पन्न झाल्या नसत्या, तर नानाप्रकारच्या भौतिक विपत्तींमध्यें असतांहि आर्यलोकांत जें बुद्धिमत्त्व व स्वधर्मनिरतत्व दृष्टीस पडतें तें कधींहि नजरेस आलें नसतें. तस्मात् या महान् पुरुषांवर प्रत्येक आर्यानें निष्ठा ठेवणें अवश्य आहे.

# प्रकरण दुसरें
## वर्णाश्रमप्रतिपालन

प्रपञ्च साधुनि परमार्थाचा लाभ जयानें केला
तो नर भलाभलारे भलाभला ॥

ही सत्पुरुषाची ( **शिवदिन केसरीची** ) प्रसादोक्ति आमच्या परमपूज्य वैदिक धर्मतत्त्वांस अनुसरूनच आहे. वैदिकधर्मानें जी वर्णाश्रमव्यवस्था सांगितली आहे, त्या मार्गानें गेलेले सत्पुरुष पाहिजे तितका प्रपंच करून शेवटीं जीवन्मुक्त होऊन गेले, आणि आधुनिक कालांत सुद्धां मुक्त होऊन जातात, व जातीलहि. मात्र वैदिकधर्मावर असाधारण श्रद्धा ठेवून त्याप्रमाणें शुद्धाचरण राहिलें पाहिजे. वैदिकधर्माला एकवटपणा (System) नाहीं, अनेक धर्म, नाना पंथ, नाना मतें ह्या सर्वांची खिचडी झालेला हा एक धर्म आहे, असें विधर्मी लोक वरवर विचारानें बोलून जातात; आणि त्यांचीच झील आपल्यांतील कित्येक अज्ञानी लोक स्वतःचा धर्म काय आहे हें पाहिल्याशिवाय ओढितात; परंतु हा केवळ अविचार होय. वैदिकधर्मावर हा आरोप कधींहि करितां येणार नाहीं. कारण, तो पूर्णत्वास गेलेला धर्म आहे, आणि आधुनिक सर्व पाखंड विचारांचा लय शेवटीं त्यांतच व्हावयाचा आहे. एकादा प्रवासी हिमाचलासारख्या अत्युच्च व प्रचंड पर्वतावर किंवा एकाद्या अफाट अरण्यामध्यें संचार करीत असतां तेथील सर्व वस्तु अनियमित व अव्यवस्थित रीतीनें पसरलेल्या आहेत असें त्याच्या नजरेस येतें; आणि ह्यामुळें तेथें त्याचें चित्त रममाण होत

नाहीं. परंतु जर एकादें सुंदर उपवन—जेथील झाडझुडपें व लतापल्लवादि नीटनेटकीं ठेविलेलीं व रान गवत वगैरे काढून स्वच्छता ठेविलेली—असें त्याच्या दृष्टीस पडलें, तर तेथें त्याचें चित्त स्वस्थ होऊन अमळ विश्रांति घ्यावीशी त्याला वाटते. अशी स्थिति होते म्हणून तेवढ्यावरून टाकंटिकला केलेल्या त्या उपवनाची योग्यता अफाट अरण्यापेक्षां किंवा निबिड वृक्ष असलेल्या हिमाचलापेक्षां अधिक आहे असें मानितां येत नाहीं. कारण, त्या अरण्यांतील किंवा पर्वतावरील रान, गवत, झुडपें वगैरे छाटून टाकिलीं असतां बाकी जे वृक्ष राहतील, त्यांत कित्येक अत्युपयोगी व दिव्यौषधि असे महान् वृक्ष राहतील, आणि त्यांची उपयुक्तता बाह्य देखाव्यावरून क्षणैक दृष्टिसुख देणाऱ्या त्या उपवनांतील पुष्पगुच्छांनीं शोभिवंत दिसणाऱ्या झाडांपेक्षां शतपटीनें अधिक असते ! इतकेंच कीं, त्यांची उपयुक्तता व योग्यता जाणणारा मर्मज्ञ भेटला पाहिजे. हा जो दाखला दिला आहे तोच दाखला वैदिकधर्म व इतर धर्म ह्यांच्या तुलनेला लागू पडतो व त्या तुलनेंत महदंतर दृष्टीस पडून वैदिक धर्माची महती स्थापित होते. हा भरतखंड देश हजारों वर्षांपूर्वीं भरभराटीस येऊन गेलेला आहे. त्यांत नानाप्रकारचे लोक, नानातऱ्हेचे पंथ व मतें निर्माण झाल्यामुळें हें एक स्वतंत्र खंडच बनून गेलें आहे. एवढ्या विस्तीर्ण खंडांत जगावरील इतर खंडांतील देशांप्रमाणें निरनिराळे धर्मपंथ होऊन गेले म्हणून त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं, व अनेक धर्मपंथांची खिचडी झालेली असली म्हणून त्यांत ग्राह्य भाग कांहींच नाहीं, ह्या म्हणण्यांत कांहीं अर्थ

नाहीं. भरतखंडांत ज्या अनेक धर्मशाखा आहेत, त्यांतील प्रत्येकांत कांहीं ना कांहीं तरी सर्वमान्य भाग आहेत असें तत्त्ववेत्त्यांना दिसून आलें असून त्यांतील विचारांचें अवगाहन मननपूर्वक केलें असतां वैदिकधर्माची थोरवी स्पष्ट दिसून येईल. इतकेंच कीं, प्रत्येक धर्मशाखेंतील गुण ओळखण्याची योग्यता अंगीं पाहिजे.

वरील सिद्धांत अगदीं खरा असून जो वैदिकधर्मानुचारी, मुमुक्षु व खरा नैष्ठिक आहे, त्याला आधुनिक कालींहि हवा तितका प्रपंच करून परमार्थसाधन करितां येतें, हें स्पष्टरीतीनें दाखविण्याला भावनगर संस्थानचे कै० वा० दिवाण महाशय गौरीशंकर उदेशंकर ह्यांच्या निर्मल जीवनचरित्राचें उदाहरण हा एक बिल्लोरी आरसाच आहे. म्हणून तत्संबंधानें प्रथम थोडेंसें लिहून मग मुख्य विषयाकडे वळूं. हे महाशय अगदीं गरीबशा एका ब्राह्मणकुटुंबांत जन्मास आलेले होते. त्यांनीं गृहस्थाश्रमामध्यें असतां मनमुराद प्रपंच केला. तो सुद्धां आमच्यासारख्या पांचचार मनुष्यांच्या अल्प कुटुंबाचा किंवा प्रादेशमात्र क्षेत्राचा नव्हे; तर लक्षावधि प्रजेच्या सगळ्या भावनगर संस्थानचा प्रपंच त्यानीं तेथील महाराजांच्या चार पिढींपर्यंत चालविला. सन १८२१ त पेशव्यांच्या ऐवजीं इंग्रज सरकारची राजसत्ता स्थापित होऊन गुजराथ व काठेवाडांतील संस्थानिकांशीं तहनामे करण्याचा प्रसंग आला; त्या वेळीं त्या सर्वांमध्यें महाशय गौरीशंकर ह्यांचें प्रधानांग होतें. मौंट स्टुअर्ट एलफिन्स्टन, सर जॉन मालकम, व सर बार्टल फ्रियर ह्यांच्यासारखे माजी सर्वमान्य गव्हर्नर फार नाजुक राज्यकारणांत देखील ह्यांचा

सल्ला प्रथम घेत असत, इतका असामान्य मुत्सद्दीपणा व इतकें व्यवहारनैपुण्य त्यांच्यामध्यें भरलेलें होतें. हैद्राबादचे सर सालरजंग, त्रावणकोरचे सर टी. माधवराव, ग्वाल्हेरचे सर दिनकरराव अशा नामांकित राजकर्णी पुरुषांमध्यें त्यांची गणना असे. एवढेंच नव्हे, तर इंग्लंडांतील विख्यात मुत्सद्दी मि० ग्लाडस्टन किंवा जर्मनीतील प्रिन्स बिस्मार्क ह्यांच्याच तोडीचे मुत्सद्दी हे होते, असे उद्गार प्रो० मोक्षमुल्लर यानीं काढिलेले आहेत. ग्लाडस्टन वगैरेनीं मोठाले राष्ट्रशकट हांकले, व ह्यानीं लहानशाच संस्थानची व्यवस्था केली हें खरें; तथापि जें राज्यकारभाराचें कौशल्य व व्यवहारनैपुण्य ग्लाडस्टन व बिस्मार्क ह्यांजमध्यें होतें, तेंच मोठें घड्याळ आणि लहान वॉच यांच्यामधील तफावतीप्रमाणें महाशय गौरीशंकर यांजमध्यें होतें. ह्यानीं भावनगरचा राज्यकारभार प्रथम हातीं घेतला, तेव्हां सर्वत्र अव्यवस्थाच होती; परंतु तेथें त्यानीं भव्य व रमणीय हवेल्या उठविल्या; मोठालीं विद्यामंदिरें उघडिलीं; विस्तीर्ण जलाशय तयार केले; व धर्मार्थ दवाखानें, तारायंत्र, पोष्ट, हायकोर्ट इ० संस्था निर्माण करून जेव्हां त्यांचा संसार थाटला, तेव्हां तेथील स्थितींत जमीन—अस्मानाचें अंतर पडून गेलें. जनरल केटिंग हे काठेवाडचे पोलिटिकल एजंट असून त्यानीं भावनगरची पूर्वींची निकृष्ट स्थिति पाहिलेली होती. मागाहून जेव्हां तेथीलच उन्नतस्थिति त्यानीं पाहिली, तेव्हां आपण पूर्वीं पाहिलें होतें तेंच हें भावनगर कीं ही नूतन रचलेली एकादी श्रीमान् नगरी आहे अशी त्यांना चुकभूल पडली. तात्पर्य काय कीं, महाशय गौरीशंकर

यानीं प्रपंच केला, तो मोठ्या बहारीचा होऊन त्यांची जगभर प्रशंसा झाली, आणि तसें होण्याला मुख्य कारण त्यांचें स्पृहणीय व्यवहारचातुर्य आणि अतिनिर्मल व सर्वोत्कृष्ट आचरण हींच होत.

एथपर्यंत महाशय गौरीशंकर यांच्या व्यवहारचातुर्याबद्दल व राजकारणपटुत्वाबद्दल दिग्दर्शन झालें. त्यांची धर्मश्रद्धाहि असामान्य होती. जो आमचा वैदिकधर्म विधर्म्यांला व अज्ञानी एतद्देशीयांस सुद्धां कचऱ्यासारखा वाटतो, त्यांतीलच उत्तमोत्तम महत्तत्त्वांचें अनुपमेय माधुर्य ह्यानीं चाखिलें होतें. वैदिकधर्माचें मुख्य तत्त्व म्हटलें म्हणजे वर्णाश्रमविहितधर्म हें आहे. त्या तत्त्वाप्रमाणें ह्या महाशयानीं आमरणांत आचरण ठेविलें होतें. व आधुनिक कालीं चारी आश्रमांत राहून परमार्थसाधन कसें करावें, हें त्यानीं स्वतःच्या पवित्र आचरणानें सर्व जगाला दाखवून दिलें. त्यानीं सन १८७९ त भावनगरचीं राज्यसूत्रें हातांतून खालीं ठेविलीं, त्याबरोबरच गृहस्थाश्रमाचाहि परित्याग त्यानीं करून वैदिकधर्माज्ञेप्रमाणें वानप्रस्थाश्रमाची जी त्याच्या वरची पायरी त्या आश्रमाचा आश्रय त्यानीं केला, आणि ब्रह्मविचारांत ते कालक्षेप करूं लागले. वानप्रस्थाश्रम घेतल्यामुळें त्यांना अरण्यवासास जावें लागलें नाहीं. आपल्याच एका विस्तीर्ण बागेंत एक मठ बांधून त्यांत ते राहिले. तेथें निरनिराळ्या ठिकाणांहून मोठमोठाले योगी व साधु येऊन त्यांचे आश्रमबंधु होऊन राहिले व तेथें ब्रह्मविचाराचीं पारायणें सुरू झालीं. त्या वेळीं भावनगर हें ब्रह्मविचाराचें ( वेदान्तविचाराचें ) मूळपीठच बनून गेलें होतें. महाशय गौ-

रीशंकर हे राज्यकारभारामध्यें असतां बहुकार्यव्यापृतत्वामुळें त्यांना संस्कृतभाषाज्ञानाकडे फारसें लक्ष देतां आलें नव्हतें म्हणून त्यांनीं ह्या आश्रमांत गीर्वाणभाषाग्रंथांचें परिशीलन चालविलें, व त्यांत अल्पावधींतच इतकें प्राविण्य मिळविलें, कीं त्यांनीं आपल्या वयाच्या एकोणायशीव्या वर्षी "स्वरूपानुसंधान" नामक एक मौल्यवान् ग्रंथ संस्कृत भाषेंत लिहून प्रसिद्ध केला. ह्या ग्रंथांत आत्मस्वरूप म्हणजे काय ह्याचें उत्कृष्ट विवरण केलें असून जीवात्म्याचें व परमात्म्याचें ऐक्य कसें करावें ह्याचेंहि सुबोध प्रतिपादन केलें आहे.

वानप्रस्थाश्रमामध्यें असतां महाशय गौरीशंकर ह्यांचें चित्त बाह्यात्कारीं प्रापंचिक गोष्टींत आहे असें दिसे; तथापि तत्त्वतः

सबाह्य अभ्यंतरीं अवघें रामरूप कोंदलें हो<br>
मन रामीं रंगलें अवघें रामरूप झालें ॥

—एकनाथ

ह्याप्रमाणें त्यांचें सर्वांतर्याम ब्रह्मविचारांत निमग्न होऊन गेलेलें असे. ते अशा अवस्थेंत असतां मुंबईचे माजी गव्हर्नर नाम० लॉर्ड रे हे सन १८८६ त सहकुटुंब त्यांच्या भेटीसाठीं गेले होते. त्या भेटीच्या वेळीं भगवी कौपिन परिधान केलेली ही आनंदमूर्ति त्यांच्या दृष्टीस पडली. सुमारें दीड तास उभयतांचें संभाषण झाल्यावर त्या प्रसंगीं लॉर्ड रे यानीं असे उद्गार काढिले कीं, "ह्या सत्पुरुषाशीं संभाषण करीत असतां माझ्या हृत्पटलावर ज्या प्रकारचा ठसा उमटला व जो परमाल्हाद झाला, तशा प्रकारचा आनंदानुभव हिंदुस्थानांत आल्यापासून

आपल्याला कधींहि झालेला नाहीं ". लॉर्ड रे म्हणजे महाविद्वान् व नीतिमान् पुरुष, तेव्हां अशा सद्गृहस्थाचे मनावर उठलेला हा ठसा किती मौल्यवान् आहे हें सांगावयास नकोच.

ह्याप्रमाणें महाशय गौरीशंकर ह्यानीं वैदिकधर्मतत्त्वानुरूप वानप्रस्थाश्रमवास केल्यावर पुढें चार वर्षांनीं त्यानीं त्या आश्रमाचा त्याग करून शेवटचा चतुर्थाश्रम ( संन्यास ) ग्रहण केला. ही संन्यासदीक्षा केवळ भगवीं वस्त्रें परिधान करण्यापुरतीच नव्हे; तर जगांतील सर्व मायिक उपाधि व संकल्पविकल्प नाहींसे होऊन निष्काम व निर्विकार वृत्ति होणें ह्याचें नांव संन्यास होय. ही वृत्ति महाशय गौरीशंकर ह्यांजमध्यें पूर्ण रीतीनें बाणली होती. त्यांचीं धर्ममतें काय होतीं, हें पहाणें फारच महत्त्वाचें आहे. धर्माचें मुख्य कार्य म्हटलें म्हणजे परमेश्वरप्राप्ति व आत्मज्ञान हें होय. ह्या गोष्टी साध्य होण्यास वैदिकधर्मासारखा अन्य धर्म नाहीं असें महाशय गौरीशंकर यांचें ठाम मत होतें. त्यांतहि वैदिकधर्मप्रतिपाद्य जी वर्णाश्रमव्यवस्था तीच त्यांस सर्वोत्कृष्ट वाटत असे. जातिभेदामुळें वैदिकधर्माला गौणत्व येतें असें जें विधर्मी लोक म्हणत असतात, तें खरें नसून वर्णाश्रमव्यवस्थेमुळेंच कमजास्त बुद्धीच्या व निरनिराळ्या अधिकाराच्या सर्व प्रकारचे मनुष्यांस निरनिराळ्या रीतीनें ईश्वराची ओळख करून घेतां येते, असें त्यांचें मत असे. महाशय गौरीशंकर हे पूर्ण वेदान्ती होते. " एकमेवाद्वितीयं " हें जें वेदांत प्रतिपादिलेलें परमात्म्याचें स्वरूप त्यांत ते सर्वकाळ निमग्न असत. ईश्वर निर्विकार आहे, आणि

आत्मानं सर्वभूतेषु सर्वभूतानि चात्मनि ॥

ह्या गीतावाक्याप्रमाणें सर्व भूतमात्रांत परमात्मा भरलेला आहे, आणि सर्व भूतें त्याच्याठायीं आहेत, ह्या महातत्त्वाचा अनुभव ते क्षणोक्षणीं घेत असत. सामान्यतः असा समज आहे कीं, ज्या मनुष्याचा तत्त्वज्ञानाकडे विशेष ओढा असतो, तो व्यवहारास अगदीं निरुपयोगी होतो, परंतु गौरीशंकर ह्यांची स्थिति याच्या उलट होती. त्यानीं सर्व जगाच्या रहाटीचें शास्त्रदृष्ट्या सूक्ष्म निरीक्षण केलें असल्यामुळें हातीं धरलेल्या कार्यांत जरी मनाप्रमाणें फलसिद्धि झाली नाहीं, तरी ते कधींहि निराश होत नसत. ह्याचें मुख्य कारण त्यांची वैदिकधर्मावरील दृढश्रद्धा हें होय. वैदिकधर्मास अनुसरून असणारें श्रेष्ठ मत म्हणजे वेदान्तमत होय. सांख्यादि इतर दर्शनें त्यापेक्षां गौण होत. वेदान्तमत हें आर्यभूमींतील आबालवृद्ध, ज्ञानी, अज्ञानी ह्या सर्वांचें पारमार्थिक वतनच होऊन गेलेलें आहे. असें वतन जगावरील कोणत्याहि राष्ट्रास प्राप्त झालेलें नाहीं. ह्याचें कारण इतर देशांतील व राष्ट्रोपराष्ट्रांतील लोकांचें लक्ष केवळ भौतिक सुखाकडे गुंतलेलें असतें, तसें आर्यभूमींतील लोकांचें नाहीं. हें जग नश्वर असून परमार्थसाधन करणें हें आपलें कर्तव्य आहे, अशी सर्वांची कमजास्त प्रमाणानें समजूत होऊन गेलेली आहे. व्यक्तिमात्राच्या ग्राहकशक्तीप्रमाणें वस्तुज्ञान जरी भिन्नभिन्न असलें, तथापि सर्वांच्या समजुतीचा पाया म्हणून एकच, आणि तो जगन्मिथ्यात्व हा होय. ज्ञानदृष्ट्या जगताचें मिथ्यात्व एकदां स्पष्ट कळूं लागलें, म्हणजे आपापच वैराग्यस्फूर्ति होऊं लागते. अर्थात् को-

णत्याहि दृश्य वस्तूविषयीं वासना उत्पन्न होत नाहीं. जगांतील वस्तु आपणास मिथ्या वाटूं लागल्या म्हणजे त्यांजकडे अंत:करणाचा ओढा मुळींच जाईनासा होतो. आणि तसें झालें म्हणजे अंत:करण केवळ आत्मस्वरूपामध्यें निमग्न होऊन जातें. अशीच स्थिति महाशय गौरीशंकर यांची झालेली होती.

आपणास दृष्टिगोचर होणारें हें जगत् खरें नसून केवळ चिच्छक्तीचा तो आभास आहे. सत्य वस्तु म्हटली म्हणजे एक, अद्वितीय, व निर्विकार असा जो परमात्मा तीच होय. सामान्यत: असें म्हटलें असतांहि चालेल कीं, सूक्ष्मबुद्धीनें ज्या पदार्थांचें ज्ञान होतें, तीच वस्तु केवळ सत्य, आणि बाह्येंद्रियांस गोचर होणारे जे जे विषय किंवा पदार्थ ते ते सर्व असत्य, मिथ्याभूत व नाशवंत होत. ईश्वराचा आणि जगताचा संबंध पाणी आणि त्याजवर उठणारे जलतरंग, किंवा वस्तु आणि तिचें आरशांत उठलेलें प्रतिबिंब ह्याप्रमाणें आहे. ह्यांत जल आणि वस्तु हीं सत्य; आणि जलतरंग व आरशांतील प्रतिबिंब हे त्यांचे विकार होत. ह्याप्रमाणें परमात्मा हें सत्यस्वरूप आणि हें दृश्यजग ही चिच्छक्तीची विकृति होय. ह्या उच्च वेदान्तज्ञानाचा लाभ गौरीशंकर यांस झाला होता. त्यानीं शंकराचार्यांच्या ग्रंथांचें परिशीलन फार सूक्ष्मरीत्या केल्यामुळें मन म्हणजे काय, आत्मा तो कोण, आणि आत्म्यावरून परमात्म्याची शक्ति कशी ओळखितां येते, हें त्यांस उत्कृष्ट अवगत झालेलें होतें.

अद्वैतमताप्रमाणें आत्मज्ञान होण्यास प्रथम मन जिंकिलें पाहिजे. आत्मा नित्य व शुद्धबुद्ध आहे, परंतु त्या-

च्या शेजारीं राहून खेळ करणारें तें मन फार कठिण. तें खेळाडू मन बाह्य वस्तूवर कसकशा उड्या घालितें, व आशाळभूताप्रमाणें विषयसेवनेची हांव त्याला किती विलक्षण आहे, हें विचारदृष्टीनें पाहून त्या मनाचें आकर्षण करण्याची शक्ति अंगीं येणें म्हणजेच आत्मज्ञानाचा प्रभाव समजावयाचा. मनाचा धर्मच असा आहे कीं नवे नवे संकल्प-विकल्प उत्पन्न करून तिकडे मनुष्याची प्रवृत्ति करावयाची. अशा चंचलत्वामुळें त्याला कोणीं श्वानोपमा दिली आहे, कोणीं घोड्याची दिली आहे, कोणीं दारोदार वंचना करणाऱ्या रंकाची दिली आहे. वेदांनीं तर

भीष्मोहि देवः । —**तैत्तिरीय ब्राह्मण**

असें मनाला म्हटलें आहे. म्हणून अशी जी मनाची संकल्पविकल्पात्मक प्रवृत्ति, तिचें नियमन करणें हा आत्मज्ञानाचा पहिला मार्ग होय. हें ज्ञान झालें म्हणजे आत्मा शुद्धबुद्ध कसा आहे हें कळून सरतेशेवटीं

ब्रह्माऽहमस्मि । **नारायणोपनिषद्**

ह्या अवस्थेचा अनुभव येतो. पंडित **गौरीशंकर** हे ह्याच पूर्णावस्थेस पोहोंचलेले होते. त्यानीं वानप्रस्थाश्रमांत असतां प्रसिद्ध शार्मण्य पंडित **मोक्षमुल्लर** यांस एक पत्र लिहिलें होतें, त्याचा उतारा खालीं दिला आहे. तो वाचला म्हणजे आत्मज्ञान त्यांच्या ठायीं कसें बाणलें होतें, हें स्पष्ट कळून येण्यासारखें आहे. महाशय **गौरीशंकर** यानीं संन्यासग्रहणापूर्वीं शार्मण्य पंडित **मोक्षमुल्लर** यांस पाठविलेले पत्रांत पुढें लिहिल्याप्रमाणें इत्यर्थ होताः—

" स्वरूपानुसंधान नामक वेदांतशास्त्रावर रचिलेला ग्रंथ मीं आपणाकडे पूर्वीं पाठविलाच आहे. मी ब्राह्मणकुलोत्पन्न असल्यामुळें त्या ग्रंथांत विवेचन केलेल्या उदात्त तत्त्वांचा अनुभव खरोखरच मी घेत आहें हें आपणास सहज कळून आलेंच असेल. आमच्या वैदिकधर्मांत चार आश्रम सांगितले असून द्विजांनीं यथाक्रमानें त्या आश्रमांतून गेलें पाहिजे. त्या आश्रमांपैकीं दुसरा म्हणजे गृहस्थाश्रम, ह्याचा अनुभव कमजास्त प्रमाणानें सर्वत्रांस असतोच. परंतु तिसऱ्या व चवथ्या आश्रमांत शिरलेले लोक फारच क्वचित्. ईश्वरकृपेनें मी वानप्रस्थाचा अनुभव शास्त्राज्ञेप्रमाणें घेत आहें. परंतु आतां शक्तिपात होत चालला आहे. ह्यास्तव लौकरच मी चतुर्थाश्रम स्वीकारणार. त्या आश्रमांत गेलों, म्हणजे जगांतील सुखदु:खापासून मी निर्मुक्त होईन, व मग मला ऐहिक इतिकर्तव्यता कांहींएक राहणार नाहीं. साठ वर्षेपर्यंत जगांतील व्यवहार केल्यानंतर संन्यासाश्रम ग्रहण करण्याशिवाय आतां मला कांहींएक कर्तव्य राहिलेलें नाहीं. ह्या आश्रमामध्यें शंकराचार्यादि प्राचीन महातत्त्ववेत्त्यांनीं दर्शविलेल्या मार्गांनीं जीवात्म्याचें परमात्म्याशीं ऐक्य करण्यास मी समर्थ होईन. मनुष्याला ही सिद्धि झाली, म्हणजे तो जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटून अक्षय्य मोक्षपदास पोहोंचतो. हे विद्वान् मित्रवर्या, मी थोड्याच दिवसांनीं संन्यासी होऊन माझ्या आयुष्यक्रमाचा अगदीं विपर्यास होऊन जाणार. आजपर्यंत मीं आपल्याशीं जसा पत्रव्यवहार ठेविला, तसा पत्रव्यवहार मग मला करितां येणार नाहीं. म्हणून शेवटीं परमेश्वर तुमचें कल्याण करो

एवढीच इच्छा करितों. ह्यापुढें ‘तुम्हीं व मी’ हा द्वैतभाव नष्ट होणार, कारण माझा जीवात्मा परमात्म्याशीं लीन होणार, आणि तो परमात्मा विश्वव्यापक असल्यामुळें अर्थात् आपल्यामध्यें व माझ्यामध्यें द्वैतभाव राहण्यास मग जागाच राहणार नाहीं. तेव्हां आपणच पूर्वींच्या पत्रांत लिहिलेलें जें वचन—

ज्ञात्वा देवं सर्वपाशापहानिः ।

म्हणजे, एकदां परमात्म्याचें ज्ञान झालें असतां जगांतील सर्व बंधनांचा नाश होतो—तें आपलेंच वचन शेवटीं लिहून हें पत्र पुरें करितों.”

ह्या पत्रावरून महात्मे गौरीशंकर ह्यांचें परमात्म्याशीं कसें तादात्म्य झालें होतें हें वाचकांस सहजच कळून येणारें आहे. अशा स्थितींत असतांनाच पुढें त्यांचें देहावसान झालें. मनुष्यानें जन्मास येऊन जी इतिकर्तव्यता करावयाची ती हीच. आणि अशा विभूतीलाच जीवन्मुक्त म्हणावयाचें. संसार हवा तितका करावा, त्याला ना नाहीं, परंतु नेहमींच विषयोपभोग घेण्यासाठीं हा देह नव्हे. मानवी देहाचें अखेर कर्तव्य अगदीं निराळें म्हणजे परमात्म्याची प्राप्ति हें आहे, हें ध्यानांत ठेवून मनुष्यानें वागलें पाहिजे. आमच्या वैदिकधर्मानें जे चार आश्रम सांगितले आहेत, त्या सोपानपरंपरेनें गेलें म्हणजे ती सिद्धि मनुष्याला लाभते, हें महात्मे गौरीशंकर यांच्या अलीकडील उदाहरणावरून सुव्यक्त होत आहे.

---

# प्रकरण तिसरें

## वेदान्तशास्त्राचें पुनरुज्जीवन व उपयुक्तता

वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः । संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्त्वाः ॥
ते ब्रह्म लोके तु परान्त काले । परामृतान्परि मुच्यन्ति सर्वे ॥ १

—नारायणोपनिषद्

आधुनिक विद्वानांला इतर गोष्टींमध्यें जरी देशोन्नतीचा अभिमान असतो, तथापि सांप्रतकाळीं वेदान्तशास्त्राचें जें पुनरुज्जीवन होत आहे, तें त्यांपैकीं पुष्कळांला आवडत नाहीं. त्यांची अशी खात्रीलायक समजूत झालेली दिसते कीं, वेदान्तशास्त्राचें पुनरुज्जीवन होणें हें प्रगतीचें लक्षण नसून देशापकर्षाचें चिन्ह होय; प्राचीन वेदान्तविचारांस महत्त्व देण्यांत कांहीं राम नाहीं, फक्त उपसनामार्ग म्हणजे भागवतधर्म सत्य मानून भक्तिमार्गानें चालावें, म्हणजे त्यांतच सार्थकता होईल. सांप्रतच्या शास्त्रीय ज्ञानामुळें जगांत जे विलक्षण चमत्कार दृष्टिगोचर होतात, व विचारसरणीस जें एक विलक्षण प्रकारचें वळण मिळत आहे, त्यामुळेंच आधुनिक विद्वानांच्या मनांत हे विचार घोळूं लागले आहेत, आणि वेदान्तशास्त्राच्या पुनरुज्जीवनानें राष्ट्रीय प्रगतीस खचित धक्का बसेल असेंहि त्यांना वाटून ते तसें प्रतिपादनहि करितात. अशी मतें ज्यांचीं झालीं आहेत, तीं माणसें सामान्य नसून अत्यंत बुद्धिमान् व देशाचा पुढाकार घेण्यास लायक असल्यामुळें ह्या विषयावरील त्यांचीं मतें एकदम एकीकडे झुगारून देण्यासारखीं नाहींत असें कबूल करावें लागतें. प्रत्येक गोष्टींत आपलें पाऊल पुढें

पडलें पाहिजे, असें मानणारे जे महाशय झाले आहेत त्याच वर्गांतील ही मंडळी असून प्रगतीच्या नियमांवर त्यांची पूर्ण श्रद्धा असल्यामुळें प्रत्येक शास्त्रीय शोधांत –मग तो शोध भौतिक असो, नैतिक असा किंवा अध्यात्मिक असो–त्यांस प्रगतीशिवाय कांहींएक दिसत नाहीं. उत्क्रांतितत्त्व सर्व सृष्टीमध्यें सार्वात्रिक होऊन गेल्यामुळें हे आधुनिक विद्वान् असें सिद्ध करितात कीं, अर्वाचीन गोष्ट कोणतीहि असो, शास्त्र असो किंवा तत्त्वज्ञान असो ती प्राचीन अर्थात् पुराण गोष्टीपेक्षां अधिक चांगली असलीच पाहिजे.

पुराणमित्येव न साधु सर्वम् । —**मालविकाग्निमित्र**

हें मत ते धरून चालतात.

आधुनिक विद्वानांची दुसरी अशीहि समजूत आहे कीं,—आपल्या देशाच्या उत्कर्षाकडे लक्ष दिलें तर तत्त्वज्ञान किंवा धर्म ह्यांसंबंधानें प्राचीन आर्यमतांकडे परत वळणें इष्ट नाहीं इतकेंच नाहीं, तर बहुतेक असंभाव्यच आहे. कारण, हिंदुस्थानांतील कोणीही आधुनिक आर्य घेतला तरी पूर्वज आर्यांपेक्षां सर्व गोष्टींत त्याचें भिन्नत्व दिसून येणार. त्याचा जन्म भिन्न स्थितींत होऊन शिक्षणहि भिन्न मिळाल्यामुळें तो एक निराळ्या प्रकारचाच मनुष्य बनून गेलेला आहे. त्याचे मनावर अर्वाचीन राज्यव्यवस्था, सामाजिक व्यवस्था इत्यादि कारणांनीं घडणारे परिणाम आणि त्याची परिस्थिति ह्या अगदीं निराळ्या झाल्या आहेत. व त्याच्या मानसिक उन्नतीसंबंधानें पूर्वींच्या व आतांच्या मार्गांत विलक्षण फरक होऊन गेला आहे. आधुनिक विद्वान् आणखी असेंहि प्र-

तिपादन करितात कीं,--बाह्योपाधींचें आंतरस्थितीशीं, आणि आंतरस्थितीचें बाह्यपरिस्थितीशीं संमेलन होणें, हा जर उत्कृष्ट जीवनकलेचा नियम ठरतो, तर त्याप्रमाणें आधुनिक आर्यांचा धर्म किंवा त्यांचें तत्त्वज्ञान हीं प्राचीन आर्यांच्या धर्माहून अगर तत्त्वज्ञानाहून भिन्न असलींच पाहिजेत. जुन्यापुराण्या तत्त्वज्ञानानें किंवा धर्मानें सुधारणेच्या अत्युच्च शिखरास पोहोंचलेल्या आधुनिक आर्यांचे समाधान होणार नाहीं, आणि ज्या धर्माची किंवा तत्त्वज्ञानाची अभिवृद्धि भिन्नावस्थेंत झालेली आहे, त्या धर्माच्या किंवा तत्त्वज्ञानाच्या परिस्थितीशीं सांप्रतची मानसिक स्थिति कधीं जुळणार नाहीं हेंहि उघड आहे. आधुनिक आर्यांस आपल्या पूर्वजांपेक्षां वरच्या पायरीस गेलेले असेच धर्मविचार, असेंच तत्त्वज्ञान, आणि अशीच राहणी अवश्य पाहिजेत; आणि वेदान्त व प्राचीन षड्दर्शनांमध्यें प्रतिपादन केलेल्या तत्त्वज्ञानापेक्षां अधिक सुधारलेल्या व उदात्त अशाच तत्त्वज्ञानाची त्याला जरूर आहे.

अशा रीतीचे मुख्य आक्षेप वेदान्तशास्त्राचें जें पुनरुज्जीवन होत आहे त्याविरुद्ध येत असून, त्यांत बराच सत्यांश आहे हें नाकबूल करितां येणार नाहीं. आधुनिक आर्य आपल्या पूर्वजांपेक्षां आजकाल अगदीं भिन्नावस्थेप्रत पोहोंचले आहेत, हेंहि कबूल केलें पाहिजे. परराष्ट्रांशीं व विशेषतः पाश्चात्यांशीं त्यांचा निकट संबंध जुळल्यामुळें त्यांची जगांतील अनुभवाची कल्पना विस्तृत झालेली असून, बदललेल्या परिस्थितीशीं जुळेल, अशा तऱ्हेची राहणी व विचारसरणी पत्करणें हें त्यांस

भाग पडलें आहे. भौतिक जगाविषयीं व शारीर रचनेविषयीं आधुनिक आर्यांस पूर्वजांपेक्षां पाश्चात्यांकडून नवें ज्ञान प्राप्त झालें, आणि सर्वांत अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे वेदाज्ञा, शास्त्राज्ञा वगैरे कोणालाहि प्रमाण व आधारभूत न धरितां स्वतंत्र रीतीनें व निर्भयपणानें विचार करण्याचा यूरोपीय पंडितांतील जो विशिष्ट गुण, तो आधुनिक आर्यांनीं उचलिला आहे.

एथपर्यंत आधुनिक विद्वानांच्या आक्षेपांचें निरूपण झालें. आतां वर लिहिल्याप्रमाणें जरी स्थितिविपर्यास झाला आहे, तथापि आधुनिक आर्यांनीं आपला धर्म व तत्त्वज्ञान टाकून देऊन पाश्चात्यांचा धर्म व तत्त्वज्ञान ह्यांचा स्वीकार केलाच पाहिजे असें सिद्ध होतें कीं काय? यूरोपांतील धर्मविचार व तात्त्विकविचार आमच्या धर्मविचारांपेक्षां किंवा तात्त्विकविचारांपेक्षां श्रेष्ठ आहेत असें पूर्वनिरूपित गोष्टीवरून सिद्ध होतें कीं काय? आणि भौतिक किंवा शास्त्रीय प्रगति कितीहि झाली, तथापि त्याबरोबर तत्त्वज्ञान व धर्म यांचेंहि पाऊल अवश्यमेव पुढें पडलेंच पाहिजे कीं काय? असे कित्येक महत्त्वाचे प्रश्न उत्पन्न होतात. त्यांचें उत्तर आमच्या मतें 'नाही' असेंच द्यावें लागणार. कारण, आधुनिक सुधारणेनें फार तर भौतिकशास्त्राची प्रगति होऊन तेणेंकरून ऐहिकसुखें व सोई वाढतील, परंतु त्या आधुनिक सुधारणेचा व उदात्त धर्मविचारांचा परस्पर निश्चयात्मक संबंध आहे असें मात्र म्हणतां येत नाहीं. आधुनिक सुधारणेचीं वर सांगितलेलीं जीं मुख्यांगें आहेत, त्यांशिवाय नैतिक, अध्यात्मिक व धार्मिक कल्पनांची प्रगति ह्या तिहींचाहि अ-

न्तर्भाव जर आधुनिक सुधारणेंत होत असेल, तर आ-झाला असें खात्रीनें म्हणतां येतें कीं,—खऱ्या सुधारणेंत जे महत्त्वाचे घटकावयव आवश्यक व्हावे लागतात, ते सांप्रतकाळच्या टेंभा मिरवीत असलेल्या सुधारणेंत खचित नाहींत, आणि म्हणूनच सुधारणा हें नांवच त्याला शोभत नाहीं ! अलीकडील यूरोपांतील सुधारणेचीं तुलना प्राचीन आर्यांच्या सुधारणेशीं केली असतां विलक्षण तफावत दृष्टीस पडून प्राचीन आर्यांचे शोध परमावधीचे म्हणजे पूर्णावस्थेस पोहोंचलेले आहेत असें दिसतें.

पाश्चात्य सुधारणेमध्यें व प्राचीन आर्यांच्या प्रगतीमध्यें कशी तफावत दृष्टीस पडते हें आपण पाहूं. प्राचीन आर्यांची अगदीं साधी वृत्ति आणि पराकाष्ठेची ज्ञानसंपन्नता हीं दोन विशिष्ट लक्षणें असत. ह्यांच्या ऐवजीं आधुनिक सुधारणेंत अशा गोष्टी दृष्टीस पडतात कीं—अनेक व्यवहारांचें मिश्रण आजकालच्या राहणींत झालें पाहिजे, व जीवनकलहामध्यें आपणाहून दुर्बल व कमी धूर्त अशा बांधवांवर आपलें वर्चस्व स्थापन करितां येईल, अशा प्रकारचें जगाचें विस्तृत ज्ञान प्राप्त झालें पाहिजे. हे दोन मोठे फरक आधुनिक सुधारणेंत पूर्वींच्या सुधारणेच्या ऐवजीं झालेले आहेत. प्राचीनकालीं स्पर्धेचें म्हणजे चढाओढीचें तत्त्व केवळ विशिष्ट समाजास व जातीस नियमित रीतीनें लाविलेलें असे. परंतु तें चढाओढीचें तत्त्व आतां इतकें सार्वत्रिक व अनियमित झालें आहे कीं, आपलें जीवन हें जणूं काय घोड्याच्या शर्यतीप्रमाणेंच होऊन गेलें आहे ! पुढें जाईल तो जिंकील; मागें राहील तो फसेल ! ! या शर्यतींत

प्रत्येकानें दुसऱ्यास आपला प्रतिस्पर्धि मानणें व बऱ्या-वाईट कोणत्याहि रीतीनें त्यावर आपलें वर्चस्व स्थापण्याचा प्रयत्न करणें ह्या गोष्टी अगदीं अवश्य झाल्या आहेत. प्राचीन सुधारणा जीवन व समाज ह्यांच्या मिथ्यात्वाच्या दृढकल्पनेच्या पायावर उभारलेली असून त्यामध्यें धर्मप्रभाव पूर्णपणें दृष्टीस पडे, पण आतांची सुधारणा त्याच्या उलट झाली आहे. म्हणजे ती जीवन आणि समाज यांच्या नित्यत्वाच्या कल्पनेच्या पायावर उभारलेली असून ऐहिक सुखाविषयीं त्या सुधारणेंत इतकी आतुरता उत्पन्न झालेली आहे कीं, तेणेंकरून धर्म झुगारून दिल्यासारखा कोठें कोंपऱ्यांत जाऊन पडला आहे ! ह्या स्थित्यंतराचा परिणाम असा विलक्षण झाला आहे कीं, पूर्वींच्या सामाजिक स्थितीचें समाधानवृत्ति हें जें मुख्य लक्षण होतें, त्याऐवजीं आतां जगांत ज्या उत्तमोत्तम वस्तु असतील त्या दुसऱ्यांच्या हातून बुचाडून घेऊन आपण बळकवाव्या ही अनिवार दुरिच्छा प्रदीप्त झाली असून त्याचा रात्रंदिवस सारखा निदिध्यास लागलेला आहे. हा विलक्षण फरक आधुनिक सुधारणेंत झाला आहे. या अनिवार हांवरेपणामुळें तृप्तीचा अभाव होऊन इच्छितवस्तूच्या अप्राप्तीमुळें मनाची तळमळ, त्रास, व संताप हीं उत्पन्न झालेलीं आहेत.

वरील विवेचनांत अर्वाचीन सुधारणेचें महत्त्व कोणत्याहि रीतीनें कमी करावें अशी मुळींच इच्छा नाहीं. तर हल्लींच्या सुधारणेमुळें अनेक तऱ्हेचे पुष्कळ फायदे झालेले आहेत हें निःसंशय कबूल आहे. मग वरील प्रतिपादन तें कशाला ? तर त्या प्रतिपादनाचा मुख्य उ-

द्देश हाच कीं, आधुनिक सुधारणा अपूर्ण असून तिजमध्यें अशीं कांहीं भयंकर व एकदम भडका उडवून देणारीं द्रव्यें आहेत कीं त्यांचा प्रक्षोभ केव्हां होईल आणि समाजाला तीं केव्हां खाड्यांत घालतील ह्याचा मुळींच नेम नाहीं, ह्या गोष्टी वाचकांस स्पष्ट दाखवून द्याव्या. अर्वाचीन शास्त्रीय शोधांनीं व नवीन नवीन युक्त्यांनीं आयुष्यांतील सुखाचे मार्ग पुष्कळ वाढले आहेत हें कबूल असल्याचें वर लिहिलेंच आहे. परंतु ह्याचेबरोबर हीहि गोष्ट विसरतां कामा नये कीं, त्या शोधांच्या व युक्त्यांच्या योगानें समाजास अत्यंत भयावह व विघातक अशा पुष्कळच गोष्टी मनुष्यांच्या आटोक्यांत आल्या आहेत. आपण अलीकडील युद्धकलेकडे अंमळ दृष्टि देऊं. इतर सर्व गोष्टींमध्यें ज्याप्रमाणें सुधारणेची प्रगति होत आहे, त्याप्रमाणेंच युद्धकलेंतहि घातुक शस्त्रास्त्रें निर्माण करण्यामध्यें विलक्षण प्रगति झालेली आहे. समरांगणांत ठाण मांडून उभे राहिलेले सहस्रावधि वीर क्षणार्धांत नाहींसे करून मातीस मिळविणारी आधुनिक तोफांसारखीं घातुक संहारशस्त्रें सांप्रतच्या युद्धांत उपयोगांत आलेलीं आहेत, हें आमच्या बहुश्रुत वाचकांस अवगत आहेच. सारांश, अलीकडची सुधारणा द्विधारी तलवारीसारखी आहे. ह्या तलवारीची तीक्ष्ण धार पूर्वकालीं प्रचलित असलेल्या धर्मतत्त्वांनीं घांसून जर बोथट केली नाहीं, तर जगांवरील मनुष्यमात्राचा केव्हांना केव्हां तरी साफ फन्ना उडाल्याशिवाय खचित राहणार नाहीं.

प्राचीन आर्यतत्त्वें अगदीं निर्दोष होतीं असें म्हण-

णें नाहीं. त्यांत काहीं दोष होतेच; त्या दोषांवर पांघरूण न घालितां त्यांचें आविष्करण एथें करणें आवश्य आहे. प्राचीन आर्यांच्या अखेरच्या म्हणजे परमावधीच्या कल्पना किंचित् आकुंचित होत्या व त्या कालीं बहुजनसमाजापेक्षां व्यक्तीकडे विशेष लक्ष असे, ऐहिक सुखापेक्षां परमार्थाकडे जास्त लक्ष असे, व ऐहिक लाभाकडे आणि बहुसमाजहिताकडे फारच औदासीन्य नजरेस येई. हे जसे त्यांतील दोष तशाच आधुनिक सुधारणेंतहि उलट प्रकारच्या चुक्या पुष्कळ दृष्टोत्पत्तीस येतात. आधुनिक कालीं समाजांत व्यक्तीचा लोप होऊन जातो, व जनसमाजाचें जविन व हित कायम ठेवण्याकडे विशेष लक्ष जाऊन व्यक्तिमात्राचा म्हणजे त्याच्या जीवात्म्याचा जो फायदा त्याचा अभाव होतो. जीवनाच्या आधुनिक कल्पनांवर रचिलेल्या यूरोपांतील समाजांचा अनुभव व त्यांतील दोष आह्मास कळलेले आहेत, व त्याहून भिन्न अशा कल्पनांवर रचिलेला जो प्राचीन आर्य समाज, त्याचा अनुभव व त्यांतील दोषहेहि आह्मास अवगत आहेत. वर सांगितलेल्या प्राचीन व अर्वाचीन कल्पनांमध्यें फायदेहि आहेत आणि दोषहि आहेत, म्हणून आह्मांस स्वीकारण्यास उत्तम मार्ग ह्मटला म्हणजे हाच आहे कीं आपण प्राचीन गोष्टींचा सर्वथैव स्वीकारहि करूं नये, आणि आधुनिक युरोपांतील सुधारणेच्या भपकेदार वैभवास भूलूनहि जाऊं नये, तर मधलाच मार्ग स्वीकारणें हें आह्मांस हितप्रद होय. आह्मांला अशा प्रकारची सुधारणा पाहिजे आहे कीं, जीमध्यें दोहींचेहि फायदे एकवट करितां येतील, व दो-

होंच्याहि परमावधीच्या कल्पनांचा मेळ असा बसवितां येईल कीं एकांतील दोष दुसऱ्यानें भरून निघतील. म्हणजे दोन्ही कल्पनांतील दोषांचा त्याग करून आपलें इष्टकार्य साधेल असाच दोन्ही कल्पनांचा मेळ घालून दिला पाहिजे. आजकाल हिंदुस्थानांत ज्या गोष्टीची विशेष जरूर आहे ती गोष्ट जुन्याचा व नवीनाचा मेळ घालणें हीच आहे. हा मार्ग आपण स्वीकारिला असतां प्राचीन कल्पनांस अजीबात झुगारून दिल्याचा दोषहि येत नाहीं, आणि प्राचीन कालापासून तहत प्रस्तुत कालपर्यंतची सुधारणा अव्याहत रीतीनें कायम ठेविल्यासारखें होऊन पाश्चात्य व पौर्वात्य ज्या उत्कृष्ट कल्पना आहेत, त्यांचें संमेलन होऊन नव्या प्रकारच्या सुधारणा होतील व आपल्या राष्ट्राचें स्वत्व कायम राहील. युरोपामध्यें आजकाल व्यावहारिक चातुर्य आणि विविध गोष्टींचें ज्ञान हीं नजरेस येतात; व पूर्वेकडे उदात्त विचार आणि पारमार्थिक नैपुण्य हीं दृष्टिगोचर होतात. तेव्हां यांचें अपूर्व व विलक्षण असें मिश्रण बनवावें, हेंच वेदान्तशास्त्राचें सांप्रत पुनरुज्जीवन होत आहे त्यांतील मुख्य तत्त्व होय, आणि हें तत्त्व आमच्या आर्यभूमीचे जे खरे हितचिंतक आहेत त्यांस मान्य होईल ह्यांत कांहीं शंका नाहीं.

प्राचीन आर्यांचें परमोदात्त व सर्वोत्कृष्ट तत्त्वज्ञान हें त्यांच्यापासून आह्मांस एक मोठें वतनच मिळालेलें आहे. आमच्या वेदान्तशास्त्रावर सत्याचा व सार्वत्रिकपणाचा जणूं काय असा ठसा मारिलेला आहे कीं, त्यांतील तत्त्वज्ञानाचा उपयोग जगांतील कोणत्याहि समाजास

पाहिजे त्या अवस्थेमध्यें करितां येईल. तत्त्वज्ञान व धर्म हीं सर्व देशामध्यें भिन्न मानिलेलीं असतात; परंतु आमच्या वेदान्तशास्त्राची स्थिति तशी नाहीं. त्यांत तत्त्वज्ञान असून तो उत्कृष्ट धर्महि आहे, म्हणून यूरोपांतील अनेक प्रकारच्या तत्त्वज्ञानांमध्यें व धर्मांमध्यें जो विरोध आपल्या नजरेस येतो, तसा विरोध आर्यतत्त्वज्ञानांत व धर्मांत मुळींच आढळत नाहीं. तत्त्वज्ञान हें ज्ञानवृक्षाचें पुष्प असून धर्म हें त्याचें फल होय. तत्त्वज्ञान हें त्या वृक्षाची उपपत्ति आणि धर्म हें त्या वृक्षाचें व्यावहारिक स्वरूप होय, असें आमचें ठाम मत बनून गेलेलें आहे. परमावधीच्या ज्या सर्वोत्कृष्ट कल्पना, त्या आह्मांला तत्त्वज्ञानापासून प्राप्त होतात व त्या कल्पनांचें आविष्करण व्यवहारांत कसें करावें हें आह्मांला धर्मापासून समजतें. तात्पर्य, धर्म म्हणजे तत्त्वज्ञानाचें व्यावहारिक स्वरूप होय. म्हणून त्याच्यामध्यें कोणत्याहि प्रकारचा विरोध असणें हें अस्वाभाविक आणि अशक्य होय.

ज्या तत्त्वज्ञानाचा परिणाम धर्मस्थापनेंत होत नाहीं, तें तत्त्वज्ञान अगदीं फुकट समजावयाचें. आणि तसलें तें निरोपयोगी तत्त्वज्ञान अवश्य नाहींसें झालेंच पाहिजे. ज्या धर्माचा पाया तत्त्वज्ञानाच्या बळकट पायावर रचिलेला नाहीं, तो धर्म पायाशिवाय उभारलेल्या इमारतीप्रमाणें अगदीं डळमळीत राहतो. आणि झाडावरून खुडलेलें फूल जसें कोमेजून जातें, त्याप्रमाणेंच तो धर्म अधोगतीस अवश्य गेलाच पाहिजे. यूरोप खंडांत ह्याची प्रतीति उलटपक्षीं आपल्या दृष्टीस पडते. तिकडे शास्त्र, तत्त्वज्ञान आणि धर्म ह्यांमध्यें आजकाल केवळ तुंबळ रण

माजून गेलें असून आपआपल्या परी परस्परांच्या उरां-
वर बसावयास तीं पहात आहेत. तिकडील पदार्थविज्ञा-
नशास्त्र तत्त्वज्ञानाला व धर्माला त्यांच्या उच्चासना-
वरून झिंगट्या धरून खालीं ओढूं पहात असून, त्यांत
त्याला कांहीं अंशीं यशहि येत आहे, तसेंच पदार्थवि-
ज्ञानशास्त्राच्या मूलतत्त्वांमध्यें दोष दाखवून त्या शास्त्रा-
चें उच्चाटन करण्याचा दांडगा प्रयत्न तत्त्वज्ञानानेंहि चा-
लविला आहे. हे प्रयत्न एकेरी झाले. कांहीं जुटीचे प्र-
यत्न सुद्धां सुरू आहेत. पदार्थविज्ञान व तत्त्वज्ञान ह्या
दोघांनीं जुगल केली असून ती धर्माला खालीं पाडून चित
करण्यास तयार झालीं आहेत असेंहि दिसतें. त्यांनीं ध-
र्माला अगदीं कुचकामीं ठरविलें असून बुद्धीनें व विचार-
शक्तीनें होणाऱ्या गोष्टींचा समावेश धर्मामध्यें कधींहि
होणार नाहीं असें त्यांचें जोराचें म्हणणें आहे. पदार्थ-
विज्ञानशास्त्र, तत्त्वज्ञान व धर्म ह्या तिघांच्या अशा तीन
वाटा होऊन जो तो अहंमन्यता मिरवूं लागल्यामुळें अ-
र्थात् धर्माचा चुथडा होऊन जातो, आणि त्या बिचा-
ऱ्याला श्रद्धेच्या मांडीवर डोकें ठेवून तिचा आश्रय करणें
भाग पडतें. ह्या स्थितीवरून हें उघड आहे कीं, पाश्चात्य
देशांत विचारशक्तीची स्थिति फार डळमळीत समजली
जाते. व पदार्थविज्ञान, तत्त्वज्ञान, आणि धर्म ह्यांचे हक्क
समाधानकारकरीतीनें स्थापित करण्याची वेळ येईल तेव्हां
बुद्धिशक्तीची निःशंकपणें विलक्षण क्रान्ति होऊन जाईल.

पाश्चात्य स्थितीचें वरील निरीक्षण झालें. आतां आ-
मची स्थिति पाहूं. आमचे प्राचीन आर्य इतके शहाणे व
धूर्त होते कीं, वरील तऱ्हेच्या अडचणी ज्यांत मुळीं

येणार नाहींत, असाच मार्ग त्यांनीं फार विचारांनीं स्वीकारिलेला आहे. प्राचीन आर्यांनीं स्थापित केलेलें वेदान्तशास्त्र तत्त्वज्ञानहि आहे आणि धर्महि आहे. त्याचा पदार्थविज्ञानशास्त्राशीं कोणत्याहि तऱ्हेनें विरोध येत नाहीं, इतकेंच नाहीं, तर पदार्थविज्ञानशास्त्राची वेदान्तानें महती गाइलेली आहे. तत्त्वज्ञानाचें पाऊल नेहमीं पुढेंच पडलें पाहिजे आणि प्राचीन तत्त्वज्ञानापेक्षां आधुनिक तत्त्वज्ञान फारच उत्कृष्ट आहे असें म्हणणाराला असें उत्तर देतां येतें कीं, तत्त्वज्ञानाची प्रगति सर्व तऱ्हेनें होऊं शकत नाहीं. त्याचें पाऊल एका दिशेनें जरी पुढें पडलें, तरी सर्व दिशांनीं त्याची प्रगति सारखी व कायमची होत नसते, आणि म्हणूनच आम्ही असें म्हणतों कीं, आमच्या प्राचीन षड्दर्शनांचा अभ्यास जितका अधिक होईल, तितका फारच उपयोगीं पडेल. षड्दर्शनांच्या अभ्यासापासून बुद्धीस कुशाग्रपणा येतो, इतकेंच नाहीं, तर मनुष्यमात्रास अत्यंत उपयोगी अशीं तत्त्वें त्यापासून विद्यार्थ्यांस प्राप्त होतील. तत्त्वज्ञान ह्या शब्दाचा अत्यंत व्यापक अर्थ ध्यानीं आणिला तर त्यापासून दोन महत्कार्यें घडतात असें कळून येईल. त्यांपैकीं पहिलें कार्य म्हटलें म्हणजे विशिष्ट शास्त्रांची संगति लावून द्यावयाची, म्हणजे अनेक शास्त्रांपैकीं कोणती शास्त्रें केवळ सहायभूत समजावयाचीं, व कोणत्या शास्त्रापासून अखेरचे सिद्धांत निष्पन्न करून घ्यावयाचे हें ठरविणें हीच ती संगति होय, आणि ह्या दृष्टीनें पहातां तत्त्वज्ञानाला प्रगतिक असें म्हणतां येईल. तत्त्वज्ञानापासून होणारें दुसरें महत्कार्य म्हटलें म्हणजे अध्यात्मिक गोष्टींचें विवेचन हें होय. सा-

मान्य बुद्धीला कधींहि आकलन होणार नाहींत अशा गोष्टी तत्त्वज्ञानानें विचारवान् पुरुषास समजतात. तत्त्वज्ञान हें पदार्थविज्ञानशास्त्राचे सिद्धान्तांवर उभें राहून अध्यात्मिक गोष्टींचें विवेचन करितें, व सृष्टीचीं उत्पत्ति कशी झाली, त्याचें आदिकारण कोण, मनुष्य म्हणजे काय, इत्यादि गोष्टींचा उलगडा तें तत्त्वज्ञान लावितें. ब्रह्म म्हणजे काय? आत्मा म्हणजे काय? कर्म व पुनर्जन्म म्हणजे काय? मोक्ष कशाला म्हणावें, आणि कैवल्य म्हणजे काय? हे शुद्ध अध्यामिक विषय आहेत. त्यांचा निकाल सामान्य पदार्थविज्ञानशास्त्रापासून कधींहि होत नाहीं. ह्या विषयांचे विचारांत प्राचीन आर्यांच्या सुसंस्थापित व प्रगल्भ विचारांस प्रतिपक्षी म्हणून कसा तो आजपर्यंत उत्पन्न झालेलाच नाहीं. व ते विचार सुधारलेल्या आधुनिक राष्ट्रांसहि थक्क करून सोडितात. ह्या विषयाबद्दल आतां आणखी विवेचन झालें पाहिजे असें वाटत नाहीं. प्राचीन आर्यदर्शनांच्या अभ्यासापासून आपण काय शिकावें हें वर झालेल्या एकंदर विवेचनावरून वाचकांच्या ध्यानांत येईलच. आधुनिक सुधारणेच्या ज्ञानाचे मदतीस प्राचीन आर्यांचें ज्ञान घेतल्याशिवाय आधुनिक ज्ञानापासून जगताला कांहींएक उपयोग होणार नाहीं हें चांगलें ध्यानांत ठेवण्यासारखें असून आज जें वेदान्तशास्त्राचें पुनरुज्जीवन होत आहे, त्याचा उपयोग ह्या कामीं सर्वोत्कृष्ट होईल. तेव्हां त्या पुनरुज्जीवनाची उपयुक्तता आजकाल किती आहे हें निराळें सांगावयास पाहिजे असें नाहीं.

---

# प्रकरण चवथें

## पुनर्जन्म

वासांसि जीर्णानि यथा विहाय । नवानि गृह्णाति नरोऽपराणि ॥
तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ॥ १

—भगवद्गीता

सृष्टींतील सर्व दृश्य चमत्कार कार्यकारणभावांच्या सार्वत्रिक नियमानें बद्ध झालेले आहेत. ह्या दोहोंपैकीं कार्य नेहमीं दृष्टिगोचर होतें; परंतु कारण बहुधा अदृश्य असतें. वृक्षापासून आम्रफलाचें अधःपतन हें गुरुत्वाकर्षण म्हणून जो एक अदृश्य वेग आहे, त्या वेगाचें कार्य होय. आतां हा वेग जरी इंद्रियांस गोचर नाहीं, तथापि त्याचा परिणाम दृष्टिगोचर आहे. अशा रीतीनें पाहतां सर्व दृश्यचमत्कार हीं जगांतील द्रव्यांचीं जीं अनेक सूक्ष्मरूपें आहेत, त्या रूपांवर घडणाऱ्या नानाप्रकारच्या वेगांचीं कार्यें होत. हे अदृश्य वेग व द्रव्यांचे परमाणु मिळून सृष्टींतील सूक्ष्म शरीरें बनतात. ह्या सूक्ष्म वेगांचा जेव्हां पदार्थ बनतो, तेव्हां तो आपल्या स्थूल परिमाणानें दृष्टीस पडतो. ह्यावरून आपणांस असें म्हणतां येईल कीं, जो जो स्थूल पदार्थ सृष्टीमध्यें आपणास दिसतो, तो तो द्रव्यांच्या सूक्ष्म परमाणूंवर घडणाऱ्या सूक्ष्म वेगाचें कार्य होय. ही गोष्ट आपण उदाहरणांनीं व्यक्त करूं. आक्सिजन व हैड्रोजन ह्या वायूंचे सूक्ष्म परमाणु जेव्हां रासायनिक वेगानें मिश्र होतात, तेव्हां ते पाण्याच्या सूक्ष्म रूपानें नजरेस पडतात. पाण्याचे जे सूक्ष्म घटकावयव आक्सिजन व हैड्रोजन, त्यांपासून पाणी भिन्न

करितां येत नाहीं. पाण्याचें अस्तित्व त्याच्या घटकावयवांवर म्हणजे सूक्ष्म रूपावर अवलंबून असतें. ही सूक्ष्मावस्था जर बदलली, तर स्थूल पदार्थांमध्यें सुद्धां फरक दृष्टीस पडतो. एकाद्या वनस्पतीच्या स्थूल रूपामध्यें जो विशेष नजरेस येतो, तो त्या वनस्पतीचें जें सूक्ष्मरूप म्हणजे बीज, त्या बीजाच्या विशेष अवस्थेवरहि अवलंबून असतो. सूक्ष्मदर्शकयंत्रानें दिसणारा अतिसूक्ष्म जीवबिंदु व त्या जीवबिंदूपासून पूर्णावस्थेप्रत प्राप्त झालेला पुरुष ह्या दोहोंमधल्या ज्या अनेक अवस्था आहेत, त्या प्रत्येक अवस्थेंत दिसणारीं जीं सूक्ष्मशरीरें, त्या सूक्ष्मशरीरावर त्या पुरुषाचा स्थूलदेह अवलंबून असतो. मनुष्यमात्राचें स्थूलशरीर त्याच्या लिंगदेहाशीं निकट संबद्ध असतें. एवढेंच नव्हें, तर लिंगदेहांतील चलनवलनादि व्यापार व रूपांतरें ह्यांच्या योगानेंच त्याच्या स्थूलशरीरांतील चलनवलनादि व्यापार व रूपांतरें घडलेलीं असतात. लिंगदेहामध्यें जर यत्किंचित् फरक झाला, तर स्थूलशरीरावरहि त्याप्रमाणेंच विकार घडतो. तस्मात् लिंगदेहाचेंच स्थूलशरीर बनलेलें असल्यामुळे स्थूलशरीराची उत्पत्ति, वाढ आणि नाश हीं लिंगदेहाच्या विकारावर अवलंबून असतात.

एवढा वेळपर्यंत खनिजकोटी, उद्भिज्जकोटी, आणि प्राणिकोटी ह्यांमध्यें लिंगदेहापासून स्थूलशरीरें कशीं बनतात, ह्याचें विवेचन झालें. आतां लिंगदेह म्हणजे काय हें पाहूं. **लिंगदेह** म्हणजे सजीव पदार्थांचें सूक्ष्म बीज होय. एकाद्या वनस्पतीच्या बीजांमध्यें जीवनवेग व वृद्धिंगत होण्याची शक्ति हीं दोन्ही जशीं राहतात, तसेंच

मनुष्याच्या लिंगदेहामध्यें जीवनवेगानें संबद्ध झालेले अदृश्य द्रव्यपरमाणु असतात, इतकेंच नाहीं तर त्यामध्यें भावी वृद्धिंगत होणारा मनोवेग (thought-force) हि असतो. वेदान्तशास्त्रांत तर ह्या लिंगदेहाचें उत्कृष्ट विवेचन केलेलें आहे. जीवनकलेनें आकृष्ट झालेले पंचमहाभूतांचे सूक्ष्म परमाणु, पंचज्ञानेंद्रियें ( चक्षु, कर्ण, घ्राण, जिव्हा, त्वचा ), पंचकर्मेंद्रियें ( वाक्, हस्त, पाद, उपस्थ, गुद ), पंच प्राण ( प्राण, अपान, व्यान, उदान, समान ), मन, आणि बुद्धि इत्यादिकांचीं सूक्ष्म रूपें इतकीं मिळून लिंगदेह बनतो. प्राण शब्दाचा अर्थ जीवनशक्ति असा असून तो प्राण जरी एकच आहे, तथापि शरीरांतील निरनिराळ्या वायूंस त्यांच्या पृथक्पृथक् कार्यांवरून प्राण, अपान, समान, उदान आणि व्यान अशीं पांच निरनिराळीं नांवें पडलीं आहेत. प्राणवायूचा धर्म बाहेरचा वायु फुप्फुसांत घेऊन आंतील बाहेर टाकावयाचा हा आहे. शरीरांत ज्या वायूंची गरज नाहीं, ते बाहेर टाकणें ही क्रिया अपानवायु करितो. शरीरांतील पचनक्रिया करून त्याच्या प्रत्येक भागास अन्नरस पोहोंचविणें हें काम समान वायूचें आहे. उदान वायूचा धर्म घशाखालीं उतरलेलें अन्न जठराग्नीस पोहोंचविणें व वाचाशक्ति उत्पन्न करणें हा आहे. आणि पांचवा व्यान वायु हा नखशिखान्त शरीराच्या सर्व भागांत व नाडींत फिरून शरीराची आकृति कायम ठेवणारा आहे, आणि तो प्रत्येक इंद्रियाला तरतरी आणितो. ह्या सगळ्या वायूंचें नांव **प्राण** होय. हे पांच वायु जीवनवेगाचीं रूपें आहेत. वर सांगितलेल्या सूक्ष्म शक्ति, स्थूल शक्ति,

स्थूल शरीरांतील द्रव्यपरमाणु, व एका जन्मामध्यें मनुष्याचे मनावर घडलेले संस्कार, संकल्प व वासना ह्यांचीं भावि रूपें मिळून लिंगदेह बनला जातो. मनुष्य ह्या जन्मीं जीं जीं भिन्न कर्मे मनानें किंवा शरीरानें करितो, त्याचे परमाणु पुढील जन्मीं होणाऱ्या वासना व संकल्प होत. पूर्वजन्मांतील कोणत्याहि संस्काराचा परिणाम पुढच्या जन्मीं झालेला नाहीं असें मात्र घडत नाहीं.

एका जन्मामध्यें आपण जीं शारीरिक व मानसिक कर्में करितों, व जे जे संकल्प मनांत आणितों, ते सूक्ष्म होऊन संस्काररूपानें पुढच्या जन्मीं कायम राहतात. ते संस्कार कांहीं कालपर्यंत स्तिमित असतात हें खरें, परंतु नियमित कालानंतर समुद्रलहरीप्रमाणें तें गुप्तसंस्कारित मन प्रक्षुब्ध होऊन निरनिराळ्या इच्छा उत्पन्न करितें. त्यांस वेदान्तशास्त्रांत वासना असें म्हणतात. **वासना** म्हणजे उत्कट इच्छा. प्राण्यास जे नवीन देह घ्यावे लागतात, त्यांचे जनक त्या वासनाच होत. ऐहिक सुखें व पदार्थ ह्यांच्या प्रबल वासना जोंपर्यंत मनुष्यामध्यें राहतात, तोंपर्यंत प्राण्याला अनेक जन्म घ्यावे लागतात. शंभर जन्म झाले, तथापि वासना जर कायम आहे, तर त्यासाठीं आणखी जन्म घ्यावेच लागतात. त्या प्रबल वासनांची गति कुंठित होत नाहीं. केव्हां ना केव्हां तरी वासनाशांति झाली, तरच नवे जन्म चुकण्याचा संभव आहे.

लिंगदेहामध्यें जे जे गुप्तसंस्कार असतात, त्या संस्कारांअन्वयें शरीराचीं, इंद्रियांचीं किंवा मनाचीं कर्में घडून येतात. तीं कर्में कधीं आपल्या इच्छेप्रमाणें घडतात, कधीं इच्छेविरुद्धहि घडतात. जरी आपल्या स्थूल

भौतिकशरीराची वाढ, पोषणक्रिया आणि इतर सर्व विकार त्या त्या कारणांनीं घडून येतात, तथापि एकंदर सर्व कर्मे, तीं घडवून आणण्यास शरीराची जी स्थिति लागते ती, आणि आपले शरीरास जीं अवस्थांतरें घडतात, तीं सर्व लिंगदेहांत संचित झालेल्या गुप्तसंस्कारांचे बाह्य परिणाम होत. संस्कारांच्या स्वरूपाचा एकंदर मानवी शरीराशीं असणारा ऐक्यभाव वर सांगितलेल्या गोष्टींवर अवलंबून राहतो. म्हणून आपल्यामध्यें ज्या वासना अत्युत्कट असतात, त्यांशीं अन्वय पावणारीं अशीं इंद्रियें बनतात. अर्थात् इंद्रियें हीं वासनांचे बाह्य परिणाम होत. जर आपल्यास क्षुधा म्हणजे अन्नभक्षणाची इच्छा नसती, तर दांत, कंठ, आणि आंतडीं ह्यांचा कांहींएक उपयोग होणार नाहीं. आपल्याला कोणताहि पदार्थ ग्रहण करण्याची किंवा चलनवलनाची इच्छा नसेल, तर हस्तपादादि अवयव निरुपयोगी होतील. त्याप्रमाणेंच, पाहण्याची व ऐकण्याची इच्छा असते त्यामुळें डोळे व कान उत्पन्न होतात. जर हस्तचालनाची आपण इच्छा केली नाहीं, व हाताचा आपण मुळींच उपयोग केला नाहीं, तर थोड्याच दिवसांत हात वाळून काष्ठवत् होतो. असे काष्ठवत् ऊर्ध्वहस्त झालेले कांहीं अघोरपंथी लोक वाचकांच्या पाहण्यांत आलेले असतीलच. तसेंच एकादा मनुष्य सहा महिनेपर्यंत सारखा अंथरुणावर पडून राहील्तर, कांहीं दिवसांनीं त्याची चालण्याची शक्ति नष्ट होईल. असलींहि उदाहरणें पाहण्यांत येतातच.

सामान्यतः मानवी प्राण्याच्या शरीराचा आकार त्या-

च्या इच्छेशीं अनुरूप असतो. त्याप्रमाणेंच व्यक्तिमात्राच्या जसजशा वासना, इच्छा, व विचार असतात, त्या त्याप्रमाणें त्याच्या शरीराची ठेवण बनते. आणि त्यावरून पाहतां मनुष्याचा बाह्य आकार हा त्याच्या अंतःस्वरूपाचें केवळ आविष्करण होय. व्यक्तिमात्राच्या अंतःस्वरूपामुळें त्यास निरनिराळीं रूपें प्राप्त होऊन त्याला एकामागून एक जन्म येतात. मनुष्य मरतो, तेव्हां त्याचा जीवात्मा नष्ट होत नाहीं. तर तो अदृश्य रूपानें कार्यकारणभावाच्या नियमामुळें आपले निरनिराळे जन्म ज्या अक्षय रज्जूनें बद्ध झालेले असतात, त्या रज्जूंत राहतो. अनंत व अनादि कालापासून निर्माण झालेल्या जलबिंदूप्रमाणें हा लिंगदेह असून त्या लिंगदेहांत चिच्छक्ति समाविष्ट असते. जसा एकादा जलबिंदु कधीं मेघांमध्यें अदृश्य वायुरूपानें असतो, कधीं पर्जन्यधारारूपानें, कधीं हिमरूपानें, कधीं बर्फाच्या रूपानें असतो, कधीं कधीं फिरून त्याची वाफ होते, व कधीं चिखलांतहि असतो, परंतु त्याचा समूळ नाश कधींच होत नाहीं, त्याप्रमाणेंच लिंगदेहाचें आहे. तो कधीं कधीं अव्यक्त असतो, व कधीं कधीं पूर्वजन्मांतील वासना व संस्कार ह्यांस अनुरूप अशा एकाद्या प्राण्याच्या किंवा मनुष्याच्या स्थूल रूपानें व्यक्त होतो. हा लिंगदेह कधीं स्वर्गास जाईल किंवा आकाशांतील एकाद्या ग्रहगोलावरहि जाईल. किंवा ह्या पृथ्वीवरच तो फिरून जन्मास येईल. ह्या सर्व गोष्टी पूर्वजन्मार्जित वासनेच्या जोरावर अवलंबून असतात. ह्या विचाराचें वेदान्तशास्त्रांत असें स्पष्टीकरण केलें आहे कीं, मनुष्य जिवंत असतां जे संकल्प, ज्या वासना, व ज्या इच्छा त्याच्या

ठायीं अत्यंत प्रबल असतात, त्या मरणकालीं फार जोरावतात; आणि मरणाराचें अंतःस्वरूप त्याप्रमाणें बनतें. व अशा रीतीनें बनणारें जें अंतःस्वरूप, तें पुनर्जन्माचे रूपानें व्यक्त होतें. अशा रीतीनें अंतःस्वरूप बनविणारे जे संकल्प, वासना, व इच्छा त्यांच्यामध्यें अशी कांहीं एक विलक्षण शक्ति आहे कीं त्या शक्तीच्या योगेंकरून त्या त्या वासना संतृप्त होण्यास ज्या ज्या अवस्था व उपाधि पाहिजे, त्यांची त्यांची निवड ते संकल्प व त्या वासनाच करितात. ह्या क्रियेला उत्क्रांतितत्त्वाभिमानी लोक 'नैसर्गिक निवडणुकीचा नियम' असें म्हणतात. इंग्रजींत ह्याला Law of Natural Selection ही संज्ञा आहे.

वर सांगितलेली क्रिया स्पष्टपणें कळण्यासाठीं, वनस्पतींचीं निरनिराळीं बीजें भिन्नभिन्न द्रव्यांतून आपणांस हवे तसतसे भिन्नभिन्न रस कसे शोषण करून घेतात हे पाहूं. आपण आम्रबीजहि रुजण्यास घालितो, आणि गुलाबाचें बीजहि घालितो. त्या दोघांला जी माती व जें पाणी आपण घालतों, तीं वस्तुतः एकसारखींच असतात. सूर्याची उष्णता दोघांला पोहोंचते, तीहि सारखीच असते; आणि दोन्ही बीजांतील वाढीची शक्तिहि सारखीच असते; तथापि त्या बीजांत असा कांहीं विशेष धर्म असतो कीं, त्या योगें बाहेरच्या द्रव्यांतून आपणांस लागतील तेवढेच रस तीं शोषून घेतात. त्या बीजांपासून उत्पन्न होणारें जें फूल किंवा फळ यावयाचें असेल, त्याच्या विशिष्ट रूपाच्या वाढीस साहाय्यकारक असेच रस त्या बीजांला आकर्षण करून घेतां येतात. हें जसें, तसेंच मनुष्याचेंहि आहे. मरणाऱ्या मनुष्याचें लिंगशरीर वर सां-

गितलेल्या नैसर्गिक निवडणुकीच्या नियमाप्रमाणें आपल्या अवशिष्ट वासनांस व्यक्त होण्याची संधि मिळेल अशाच अवस्थांची निवड करितें. मनुष्य मृत झाल्यावर पुनर्जन्म प्राप्त होणाऱ्या ज्या अनेक अवस्था, त्यांपैकींच **मातापितरें** ही एक मुख्यावस्था आहे. नवीन बनणारें अंतःस्वरूप किंवा लिंगदेह हा आपणास योग्य अशाच मातापितरांची निवड नैसर्गिक निवडणुकीच्या नियमानें करितो, आणि त्याच्या पोटीं तो जन्मास येतो. जसें एकाद्याची चित्रकलेंत निपुण होण्याची बलवत्तर इच्छा आहे आणि त्यानें उत्कृष्ट चितारी होण्याकरितां साऱ्या जन्मभर खटपट करून ती साध्य झाली नाहीं, तर तो मनुष्य मरणोत्तर अशाच मातापितरांच्या पोटीं येईल, व अशाच अवस्था त्याला प्राप्त होतील कीं तेणेंकरून उत्कृष्ट चितारी होण्यास त्याला साहाय्य होईल. एवढा वेळपर्यंत सांगितलेल्या ह्या क्रियेस पूर्वात्य तत्त्वज्ञानामध्यें **पुनर्जन्म** असें म्हणतात.

लिंगदेह आपलया पुढील अवस्थेची निवड नैसर्गिक निवडणुकीच्या ( Law of natural selection ) तत्त्वानें करितो, व जीवात्म्याला पुनर्जन्म आहे, हें पूर्वात्य तत्त्व पश्चिमेकडील राष्ट्रांत सर्वमान्य जरी झालेलें नसलें, तथापि प्राचीनकालीं व आधुनिककालींहि अनेक तऱ्हेच्या लोकांनीं म्हणजे महान् तत्त्ववेत्ते, धर्मोपदेशक, इतिहासकार, साधु, कवि इत्यादिकांनीं निःसंशय मान्य केलें आहे. प्रथमतः मिसर देशाकडे आपण पाहूं. तो देश सर्व पृथिवीमध्यें पहिल्यानें सुधारलेला होता. त्यांत हें तत्त्व मान्य होतें. प्रसिद्ध ग्रीक इतिहासकार हेरोडोटस

ह्यानें असें लिहिलें आहे कीं—" मानवी आत्मा अमर आहे, आणि जेव्हां मनुष्य मृत होतो तेव्हां त्याचा आत्मा दुसऱ्या एकाद्या शरीरामध्यें शिरतो, हें तत्त्व मिसरदेशांतलि लोक प्रतिपादन करीत असत." पायथॅगोरास म्हणून जो तत्त्ववेत्ता होऊन गेला, त्यानें व त्याच्या शिष्यमंडळीनें पुनर्जन्म-मताचा प्रसार ग्रीस व इताली देशांत केलेला आहे. सदरहु तत्त्ववेत्ता एकदां रस्त्यांतून चालला असतां त्याला वाटेंत एक श्वान भेटला; तेव्हां पूर्वीं मरून गेलेल्या एका मित्राचा आत्मा त्या श्वानदेहांत प्रविष्ट झाला होता, असें त्यानें ओळखिलें, ही गोष्ट ग्रीसच्या इतिहासांत प्रसिद्ध आहेच. साक्रेटिसाचा सच्छिष्य व महान् तत्त्ववेत्ता जो प्लेटो, त्यानें रचिलेल्या ग्रंथांची तर पुनर्जन्म ही गुरुकिल्लीच होती. त्या प्लेटोनें असें म्हटलें आहे कीं—" आपल्या शरीरापेक्षां आत्मा हा फार जुनापुराणा आहे व तो पुनःपुनः निरनिराळे जन्म घेतो." इताली देशांतील महाकवि व्हर्जिल व ओव्हिड ह्यांच्या काव्यांमध्यें ठिकठिकाणीं पुनर्जन्माचें प्रतिपादन केलेलें आढळतें. ओव्हिडच्या काव्याचें ड्रायडन नामक इंग्लिश कवीनें भाषांतर केलें आहे. त्यांत लिहिलें आहे कीं—" आपला जो अजरामर आत्मा, त्याला मारण्याची मृत्यूच्या अंगीं शक्ति नाहीं. एका देहाची मृत्तिका झाली असतां आत्मा नवें वसतिस्थान शोधून काढितो व तेथें जीव व प्रकाश उत्पन्न करितो." इराण देशांतील प्राचीन तत्त्ववेत्त्यांच्या धर्मांत पुनर्जन्म हेंच सार होतें. शिकंदर बादशाहानें हिंदुस्थानांत स्वारी केल्यानंतर त्यानें आर्यतत्त्वज्ञान्यांच्या सहवासानें पुनर्ज-

न्माचें तत्त्व मान्य केलें होतें असा आधार मिळतो. फ्रान्स देशांतील मूळचे रहिवासी, ज्यांस गाल असें म्हणत, त्यांचा पुनर्जन्मावर पूर्ण विश्वास होता, असें प्रख्यात रोमन ग्रंथकार व योद्धा जो जूलियस सीझर त्यानें लिहून ठेविलें आहे. ब्रिटन देशांतील प्राचीन धर्मोपदेशक, ज्यांना ड्रुइड असें म्हणत, ते असें मानीत असत कीं "मनुष्याचा आत्मा देह नष्ट झाल्यावर आपल्या स्वभावास व इच्छेला अनुरूप अशा दुसऱ्या शरीरांत प्रवेश करितो." अरबस्तानांतील प्राचीन तत्त्ववेत्ते व मुसलमान सुफी पंडित यांचा पुनर्जन्म-प्रतिपादन हा आवडता विषयच होऊन गेलेला होता. यहुदी लोकांनीं बाबिलोनिया एथील बंदिवासानंतर पुनर्जन्म-मत मान्य केलें होतें. त्या लोकांमध्यें एलिजा म्हणून जो साधु होऊन गेला, त्याचाच जॉन बापटिष्ट हा अवतार होऊन गेला, असें ते लोक मानीत असत. तसेंच, खुद्द येशू ख्रिस्त आणि यहुदी लोकांचा स्मृतिकार जो मोझेस हेहि पूर्वींच्या साधूंचे अवतारच होते, असें यहुदी लोक मानीत असत. ख्रिस्ती धर्माकडे वळलें तरी हाच प्रकार दृष्टीस पडतो. तें शास्त्र पुनर्जन्ममतापासून अलग आहे असें नाहीं. आरिगेन म्हणून जो ख्रिस्ती धर्मोपदेशक होऊन गेला तो लिहितो कीं—" दोन मनुष्यांपैकीं एकाची पुण्याकडे व एकाची पापाकडे प्रवृत्ति व्हावी, तसेंच एकाच मनुष्याची एका कालीं पुण्याकडे व एका कालीं पापाकडे प्रवृत्ति होते, ती तशी कां व्हावी? हा फारच मोठा गूढ प्रश्न आहे. देहाच्या उत्पत्तीनंतर ह्याचें कारण शोधूं लागलें तर कांहींएक समजत नाहीं. त्याचें कारण शोधण्यास देहोत्पत्तीच्या

अगोदरचाच विचार केला पाहिजे." ख्रिस्ती लोकांत पुनर्जन्माच्या मताचा फैलाव इतक्या जलदीनें होऊं लागला होता कीं, रोमन लोकांचा बादशाहा जो जस्टीनियन. त्याला ख्रिस्ती शकानंतर ५३८ या वर्षीं कान्स्टान्टिनोपल एथील राजसभेमध्यें एक नवा कायदा करून या मताचा उच्छेद करणें भाग पडलें. त्या कायद्यांत असें ठरविलें होतें कीं,—"ह्या देहाच्या पूर्वींहि आत्म्याचें अस्तित्व होतें व पुढेंहि तो पुनः जन्मास येणार, हें पौराणिक व चमत्कारिक मत मान्य करून त्याचा जो प्रसार करील त्याला बहिष्कृत समजलें जाईल." सतराव्या शतकांत केंब्रीज विश्वविद्यालयांतील प्लेटोच्या मतानुयायांनीं पुनर्जन्माचें मत मान्य केलें होतें. जर्मनीच्या इतिहासांतील मध्यकालीं (ख्रिस्ती शकानंतर ५०० व १५०० यांमधील कालीं) झालेल्या व सांप्रतच्या पुष्कळ जर्मन तत्त्ववेत्त्यांनींहि हें मत प्रतिपादन केलेलें आहे. **क्यांट**, शेलिंग, **गोएथ** इत्यादि जर्मन तत्त्ववेत्त्यांच्या ग्रंथांतून पुनर्जन्म-मताच्या पुष्टीकरणार्थ आह्माला अनेक उतारे देतां येतील, परंतु विस्तारभयास्तव दिले नाहींत. नास्तिकशिरोमणि **ह्यूम** यानें आत्म्याच्या अमरत्वाबद्दल लिहून ठेविलेला निबंध त्याच्या मरणोत्तर प्रसिद्ध झालेला आहे. त्यांत त्यानें असें लिहिलें आहे कीं—"मनुष्यमात्रामध्यें अवस्थाभेद, चित्तवृत्तिभेद, इत्यादि जे भेद आढळून येतात, त्यांचा तात्त्विकदृष्टया विचार केला असतां पुनर्जन्माचें मत ग्रहण केल्याशिवाय मुळीं सोयच नाहीं." आधुनिक पदार्थविज्ञानशास्त्रवेत्ते प्रो० हक्स्ले ह्यानीं लिहिलें आहे कीं—"पुनर्जन्माचें मत असंभाव्य आहे, असें अविचारी लो-

क म्हणोत, परंतु जगांतील वस्तुस्थितीचें खरें ज्ञान होण्यास उत्क्रांतितत्त्वाच्या मताची जशी आवश्यकता आहे, तसेंच पुनर्जन्ममत मान्य करणेंहि अतिशय जरूर आहे. हें मत मान्य केल्याशिवाय जगांतील अनेक गोष्टींचा उलगडा होणें शक्यच नाहीं." ईश्वरज्ञानवेत्ता इमर्सन ह्यानें 'अनुभव' या विषयावरील आपल्या निबंधांत म्हटलें आहे कीं—"आपण जागें होऊन पाहावें तों सोपानपरंपरेच्या मध्यभागीं आपण बसलों आहों असा भास होतो. खालीं दृष्टि दिली म्हणजे बऱ्याच पायऱ्या चढून आपण वर आलों आहों असें दिसतें. आणि वर दृष्टि दिली म्हणजे आपणांस पुष्कळ पायऱ्या चढून जावयाचें आहे असें दिसून कांहीं पायऱ्यांचा तर आपणास पत्ताहि लागत नाहीं." वर्ड्सवर्थ, राजकवि टेनिसन इत्यादि पाश्चात्य कविश्रेष्ठांनीं हि पुनर्जन्ममत मान्य केलेलें आहे. व्हिटमन् कवीनें म्हटलें आहे कीं, "हे जीवात्म्या, तूं अनेक वेळां मरून शिल्लक राहिलेला आहेस. मी पूर्वी दहा हजार वेळां मृत झालों आहें ह्यांत शंका नाहीं."

आफ्रिका, अमेरिका, एशिया ह्या खंडांतील जे मूळचे अडाणी लोक त्यांमध्येंहि पुनर्जन्ममत दृष्टीस पडतें. एशियाखंडांतील तीनचतुर्थांश लोक ह्या मतावर विश्वास ठेवणारे आहेत. मृत्यूनंतर जीवात्म्याचें अस्तित्व ज्यांत कबूल केलें जात नाहीं असा जगाच्या पाठीवर एकहि धर्म सांपडणार नाहीं.

अल्पवयांतच अलौकिक बुद्धिमत्तेच्या उदाहरणांकडे आतां लक्ष देऊं. पास्कल म्हणून जो विद्वान् होऊन गेला, तो बारा वर्षांचा असतांच त्यानें सरलभूमितीचीं मुख्य

प्रमेयें शोधून काढिलीं. मंगिआमेलो हा निवळ धनगर होता, तथापि तो पांच वर्षांचा असतांच गणिताचीं कठिण उदाहरणें सहज करून टाकी. त्याला ‘ गणिताचें यंत्र ’ हें नांव लोकांनीं ठेविलें होतें. कालबर्न म्हणून एक विद्वान् होऊन गेला, तो आठ वर्षांचा होण्यापूर्वींच पाटीवर आंकडे न मांडितां तोंडानेंच गणिताचे प्रश्न चट्कन् सोडवी. एकदां त्यानें ८ ह्या संख्येचा षोडशघात तोंडानें करून दाखविला. त्या षोडशघाताची संख्या पंधरा आंकड्यांची म्हणजे २८,१४,७४,९७,६७,१०,६५६ ही होती! तो सहा आंकड्यांच्या रकमेचें वर्गमूळ व दशकोटी संख्येचें घनमूळ विचारल्याबरोबर बिनचूक सांगे. ४८ वर्षांचीं मिनिटें किती? असें एकानें त्याला विचारितांच त्यानें २,५२,८८,८०० असें एकदम सांगितलें. मोझार्ट म्हणून जो प्रसिद्ध गायनशास्त्रज्ञ होऊन गेला, त्यानें चार वर्षांचा असतां पदें रचिलीं, व आठ वर्षांचें वय असतां तर, त्यानें एक संगीत नाटकग्रंथ लिहिला. मिलानोला म्हणून जी एक स्त्री तंतुवाद्यांत प्रवीण होऊन गेली, ती अगदीं अल्पवयांतच सारंगी उत्कृष्ट वाजवी. तें पाहून पुष्कळ लोक म्हणत असत कीं, ती जन्मास येण्यापूर्वींच तिचा तंतुवाद्यावर अभ्यास झालेला असावा. ह्याप्रमाणेंच बाल्यावस्थेंत असतां ज्यांनीं आपल्या बुद्धिमत्तेचा प्रभाव दाखवून लोकांस थक्क करून सोडिलें असे कित्येक अलौकिक शक्तीचे चित्रकार व शिल्पज्ञ होऊन गेलेले आहेत. श्रीमच्छंकराचार्य हे बारा वर्षांचे असतांच त्यानीं उपनिषदांवरील, गीतेवरील, व ब्रह्मसूत्रांवरील भाष्य पुरें केलें. अशीं उदाहरणें दृष्टिगो-

चर होतात, म्हणून हा पूर्वजन्मसंस्कारच म्हणावयाचा. होमर, प्लेटो, शेक्सपीयर इत्यादि लोकोत्तर पुरुषांनीं बाल्यावस्थेंत जी अलौकिक बुद्धिमत्ता प्रकट केली, त्याचा संबंध त्यांच्या पूर्वजांपैकीं कोणाकडेहि लावितां येत नाहीं. त्यांच्या बुद्धिमत्तेच्या कारणाचें समाधानकारक उत्तर पुनर्जन्मतत्त्व हेंच होय, असें म्हटल्याशिवाय सोय नाहीं. वाल्मिकानें तुळशीदासाचा अवतार घेतला, उद्धवानें नामदेवाचा अवतार घेतला, आणि शुकानें कबिराचा अवतार घेतला अशा कथा आहेत. ते जन्मतःच भगवद्भक्त बनले व सर्व जगास थक्क करून सोडणारे प्रासादिक ग्रंथ त्यांनीं लिहिले. हें सर्व पूर्वजन्मार्जित कर्माचें फल होय असें वेदान्तशास्त्रानें सिद्ध केलेलें आहे.

अखिल जगांतील दृश्य पदार्थांमध्यें विचित्र प्रकार, भेद व विषमता दृष्टीस पडतात, त्याबद्दल वेदान्तशास्त्राचें ठाम मत असें आहे कीं, मनुष्य मृत होतो तेव्हां त्याचा जीवात्मा संकोच पावतो, व पूर्व देह सोडून तो दुसऱ्या एकाद्या जीवाच्या बीजरूपानें बाहेर पडतो. एक मनुष्य साधु असतो व दुसरा खुनी बनतो, ह्याचें मुख्य कारण पाहूं लागलें तर त्या त्या व्यक्तीचीं पूर्वजन्मांतील कर्में हेंच होय. लिंगदेहांत संचित होऊन राहिलेले जे गुणधर्म असतात, तेच पुढें मनुष्याच्या स्वभावामध्यें दृष्टीस पडतात. कित्येकांस अगदीं अल्पवयांतच अलौकिक बुद्धिमत्ता व शक्ति असल्याचीं उदाहरणें नजरेस येतात. तसें कां बरें असावें? ह्याबद्दल समर्पक व तर्कशास्त्रास समाधानकारक असें विवरण पुनर्जन्ममताचा स्वीकार केला तरच होतें. एरव्हीं होत नाहीं.

वेदान्ती लोक पुनर्जन्माचें प्रतिपादन दुसऱ्या रीतीनें असें करितात कीं, जगांत जी जी घटना होते व जी जी क्रिया होते, त्यांपैकीं कांहींएक निष्फळ होत नाहीं. त्याचा कांहींतरी परिणाम अवश्य घडतोच. कोणतीहि वस्तु फार झालें तर मोडेल किंवा फुटेल, परंतु तिचा समूळ नाश कधींहि होणार नाहीं, हें जसें आधुनिक पदार्थविज्ञानवेत्ते म्हणतात, तसेंच वेदान्तशास्त्राचेंहि मत आहे. वेदान्तशास्त्रांत स्पष्ट असें म्हटलें आहे कीं, अभावाचा कधींहि भाव होणार नाहीं व भावाचा अभाव होणार नाहीं. म्हणजे जी वस्तु पूर्वीं कधींच अस्तित्वांत नव्हती, अशी वस्तु अस्तित्वांत येणें शक्यच नाहीं. आणि उलट पक्षीं जी वस्तु कोणत्या तरी रूपानें अस्तित्वांत असेल, अशी वस्तु अगदीं नाहींशी झाली असेंहि कधीं होणार नाहीं. हा सिद्धांत प्रस्तुत विषयासंबंधानें फारच विचार करण्यासारखा आहे.

नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ॥

असें गीताशास्त्रांत वचन आहे, त्याचाहि भावार्थ वर लिहिला तोच आहे. वर सांगितलेला हा सृष्टिधर्मच आहे. त्याप्रमाणें पाहतां, आज आपल्या मनांत जे संकल्प आले व मनावर जे जे संस्कार झाले त्यांचा समूळ नाश कधींच होणार नाहीं. तर ते संस्कार व संकल्प आपल्याबरोबर कोणत्या तरी स्वरूपानें नेहमीं राहणारच. आत्मा एक शरीर सोडून दुसऱ्या शरीरांत प्रविष्ट झाला, तथापि ज्या ज्या घटकावयवांनीं हें शरीर बनलें आहे, ते ते घटकावयव, संस्कार व संकल्प हीं अव्यक्त रूपानें लिंगदेहांत जशाचीं तशीं राहिलींच पाहिजेत. सृष्टिनियमाप्रमाणें त्यां-

चा समूळ नाश होणें शक्यच नाहीं. पदार्थविज्ञानशास्त्राचा असाहि एक सिद्धांत आहे कीं, जी जी वस्तु अव्यक्त किंवा भावि दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या अवस्थेंत राहते, ती कधीं ना कधीं तरी स्पष्टरूपानें व्यक्त झालीच पाहिजे. वरील सर्व विवेचनावरून असें ठरतें कीं, कधीं ना कधीं तरी हीं शरीरें टाकून दुसरीं शरीरें अवश्य धारण केलींच पाहिजेत. श्रीमद्भगवद्गीतेंतील—

जातस्य हि ध्रुवो मृत्युः ध्रुवं जन्म मृतस्य च ॥

ह्या वचनाचा अर्थहि हाच आहे, कीं, जो जो म्हणून प्राणी जन्मास आला, तो तो निश्चयेंकरून मरणार, आणि ज्याला ज्याला मृत्यु आला, तो तो पुनः जन्मास येणारच. ह्या जन्ममरणाच्या परंपरेंतून जीवमात्रास गेलेंच पाहिजे. फक्त ज्ञानी जन्मातीत होतात.

पुनर्जन्म-मतावर एक असा आक्षेप आणितात कीं, आपणांस पूर्वीं जर अनेक जन्म प्राप्त झाले आहेत, असें म्हणावयाचें, तर त्यांपैकीं कोणत्याहि जन्माची आठवण कां राहूं नये ? ती आठवण जर रहात नाहीं, तर पूर्वजन्मच संभवत नाहीं. हा आक्षेप इतका प्रबळ आहे कीं, पुष्कळ लोक फक्त ह्या मुद्यावरच पुनर्जन्ममत नाकबूल करितात. असें प्रतिपादन करणारी मंडळी असा विचार करीत नाहींत कीं, हल्लींच्या जन्माच्या कुमार अवस्थेंत किंवा पौगंड दशेंत आपण होतों, त्या वेळीं घडलेल्या अनेक गोष्टींचें स्मरण तरी आपणांस राहतें काय ? ह्याच जन्मांतल्या पूर्वीं घडलेल्या गोष्टींचें जर आपणांस स्मरण रहात नाहीं, तर पूर्वजन्माचें स्मरण कोठून रहावें ? एकाद्याला बालपणीं केलेल्या लीलेचें स्मरण

जरी राहिलें नाहीं, तरी मला बालपणचें नव्हतें, असें त्याला म्हणतां येईल काय? मुळींच म्हणतां येणार नाहीं. तसेंच, सन १८८५ च्या मे महिन्याच्या २४ तारखेस दोन प्रहरीं तूं काय करीत होतास? असें एकाद्याला विचारिलें, आणि त्याचें उत्तर त्याला सांगतां आलें नाहीं म्हणून त्या तारखेस तो मुळीं नव्हताच असें म्हणतां येईल काय? नाहीं. त्याला स्मरण नाहींसें झालें, तथापि त्या तारखेला तो होता हें खचित आहे. ह्या जन्मीं घडलेल्या गोष्टींची आठवण रहात नाहीं, ह्याचें कारण आपली धारणाशक्ति दुर्बळ व अपूर्ण हें आहे. आपले मनांत बालपणापासून जे जे संकल्प व विचार येऊन गेले, आणि स्वप्नांत जे जे प्रकार पाहिले, त्या सर्वांची आपणांस जर आठवण करितां येईल तर पूर्वजन्मांत घडलेल्या गोष्टींचेंहि यथार्थ स्मरण होईल. योगाभ्यासाशिवाय अशा प्रकारचें ज्ञान संभवत नाहीं. ही गोष्ट सर्व दर्शनांस अभिमत आहे. न्यायशास्त्राचा प्रसिद्ध ग्रंथ जो सिद्धांतमुक्तावलि, त्यांत असें म्हटलें आहे कीं—"योगाभ्यासाचे योगानें सर्व पृथिवींतील पदार्थांचें ज्ञान सर्वदा होण्याची विचित्र ज्ञानशक्ति योग्याचे ठायीं उत्पन्न होते." स्मरणाच्या ज्या गोष्टी साधारण लोकांस अशक्य वाटतात, त्या योगबलानें सुलभ होतात. असे कांहीं सिद्ध पुरुष आढळतात कीं, त्यांला आपल्या पूर्वींच्या सर्व जन्मांची आठवण असतेच. शिवाय इतर लोकांच्या पूर्व जन्मांत घडलेल्या गोष्टी ते तत्काल सांगतात. ह्या सर्वांचें कारण 'धारणा' म्हणून जी अप्रतिम शक्ति तेंच आहे. ह्या शक्तीची जोपासना कशी करावी हें योग्याला चां-

गलें माहित असतें व तेणेंकरून पूर्वजन्मांतील गोष्टींचें त्याला ज्ञान होतें. नारायणोपनिषदांत

नमो ब्रह्मणे धारणं मे अस्तु ।

इत्यादि जो मंत्र आहे, त्याचें भाष्य वाचिलें असतां हें सर्वांस कळेलच. ह्या मंत्राची योगता आर्य लोकांत फारच मोठी आहे. बहुतेक प्राचीन विद्वानांनीं ह्या मंत्राचीं पुरश्चरणें केलेलीं आहेत. फार कशाला, योगीजन म्हणतात कीं—काल आणि दिक् हीं द्रव्यें अपरिच्छिन्न आणि अनंत असून आपण व आपलें मन हीं मात्र मर्यादित व परिच्छिन्न आहेत. ही मर्यादा उल्लंघून जाण्याजी जर इच्छा असेल, तर योगाभ्यास करावा. म्हणजे मग आपलें चित्त परिच्छेदातीत होऊन वर्तमानकालच्या वस्तु जशा स्पष्ट दिसतात, त्याप्रमाणेंच भूतभविष्यत् वस्तूंचें ज्ञानहि होऊं शकतें. गौतमबुद्धाला पूर्वजन्मांची स्मृति होती, हें प्रसिद्ध आहेच. म्हणून ज्यांला ह्या गोष्टीची जिज्ञासा असेल त्यांनीं मोठ्या उत्साहानें व धैर्यबलानें योगाभ्यास करावा, म्हणजे पूर्वगोष्टींचें त्याला खचित स्मरण होईल.

पूर्वजन्मांत घडलेल्या गोष्टी समजून घेण्यांत कालाचा व मानसिक शक्तीचा व्यय न करितां त्याचा उपयोग भावी गोष्टींला चांगलें वळण देण्याकडे व आपणांस आहे त्यापेक्षां चांगली अवस्था प्राप्त करून घेण्याकडे जर केला, तर अधिक फायदा होईल. कारण पूर्वस्थितीचें स्मरण झालें असतां कदाचित् हल्लींच्या कालाचाहि दुरुपयोग होण्याचा संभव असून उद्विग्नतेस व दुःखास कारण होईल, व विपन्न स्थिति प्राप्त होईल. एका अर्थी

आपल्यास पूर्वी घडलेल्या गोष्टींचें स्मरण होत नाहीं, ही एक ईश्वरी कृपाच समजावयाची. वेदान्तशास्त्रांत लिहिलें आहे कीं, पूर्वजन्मीं काय काय घडलें हें ठरविण्यांत आपला अमोल्य वेळ दवडूं नये, तर पुढील प्रगतीकडे दृष्टि ठेवून जेणेंकरून आत्मोन्नति होईल व जीवन्मुक्तस्थितीच्या उच्च पदाप्रत आपण पोहोंचूं, तोच मार्ग स्वीकारावा. सर्व जगाचा नियंता जो परमेश्वर, त्याचें ज्ञान झालें असतां व त्याच्याशीं आपलें सारूप्य झालें असतां आपणास अज्ञात अशी कोणतीच गोष्ट रहाणार नाहीं. सच्चिदानंदाचें स्वरूप हृदयांत प्रकट झालें म्हणजे काल आणि दिक् यांचा प्रतिबंध राहणारच नाहीं व भूत आणि भविष्यत् हीं वर्तमानाशीं संलग्न होऊन जातील.

बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ॥
तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ १

—भगवद्गीता

म्हणजे, अर्जुना, माझे आजपर्यंत पुष्कळ जन्म झाले, तसे तुझेहि झाले. माझ्या जन्मांचें ज्ञान मला आहे पण तुला मात्र कांहीं नाहीं. असें जें कृष्णानीं अर्जुनास सांगितलें आहे त्याचा अनुभव येईल.

# प्रकरण पांचवें

## संचित, प्रारब्ध व क्रियमाण

एत ँ ह वाव न तपति । किमहँ साधु नाकरवम् । किमहं पापमकरवमिति ।    —तैत्तिरीयारण्यक

ही चराचर सृष्टि परमेश्वरानें आपल्या स्वरूपापासून

निर्माण केली व तो सर्वात्मस्वरूपानें प्रत्येक उपाधीं विराजमान झाला आहे. परमेश्वरानें अनंत नामें व अनंत रूपें धारण केलीं आहेत; तथापि आपल्या स्वरूपाची, गुणांची, शक्तीची, व ऐश्वर्याची अतिसूक्ष्म अशी जी प्रतिमा त्यानें उत्पन्न केली आहे, त्या प्रतिमेला मनुष्य ही संज्ञा आहे. मनुष्यामध्यें जगतांतील पंचमहाभूतांचीं रूपें सूक्ष्मपणें एकवटलीं आहेत, एवढेंच नव्हे, तर इतर सर्व प्राण्यांपेक्षां मनुष्यांमध्यें विचित्र विचारशक्ति असून तो स्वतंत्र इच्छाशक्तीनें म्हणजे जिला इंग्रजी भाषेंत Free will म्हणतात त्या शक्तीनें युक्त आहे, हा विशेष आहे. ह्या गुणाशिवाय मनुष्याचे ठायीं त्याच्या उन्नतीची व अवनतीची सर्व प्रकारची जबाबदारी Responsibility परमेश्वरानें ठेविलेली आहे. इतर प्राण्यांप्रमाणेंच मनुष्यालाहि ईश्वरानें बुद्धि दिलेली आहे; तथापि त्यानें मनुष्यबुद्धींत जी सारासारविचारशक्ति ठेविली आहे, तिचा इतर प्राण्यांमध्यें अभाव असल्यामुळें इतर प्राण्यांवर त्यांच्या उन्नतीची किंवा अवनतीची जबाबदारी पडत नाहीं. इतर प्राणी केवळ देहधारी असून जीवनपरिचर्येस अवश्य तेवढेच व्यवहार करण्याचें ज्ञान त्यांस असतें. म्हणजे आहार, निद्रा, मैथुन, प्राणरक्षण, प्रबलानें निर्बलास खाणें एवढ्यानेंच त्यांचा काय तो जगद्व्यापार आटपतो. ह्यापेक्षां जगांत अधिक कर्तव्य त्यांचें कधींहि नसतें. व्याघ्रसिंहादिकांनीं चातुर्मास्याची अन्नसामुग्रीची तयारी करून ठेविली असें कधीं तरी झालें आहे काय? नाहीं. ते जें कांहीं करितात, त्याचा उपयोग दिनचर्येच्या सिद्धतेच्या पलीकडे होत नाहीं. असें होण्याचें का-

रण हें आहे कीं, मनुष्येतर सर्व योनि ह्या केवळ भोगयोनि आहेत. कर्तव्ययोनि काय ती मनुष्यप्राण्याचीच. चांगलीं कर्में घडलीं, तर त्यांचे भोगार्थ दिव्यशरीरें प्राप्त होतात व अतिनीच कर्में घडलीं तर त्यांच्या उपभोगार्थ मनुष्येतर देह प्राप्त होतो. मनुष्ययोनींत सर्व कर्तव्यता व शक्ति असल्यामुळें मनुष्यजन्म सर्वांत श्रेष्ठ मानिला आहे. परमेश्वरानें मनुष्याला विचारशक्तीनें पूर्ण समर्थ केला आहे; व त्या शक्तीच्या बळावर तो परमात्मस्वरूपीं लीन होऊन जन्ममरणरहित होतो. वास्तविक पहातां जीवाला (जीवात्म्याला) जन्ममरण नाहीं. तथापि अज्ञानामुळें तो आपणावर जन्ममरण ओढून घेतो. तें अज्ञान दूर झालें म्हणजे त्याला स्वरूपप्राप्ति होते.

वरील विवेचनावरून असें सिद्ध होतें कीं, मनुष्य आपल्या कर्मानुसार भोग भोगण्यासाठीं भिन्न देह धारण करितो, व त्यापासूनच संचित, प्रारब्ध व क्रियमाण ह्या कल्पना निष्पन्न होतात. श्रीमद्विद्यारण्यस्वामीनीं श्रुतींस धरून क्रियमाण, संचित व प्रारब्ध ह्यांच्या व्याख्या केल्या आहेत, त्या अशा कीं—( १ ) वर्तमानकाळीं जीवाच्या हातून जें कर्म घडत आहे, व ज्याचें फल पुढें यथानुक्रमें येणार आहे, असें जें चालू कर्म त्याला **क्रियमाण** कर्म असें म्हणतात, ( २ ) हें क्रियमाण कर्म ज्या मागील कर्मभांडारांत जाऊन सांठणार आहे त्या खजिन्याला **संचित** कर्म म्हणावयाचें, आणि ( ३ ) जन्मापासून मरेपर्यंत संचितकर्माच्या सांठ्यांतून शरीराबरोबर नित्यभोगार्थ आलेलें जें कर्म, त्याला **प्रारब्ध** कर्म असें म्हणावयाचें.

आर्यतत्त्वज्ञानाप्रमाणें आत्मज्ञान झाल्यानंतर, म्हणजे

मी देहाहून निराळा आहें ही खूगगांठ समजल्यावर व तदनुरूप आचरण झाल्यावर, संचित व क्रियमाण यांचा नाश होतो. ही दोहोंची व्यवस्था झाली. परंतु अशा प्रकारें ज्ञान झालें तथापि प्रारब्धकर्म मनुष्याला कधींहि चुकत नाहीं. एथपर्यंत विचार आला म्हणजे दोन वाद उत्पन्न होतातः—( १ ) प्रारब्धवाद ( २ ) प्रयत्नवाद. या दोन्ही वादांचा प्रत्येकाच्या जीवनचरित्राशीं अत्यंत निकट संबंध आहे. ह्या दोन्ही वादांतील खरें तत्त्व न समजल्यामुळें आर्यलोकांच्या आचारविचारांविषयीं पाश्चात्य पंडितांचे व आधुनिक विद्वानांचे भलतेच ग्रह झालेले आहेत. त्यांच्या गैरसमजुती इतक्या पंथास जाऊन पोहोंचल्या आहेत कीं, आर्य तितका प्रारब्धवादी ( Fatalist ) असा ते सरसकट आरोप करितात. प्रारब्धवादी ही संज्ञा निंदाव्यंजक असून श्रुतींत व आर्यतत्त्वज्ञानांत आह्मांस प्रारब्धवादी असें म्हणण्यास कांहींएक आधार नाहीं. उलट पक्षीं योगवासिष्ठांत तर प्रयत्नवादासच प्राधान्य दिलेलें आहे.

ह्या वादासंबंधानें योगवासिष्ठ ग्रंथांतील विचारसरणी अशी आहे कीं—पूर्वजन्मीं केलेल्या कर्माचें फळ जर ह्या जन्मीं मिळणारच आहे, व तें आमचें कर्म जर सर्वोत्कृष्ट आहे, तर जीवन्मुक्ति आपोआप प्राप्त होईल. त्याकरितां प्रयत्न कशाला पाहिजे? ह्या शंकेचें समाधान असें आहे कीं—पूर्वकर्मानुसार आपणांस जर फल प्राप्त होतें, तर कृषिवाणिज्यादि ज्या प्रयत्नाच्या दिशा त्या निष्फळ होऊं लागतील, व कोणी प्रयत्नच करणार नाहीं असें होईल. वस्तुस्थिति पाहतां अशी आहे कीं, ज्याला

आपण कर्म म्हणतों, त्याचें रूप अदृष्ट असतें. दृष्टसाधनाच्या संपत्तीशिवाय कोणत्याहि कर्माचें फल अमुकच मिळेल असें सांगतां येत नाहीं. ह्यास्तव कृषिवाणिज्याप्रमाणें जीवन्मुक्तीसाठीं प्रयत्न केलाच पाहिजे. कृषिकर्मांत प्रयत्न केला असूनहि जेव्हां फल दिसत नाहीं (अनावृष्टीमुळें वगैरे) तेव्हां असें समजावें कीं—कृषीचें फल उत्पन्न होण्याजोगें जें आपलें कर्म, त्याच्या आड त्याच्याहूनहि प्रबल असें दुसरें कर्म म्हणजे उंदीर किंवा टोळधाड हें आलें असें समजावें. कर्मफलाला असा प्रतिबंध झाला असतां कारीरीष्ट्यादि क्रिया करून तो प्रतिबंध दूर करावा, असें आर्यशास्त्रांत सांगितलें आहे. हें कृषिवाणिज्याबद्दल झालें. तसेंच जीवन्मुक्तीच्या मार्गांत जर प्रारब्धकर्म आड येऊं लागलें, तर योगाभ्यासरूप पुरुषप्रयत्न करून त्याचा प्रतिबंध करावा. प्रारब्धकर्म भोगल्याशिवाय सुटत नाहीं हें खरेंच, परंतु योगाभ्यास हा प्रारब्धकर्मापेक्षांहि प्रबल असें सांगितलें आहे.

आणि योगें प्रारब्ध कर्म नासे । हें सर्व शास्त्रीं बोलिलें असे
हें तंव नव्हे गा अनारिसें । अनुभवें असें तैसेंचि ॥ १

**—रंगनाथ**

प्रारब्धभोग चुकविण्यासाठीं शास्त्रांनीं क्रिया सांगितल्या आहेत.

सखा माझा हरि । देईल खाटेवरि ॥

असा दैववाद करण्यास आर्यशास्त्रांनीं सांगितलेलें नाहीं. शास्त्रांनीं निर्दिष्ट केलेले प्रयत्न फुकट आहेत असें कोणी म्हणेल, तर वैद्यक शास्त्रांतील चिकित्सेपासून वे-

दान्तशास्त्रांतील मोक्षोपयोगी योगाभ्यासापर्यंत सर्वांस आनर्थक्य प्राप्त होईल. कर्में करीत असतां मध्यंतरीं जो प्रतिबंध होतो, तेवढ्यावरून कर्में कोणी सोडीत नाहीं, व सोडूंहि नये. लढाईंत एकादे ठिकाणीं पराजय झाला म्हणून बाकीचे सेनाधिपति आपले घोडेस्वार, पायदळ, तोफखाना वगैरे परत नेत नाहींत. आनंदबोधाचार्य असें म्हणतात कीं, अजीर्ण होईल या शंकेनें आहाराचा परित्याग कोणी करीत नाहीं, भिक्षुक येऊन त्रास देतील म्हणून कोणी स्थाली सोडीत नाहीं, व ढेंकूण—पिसांच्या भयानें कोणी वस्त्राचा त्याग करीत नाहीं.

वरील विवेचनावरून प्रयत्नाचें प्राबल्य दिसून येतें. वसिष्ठ महामुनींनीं श्री रामचंद्राला केलेला सदुपदेश एथें फार विचार करण्यासारखा आहे. त्यानीं सांगितलें कीं—हे रघुनंदना, ह्या संसारांत सर्व प्रकारचा पुरुषप्रयत्न केला असतां, पाहिजे तें सिद्ध होतें. आपल्यास अनुरूप अशी कुलस्त्री पाहून तिच्याशीं लग्न करावें, तिजपासून नियमित अवधींत पुत्र झाला नाहीं आणि प्रजातंतूचा व्यवच्छेद होतो असें वाटलें, तर स्त्रीपुरुषांमधील दोषांचा विचार करून तन्निवारणार्थ शारीरकांतील औषधिक्रिया कराव्या. त्यानेंहि पुत्रोत्पत्ति न होईल तर पुत्रकाम्येष्टि यज्ञ करावा. तसेंच द्रव्यार्जन करणें असेल तर कृषिवाणिज्यादि उद्योग करावे, स्वर्गप्राप्ति व्हावी असेल तर ज्योतिष्टोम यज्ञ करावा, ब्रह्मलोकाची प्राप्ति व्हावी असेल तर ब्रह्मोपासना करावी. अशा रीतीनें बालपणापासून अनेक शास्त्रांचा अभ्यास व सत्समागम करून मोठ्या साहसानें पाहिजे त्या रीतीनें प्रयत्न करून इच्छित अर्थ

सिद्धीस न्यावा. ह्या उपदेशांत वसिष्ठानीं प्रयत्नवाद सिद्ध केला आहे. त्यावर रामचंद्रानीं अशी आशंका घेतली कीं—आपण पुरुषप्रयत्न करावा म्हणून सांगतां खरें, परंतु पूर्वजन्मीं घडलेल्या कर्माचा जो वासनारूप अवशेष शिल्लक रहातो तदनुसार मी कर्मे करितों, तेव्हां वासना बद्ध झालेला जो मी, त्याच्या हातन आपण सांगतां तो पुरुषप्रयत्न कसा होईल? ह्या शंकेचें समाधान वसिष्ठानीं असें केलें कीं—हे रघुनंदना, तूं वासनेच्या आधीन झाला आहेस, म्हणूनच वासनापारतंत्र्याचें निवारण करण्याकरितां पुरुषप्रयत्न केला पाहिजे. तरच वासनाजालांतून सुटशील. ह्या वासना शुभ आणि अशुभ अशा दोन प्रकारच्या आहेत. जर तूं शुभवासनेनें प्रेरित झाला असशील तर इच्छितकार्य झालेंच म्हणून समज. परंतु जर अशुभवासना प्रबळ होऊन तुला संकटांत पाडण्यास प्रवृत्त होत असतील, तर अशुभवासना दूर करणारीं जीं कर्मे शास्त्रांत सांगितलीं आहेत, तीं मोठ्या उत्साहानें करून त्या वासना जिंकून टाक. अशुभवासनांस चांगलें वळण देण्याचा प्रयत्न अवश्य करावा. पूर्वकर्मांचा जोर जरी आपणांवर असला तरी परमेश्वरानें आपणांस दिलेल्या सारासारशक्तीचा उपयोग केलाच पाहिजे. मी पूर्वकर्मानें बद्ध झालों आहें, काय करूं? असें म्हणून केवळ मनुष्य आपल्या जबाबदारींतून सुटत नाहीं. असद्वासना आपणास घेरतील तेव्हां साधुचरणाकडे धांव घ्यावी व मुख्य जें वेदान्तशास्त्र त्यांतील रहस्य चांगलें समजून घ्यावें. लहान मूल माती खात असलें तर त्याच्या पुढें फल करून त्याचें मन जसें मातीपासून परावृत्त करितात,

त्याप्रमाणें चित्ताला दु:समागमापासून सोडवून सत्समागम व शास्त्रविचार करण्याकडे लावावें.

यावरून पहातां वसिष्ठादि आचार्यांनीं प्रारब्धवाद्यांपेक्षां प्रयत्नवाद्यांसच श्रेष्ठत्व दिलें आहे. आणखी ही एक गोष्टी लक्षांत ठेविली पाहिजे कीं, प्रयत्नवाद व प्रारब्धवाद यांच्या क्रियेची घटना एकंदरीनें एकच असते, म्हणजे प्ररब्धवाद्यालाहि प्रयत्नाचें प्राबल्य कबूल करावें लागतें. त्यांत भेद म्हणून इतकाच कीं, कर्मांचीं रूपें अदृष्ट असल्यामुळें जें फल मिळतें, तें कोणत्या कर्मापासून हें स्पष्ट सांगता येत नाहीं. एकाद्याला कर्माचें फल ह्या जन्मीं कांहींएक प्रयत्न केल्याशिवाय प्राप्त होतें, व एकाद्याला तेंच फळ मिळण्यास अत्यंत परिश्रम करावे लागतात. असें कां होतें ? ह्याचा विचार करूं लागलें म्हणजे असें दिसतें कीं, ज्याला अवचित फल मिळतें, त्याचा तद्विषयींचा प्रयत्न पूर्वजन्मींचाच सिद्ध असतो, आणि ज्याला तेंच फळ दीर्घ प्रयत्न करून मिळवावें लागतें त्याचा पूर्वकर्माचा सांठा नसतो. कर्माचा व फलाचा स्पष्ट संबंध न समजल्यामुळेंच प्रारब्धकर्मास अदृष्ट ही संज्ञा प्राप्त झाली आहे. शिवाजीमहाराजांस हिंदुपदपादशाही मिळविण्यास भगीरथ प्रयत्न करावे लागले, आणि श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड हे दत्तक होऊन त्यांच्यापुढें आयतेंच पान वाढून आलें. ह्या ठिकाणीं असें समजावयाचें कीं, गायकवाडमहाराजांस राज्यपदरूप फलाची प्राप्ति संचितकर्मामुळेंच झाली, आणि शिवाजीमहाराजांस दीर्घ प्रयत्न करून झाली. दोहोंमध्यें प्रयत्नाचें महत्त्व सारखेंच आहे. त्यांत फरक काय तो एव-

दाच कीं एकाचा अदृष्ट प्रयत्न आहे आणि दुसऱ्याचा दृष्ट प्रयत्न आहे.

दृष्ट आणि अदृष्ट प्रयत्नांबद्दल अलंकारशास्त्रांतहि वरील मतच ग्राह्य केलेलें दिसतें. कांहीं ग्रंथांच्या आरंभीं मंगलाचरण केलें असतांहि त्यांची योग्य परिसमाप्ति झाली नाहीं, आणि कांहीं ग्रंथ मंगलाचरण केल्यावांचूनहि निर्विघ्नपणें सिद्धीस गेलेले आहेत. ह्याला अनुक्रमें 'कादंबरी' आणि 'किरणावलि' हीं उदाहरणें आहेत. अशा ठिकाणीं हाच सिद्धांत ठरतो कीं, कादंबरी ग्रंथाचे आरंभीं मंगलाचरण केलें होतें तथापि पूर्व विघ्नबाहुल्यामुळें त्याचा शेवट झाला नाहीं. आणि किरणावलींत पूर्वकृत जें कर्म तें मंगल होऊन बसलें, म्हणून त्याची निर्विघ्न परिसमाप्ति झाली. असो.

प्रारब्धानें किंवा प्रयत्नानें जरी इच्छितफल प्राप्त झालें, तथापि त्याचे उपभोगासाठींहि प्रयत्न अवश्य करावा लागतोच. शिवाजी महाराज किंवा गायकवाड महाराज यांस राज्यपद प्राप्त झालें तरी त्यांच्या प्रयत्नाची मर्यादा संपली असें होत नाहीं. पुढें राज्यसुखोपभोगार्थ नीतीनें प्रजापालन करण्याचा व शत्रुदमन करण्याचा प्रयत्न दोघांसहि सारखाच चालू ठेवणें अवश्य आहे. हा प्रयत्न न केल्यास प्राप्त फल अनुपभुक्त राहून शेवटीं नष्ट देखील होईल. यावरून असें सिद्ध होतें कीं, अदृष्टानुरूप जें फल जीवास प्राप्त होतें, त्या फलाच्या उपभोगार्थ पुनः उर्वरित कर्म किंवा प्रयत्न करावेच लागतात.

प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः ।

म्हणजे प्रारब्धकर्मफलाचा क्षय भोगावांचून होत

नाहीं, असा श्रुतींचा सिद्धान्त आहे. त्या फलाच्या उपभोगार्थ जे प्रयत्न अथवा क्रिया करावी लागते, ती क्रिया सिद्धफलाचा उपभोग तर देतेच, पण अनेक नवीन कर्में व फळें ती क्रिया उत्पन्न करीत असते. त्यामुळें पूर्वभोग न संपतां त्यांत नव्या नव्या भोगांची भर पडून जीवाला आणखी गुंतवितात, यामुळें परिभ्रमणांत पडून जीवाची सुटका होत नाहीं. अशा रीतीनें कर्मांच्या व फलभोगाच्या चक्रांत सारखी गुंतागुती चाललेली असते.

उद्दिष्टकर्मफलभोगांत किती गुंते उभे राहतील ह्याचा पत्ता सुद्धां लागत नाहीं. उद्दिष्टफलप्राप्त्यर्थ दृष्टकर्म अथवा प्रयत्न होतांना अंतर्गत कोणतीं अदृष्ट कर्में घडतील, त्याचीं कोणतीं अदृष्ट फळें तयार होतील व तीं कधीं व कशीं भोगावीं लागतील हें यथार्थ समजणें अत्यंत दुर्घट आहे. आणि ह्यावरूनच

कर्मणो गहना गतिः ।

कर्माची गति दुर्विज्ञेय व अनिवार्य आहे, हा सिद्धांत झालेला आहे. आपण ज्यास प्रारब्धकर्म म्हणतों, तें पंचदशीमध्यें तीन प्रकारचें वर्णिलें आहे. ( १ ) इच्छाप्रारब्ध, ( २ ) अनिच्छाप्रारब्ध, आणि ( ३ ) परेच्छाप्रारब्ध. ह्यांपैकीं इच्छाप्रारब्धाचीं ठळक उदाहरणें म्हटलीं म्हणजे अपथ्यसेवी, चोर, राजदाररत अशा प्रकारचे पुरुष हीं होत. जीं कर्में केलीं असतां अनर्थ होतील असें माहित आहे अशीं कर्में करण्यास ते पूर्वकर्मांच्या जोरानें प्रवृत्त होतात. ही असत्कर्मप्रवृत्ति ईश्वरालाहि टाळतां येणें अशक्य आहे. कारण, भगवद्गीतेंत म्हटलें आहे कीं——

सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ॥
प्रकृतिं यांति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥ १

म्हणजे विवेकज्ञानसंपन्न जरी पुरुष असला तथापि पूर्वजन्मीं केलेल्या धर्माधर्माचा वर्तमानकालीं दृष्टोत्पत्तीस येणारा जो संस्कार त्याला अनुरूप असेंच तो कर्म करणार. जो तो आपल्या स्वभावावर जातो. अशा ठिकाणीं निग्रह करून काय उपयोग होणार ?

अवश्यंभावि भावानां प्रतिकारो भवेद्यदि ॥
तदा दुःखैर्न लिप्येरन्नलरामयुधिष्ठिराः ॥ १

**--पंचदशी**

अवश्य होणाऱ्या ज्या गोष्टी आहेत, त्यांचा प्रतिकार जर निग्रहानें होणें शक्य असतें, तर नलराजा, रामचंद्र, युधिष्ठिर इत्यादि महात्मे कधींहि संकटांत पडले नसते.

अनिच्छाप्रारब्धासंबंधानें भगवद्गीतेंत श्रीकृष्णार्जुनांचा संवाद आहे तो असाः—

अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ॥
अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥१

म्हणजे हे कृष्णा, एकाद्याची इच्छा नसतां त्याला धरून नेऊन पापकर्मास लावावें, अशा रीतीनें जो पापकर्म करितो त्याला तें पाप करण्यास लावणारा तरी कोण ? ह्यावर श्री कृष्णानीं उत्तर दिलें कीं—

काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ॥
महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ १

म्हणजे मनुष्यामध्यें असणारा जो रजोगुण तो अत्यंत प्रबल झाला असतां कामविकार उत्पन्न करून पापकर्माविषयीं मनुष्यास प्रवृत्त करितो, आणि त्याच्या प्रवृत्तींत विघ्नें आलीं असतां तोच क्रोधाचें स्वरूप धारण करून

मनुष्यास घात करण्यास प्रवृत्त करितो. हा काम सर्वभक्षक असून कोणत्याहि विषयानें त्याची तृप्ति होत नाहीं. सर्व पापांचें आदिबीज त्या कामवासनेंतच आहे. म्हणून संसारामध्यें त्या कामाला व क्रोधाला आपले वैरी असें समज.

तिसरें परेच्छाप्रारब्ध होय. स्वतःची इच्छा किंवा अनिच्छा नसतांहि केवळ अन्य जीवाप्रीत्यर्थ जो सुख-दुःखाचा अनुभव येतो, तो या प्रारब्धाचें फल होय. उदाहरणार्थ, आपण एकाद्याचे चाकर बनलों म्हणजे मग आपली इच्छा असो किंवा नसो, तो जीं जीं कामें सांगेल तीं तीं करणें अवश्य असून त्या कर्मापासून सुख-दुःखाचा अनुभव घेणें प्राप्त आहे.

श्रीमत् विद्यारण्यकृत पंचदशीच्या आधारानें वरील उपपादन केलें आहे, व त्यांत असें सांगितलें आहे कीं, इच्छाप्रारब्धामध्यें ज्या गोष्टी घडून येतात, त्या अवश्यंभावि असल्यामुळें ईश्वरालाहि टाळतां येणें शक्य नाहीं. शिवाय वसिष्ठादिकांच्या वचनांवरून असें सिद्ध करण्यांत आलें आहे कीं, सर्व हेतु परिपूर्ण करण्यास प्रयत्न हाच बलवत्तर आहे. तेव्हां ह्या दोन सिद्धांतांत जो विरोध दिसतो, तो दूर झाला पाहिजे. म्हणून अवश्य घडणाऱ्या गोष्टी कोणत्या व कोणत्या हेतूची सिद्धि प्रयत्नांनीं होऊं शकते, ह्यांच्या मर्यादा ध्यानांत आणिल्या म्हणजे विरोध राहत नाहीं.

( १ ) ह्या जन्मीं भोगण्यासाठीं संचितापैकीं जें कर्मफल प्राप्त झालेलें असतें, त्यापैकीं कांहीं गोष्टी आधिदैविक, आधिभौतिक किंवा अध्यात्म कारणांनीं घडणाऱ्या असतात. जसें, मुलगा उपजल्याबरोबर त्याची आई मृत

होणें, एकाद्याचें घरदार एकाएकीं दग्ध होऊन सर्व संपत्तीचा नाश होणें, किंवा एकाद्याचे शरीरास घातपातानें विकार होणें अशा प्रकारचे जे प्रसंग ते अवश्यंभावि होत. ते मनुष्याला प्रारब्धानुरूप भोगलेच पाहिजेत आणि ते ईश्वराच्यानेंहि टाळवणार नाहींत.

( २ ) ज्या फलांचीं इष्ट साधनें व्यवहारामध्यें उघड दृष्टीस पडतात, अशा कृषिवाणिज्यादि फलांबद्दल प्रयत्नच केला पाहिजे. घरांत धनधान्यादिकांचा संग्रह करणें असेल तर जमिनीची मशागत केली पाहिजे, व परदेशांतून स्वदेशांत माल आणून स्वदेशांतील माल परदेशांत नेण्याची क्रियाहि केली पाहिजे.

( ३ ) वासनांला चांगलें वळण देणें हें प्रत्येकाचें काम आहे. याविषयीं प्रयत्नांची पराकाष्ठाच केली पाहिजे. सर्व कर्मांचें व फलांचें मूळ पाहूं गेलें तर आपल्या वासना होत. कोणतेंहि कर्म करून त्याचा फलभोग जरी झाला, तथापि कांहीं अवशिष्ट संस्कार राहून तोच पुढें वासनारूप होतो. म्हणून ह्या वासनांला चांगलें वळण देण्याचा प्रयत्न करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. कर्तव्ययोनी तेवढी मनुष्याची असून त्याला सारासारविचारशक्ति आहे म्हणूनच दुष्ट वासनांबद्दल मनुष्यप्राणी जबाबदार आहे. दुर्वासना उत्पन्न होतील तर साधुचरणीं धांव घ्यावी व सच्छास्त्र श्रवण करावें हा उपाय सांगितलाच आहे.

ज्या वासना कामक्रोधादि सहा ऊर्मींच्या स्वरूपानें जन्मतः उत्पन्न होतात, त्यांला चांगली दिशा बाळपणापासून लाविली पाहिजे. जीवांचीं शरीरें, इंद्रियें, अवयव वगैरे जन्मतः कोमळ असतात. त्याप्रमाणें त्यांचे मनोध-

र्मेहि त्या वेळीं कोमलच असतात. आणि इंद्रियें जसजशीं पुष्ट व वृद्धिंगत होत जातात व त्यांत विषयज्ञानाची जास्त भरती होत जाते, तसतसे मनोविकारहि प्रबळ होत जातात. म्हणून कामक्रोधादि षडूर्मींला बालपणापासून चांगलें वळण देणें हें मातापितरांचें, पालकांचें व शिक्षकांचें अवश्य कर्तव्य आहे. मनोविकारांस चांगलें वळण देणें हा नैतिकशिक्षणाचा ( Moral Education ) मुख्य भाग आहे. मनुष्याचा स्वभाव जो म्हणतात तो ह्या मनोविकारांच्या समुदायाचाच पर्यायशब्द होय, म्हणजे षडूर्मींच्या स्वरूपावरून मनुष्याचा स्वभाव ठरविला जातो. जोंपर्यंत ह्या षडूर्मि मनाचे कह्यांत असतात, तोंपर्यंत मनुष्य दुःखी होण्याचा संभव असतो, व जेव्हां त्या षडूर्मि बुद्धीच्या ताब्यांत वागूं लागतात, तेव्हां मनुष्य सुखी होण्याचा संभव असतो. या ठिकाणीं मन व बुद्धि ह्यांचीं स्वरूपें व कार्यें हीं ध्यानांत आणणें अवश्य आहे. मनाचे स्वरूपांत चांचल्य फार असून निश्चितार्थ किंवा विचार कमी असतो. बुद्धि ही विचारी, निश्चयी व गंभीर स्वभावाची आहे. कोणत्याहि कर्माचा परिणाम काय होईल हें मन पहात नाहीं. बुद्धीचें लक्ष प्रथम परिणामाकडे असतें आणि नंतर कोणत्याहि कार्याकडे प्रवृत्ति होते. याकरितां प्रत्येक पालकानें अशी खबरदारी ठेवावी कीं, कामक्रोधादि विकारांस बुद्धीच्या ताब्यांत वागविण्याचें लहानपणापासून बालकांस शिक्षण मिळावें. ह्या षडूर्मि बुद्धीच्या ताब्यांत दिल्या असतां चांगलें वळण कसें लागतें हें कांहीं उदाहरणांनीं स्पष्ट करूं. एकाद्या मुलाला दुसऱ्या मुलावर संतापून चरफडण्याची संवय

असेल तर " बाळ, असें करूं नये, तो आपला संवगडी आहे, त्याच्याशीं भांडावें काय, त्याच्यापाशीं नीट खेळावें " असें त्याला शिकवावें. हें सांगणें म्हणजे क्रोधाचें क्षमा व शांति यांत रूपांतर करणें होय. तसेंच सणावारीं मुलांस वस्त्रभूषणें घातलीं असतां त्यांना डोल येऊन त्यांचे ठिकाणीं मद उत्पन्न होतो व तीं इतर मुलांस हिणवूं लागतात. अशा वेळीं " बाळ, आपण असें म्हणूं नये. हे आपले काका आहेत, शास्त्रीबोवा आहेत, गुरुजी आहेत, ह्यांस नमस्कार करावा, व त्यांच्यापाशीं मर्यादेनें बसावें " असें शिकवावें. हें मदाचें लीनता व निर्दंभता ह्यांत रूपांतर करणें होय. अशा प्रकारें कामविकाराचे विचार आणि अनिच्छा ह्यांत रूपांतर करावें, लोभाचें कृपालुता व औदार्य ह्यांत, मोहाचें वैराग्य व निःस्पृहता ह्यांत, आणि मत्सराचें अहिंसा व सरलता ह्या गुणांत रूपांतर करण्याचें वळण बाळपणापासून मुलांला लाविलें असतां पुष्कळच फायदा होतो. ही प्रयत्नाची दिशा मनुष्यमात्राला अवश्य आहे.

पुष्कळ लो ांची अशी समजूत झालेली दिसते कीं, व्यवहारास अवश्य जो प्रवृत्तिमार्ग त्यास मात्र प्रयत्नाची आवश्यकता आहे, परंतु निवृत्तिमार्गास कशाची गरज नाहीं. ह्या मतांतील सत्यासत्यतेचा विचार करूं. श्रुतिमातेची प्रवृत्ति व निवृत्ति ह्या दोन्ही बालकांवर सारखीच प्रीति आहे. बुद्धीचा प्रवाह पराक् म्हणजे बाहेर धांवून विषयग्रहण करणें आणि अतृप्तीनें अधिकाधिक शक्ति वाढवूं लागणें ह्याला **प्रवृत्तिमार्ग** म्हणतात, आणि तोच बुद्धीचा प्रवाह प्रत्यक् म्हणजे मागें परतून विषयांचा प-

रित्याग करीत करीत आंत येऊं लागणें ह्याला **निवृत्तिमार्ग** म्हणतात. मन पुढें धांवणें ही **प्रवृत्ति** आणि मन मागें परतणें ही **निवृत्ति** होय. पुढें धांवणारानें आपल्या जिज्ञासेनुरूप इष्ट साध्य करून कसें घ्यावें, एतदर्थ श्रुतीची

अथाऽतो धर्मजिज्ञासा । —**मीमांसासूत्र**

ह्यामध्यें प्रवृत्ति झाली, आणि धांवून धांवून जे कंटाळतील, त्यांस परत येण्याची इच्छा झाल्यास त्यांनीं विषयत्याग कसे करावे आणि स्वस्वरूपीं कसें पोहोंचावें, एतदर्थ श्रुतीची

अथाऽतो ब्रह्मजिज्ञासा । —**ब्रह्मसूत्र**

ह्या प्रकारची प्रवृत्ति झाली. या दोन प्रकारच्या साधनसंपत्तीस प्रवृत्तिमार्ग आणि निवृत्तिमार्ग ह्या संज्ञा आहेत. आतां योगवासिष्ठांत प्रवृत्त व निवृत्त यांचीं लक्षणें काय सांगितलीं आहेत तें पाहूं. प्रवृत्तिमार्गाचा आश्रय करणारे पुरुष सकाम धर्मानुष्ठानें करितात. ते असें म्हणतात कीं, जे अहेतुकपणें निवृत्तिमार्गानें कर्में करितात, ते व्यर्थ शीण पावतात, कारण ते कर्में करून फुकट दवडितात व त्यांला विषयसुखाची प्राप्ति मुळींच होत नाहीं. ज्या कर्मांत विषयसुख नाहीं, तें कर्म करून तरी काय उपयोग आहे ? ह्यास्तव इहपरलोकीं विषयसुखाची प्राप्ति करून घेण्याकरितांच नानाप्रकारच्या कर्मांचें आचरण करावें. रंभादि वनितांचे भोग मिळविण्याचीं साधनें संपादण्यंतच खरा पुरुषार्थ आहे असा दृढनिश्चय होऊन काम्यकर्मांचें जें अनुष्ठान त्यास प्रवृत्तिमार्ग असें म्हणावें. जो निवृत्त पुरुष असतो त्याला संसारांतील दुःखाची नेहमीं आठवण होत असून संसार हें

वणवा लागलेलें अरण्यच आहे असें त्याला वाटत असतें. पाठीस वाघ लागलेला आहे आणि पुढें धांव मारावी तर समुद्र पसरलेला, अशा कचाटींत सांपडलेल्या मनुष्याच्या मनाची जी स्थिति होते, तशी निवृत्त पुरुषाची सर्वदा झालेली असते. गर्भवासांतील असह्य यातना व त्यानंतर प्राप्त होणाऱ्या बाल्यादि अवस्था व मृत्यु ह्यांची आठवण होऊन संसार म्हणजे यमयातना असें त्याला वाटत असतें. अशा संसारांत नानाप्रकारचीं पुण्यकर्मे केलीं व त्यामुळें उत्तम जन्म प्राप्त झाले, तथापि कर्मांचें फल भोगल्यानंतर फिरून दुःख आहे तें आहेच. त्यांत कमीपणा होत नाहीं. म्हणून कर्माचें फल केवळ दुःख होय असें मानून निवृत्त पुरुष सदा आत्मविचारांत निमग्न असतात. त्यांची विषयावरील प्रीति समूळ नष्ट झालेली असते व ते साधनचतुष्टयानें संपन्न असतात. मी भवसमुद्र कोणत्या उपायानें तरून जाईन व मुक्त कसा होईन, ह्याच इच्छेनें ते सर्वदा प्रेरित असतात. अशा प्रकारचे जे मुमुक्षु त्यांस **निवृत्त पुरुष** असें म्हणावयाचें.

वर सांगितलेल्या प्रवृत्ति व निवृत्ति या दोन्ही मार्गांलाहि प्रयत्नांची आवश्यकता आहे. प्रवृत्तिमार्ग म्हणजे प्रयत्न, आणि प्रत्येक जीवाचा कल प्रवृत्तीकडे असतो हें सर्वांला मान्यच आहे. परंतु सामान्यतः लोकांची अशी समजूत असते कीं, निवृत्तिमार्गांत प्रयत्नांची कांहींएक जरूरी नाहीं. निवृत्तमार्गास जे लागतात, ते निरुद्योगी व आळशी असून त्यांच्यामुळें देशाची फार हानि होते, अशा प्रकारची आधुनिक विद्वानांची समजूत झालेली आपल्या नजरेस वारंवार येते, आणि आर्यतत्त्वज्ञानाबद्दल

व धर्माबद्दल भलताच ग्रह धरून ते त्याची निंदा करण्यास प्रवृत्त होतात. परंतु वास्तविक पाहतां ही समजूत फार घातक व खोटी आहे. प्रावृत्तिमार्गांत ज्याप्रमाणें प्रयत्न अवश्य आहेत, तसेच किंबहुना त्याहूनहि जास्त प्रयत्नांची निवृत्तिमार्गास आवश्यकता आहे. जास्त प्रयत्न म्हणण्याचें कारण असें कीं, प्रवृत्तिमार्गांत विषयोपभोग यथेच्छ असल्यामुळें इंद्रियांचा तिकडे स्वाभाविकच ओघ वळतो. परंतु निवृत्तिमार्गांत इंद्रियें अंतर्मुख करणें अवश्य असल्यामुळें तद्विषयींचा प्रयत्न अधिक साहसानें करावा लागतो. प्रथम, साधनचतुष्टयसंपन्न होण्यास किती तरी प्रयत्न करावे लागतात. त्यानंतर योगाभ्यासाकरितां तर प्रयत्नांची पराकाष्ठाच करावी लागते. इतकें झाल्यावर ज्ञानाच्या ज्या सात भूमिका त्या प्राप्त करून घेण्याची योग्यता अंगीं येते. या भूमिका प्राप्त झाल्यावर जीवन्मुक्ति आपोआप माळ घालिते. जीवन्मुक्तीची सिद्धि म्हणजे प्रयत्नांचें केवळ शिखर होय. ह्यावरून प्रवृत्तिमार्गापेक्षां निवृत्तिमार्गासच अधिक प्रयत्न करावा लागतो असें दिसून येतें.

संचित, प्रारब्ध व क्रियमाण ह्यांपैकीं संचित व क्रियमाण ह्यांचा नाश आत्मज्ञान झाल्यानंतर होतो, असें पूर्वीं सांगितलें आहे. त्याचा स्पष्टार्थ आतां करूं. आत्मज्ञानाची तुलना आर्यतत्त्वज्ञानांत अग्नीशीं किंवा शस्त्राशीं केलेली आहे. आत्मज्ञानरूपी जो अग्नि- तो कृतकर्माचें व क्रियमाण कर्माचें दहन करून टाकितो.

यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ॥
ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा॥ १--भगवद्गीता

म्हणजे अग्नि प्रदीप्त झाला असतां होमद्रव्यांचें भस्म करून टाकितो, तद्वत् ज्ञानरूपी अग्नि सर्व कर्में नष्ट करितो. तसेंच आत्मज्ञानरूपी खड्ग आपल्या हृदयांतील सर्व ग्रंथि व असंभावनादि संशय ह्यांचा छेद करून टाकितो.

तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ॥
छित्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ १

—भगवद्गीता

म्हणजे—याकरितां, अविवेकापासून उत्पन्न होणारा हृदयस्थ जो संशय तो आत्मविषयक जी निश्चयबुद्धि तद्रूप खड्गानें छेदून निष्काम कर्में करण्यास प्रवृत्त हो. भगवद्गीतेमध्यें अशा प्रकारचीं वचनें अनेक आहेत. आत्मज्ञान झालें म्हणजे कृतकर्मांशीं किंवा क्रियमाण कर्मांशीं आपला कर्तृत्वभोक्तृत्वादि संबंध मुळींच रहात नाहीं. कारण आत्माज्ञानानें जीवाची खात्री होते कीं, ज्या इंद्रियांच्या हातून कर्में घडतात तीं व त्यांस प्रवृत्त करणारें जें बुध्यादि चतुष्टय तें 'मी' नसून, मी केवळ साक्षीभूत आहे. ही साक्षीपणाची ओळख होऊन स्वस्वरूपप्राप्ति झाली, म्हणजे संचित कर्में भस्म होतात. वासनारूप जो लिंगदेह तो मी नव्हें, असा सद्गुरुप्रसादानें दृढनिश्चय झाल्यानंतर घडलेलीं कर्में निराधार होऊन त्यांचें कर्तेपण जीवाकडे येत नाहीं. त्याप्रमाणेंच 'मी' भोक्ता ह्या विषयींचें खरें ज्ञान झालें असतां क्रियमाण कर्मेंहि माझीं नव्हत असें वाटूं लागतें. कर्मांच्या कर्तेपणाच जर नाहींसा झाला, तर मग त्यांचे फलांचा भोक्तेपणा तरी आपणाकडे कसा येईल ? अशा रीतीनें संचिताचा व क्रियमाणाचा नाश होतो, पण प्रारब्ध मात्र देह आहे तोंपर्यंत सुटत नाहीं.

हें प्रारब्धकर्म योगाभ्यासानें नष्ट होतें असें पूर्वीं सांगितलें आहे. याचा अर्थ असा कीं, त्या कर्माचा भोग भोगून प्रारब्धाचा क्षय होतो. प्रारब्धकर्म भोगण्याचे संबंधानें आत्मज्ञानी व सामान्य जन ह्यांमध्यें विलक्षण अंतर आहे. एक असामी सावकाराचें कर्ज फेडीत जातो व दुसरा असामी कर्ज वाढवीत जातो हा जसा प्रकार व्यवहारांत आढळतो, त्याप्रमाणें आत्मज्ञानी पूर्वींच्या कर्माचीं फलें भोगून पूर्वकर्माचा क्षय करितो, व त्याचें प्रारब्ध क्षीण होतां होतां मग त्याला देहाचें व जगाचें भान पुनः कधीं होत नाहीं. परंतु सामान्य जन पूर्वकर्माचें फल भोगीत असतां नवीन कर्में करून संचितांत भर घालीत जातात व तेणेंकरून त्यांच्या कर्माची पुंजी कधीं संपतच नाहीं. आत्मज्ञानी पुरुषाचा ह्याहून एक विलक्षण चमत्कार असा आहे कीं,—

प्रारब्धकर्म देहाचे माथां। —रंगनाथ

असें तो समजतो. देह जरी सुखदुःख भोगीत असला, तथापि त्याचें भान आत्मज्ञान्यास मुळींच नसतें. श्री समर्थ रामदासांच्या चरित्रांत ह्याचें एक उत्कृष्ट उदाहरण आढळतें. एकदां समर्थांची स्वारी परळीवर असतां, शिवाजी महाराज दर्शनास आल्याची वर्दी शिष्यांनीं त्यांस दिली. त्यावेळीं समर्थांस हिंवतापाचा झटका येऊन ते पीडित झाले होते. परंतु शिवाजी महाराज दर्शनास आले हें कळतांच, त्यानीं अंगावरील भगवी कंथा दूर ठेविली, आणि नित्याप्रमाणें महाराजांस स्वागत करून त्यांच्याशीं संभाषण सुरू केलें. आपले देहावर हिंवतापाचीं चिन्हें त्यांनीं कांहींएक दिसूं दिलीं नाहींत, परंतु कांहीं

अंतरावर ठेविलेली कंथा हुडहुडी भरल्याप्रमाणें उडत असलेली शिवरायानीं पाहिली. तेव्हां हें काय म्हणून समर्थांस त्यानीं विचारिलें. त्यावेळीं समर्थांनीं सांगितलें कीं, बा शिवबा, तूं येण्यापूर्वीं मी हिंवतापानें ग्रासून गेलों होतों, परंतु तुझी भेट घेण्याकरितां तो ताप या कंथेंतच ठेवून मी बसलों आहें. तेव्हां शिवाजी महाराजानीं पुनः प्रश्न केला कीं, महाराज, आपण महान् योगी व त्रिकालज्ञानी असून हिंवाची बाधा आपणांस कां व्हावी ? त्याला समर्थांनीं उत्तर दिलें कीं, बा शिवबा, संचित व क्रियमाण हीं पाहिजे तर आत्मज्ञानानें नष्ट करितां येतील, पण प्रारब्ध कर्म देहपाताशिवाय कधींहि सुटणार नाहीं. ह्या आख्यायिकेवरून ह्या तिन्ही कर्मांचीं विशेष स्वरूपें काय आहेत तीं वाचकांचे लक्षांत येतील.

संचित, प्रारब्ध व क्रियमाण हा विषय अत्यंत कठिण असून प्रत्येक मनुष्य त्याबद्दल आपआपल्या समजुतीप्रमाणें निकाल लावण्याचा जरी प्रयत्न करीत असला, तथापि अखेरपर्यंत त्याचें पूर्ण समाधान होत नाहीं. अशी जरी स्थिति आहे, तथापि सर्वमान्य श्रुतीमध्यें ह्या विषयाची समाधानकारक उपपत्ति असून भाष्यकारांनीं त्याचा परिस्फोट फार सुगम केलेला आहे. म्हणून आह्मीं श्रुतीच्या व आचार्यांच्या वचनांचे आधारानें दोन सिद्धांतांचें निरूपण केलें. ते सिद्धांत म्हणजे ( १ ) आत्मज्ञान झाल्यानंतर संचित व क्रियमाण यांचा नाश होतो, ( २ ) प्रारब्ध तेवढें शरीरपात होईपर्यंत देहास भोगावें लागतें. हे होत. यावर अशी शंका येते कीं, आत्मज्ञान ही अगदीं शेवटची पायरी असून, ती मिळविल्यानंतरहि जर

देहास प्रारब्धभोग भोगावे लागतात, तर मग त्या आत्मज्ञानाची प्रतिष्ठा ती काय? या शंकेचें उत्तर शंकराचार्यकृत अपरोक्षानुभूतीमध्यें येणेंप्रमाणें आढळतें:—

तत्त्वज्ञानोदयादूर्ध्वं प्रारब्धं नैव विद्यते ॥
देहस्यापि प्रपंचत्वात्प्रारब्धावास्थितिः कुतः ॥ १
अज्ञानिजनबोधार्थं प्रारब्धं वक्ति वै श्रुतिः ॥
आत्मानं सततं जानन् कालं नय महाद्युते ॥ २
प्रारब्धखिलं भुंजन् नोद्वेगं कर्तुमर्हसि ॥

म्हणजे, आत्मज्ञान झाल्यानंतर प्रारब्ध म्हणून कांहीं उरतच नाहीं. देह हा प्रपंच असल्यामुळें प्रारब्ध मग शिल्लक कोठून राहील? श्रुतींनीं जें प्रारब्ध म्हणून वर्णिलें आहे, तें केवळ अज्ञानी लोकांच्या समजुतीकरितां आहे. आत्मानुभवामध्यें ज्ञानी पुरुषानें काळ घालवावा, परंतु प्रारब्धयोग भोगतांना मनाचा उद्वेग होऊं देऊं नये.

आर्यतत्त्वज्ञानाचा असा चमत्कार आहे कीं, त्यांत एकेक विषयावर अनेक ऋषींनीं आपआपलीं मतें प्रदर्शित केलीं आहेत. तेव्हां सामान्यजन त्या मतभिन्नत्वामुळें घोंटाळ्यांत पडतात, व त्या सर्व मतांची एकवाक्यता करणें फार बिकट होतें. ही स्थिति प्रस्तुत विषयासंबंधानेंहि आहे. श्रीमत् सायणाचार्यांनीं श्रुति, अनुभव व युक्ति या तिन्ही प्रकारांनीं निरूपण करण्याकरितां या विषयाचे तीन भाग केले आहेत. ( १ ) आत्मज्ञान झाल्यानंतर मनुष्याचे हातून जर पाप घडलें तर त्याचा दोष त्याला लागतो कीं नाहीं? ( २ ) आत्मज्ञान झाल्यानंतर केलेल्या पुण्यकर्माचें फळ त्या पुरुषास भोगावें लागतें कीं काय? ( ३ ) साक्षात्कार झाल्यानंतर प्रा-

रब्धकर्म भोगावें लागतें कीं नाहीं? प्रथमतः सायणाचार्यांनीं

नाभुक्तं क्षीयते कर्म कल्पकोटिशतैरपि ॥

ह्या सामान्य सिद्धांताचा विचार केला आहे. त्याचा अर्थ असा कीं, मनुष्याचे हातून जें कोणतेंहि कर्म घडतें, त्याचा क्षय भोगाशिवाय कोटिशः कल्पकाल लोटला तरी होत नाहीं. हा जो सर्वशास्त्रप्रसिद्ध सिद्धांत तो आत्मज्ञान्यास मुळींच लागू पडत नाहीं. कारण ब्रह्मसाक्षात्कार झाल्यानंतर देहेंद्रियांकडून होणारें जें पाप त्याचा लेप त्या पुरुषास घडत नाहीं. ह्यास श्रुतिवचन प्रमाण आहे तें:—

तद्यथा पुष्करपलाश आपो न श्लिष्यन्त

एवमेवंविदि पापं कर्म न श्लिष्यते ।

म्हणजे, कमलपत्रावर पडलेलें पाणी त्याला जसें चिकटत नाहीं, तसें ब्रह्मवेत्ता जो पुरुष त्याला पापकर्माचा लेप कधींहि होत नाहीं. हें पापकर्म म्हणजे क्रियमाणकर्म असें समजावें. पूर्वजन्मींचें किंवा ह्या जन्मींचें संचित जें पाप त्याचा नाश आत्मसाक्षात्कार झाल्याबरोबर तत्काल होतो. ह्याविषयीं पुढील श्रुतिवचन प्रमाण आहे.—

तद्यथेषीकातूलमग्नौ प्रोतं च प्रदूयेत

एवं हास्य सर्वे पाप्मानः प्रदूयंते ।

म्हणजे, ज्याप्रमाणें तृणविशेषाच्या फुलांपासून काढिलेला कापूस अग्नीमध्यें टाकिला असतां भस्म होतो, त्याप्रमाणें ब्रह्मवेत्ता जो पुरुष त्याचीं सर्व पापें नष्ट होतात. यावरून ब्रह्मवेत्त्यास क्रियमाण पापाचा लेप न होऊन, त्याच्या संचित पापाचा नाश होतो. ह्याचें मुख्य कारण असें आहे कीं, तो ब्रह्मस्वरूप झाल्याकारणानें मी अमुक गोष्ट केली, करीत आहें, किंवा पुढें करणार आहें, यात्र-

द्दल कर्तृत्वभाव कालत्रयींहि त्याचे ठायीं घडत नाहीं.

कामोऽकार्षीत्कामः करोति । नाहं करोमि कामः कर्ता नाहं कर्ता ।
मन्युरकार्षीन्मन्युः करोति । नाहं करोमि मन्युः कर्ता नाहं कर्ता ।

—नारायणोपनिषद्.

म्हणजे, लिंगदेहाधिष्ठित जे कामादि मनोविकार त्यांच्या प्राबल्यामुळें कर्में घडतात, साक्षिस्वरूप जो मी त्याच्याकडे त्याचा कर्तृत्वभाव संभवत नाहीं. व्यवहारामध्यें सुद्धां आपण असें पाहतों कीं, ज्यानें जी गोष्ट केली नाहीं, त्याचा दोष त्या पुरुषावर मूर्ख मनुष्य देखील लादूं शकत नाहीं. तेव्हां अकर्तृत्वभाव बाणलेला जो पुरुष, त्याला पापाची बाधा कोठून होणार बरें ? तेव्हां

नाभुक्तं क्षीयते कर्म कल्पकोटिशतैरपि ।

हें वचन, आत्मानुभव ज्यास घडलेला नाहीं, त्यासच लागू होतें असें समजावें. ह्याबद्दल पुढील ब्रह्मसूत्रहि प्रमाण आहे.

तदधिगम उत्तरपूर्वाघयोरश्लेषविनाशौ तद्व्यपदेशात् ।

या सूत्राचा अर्थ असा कीं, ब्रह्मप्राप्ति झाल्यानंतर उत्तर म्हणजे क्रियमाण जें पाप त्याचा अश्लेष म्हणजे लेप होत नाहीं, आणि पूर्व म्हणजे संचित जें पाप त्याचा नाश होतो, कारण श्रुतींत असा उल्लेख सर्वत्र आढळतो. ह्या सर्व गोष्टी ज्ञानोत्तरकालीं संभवणाऱ्या आहेत.

वरील विवेचन पापकर्माबद्दल झालें. आतां पुण्याचा विचार करावयाचा. ब्रह्मवेत्त्यास पापाचा लेप न [illegible], परंतु पुण्याचा त्याला लेप होण्यास काय हरकत आहे ? ब्रह्मज्ञान आणि पाप ह्या विरुद्धधर्माच्या गोष्टी असल्यामुळें त्यांची एक स्थिति होऊं शकणार नाहीं. हें खरें आहे, परंतु आत्मज्ञान आणि पुण्य ह्या सजातीय वस्तु

असल्यामुळें त्या एकत्र रहाण्यास कांहीं हरकत नाहीं. म्हणून पुण्याचा लेप ब्रह्मज्ञान्यास झालाच पाहिजे. अशी सहजीं शंका येते. ह्या शंकेचें समाधान वेदभाष्यांत येणेंप्रमाणें केलेलें आहे:—ज्ञानाचा प्रभाव असाच आहे, कीं अकर्ता जो आत्मा त्याला पापाप्रमाणेंच पुण्याचाहि लेप घडूं शकत नाहीं. कारण काम्य म्हणून जेवढें पुण्यकर्म आहे, तें अधम जो जन्म तो देण्यास कारणीभूत होतें, म्हणून आत्मज्ञ पुरुष पापाप्रमाणेंच पुण्यकर्महि समजतो. ह्यास पुढील श्रुतिवचन प्रमाण आहे:—

सर्वे पाप्मानोऽतो निवर्तन्ते ।

ह्या वचनांतील 'पाप्मानः' या शब्दामध्यें पुण्य, पाप व त्यांचीं फळें इतक्या सर्वांचा समावेश होतो. या वचनाचा अर्थ असा कीं—सुकृत, दुष्कृत व त्यांचीं फळें हीं सर्व 'अतः' म्हणजे ब्रह्मोपासकापासून पराङ्मुख होतात. ह्याबद्दल दुसरें श्रुतिवचन असें आहे कीं—

उभे ह्येवैष एते तरति ।

म्हणजे ज्ञानी पुरुष पाप आणि पुण्य ह्या दोहोंसहि सारख्याच रीतीनें तरून जातो. म्हणून पापाप्रमाणेंच पुण्याचाहि लेप ब्रह्मवेत्त्यास होत नाहीं.

ह्याबद्दल पुढील ब्रह्मसूत्र प्रमाण आहे:—

इतरस्याप्येवमसंश्लेषः पाते तु ।

याचा अर्थ असा कीं, पापाप्रमाणें पुण्यकर्माचाहि लेप होत नाहीं, व देहपतन झाल्याबरोबर मुक्ति होते.

आतां तिसऱ्या भागाबद्दल, म्हणजे साक्षात्कारानंतर प्रारब्धकर्म भोगावें लागतें किंवा नाहीं, याबद्दल विचार करावयाचा. श्रीमद्विद्यारण्यस्वामींनीं ह्याचा अगदीं थो-

इक्यांत निर्णय केला आहे तो येणेंप्रमाणें:—

उभयत्राप्यकर्तृत्वं तद्बाधः सदृशः खलु ॥
आदेहपातं संसारः श्रुतेरनुभवादपि ॥ १
इषुचक्रादि-दृष्टान्तान्नैवारब्धे विनश्यतः ॥

—अधिकरणरत्नमाला

याचा अर्थ असा कीं, संचिताप्रमाणेंच प्रारब्धाचा नाश होतो किंवा नाहीं ? ह्याचा विचार करितां दोन्ही ठिकाणीं अकर्तृत्वभाव असल्यामुळें संचिताचा जसा नाश होतो, तसाच प्रारब्धाचाहि नाश व्हावा हें संभवनीय दिसतें. परंतु ( १ ) श्रुति, ( २ ) अनुभव आणि (३) युक्ति ह्या तिन्ही प्रकारांनीं पाहतां इषुचक्राच्या दृष्टांताप्रमाणें देहपात होईतोंपर्यंत प्रारब्धाचा नाश होऊं शकत नाहीं.

ह्याबद्दल अनुक्रमानें विचार करावयाचा. पहिल्यानें श्रुतींत पुढील वचन आढळतें:—

तस्य तावदेव चिरं यावन्न विमोक्ष्येऽथ संपत्स्ये ।

—छांदोग्य

याचा अर्थ असा कीं, ब्रह्मवेत्ता जो पुरुष त्याला ज्ञान झाल्याबरोबर मुक्ति ठरलेलीच आहे, परंतु त्याच्या देहाचा व प्राणाचा वियोग होईपर्यंत ती वाट पहात असते. देहपात झाल्याबरोबर मुक्ति त्याला माळ घालण्यास तयारच असते. ह्या श्रुतिवचनावरून असें सिद्ध होतें कीं, तत्त्ववेत्ता पुरुष जरी झाला, तथापि देहपात होईपर्यंत त्यानें प्रपंचाचा अंगीकार केलाच पाहिजे. प्रपंचाचा अंगीकार केला कीं तदनुषंगी सुखदुःखें त्याच्या पाठीस लागलींच. हा श्रुतीचे दृष्टीनें विचार झाला. आतां अनुभवाविषयीं पहातां पूर्वीं दिलेल्या रामदासांच्या आ-

ल्यायिकेवरून हाच सिद्धांत ठरतो व सांप्रतकाळचे योगी म्हणजे अक्कलकोटकर स्वामी, आळंदीचे नृसिंहसरस्वति, योगानंदसरस्वति, ह्यांच्या सारख्यांनीं ज्या ज्या स्वानुभवाच्या गोष्टी श्रोतृमंडळीपुढें प्रतिपादन केल्या आहेत, त्यांमध्येंहि ते ह्याच तत्त्वाचा निर्देश करीत असत. आतां तिसरा प्रकार युक्तीविषयींचा होय. देहपात होईपर्यंत प्रारब्ध कसें चिकटून राहतें हें समजण्याकरितां इषु व चक्र ह्यांचे दोन समर्पक दृष्टांत सायणाचार्यांनीं दिले आहेत. धनुष्यास जोंपर्यंत बाण सज्ज केलेला असतो, व तो बाण जोंपर्यंत सुटून गेलेला नाहीं, तोंपर्यंतच तो बाण सोडणें अगर न सोडणें हें स्वातंत्र्य धनुर्धाऱ्याला असतें. परंतु एकदां बाण धनुष्यापासून सुटून गेला, म्हणजे त्या बाणाच्या गतीवर धनुर्धाऱ्याचा कोणत्याहि प्रकारें अमल रहात नाहीं. मध्येंच त्याला थांबवीन म्हटलें तर तें त्याच्या शक्तीबाहेर आहे. त्या बाणाचा वेग आपोआप जेव्हां थांबेल, तेव्हांच तो खालीं पडेल. हा बाणाचा दृष्टांत दार्ष्टांतिक जें प्रारब्ध त्यास कसा लागू पडतो हें पाहूं. संचित व क्रियमाण ह्या कर्मांचा नाश करण्याविषयीं आत्मज्ञानामध्यें पूर्ण स्वातंत्र्य किती जरी असलें, तथापि त्याची सत्ता प्रारब्धावर चालत नाहीं. कारण, मनुष्यापासून सुटून गेलेल्या बाणाप्रमाणें प्रारब्धाच्या फलाचा उपभोग देहोत्पत्तीपासून अगोदरच सुरू झालेला असतो. प्रारब्धाच्या योगानें प्राप्त झालेलें जें शरीर त्याचा पात होईपर्यंत प्रारब्धकर्म सुटणारच नाहीं. कुलालाचा दृष्टांतहि अशाच अर्थाचा आहे. म्हणजे चक्राला प्रथमतः गति देणें एवढेंच कुलालाच्या

स्वाधीन असतें, परंतु त्या गतीचा निरोध करणें हें कांहीं कुलालाच्या हातीं रहात नाहीं.

आत्मज्ञान झाल्यानंतर तत्क्षणींच प्रारब्धकर्माचा नाश होऊन जर मुक्ति प्राप्त होणें हें संभवेल, तर जगांत उपदेष्टा कोणी न राहिल्यामुळें ज्ञानमार्गच खुंटेल. आर्यतत्त्वज्ञानाची तर अशी गोष्ट आहे कीं, यांतील ज्ञान हें पूर्वापरसंबंधानेंच प्राप्त होतें. कोणी म्हणेल कीं मी वेदशास्त्राच्या पोथ्या जमवून ज्ञानप्राप्ति करून घेईन, तर तसें होण्याचा बिलकूल संभव नाहीं. आदिनाथापासून मत्स्येंद्रनाथास ज्ञानप्राप्ति झाली, त्याच्यापासून गोरखनाथास, त्याच्यापासून गहिनीनाथास, त्याचयापासून निवृत्तिनाथास, व निवृत्तिनाथापासून ज्ञानदेवास ज्ञानप्राप्ति झाली. ही परंपरा विश्रुतच आहे. ह्याकरितां विद्यासंप्रदाय अबाधित चालू रहाण्याकरितां ज्ञानी पुष्कळ दिवस जगांत राहिलेच पाहिजेत, व त्यांचे हातून लोकांस उपदेश झाला पाहिजे. तरच ज्ञानमार्ग अविच्छिन्न राहील. ज्ञानप्राप्तीबरोबर जर ब्रह्मवेत्ते मुक्त होऊं लागले, तर सर्व जगांत अंधार होऊन ज्ञानाचा लय होईल, ह्यांत शंका नाहीं. ह्यावरून संचित व क्रियमाण या कर्मांप्रमाणें प्रारब्धकर्माचा नाश होत नाहीं हें सिद्ध झालें.

ह्याबद्दल पुढील ब्रह्मसूत्र प्रमाण आहे:—

अनारब्धकार्ये एव तु तदवधेः ।

याचा अर्थ असा कीं, ज्या कर्मांचीं फलें भोगण्याची सुरवात झाली नाहीं अशीं जीं संचित कर्मे त्यांचा मात्र ज्ञानोदयाबरोबर क्षय होतो; परंतु अर्धे अधिक फल ज्या कर्माचें भोगून गेलें आहे त्यावर मात्र ज्ञानाची सत्ता कांहीं

चालत नाहीं, कारण तेथें शरीरपात होण्याची प्रतीक्षा रहाते.

एथपर्यंत श्रुतींतील प्रमाणें व षड्दर्शनांतील शिरोभूत जीं ब्रह्मसूत्रें त्यांतील आधार देऊन आत्मज्ञान झाल्यानंतरहि प्रारब्धभोग सुटत नाहीं, केवळ संचिताचा नाश क्रियमाणाचा लेप होत नाहीं, हे सिद्धांत प्रतिपादन केले. आतां अपरोक्षानुभूतींतील वर दिलेल्या वचनांशीं या सिद्धांताचा मेळ कसा बसतो तें पहावयाचें. अपरोक्षानुभूतींतील ८८ व ८९ या दोन श्लोकांचें तात्पर्य मनांत आणिलें असतां या विषयाचा बहुतेक निकाल होणार आहे. ते श्लोक असे:—

सर्वमात्मतया ज्ञातं जगत्स्थावरजंगमम् ॥
अभावात्सर्वभावानां देहानां चात्मता कुतः ॥ ८८
आत्मानं सततं जानन्कालं नय महाद्युते ॥
प्रारब्धमखिलं भुंजन्नोद्वेगं कर्तुमर्हसि ॥ ८९

याचा अर्थ असा कीं—ब्रह्मज्ञान झालें म्हणजे सर्व स्थावरजंगमात्मक जगत् हें आपला आत्माच आहे असा अनुभव येऊं लागतो, व त्याबरोबर सर्व वस्तु विकारी अतएव अभावरूपी आहेत अशीहि बुद्धि उत्पन्न होते. ही स्थिति बाणली असतां मग देहांच्या ठिकाणीं आत्मत्व कोठून प्रतीतीस येईल बरें ? याकरितां ब्रह्मवेत्ता जो पुरुष त्यानें सर्वत्र ओतप्रोत भरलेला जो आत्मा, तन्मय आपली वृत्ति करून कालक्षेप करावा, परंतु प्रारब्धभोग भोगीत असतां कोणत्याहि प्रकारें चित्त उद्विग्न होऊं देऊं नये. अशा प्रकारचा प्रस्ताव करून शंकराचार्यांनीं ९० पासून ९८ पर्यंत जे श्लोक लिहिले आहेत त्यांचा अर्थ येणेंप्रमाणें आहे:—

आत्मज्ञान जरी प्राप्त झालें, तथापि प्रारब्ध कधींहि पाठ सोडीत नाहीं, असें जें श्रुतीमध्यें सांगितलें आहे त्याचें विवरण आह्मीं करितों. तत्त्वज्ञान झाल्यानंतर प्रारब्धच मुळीं रहात नाहीं, कारण मग देहादिकांचाच अभाव होतो. जन्मान्तरीं केलेलें व वर्तमानकाळच्या देहाकडून भोगण्यास ज्याचा आरंभ झाला आहे, असें जें प्रारब्धकर्म, तें पुढचा जन्मच जर ज्ञान्याला मुळीं नाहीं, तर त्याला बाधणार कोठून ? स्वप्नामध्यें आपल्याला एकादा देह प्राप्त होतो, परंतु तो देह केवळ भासमान् असल्यामुळें जसा खोटा ठरतो, तद्वत् हाहि देह खोटा असा अनुभव आत्मज्ञानानंतर येतो. मग भासमान् जो पदार्थ, त्याला फिरून जन्म तरी कसा होईल ? व फिरून जन्मच जर झाला नाहीं, तर प्रारब्ध कोठून राहणार ? मातीच्या भांड्याचें उपादान कारण ज्याप्रमाणें मृत्तिका होय, त्याप्रमाणें प्रपंचाचें उपादान कारण ब्रह्म हें होय. मग वेदान्तशास्त्राध्ययनानें अज्ञानाचा नाश झाला असतां प्रपंच कोठून उरेल ? दोरीला भ्रमामुळें एकादा सर्प समजतो, तसें मूर्ख जो आहे तो जगताचें वास्तविक स्वरूप न समजून तें सत्य आहे असें मानितो. परंतु हा सर्प नसून केवळ दोरी आहे असें ज्ञान झालें म्हणजे सर्पबुद्धि आपोआप नाहींशी होते. त्याप्रमाणें सकलांचें जें अधिष्ठान त्याचें ज्ञान झालें म्हणजे प्रपंच शून्य झाला असें समजावें. तर मग देह हाहि जर प्रपंचांतीलच एक भाग आहे, तर प्रारब्ध अवशिष्ट कसें राहील ? श्रुतीमध्यें जें प्रारब्धाचें वर्णन आहे, तें अज्ञानी लोकांच्या समजुतीकरितांच आहे असें समजावें.

यावरून पाहतां ब्रह्मवेत्ता पुरुष प्रारब्धभोग भोगीत असतांहि त्याला मुळींच जुमानीत नाहीं, म्हणून आत्मज्ञास प्रारब्धकर्म बाधूं शकत नाहीं. तथापि श्रुतीमध्यें प्रारब्धाचें जें अवडंबर केलें आहे, तें

अज्ञानिजनबोधार्थं प्रारब्धं वक्ति वै श्रुतिः।

अज्ञानी लोकांस प्रारब्ध म्हणजे काय ह्याचा बोध व्हावा एवढ्यासाठींच आहे. अनेक मतांची एकवाक्यता सिद्ध करण्यास जे आधार द्यावे लागतात, त्यांपैकीं मुख्य आधार——

परप्रसिद्ध्या परो बोधनीयः।

हा आहे. म्हणजे ज्या रीतीनें ज्याची समजूत पडेल, त्याच रीतीनें अवलंब करून त्याची समजूत पाडावी. ब्रह्मवेत्ता पुरुष प्रारब्धभोग जेव्हां भोगीत असतो, तेव्हां इतर अज्ञानी लोकांची प्रारब्धाबद्दल समजूत पडावी, म्हणून श्रुतीमध्यें त्याचें अवडंबर केलेलें आढळतें. सर्व ठिकाणीं आत्मा भरलेला आहे, अज्ञान नष्ट झालें आहे व साक्षात्कार घडला आहे, अशा ठिकाणीं प्रारब्धाचा कांहीं अंमल चालत नाहीं हें उघडच आहे.

आतां एक शंका राहिली ती अशी कीं—प्रथमच सृष्टि झाली, तेव्हां जे प्राणी उत्पन्न झाले त्यांस संचित व प्रारब्ध आलीं कोठून? ह्याविषयीं ब्रह्मसूत्रांत पुढील वचन आहे:—

संसारस्य अनादित्वात्।

याचा अर्थ असा कीं, प्रपंच अनादि मानिलेला आहे. कांहीं काल लोटल्यानंतर सृष्ट्युत्पत्ति फिरून होते हें तत्त्व श्रुतींत प्रतिपादन केलें आहे व आधुनिक पदार्थविज्ञानवेत्त्यांसहि हें तत्त्व मान्य आहे. ही सृष्टीची उत्पत्ति

कशी होते, हें कळण्याकरितां वेदभाष्यांतील ह्या विषयावरचा गोषवारा आह्मीं देतों. प्रथमतः भाष्यकारांनीं आपणांपुढें ( १ ) देवाचे ठायीं विषमभाव भासतो व ( २ ) परमेश्वर निर्दय भासतो हे दोन प्रश्न ठेवून त्यांचें विवरण केलें आहे. तें असें कीं:—

वैषम्याद्यापतेन्नो वा सुखदुःखे नृभेदतः ॥
सृजन्विषम ईशः स्यान्निर्घृणश्चोपसंहरन् ॥ १
प्राण्यनुष्ठितकर्मादिमपेक्ष्येशः प्रवर्तते ॥
नातो वैशम्यनैर्घृण्ये संसारस्तु न चादिमान् ॥ २

—**अधिकरणरत्नमाला**

याचा अर्थ असा कीं—भिन्नभिन्न मनुष्यें सुखाचा किंवा दुःखाचा अनुभव घेतात, ही जी विषमता दृष्टीस पडते, त्यावरून ती उत्पन्न करणारा जो ईश्वर त्यावर वैषम्याचा आरोप येतो. वेदभाष्यामध्यें सर्व प्राण्यांचे एकंदर तीन वर्ग केले आहेत. त्यांपैकीं देवयोनींतील प्राणी अत्यन्त सुखी असतात, पशुवर्ग अत्यंत दुःखी असतो, व मनुष्यवर्गांतील प्राणी मध्यम सुखाचा अनुभव घेतात. ह्याप्रमाणें तारतम्यभाव ठेवून निरनिराळ्या प्राण्यांस भिन्नभिन्न सुखदुःखाचा अमुभव घ्यावयास लावणारा ईश्वर वैषम्यभावास पात्र आहे. तसेंच देवयोनि, तिर्यक्‌योनि, मनुष्ययोनि वगैरे प्राणिमात्रांचा संहार करणारा जो ईश्वर त्याला या कृत्याबद्दल नीच लोक सुद्धां नांवें ठेवितात. तेव्हां सर्व जगाचा नाश करणारा ईश्वर अत्यंत निर्दय असला पाहिजे. हे दोन भयंकर आरोप ईश्वरावर येतात, व त्यांचें समाधान भाष्यांत आहे तें असें:

ईश्वरावर वैषम्यभावाचा आरोप कधींहि येणार नाहीं.

कारण, प्राण्यास जी उत्तम, मध्यम किंवा अधम स्थिति प्राप्त होते, ती त्याच्या कर्मानुरूप होत असते. असें झाल्यामुळें ईश्वराचें जें स्वातंत्र्य तें नष्ट होत नाहीं. कारण ईश्वर सर्वांतर्यामी असल्यामुळें कर्माध्यक्षहि आहे, म्हणजे सर्व कर्मांचें नियमन करणें हें ईश्वराचें मुख्य लक्षण होय. ह्या स्थलीं नियामक याचा अर्थ असा समजावयाचा कीं, ज्या ज्या वस्तूंत जी जी शक्ति असेल, तिची अव्यवस्था होऊं न देणें. ह्या रीतीनें ईश्वर हा व्यवस्थापक आहे हें ध्यानांत आणिलें म्हणजे त्यावर वैषम्याचा आरोप बिलकुल येऊं शकत नाहीं. यावरून पहातां मनुष्याच्या पूर्वकर्मांप्रमाणें त्याला सुखदुःखाची स्थिति प्राप्त होते. ईश्वर आपण होऊन त्याला कांहीं वाईट स्थितींत ठेवीत नाहीं. जसें एकादा मनुष्य आपली ठेव सावकारापाशीं नेऊन ठेवितो, आणि ती ठेव तो मागावयास आला म्हणजे सावकार त्याची ठेव जशीच्या तशी परत देतो, तसेंच ईश्वर साक्षीभूत राहून ज्याचीं त्याचीं पूर्वकर्में ज्याच्या त्याच्या स्वाधीन करितो, म्हणजे त्याला भोगावयास देतो. असें जरी झालें, तथापि प्रथमच जेव्हां सृष्टि निर्माण झाली, त्या वेळेस कोणत्याहि प्राण्याचें पूर्वकर्म संभवत नाहीं. मग त्या वेळीं प्राण्यांचे स्थितींत वैषम्य कां घडावें? हा जबरदस्त आक्षेप पुढें आला असतां त्याला उत्तर

संसारस्य अनादित्वात्। —ब्रह्मसूत्र

हेंच आहे. म्हणजे सृष्टि अनादि मानिलेली आहे, व तिचा व्यापार बीजवृक्षन्यायानें चालला आहे. अशा ठिकाणीं बीज अगोदर कीं वृक्ष अगोदर हें जसें ठरविणें अशक्य आहे, तसेंच संसाराचें अनादित्व आहे. कर्मामुळें विशिष्ट-

स्थिति, विशिष्टस्थितीमुळें कर्म, हें रहाटगाडगें चालू आहे.

त्याप्रमाणेंच ईश्वरावर निर्दयपणाचा आरोप येत नाहीं. देह विकारी असल्यामुळें, त्यास परिणतावस्था प्राप्त होते. मग अशा रुग्ण स्थितींत मृत्यु आला असतां सुषुप्तीप्रमाणें सर्व दुःखापासून व क्लेशापासून सुटका होते. म्हणून प्राणिमात्रास मृत्यु हा मोठा लाभच होय.

आतां सृष्टीचा लय व पुनरुत्पत्ति कशी होते हें आपण पाहूं. सर्व जड पदार्थांचा लय क्रमाक्रमानें होतो; म्हणजे पृथ्वीचा जलांत, जलाचा अग्नींत, अग्नीचा वायूंत, व वायूचा आकाशामध्यें होतो, आणि ह्याप्रमाणेंच सर्व शक्तींचा लय—मग ती विद्युच्छक्ति असो किंवा आकर्षणशक्ति असो प्राणामध्यें होतो. ह्या रीतीनें पहातां आकाश व प्राण हीं सर्व जडपदार्थांचीं व शक्तींचीं अधिष्ठानें होत. पुढें आकाश व प्राण ह्या दोहोंचाहि लय अनंत व अनादि असें जें तत्त्व त्यामध्यें होतो. अशा रीतीनें लय झाला म्हणजे पुनः उलट क्रमानें ह्याच अनादि तत्त्वापासून क्रमानें उत्पत्ति होऊन स्थावरजंगमात्मक जगत् आविर्भूत होतें. अशा वेळीं सूक्ष्मरूपानें राहिलेले वासनामय जे लिंगदेह ते पुनरुद्भूत होऊन निरनिराळीं शरीरें धारण करितात, व तीं शरीरें त्यांच्या वासनांस व कर्मांस अनुरूप अशीं असतात. ईश्वराचें व्यवस्थापकत्व तें हेंच. म्हणजे प्राणी जो जन्मास येतो, त्याला पाहिजे त्या स्थितींत ईश्वर जन्मास घालितो असें नसून, त्याच्या पूर्वकर्माप्रमाणें त्याला विशिष्टस्थिति ईश्वर देतो. पूर्वकर्मांचा संस्कार चुकवून जाण्याचें प्राण्याच्या मनांत असेल तर तेंहि मार्ग श्रुतींत सांगितले

आहेत. म्हणजे आत्मज्ञानानें संचित व क्रियमाण यांचा क्षय करावा व कर्मफल भोगून किंवा योगाभ्यासाचा अवलंब करून प्रारब्धाचा शेवट करावा.

ह्या जगामध्यें सर्व वस्तूंची स्थिति वर्तुळाकार आहे असें म्हटलें तरी चालेल. म्हणजे प्रत्येक वस्तूचा आदि व अंत एकसारखाच असतो. उदाहरणार्थ, जमिनींत बीं पेरलें असतां त्यापासून झाड होतें. झाड मोठें झाल्यावर पुनः त्यापासून बीं उत्पन्न होतें, व तें बीं पुनः दुसऱ्या झाडाचे उत्पत्तीस मूळकारण होतें. तेव्हां वृक्षांच्या जीवित्वाचा विचार आपण केला असतां, त्याच्या आरंभींचें स्वरूप व शेवटलें स्वरूप हीं एकच आहेत असें सिद्ध होतें. त्याप्रमाणें अणूपासून पर्वत होतो, आणि पर्वताचा लय पुनः अणूमध्यें होतो. एतावता सर्व पदार्थांचा आरंभ व अंत एकच आहे यांत संशय नाहीं. असें जर आहे तर ज्या एका तत्त्वामध्यें ह्या सर्व विश्वाचा लय होतो, त्याच तत्त्वापासून ह्या सर्व विश्वाची उत्पति होते, आणि अशा प्रसंगीं प्रत्येक प्राणी आपआपलें पूर्वकर्म घेऊन जन्मास येतो. ईश्वरावर वैषम्याचा किंवा निर्घृणतेचा आरोप कोणत्याहि प्रकारें येऊं शकत नाहीं.

ह्या विषयाचा शारीरक भाष्यामध्यें ज्या सूत्राधारें विचार केला आहे, तें सूत्र येणेंप्रमाणें:—

वैषम्यनैर्घृण्ये न सापेक्षत्वात् तथाहि दर्शयति ।

याचा अर्थ असा कीं—प्राणिमात्रांमध्यें जें वैषम्य दृष्टीस पडतें, त्यावरून ईश्वरावर वैषम्य येत नाहीं, व प्राण्यांचा जो संहार होतो, त्यावरून ईश्वर निर्दय ठरत नाहीं. कारण, अशा ठिकाणीं दिसणारी जी ईश्वराची क्रिया तीं

केवळ सापेक्षसंबंधानें असते, म्हणजे प्राण्याच्या पूर्वकर्मानुरूप त्याला स्थिति प्राप्त होत असते. सृष्टीमध्यें वैषम्य किंवा संहार दृष्टीस पडला असतां त्यांत ईश्वराचा अपराध मुळींच होत नाहीं. ईश्वर पर्जन्याप्रमाणें समजावयाचा. सर्व प्रकारच्या धान्यांवर पर्जन्य सारखाच पडतो व सर्व धान्यांच्या उत्पत्तीला तो साधारण कारण असतो. असें जरी आहे, तथापि धान्य सर्व ठिकाणीं सारखें येत नाहीं, कारण प्रत्येक ठिकाणीं बीजांची शक्ति म्हणून असाधारण कारण असतेंच. ह्या असाधारण कारणावर शेताचा सुपीकपणा अवलंबून असतो, व पीक कमी आलें किंवा जास्त आलें, तर त्याचा पर्जन्याकडे दोष नाहीं. तसाच प्राणिमात्रांस विषमावस्था प्राप्त झाली असतां त्याचा दोष ईश्वराकडे येत नाहीं. पर्जन्याप्रमाणें ईश्वर साधारण कारण होतो. असाधारण म्हणजे विशेष कारण हें ज्याचें त्याचें कर्म होय. एतद्विषयीं पुढील श्रुतिवचन आहेः—

पुण्यो वै पुण्येन कर्मणा भवति पापः पापेन ।

—बृहदारण्यक

म्हणजे, प्राण्याच्या पुण्यकर्माप्रमाणें त्यास उत्तम जन्म प्राप्त होतो, पापकर्माप्रमाणें अधम जन्म येतो. तसेंच देहधर्मामुळें प्राणिमात्रास मृत्यु गांठितो. अशा रीतीनें संसार अनादि असून प्राणी उच्चनीच स्थिति पावतो व त्याचा संहार होतो, आणि ईश्वरावर वैषम्य किंवा नैर्घृण्य याचा दोष लागू पडत नाहीं.

संचित, प्रारब्ध व क्रियमाण ह्यांजबद्दल एथपर्यंत जें विवेचन झालें, तें श्रुत्युक्त व श्रुतिबोधित सिद्धांतांस अनु-

लक्षणच केलेलें आहे. त्यावरून श्रुतींमध्यें आत्मज्ञानाची प्रौढी केवढी सांगितली आहे ह्याची चांगली साक्ष पटते. श्रुतिवचनांचें तात्पर्य समजून घेणें प्रत्येक द्विजाचें काम आहे. सांप्रतकालीं मुद्रणयंत्राच्या साहाय्यानें वंग देशांत, पुण्याच्या आनंदाश्रमांत वगैरे अनेक संस्कृत ग्रंथ छापून श्रुत्यर्थ समजण्याचीं साधनें घरोघर व सुलभ होऊन गेलीं आहेत. असें असतां, खरें आत्मज्ञान न होतां आधुनिक विद्वान् आपल्या जिज्ञासेच्या तृप्त्यर्थ, नवे नवे पंथ व मार्ग शोधण्याच्या भरीस कां पडावेत हा फार महत्त्वाचा प्रश्न आहे. आधुनिक विद्वानांची समजूत अशी आहे कीं, जातिभेद मोडून सब् गोलंकार केला असतां समाजघटना ठीक होईल. परंतु प्रथम असा विचार करावा कीं, आर्यतत्त्वज्ञान जें इतक्या उच्च पदवीस चढलें आहे, तें कशामुळें बरें? ह्याचें उत्तर हेंच कीं, विवक्षित मनुष्यांचा समुदाय निराळा राहून त्यास विवक्षित तऱ्हेने धार्मिक, मानसिक व नैतिक शिक्षण मिळाल्यामुळें अत्यंत उदात्त व जगास थक्क करून सोडणारे असे विचार निघाले आहेत. ही गोष्ट मोक्षमुल्लर, कोलब्रुक, कावेल, जोन्स प्रभृति परधर्मी ग्रंथकारांनींहि कबूल केली आहे. अशा तऱ्हेनें सुसंस्कृत झालेला जो विवक्षित समुदाय, त्याचे हातूनच श्रुति, दर्शनें इत्यादि ग्रंथसमूह निर्माण झाला व इतके उदात्त विचार वाढले कीं साक्षात् परमेश्वरस्वरूपास पोहोंचण्याची शक्ति द्विजांच्या प्रयत्नानें उत्पन्न झाली व आत्मप्राप्तीचे मार्ग निघाले. अशा तऱ्हेनें तयार झालेला जो द्विजवर्ग, त्याचा

इच्छामात्रेंकरून नाश करणें हें आधुनिक विद्वानांचे दृष्टींनें अवश्य दिसत आहे. परंतु त्यांना असा विचार करावा कीं, या प्रकारचा सुसंस्कृत द्विज एक तरी तयार करण्याचें सामर्थ्य कोणामध्यें आहे काय ? आधुनिक विद्वानांस श्रुत्यादि ग्रंथांची महती वाटत नाहीं, याचें कारण असें कीं, हे ग्रंथ योग्य रीतीनें विद्यालयांतून शिकविले जात नाहींत. व विद्यार्थ्यांच्या मनावर आंग्ल विद्येचा पगडा बसल्यामुळें त्यास श्रुतिदर्शनादिकांचें वास्तविक स्वरूप कळत नाही. परकीय विद्येचा पगडा आधुनिक विद्वानांचे मनावर इतका बसलेला दृष्टीस पडतो कीं, त्यांच्या ग्रंथसंग्रहांत श्रुतीबरोबर कुराण, बैबल हें असावयाचेंच ! त्यांची योग्यता ते सारखीच समजतात. यामुळें सर्व देशांतील ईश्वरदत्त समजलेल्या ग्रंथांचें परिशीलन करून नवीन पंथ उत्पन्न करण्याची हौस ज्याला त्याला वाटते व याचा असा अनिष्ट परिणाम घडतो कीं, धर्मबुद्धीस अत्यंत अवश्य जी श्रद्धा तिचा लोप होऊन

इदं च नास्ति परं न लभ्यते ।

अशी सर्वत्र स्थिति आढळून येते.

आधुनिक विद्वानांची अशी मानसिक स्थिति होण्याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे नित्यनैमित्तिक कर्मांचा लोप हें होय. निष्कामकर्माशिवाय चित्त शुद्ध नाहीं. चित्तशुद्धीशिवाय निष्काम उपासना नाहीं व निष्काम उपासनेव्यतिरिक्त ज्ञान उत्पन्न होत नाहीं. कर्में अंतःकरण सुसंकृत करितात व विविदिषा जागृत होते. पापाचा क्षय झाल्याशिवाय वैराग्य उपजत नाहीं. म्हणून आधुनिक पंडितांनीं श्रुतिविहित कर्मांची आवड धरावी.

व ज्या सिद्ध ऋषिवर्यांनीं दर्शनें निर्माण केलीं त्यांची योग्यता नीट जाणून, त्यांनीं दाखविलेल्या मार्गांनीं जावें. म्हणजे आत्मविद्या प्राप्त होऊन संचित व क्रियमाण ह्यांचा नाश होईल. प्रारब्धकर्म भोगण्यास देह तयार आहेच.

# प्रकरण ६ वें

## वैराग्य प्रकरण

ब्रह्मलोकतृणीकारो । वैराग्यस्यावधिर्मता ॥

**—योगवासिष्ठ**

आध्यात्मिक विचारांचें आजकाल पुनरुज्जीवन होत असल्यामुळें अशा प्रकारच्या विषयांची अभिरुचि वाचकवर्गाला स्वाभाविक अधिक अधिक लागत चालली आहे. म्हणून अशा वेळीं वेदान्तशास्त्राची एकसारखी संगति जुळवून दाखविणारा एकादा प्रबंध सर्वमान्य व प्रौढ विचारांनीं परिप्लुत अशा एकाद्या प्राचीन आर्यग्रंथाच्या आधारें वाचकांस सादर केला तर तो बह्वादरास खचित पात्र होईल अशी आमची पूर्ण समजूत आहे. ज्यांत आर्यतत्त्वज्ञान आणि आर्यधर्म ह्यांचें पायाशुद्ध सर्वोत्कृष्ट विवेचन केलें आहे, अशा प्राचीन आर्यग्रंथाची निवड करावयाची, म्हणजे ती लोकमान्य झालेल्या **योगवासिष्ठ** ग्रंथाचीच करणें होईल. त्यांतील सोपपत्तिक विवेचनाचा प्रशांतबुद्धीनें विचार केला, म्हणजे आर्यतत्त्वज्ञान आणि आमचा सनातन आर्यधर्म ह्यांचा परस्पर विरोध

नसून आर्यधर्म तेंच आर्यतत्त्वज्ञान आणि आर्यतत्त्वज्ञान तोच आर्यधर्म हें प्रमेय सर्व लोकांच्या अंतःकरणावर चांगलें ठसण्यासारखें आहे. ह्या योगवासिष्ठ ग्रंथांत वेदान्तविचारास मूळ अधिकारी होणाऱ्या विद्यार्थ्यापासून तों अत्यंत श्रेष्ठ जे योगी त्या योग्यांपर्यंत, सर्वांलाहि अत्यंत उपयुक्त व संमत होणारीं अशीं वेदान्ताचीं व योगशास्त्राचीं मतें निर्दिष्ट झालेलीं असल्यामुळें त्याची योग्यता फारच मोठी आहे हें सांगावयास नको.

ह्या प्राचीन ग्रंथाचें कथानक फार सुरस व अगदीं अल्प आहे. वाचकांपुढें त्याची मोठी पोथी सोडावयाची आहे असें मुळींच नाहीं. ग्रंथोत्पत्तीचा प्रसंग कोणता व तिचें कारण काय एवढें आरंभीं थोडक्यांत सांगून दिलें म्हणजे पुरें होईल. विश्वामित्रऋषींनीं आरंभिलेल्या यज्ञांत दुष्ट राक्षसांनीं विघ्नें केल्यामुळें त्यांचा प्रतिकार होण्यासाठीं दाशरथेय रामलक्ष्मणांच्या मदतीची विश्वामित्रानीं अपेक्षा केली. परंतु दशरथ राजाचें पुत्रप्रेम अनिवार होतें. रामलक्ष्मणांचा वियोग असह्य होईल म्हणून त्यानें विश्वामित्राची विनंति अमान्य केली. तेव्हां तपोनिधि विश्वामित्रऋषि क्रोधाविष्ट होऊन चालले. कदाचित् ते शाप देतील, म्हणून श्रीमद्वसिष्ठऋषींनीं विश्वामित्राला विमुख न दवडण्याविषयीं सांगून, श्री रामचंद्र जरी पंचदशवर्षात्मक सुकुमार होते, तथापि ते सामान्य मनुष्य नसून मंगलांचें मंगल, योग्यांचे मुकुटमणी व विश्रामस्थान, दैत्यांचे शास्ते, आर्यधर्मरक्षक व साक्षात् परब्रह्म आहेत इत्यादि गोष्टींचें निरूपण करून दशरथाचें अज्ञान दूर केलें. तेव्हां दशरथास परमाल्हाद होऊन

त्यानें रामचंद्राला सभास्थानीं पाचारिलें. त्यावेळीं तीर्थाटनामुळें श्री रामचंद्राच्या ठायीं परमावधीची वैराग्यवृत्ति बाणून गेली होती. देहसौभाग्य, राज्यभोग, मित्र, बंधु कांहींहि नको, तरुणयुवतींचा भोग नको, कारण भोग तितका क्षयरोग अशी त्यांची बुद्धि झाली होती. तसेंच देहाचा, इंद्रियांचा, व हांवेरपणा करणाऱ्या मनाचा अतिशय तिटकारा त्यांस आला होता. असें तीव्र वैराग्य श्री रामचंद्राच्या ठिकाणीं तीर्थाटनामुळें बाणलें होतें.

इतश्चेतश्च सुव्यग्रं व्यर्थमेवाभिधावति ॥
दूराद्दूरतरं दीनं ग्राम कौलेयको यथा ॥ १

--योगवासिष्ठ

भलभलत्या पदार्थावर उडी घालावी, एकादा विषय प्राप्त झाला तरी आणखी त्याची आस धरावी, अप्राप्य वस्तूची इच्छा धरावी, एवढेंच नव्हे, तर पृथ्वीवर अविद्यमान् जे पदार्थ त्यांची सुद्धां इच्छा धरावी, इंद्रपद मिळालें तरी समाधान नाहीं. अशा प्रकारच्या कुत्र्यासारख्या ओढाळ मनाला कंटाळून श्री रामचंद्र अगदीं कासावीस होऊन गेलेले होते, व आपल्यास सद्गुरु भेटून प्राप्त झालेली तळमळ जावी अशी त्यांची वृत्ति झाली होती. अशा वेळीं श्रीमद् वसिष्ठऋषींनीं श्री रामचंद्राला आर्यधर्मतत्त्वांचा उपदेश केला व त्याच्या मनाची व्यग्रता दूर केली, हाच विशिष्ट प्रसंग योगवासिष्ठास कारण होय.

जगांतील कांहींएक पदार्थ न आवडून साधुचरणीं आसक्ति होणें हींच शुद्धमति आणि हीच ज्ञानाची पहिली पायरी आहे. शिष्याला जरी वैराग्य प्राप्त झालें, तरी त्यानें गुरूची प्रार्थना केल्याशिवाय तो उपदेशास

पात्र होत नाहीं. शिष्य आतुर होऊन गुरूला शरण न येतां प्रश्न करील तर त्याला उपदेश करणें गुरूला दूषणावह आहे, असें वसिष्ठानीं जाणविल्यावरून श्री रामचंद्रानें उठून वसिष्ठाचे पाय धरिले व माझा उद्धार करा अशी प्रार्थना केल्यावर वसिष्ठानीं रामचंद्रास सन्मुख बसवून वैराग्यपूर्वक जें ज्ञान-विज्ञान तें तुला सांगतों व त्याच्या श्रवणानें तूं पूर्णब्रह्माचा अनुभव घेशील, अशी प्रतिज्ञा करून उपदेश सुरू केला. हा उपदेश दहा प्रकरणांनीं केला आहे:—

१. वैराग्य, २. जगन्मिथ्यात्व, ३. मनोलय, ४. वासनोपशम, ५. आत्ममनन, ६. शुद्धनिरूपण, ७. आत्मार्चन, ८. आत्मनिरूपण, ९. जीवन्मुक्ति, १०. निर्वाण.

प्रथम वेदान्तशास्त्राचे अधिकारी कोण हें वसिष्ठानीं सांगितलें.

अहं बद्धो विमुक्तः स्यामिति यस्यास्ति निश्चयः ॥
नात्यंतमज्ञो नोतज्ज्ञः सोऽस्मिन्शास्त्रेऽधिकारवान् ॥ १

—योगवासिष्ठ

म्हणजे मी संसारबद्ध झालें आहें. ह्यांतून माझी मुक्तता व्हावी असा ज्याचा निश्चय झाला आहे, तोच या शास्त्राचा **अधिकारी** होतो. परंतु तो अत्यंत अज्ञानी किंवा अत्यंत तज्ज्ञ नसावा. अत्यंत अज्ञानी म्हणजे, जो असें समजतो कीं, मी देहरूपी आहें व देहाशिवाय दुसरें कांहीं नाहीं. तसेंच " अहं ' हा शब्द केवळ आपल्या देहालाच जो लावितो; मी कोण, आलों कोठून हें ज्याला कळत नाहीं; जो केवळ शिस्नोदरपरायण आणि प्रपंचामध्यें मात्र अत्यंत दक्ष, त्याला **अत्यंत अज्ञानी**

म्हणावयाचें. तो वेदान्तशास्त्राचा अधिकारी होत नाहीं. त्याप्रमाणेंच **अत्यंत तज्ज्ञ** म्हणजे ज्याला अपरोक्षज्ञान झालें आहे. जो ब्रह्मानंदांत डुलत असतो, आणि ज्याला ब्रह्माशिवाय कांहीं दिसत नाहीं तो. असाहि पुरुष ह्या शास्त्रास अर्थात् **अनधिकारी** होतो. उघडच आहे कीं, जो यथेच्छ भोजन करून बसला आहे त्याला आणखी जेवा म्हणून सांगण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तेव्हां जो अत्यंत अज्ञानी नव्हे, आणि अत्यंत तज्ज्ञहि नव्हे, तर जो केवळ मध्यस्थ, तो वेदान्तशास्त्राचा **पूर्णाधिकारी** होय. तसेंच, ह्या शास्त्राचे अधिकारी होण्यास साधनचतुष्टयसंपन्नता पाहिजे. हें साधनचतुष्टय म्हणजे ( १ ) नित्यानित्यवस्तुविवेक, ( २ ) इहामुत्रफलभोगविरक्ति ( ३ ) शमदमादि षट्क, आणि ( ४ ) मुमुक्षता.

साधनचतुष्टयापैकीं पहिलें साधन नित्यानित्यवस्तुविवेक हें होय. जगांत नित्य वस्तु कोणत्या आणि अनित्य कोणत्या ह्याचा विचार फार सूक्ष्मत्वानें आपले मनाशीं करून नित्य वस्तु म्हणजे आत्मस्वरूप होय, त्याशिवाय सर्व वस्तु अनित्य अर्थात् नाशवंत आहेत, देह आदिकरून सर्व प्रपंच हा नश्वर असून अनित्य आहे, अशी भावना होणें ह्याला **नित्यानित्यवस्तुविवेक** म्हणावयाचें. हा विवेक ज्याचे ठायीं जागृत होतो, तोच वेदान्तशास्त्राचा अधिकारी होय. आतां दुसरें साधन **इहामुत्रफलभोगविरक्ति** ह्याचें लक्षण:—

ब्रह्मलोकतृणीकारो वैराग्यस्यावधिर्मतः । —**योगवासिष्ठ**

असें आहे. म्हणजे, इहलोकीं प्राप्त होणारे राज्यादि भोग लाभले, किंवा ब्रह्मलोक लाभला, तथापि तो तृण-

वत् मानणें हें वैराग्याचें श्रेष्ठ लक्षण आहे. तिसरें साधन **शमदमादिक षट्क.** तें षट्क म्हणजे १. शम, २. दम, ३. उपरति, ४. तितिक्षा, ५. समाधान आणि ६. श्रद्धा हें होय. त्यांचीं लक्षणें अशीं:—मन, बुद्धि, चित्त, अहंकार ह्यांला विषयांपासून आंवरून धरणें ह्याला अन्तरिंद्रियनिग्रह म्हणतात, तोच **शम** होय. दम म्हणजे बाह्येंद्रियवृत्तींचा निरोध करून त्या त्या इंद्रियांकरवीं स्वस्वव्यापारीं विमुखता करविणें ह्याला **दम** ही संज्ञा आहे. **उपरति** म्हणजे इंद्रियांचें दमन झालें असतां त्यांची विषयांकडे पुनरावृत्ति होऊं न देणें ही होय. एकदां इंद्रियनिरोध केला तथापि विषयांकडे पुनःपुनः धांव घेणें हा इंद्रियांचा स्वभाविक धर्म आहे. म्हणून नेहमीं त्यांची लगाम खेंचली पाहिजे, ती खेंचणें ह्यालाच उपरति असें म्हणावयाचें. आतां तितिक्षेची व्याख्या सांगावयाची. **तितिक्षा** म्हणजे सर्वदां द्वंद्वें सहन करण्याची शक्ति. हीं द्वंद्वें म्हणजे शीत—उष्ण, सुख—दुःख, राग—द्वेष, इत्यादि होत. स्नानसंध्यादि कर्में करीत असतां शीतोष्णापासून बाधा होते, पण ती बाधा झाली तरी बेहेत्तर, परंतु आपलें कर्माचरण यथासांग झालेंच पाहिजे, तसेंच प्रारब्धवेगानें व्यवहारांत उत्पन्न होणारीं सुखदुःखें आपल्याला भोगलींच पाहिजेत, तीं कोणालाहि चुकवून चुकत नाहींत. अशीं जी शीतोष्ण-सुखदुःखादि सहन करण्याची शक्ति, तिला तितिक्षा म्हणावयाचें. पांचवें साधन समाधान. तें **समाधान** म्हणजे सर्व विषयांत नेहमीं शांतवृत्ति असून महावाक्यश्रवणामध्यें अत्यंत आदरबुद्धि असणें हें होय. आतां सहावी श्रद्धा राहिली. ति-

ची व्याख्या अशी कीं, सद्गुरूचा उपदेश आणि सत्पुरुषांनीं केलेलें महावाक्याचें विवरण ह्यावर पूर्ण विश्वास असणें, त्याबद्दल संशयितबुद्धि कधींहि असावयाची नाहीं, ह्याचें नांव **श्रद्धा.** ह्याप्रमाणें शमदमादि षट्काचें निरूपण झालें. आतां साधनचतुष्टयापैकीं चौथें साधन मुमुक्षता त्याकडे आपण वळूं.

मुमुक्षता म्हणजे काय ? तर देह मी नव्हें, इंद्रियेंहि मी नव्हें एवढेंच सामान्यत्वें ज्याला समजतें, व प्रपंचांत अज्ञानामुळें मी बद्ध झालों आहें असें कळून ज्याच्या मनाला तळमळ लागते, त्याप्रमाणेंच आत्मसाक्षात्कार ज्याला झाला नाहीं, व तेणेंकरून होणाऱ्या परमानंदाचा अनुभवहि ज्यानें घेतला नाहीं, तर केवळ विषयांचा कंटाळा उत्पन्न झाल्यामुळेंच त्याच्याकडे ज्याची प्रवृत्ति होत नाहीं, जो अनादि आज्ञानामुळें भ्रमून गेला असून आपली सुटका व्हावी म्हणून मी सद्गुरूला अनन्यभावें शरण जाईन अशी ज्याच्या मनाला तळमळ लागून गेली आहे, तो **मुमुक्षु** होय, आणि त्याच्या त्या स्थितिला **मुमुक्षुता** असें म्हणावयाचें. ह्याप्रमाणें जो पुरुष साधनचतुष्टयसंपन्न, विषयवैराग्ययुक्त, आणि साधुवचनलोलुप झाला आहे, तोच वेदान्तशास्त्राचा खरा अधिकारी होय. इतरांना तो अधिकार प्राप्त होत नाहीं.

ह्या सर्व गोष्टी घडण्यास ईश्वरानुग्रह व्हावा लागतो. तो झाल्याशिवाय अंगीं वैराग्य बाणणें व साधूंचे ठायीं भक्ति बसणें हीं कधीं होणार नाहींत. ईश्वरानुग्रह झाल्याचें लक्षण हेंच कीं, वर्णाश्रमधर्मनियामक जीं जीं नित्यनैमित्तिक कर्में तीं तीं यथासांग उत्तम रीतीनें करून

ईश्वरार्पण करावीं अशी बुद्धि मनुष्याला होते, अशा भावनेनें नित्यनैमित्तिक कर्में केलीं असतां पापाचा क्षय होऊन अंतःकरण शुद्ध होतें व ईश्वराविषयीं अत्यंत भक्ति उपजते. ईश्वर अनन्यभक्तीच्या योगानें संतुष्ट होतो. आणि तो संतुष्ट झाला म्हणजे भक्तांवर अनुग्रह होतो व तेणेंकरून देहाचे ठायीं तीव्र वैराग्य उत्पन्न होतें. तें उत्पन्न झालें म्हणजे साधूंची संगति व सेवा करावी अशी बुद्धि होऊन शमदमाची प्राप्ति होते, विमल भक्ति उत्पन्न होते, व अंतःकरणांत दयेचा पाझर सुटतो.—अशा रीतीनें वेदान्तशास्त्राची जुळणी आहे. चित्तशुद्धीचें तत्त्व वेदान्तशास्त्राप्रमाणें कोणत्याहि धर्मपंथांत विशिष्ट रीतीनें प्रतिपादन केलेलें नसतें, म्हणूनच वेदान्तशास्त्राला महती प्राप्त झालेली आहे.

यावन्नानुग्रहः साक्षाज्जायते परमेश्वरात् ॥
तावन्न सद्गुरुः कश्चित् सच्छास्त्रं वापि नो लभेत् ॥ १

—योगवासिष्ठ

या वचनाप्रमाणें जोंपर्यंत ईश्वराचा साक्षात् अनुग्रह झाला नाहीं, तोंपर्यंत सद्गुरुप्राप्तीची गोडी कल्पांतींहि उपजत नाहीं. वरील वचनांत ‘ साक्षात् ’ पद घातलें आहे त्यांत पुष्कळ अर्थ आहे. संपत्ति व संतति पुष्कळ असली व इतर सुखोपभोगाचीं यथेच्छ साधनें असलीं, म्हणजे अशा मनुष्यावर ईश्वरानुग्रह झाला आहे असें प्राकृत लोक समजतात, पण वेदान्तदृष्टया ही समजूत खोटी आहे. हा अनुग्रह केवळ सामान्य व हलक्या प्रतीचा होय. ज्या अनुग्रहानें सद्गुरूचा लाभ होतो, तोच साक्षात् ईश्वरानुग्रह होय. त्याच्याशिवाय सद्गुरूचें दर्शन

होत नाहीं, झालें तरी तेवढ्यानें पूर्ण भावार्थ उत्पन्न हो-ऊन सद्गुरु प्रसन्न होत नाहींत, प्रसन्न झालेच तर त्यांस प्रश्न करून अंतःकरणाची तळमळ काढून टाकण्या-सारखें ज्ञान त्यांजकडून प्राप्त करून घेतां येत नाहीं व अंतःकरणाची तळमळ कायम राहते. मुख्य शास्त्र म्हणजे 'तत्त्वमसि' हें महावाक्य होय. तें सद्गुरुमुखांतून श्रवण केल्यानें जगताविषयीं आपल्या ज्या अज्ञानमूलक कल्पना असतात, त्या नष्ट होतात. महावाक्य हें सूत्र-स्थानीं असून, सकल वेदान्त वृत्तिस्थानीं म्हणजे त्याच्या टीकास्थानीं आहे. म्हणून महावाक्याचें श्रवण ई-श्वरानुग्रहाशिवाय कधींहि घडत नाहीं.

शून्यं संपूर्णतामेति मृत्युरप्यमृतायते ॥
आपत्संपदि-वा-भाति विद्वज्जनसमागमात् ॥ १

—योगवासिष्ठ

आत्मज्ञान मनुष्याला नाहीं म्हणजे कांहीं नाहीं. आ-त्मज्ञानाशिवाय दाही दिशा ओस भासतात. देह, बुद्धि, अंतःकरण हीं रितीं होतात. देश, ग्राम, चंद्र, सूर्य आणि सर्व विश्व हीं अनात्मत्वामुळें शून्य दिसतात. तीर्थ, क्षेत्र, देवता, कर्माचरण ह्यांत कांहींएक अर्थ दिसत नाहीं, पण सत्समागम झाला, म्हणजे हें सर्व पारडें फिरून जातें. पूर्वी जें शून्याकार वाटत होतें, तें क्षणांत परिपूर्ण आहे असें वाटून 'खल्विदं ब्रह्म' ही भावना होऊन जाते; म्हणजे सर्वत्र आत्मा भरलेला आहे असा प्राण्याला अनुभव येतो. साधुसमागमानें हरवलेला आत्मा जाग्यावर आला म्हणजे अर्थात् ज्ञानप्रभाव होऊन बुद्धि, इंद्रियें इत्यादिकांस ब्रह्माशिवाय कांहींच भासत नाहीं. आणि

अशा स्थितींत मृत्यु प्राप्त झाला तरी ती मोक्षप्राप्ति वाटते. तात्पर्य, सत्समागमानें परम वैराग्य व ज्ञान उत्पन्न होऊन प्राण्याला सत्कर्मानुष्ठान घडतें; फार तर काय, अष्टांगसाधनसंपत्ति साधुसमागमानेंच प्राप्त होते. ह्या अष्टांगयोगसाधनाचें निरूपण मागाहून व्हावयाचेंच आहे, म्हणून एथें त्याचें जास्त विवरण करीत नाहीं.

तद्ज्ञानं स च शास्त्रार्थस्तद्विज्ञानमखंडितम् ॥
सच्छिष्याय विरक्ताय साधोर्यदुपदिश्यते ॥ १

—**योगवासिष्ठ**

सच्छिष्य व वैराग्यसंपन्न अशा अधिकारी शिष्याला उपदिष्ट जें ज्ञान तेंच खरें ज्ञान, तोच खरा शास्त्रार्थ, आणि तेंच अखंडित विज्ञान म्हणजे सानुभवज्ञान होय. वरील ' सच्छिष्य ' पदाचें मर्म ध्यानांत येण्यासाठीं त्याचा जास्त स्पष्टार्थ झाला पाहिजे. तो असा कीं—जो शिष्य जारणमारणादि निषिद्ध कर्में टाकितो, काम्यकर्में म्हणजे सहेतुक कर्में वर्ज करितो, नित्यनैमित्तिक कर्में अहेतुकबुद्धीनें करून तीं ईश्वरार्पण करितो, आणि इहींकरून ज्याचें अंतःकरण शुद्ध आरशासारखें झालें आहे, त्याला वेदान्तदृष्टचा **सच्छिष्य** म्हणावयाचें. कारण निष्कामकर्म करणें हेंच वासनेचा समूळ उत्सर्ग करणारें असून तें कर्म ईश्वरार्पण करणें म्हणजे चित्तशुद्धीला आमंत्रण देणें आहे. तेव्हां अशा प्रकारें चित्त शुद्ध होऊन ज्याचें बोलणें, चालणें, पाहणें सर्व कांहीं प्रांजल, ज्याचे ठायीं कल्पांतींहि कौटिल्य आढळत नाहीं, आणि ज्याचीं इंद्रियें सरळ वर्ततात, तो सच्छिष्य समजावयाचा. सच्छिष्याची साम्यता पाण्याचे स्वभावाशीं होते. पाण्याच्या ओ-

घाला जिकडे जसें व जेथपर्यंत न्यावें, तेथपर्यंत तो जातो. त्याच्यांत आग्रहबुद्धि नसते. त्याप्रमाणेंच ज्याच्यामध्यें आग्रहबुद्धि वसत नाहीं तो सच्छिष्य. तसेंच ज्याचे अंतःकरणांत सर्वदा शुभेच्छा वास करिते, व तदनुसार ज्याचे संकल्प असतात, त्याला सच्छिष्य म्हणावयाचें. तात्पर्य, ज्याचें मन व बुद्धि हीं अतिशुद्ध असतात, ज्याला शास्त्रश्रवणाची पूर्ण आवड, ज्याची ईश्वरावर सप्रेम भक्ति, पापवासना ज्याला उपजत नाहीं, ज्याला एकांतवासाची आवड, आणि जो मनानें उदार, व ज्यानें सत्त्वबुद्धीचे अलंकार ल्याले आहेत, त्यालाच सच्छिष्य म्हणावयाचें. आणि तो वेदान्तशास्त्राचा खरा अधिकारी होतो.

वरील श्लोकांतील 'विरक्त' पदाचाहि स्पष्टार्थ करणें इष्ट आहे. ज्याला इंद्रियवर्ग व देहसंग आवडत नाहींत, तो पुरुष **विरक्त** होय. त्याला देहाचा कंटाळा येण्याचें कारण काय? तर हा देह नश्वर व कुत्सित असून तें अस्थींचें घर आहे, त्यांत मांस, मज्जा, रुधिर, पू, पंक, थोरथोर कृमि, मल, मूत्र हीं परिपूर्ण भरलेलीं आहेत. ह्यांपैकीं एकेक जर पुढें ठेविलें तर त्याचा अत्यंत तिटकारा येईल. मग ह्या संपूर्ण दुर्गंधींची खाणच जर अपल्या शरीरांत आहे, तर ती आपणास कंटाळवाणी कशी होणार नाहीं? देहाच्या कंटाळ्याचें दुसरें कारण तो षड्विकारी आहे हें होय. हे षड्विकार म्हणजे ( १ ) अस्ति, ( २ ) जायते, ( ३ ) विवर्धते, ( ४ ) विपरिणमते, ( ५ ) अपक्षीयते, आणि ( ६ ) विनश्यति हे होत. ह्या प्रत्येक विकाराचें दुःख वर्णन करूं लागल्यास तें किती

तरी असून त्या दुःखानें मन कंटाळून जाईल यांत संशय नाहीं. पहिला अस्ति विकार. मातेच्या ऋतुकालीं पित्याचा संयोग होऊन प्राणापान वायूच्या उसळीबरोबर गर्भकमलामध्यें अणुमात्र रेतस्खलन होऊन मातेच्या विटाळरक्ताशीं पितृरेत एकत्र झाल्यानंतर लिंगदेहमिश्रित स्थूलदेह बनतो हें **अस्ति** विकाराचें लक्षण होय. गर्भवासांत असतां प्राण्यास अतिदुःख होतें व नरकवासाहूनहि भयंकर अशा यातना तेथें भोगाव्या लागतात. तेथें त्याला कोणीहि सहाय नाहीं. तो तुरुंग फारच कठिण आहे. ह्या विकारांतून सुटून प्राणी अतिप्रयासानें योनिद्वारा बाहेर येऊन मूर्च्छागत पडतो, आणि बाहेर पडल्याबरोबर सोहंकार विसरून 'कोहं?' अशी ओरड मोठ्यानें करूं लागतो. त्या अवस्थेंत कांहीं केल्या सुख होत नाहीं, म्हणून त्या दुःखानें व नालछेदनाचे पीडेनें तो प्राणी चरफडत असतो. ह्या दुसऱ्या विकाराला **जायते** ही संज्ञा आहे. तिसरा विकार **विवर्धते** म्हणजे प्राण्याचा देह वाढीस लागतो तो. त्या अवस्थेंत चिरटोळीनें दूध घालितात परंतु तें पुरत नाहीं, म्हणून प्राणी तळमळतो. मग त्याला स्तनाची गोडी लावितात. ह्या अवस्थेंत प्राणी मलमूत्रांत अखंड लोळून त्याला दुर्गंधींत रहावें लागतें. **विपरिणमते** ह्या चवथ्या विकाराचें लक्षण असें कीं, या अवस्थेंत देहाचा विशेष परिणाम होतो व त्यास चार प्रकारच्या स्थिति प्राप्त होतात. त्या अशा:—

कौमारं पंचमाब्दान्ते पौगंडं दशमावधि ॥
कैशोरमापंचदशात् यौवनं तु ततः परं ॥ १

**—योगवासिष्ठ**

पांच वर्षांचें वय होई तोंपर्यंत कुमारावस्था, दहा वर्षेपर्यंत पौगंडावस्था, पंधरा वर्षेपर्यंत किशोरावस्था आणि तदनंतर यौवनावस्था. ह्या चार अवस्थांत प्राण्याला विशेष परिणाम प्राप्त होतो, म्हणून या विकारास विपरिणमते म्हणतात. आतां पांचवा विकार अपक्षीयते होय. ह्या अवस्थेंत प्राण्याला क्षुत्पिपासेची पीडा फार होऊन लोभाची वणवण पराकाष्ठेची सुटते. अंगाला सुरकुत्या पडून केंस शुभ्र होऊं लागतात. कोणीं म्हातारा म्हटलें तर लज्जा उत्पन्न होते. वय विचारिलें तर चोरून पन्नासाचें चाळीसच सांगतो ! आत्मविचारांत मन निमग्न होत नाहीं, आणि विषयवासना मात्र फार प्रबल होतात. तोंडाचें बोळकें होतें. शब्द स्पष्ट उमटत नाहीं, तरी विषयाची हांव रहात नाहीं. ह्या अवस्थेंत स्त्रीपुत्रादि पारखीं होतात. हातपाय लुले पडून देहसौंदर्य नष्ट होतें. रात्रभर खोकून खोकून पुरेवाट, व सर्व कुटुंबीयांस कंटाळा येऊन ‘ म्हातारा ’ एकदांचा मरत कां नाहीं ! वांचला आहे कशाला ? असें तोंडावर लोक म्हणतात. एवढेंच नव्हे, तर तो मरावा म्हणून नवस सुद्धां करितात ! ! अशी दुर्दशा झाली म्हणजे देवा कोठें गेलास ? मला मृत्यु कां आणीत नाहींस ? असें आपल्यापाशींच तो प्राणी बडबडून राहतो. इतकें झालें तरी पण स्त्रीपुत्रादिकांचा मोह सुटत नाहीं. नातू, सुना, गुरेंढोरें हवींच असतात. हाच तो **अपक्षीयते** विकार होय.

आतां विनश्यति हा जो सहावा विकार, त्याबद्दल लिहावयाचें. **विनश्यति** म्हणजे मरणप्राप्ति. तें मरण केवळ दुःखाचा डोंगरच आहे. प्राणी आपलें आपलें म्ह-

णून जितकें मानीत असतो, त्या सर्वांचा त्याला अखेरचा त्याग करून जावें लागतें, व शेवटीं चंद्री फिरते. लोक शेजारीं येऊन बसतात, त्यांच्या तोंडाकडे तो पहातो व बोलण्यासाठीं म्हणून तोंड उघडितो परंतु शब्द उमटत नाहीं. त्यामुळें प्राण्याला पराकाष्ठेच्या यातना होतात ! ह्याप्रमाणें षड्विकारांचें दुःख आहे. हें दुःख अंतःकरणांत नेहमीं वागविणें हेंच खरें वैराग्य होय, आणि असें वैराग्य ज्याच्याठायीं बाणतें, त्याचीच विषयासक्ति सुटून उदासवृत्ति होते.

अशा प्रकारचा जो वैराग्ययुक्त सच्छिष्य, तोच ज्ञानोपदेशास योग्य होय, त्याचीच भूमिका तयार झाली असें म्हणवयाचें, आणि ज्ञानोपदेश केला असतां त्यालाच यथार्थ फलप्राप्ति होते. उघडच आहे कीं, जमीन चांगली न करतां त्यांत जर बीजारोपण केलें, किंवा योग्यकालीं जर तें पेरलें नाहीं, तर त्यापासून कोटि प्रयत्नांनींहि फल होत नाहीं. तसाच प्रकार ज्ञानोपदेशाचाहि आहे. गुरुमुखांतून निघणारें शाब्दिकज्ञानरूपी जें बीज, तें वैराग्य व श्रद्धा या कसणुकीनें बनविलेल्या सच्छिष्यरूपी सत्क्षेत्रांत जर पेरिलें, तरच त्यापासून अपरिमित फलें प्राप्त होतील. परंतु तेंच उत्कृष्ट बीज खडकाळ जमिनींत पेरिलें, तर फळ न येतां बीज सुद्धां वायां जाईल. ह्यावरून मथितार्थ हाच घ्यावयाचा कीं, असच्छिष्याला जें ज्ञान दिलें तें ज्ञानच नव्हे. सच्छिष्यरूपी वृक्ष जरी बनला आणि त्याला शास्त्रजलानें सिंचित केला, तथापि वैराग्यऋतूच्या बहारानें तो वृक्ष जर डवरला नाहीं, तर त्याला बोधरूप फल कधींहि येणार

नाहीं. वैराग्यवंत जो सच्छिष्य आहे, त्यालाच ज्ञानोपदेश केला तर तो ठसून त्याचा फलितार्थ होतो. हें वैराग्य अखंड असलें पाहिजे. दुःखकालीं सर्वांलाच वैराग्य होतें, परंतु सुखाचे दिवस आले, म्हणजे मनुष्य लागलाच विषयासक्त होतो. असलें घरसोडीचें वैराग्य उपयोगी नाहीं. ज्या वैराग्याला कोणत्याहि अवस्थेंत भंग होत नाहीं, आणि जें घालविलें तरी न जातां पाठीस लागतें, तेंच अखंड वैराग्य होय. पतिव्रता स्त्री ज्याप्रमाणें परपुरुषाचे ठायीं सर्वदा विमुख असते, त्याप्रमाणेंच अखंडवैराग्ययुक्त शिष्य विषयविमुख होतो. उघडच आहे कीं, विषानें रांधिलेलीं षड्रसान्नें जेवणारा जेवील कसा? पायां पडून तें अन्न ग्रहण करण्यासाठीं कोणी प्रार्थना करूं लागला, तरी तें अन्न तो दूर लोटूनच देईल. तद्वत् सर्व विषयोपभोगाचा परिणाम दुःखमय आहे, हें समजून शिष्याच्या मनाला त्याविषयीं चिळस उत्पन्न होते. असो.

शिष्याला शास्त्रव्युत्पत्ति झाली व गुरूपदेश झाला, तथापि

ज्ञप्तेस्तु कारणं शुद्धा शिष्यप्रज्ञैव केवला ॥

—योगवासिष्ठ

ह्या वचनाप्रमाणें शिष्यास खरा बोध होण्यास त्याची शुद्धबुद्धि असणें अवश्य आहे. ज्या पुरुषाची वेदान्तदृष्टचा शुद्धमति झाली आहे, त्याला तुम्ही व्यवहारमार्गाकडे कितीहि ओढा; तो उदासच रहावयाचा, आणि सच्छास्त्रश्रवणाचा वगैरे जो जो प्रसंग येईल तो तो प्रसंग कधींहि तो टळूं देणार नाहीं. ही सत्कर्मबुद्धि पूर्वसंस्कारामुळेंच उत्पन्न होते, आणि ह्या सद्बुद्धीला मनुष्य आपला आपणच कारण होतो, हें—

आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥
बंधुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः ॥ १

ह्या सामान्य गीतावाक्यावरून स्पष्टच आहे. जो आपला आत्मा आपणच जिंकितो, त्याचा आत्मा त्याचा बंधु होतो, आणि ज्याच्यानें आपला आत्मा जिंकला जात नाहीं, त्याचा आत्मा त्याचाच शत्रु होतो. ह्या रीतीनें शिष्याची शुद्धमति झाली म्हणजे त्याला साधनचतुष्टय-संपत्ति आपोआप प्राप्त होऊन गुरुबोधानें त्याला आत्मसाक्षात्कार तत्काळ होतो. ह्यावर सहजच अशी आशंका उत्पन्न होते कीं, जर शास्त्रव्युत्पत्तीच्या अंतरंग साधनानें बोध होतो व सद्गुरुदर्शनानें स्वस्वरूप प्राप्त होतें, तर आत्मप्राप्तीस शिष्याची केवळ शुद्धबुद्धि पाहिजे हें म्हणणें कसें? बाह्यसाधनांशिवाय आत्मा अगदींच अप्रकाशित आहे कीं काय? ह्या शंकेचें समाधान असें आहे कीं,—आत्मा स्वयंप्रकाश आहे ही गोष्ट निर्विवाद आहे, तथापि शुद्धबुद्धि अवश्य पाहिजे. उदाहरणानें ही गोष्ट आपण व्यक्त करूं. आवाजाच्या दारूचा अग्निस्पर्शानें बार उडतो, परंतु ती दारू जर तीक्ष्ण नसेल तर काय उपयोग होणार? हें जसें, तसेंच शुद्धबुद्धि व गुरुवाक्य यांचें आहे. दारूच्या ठिकाणीं शुद्धबुद्धि समजावयाची, आणि अग्नीच्या ठिकाणीं गुरुवाक्य समजावयाचें. बुद्धि जर शुद्ध नसेल, तर तेथें गुरुवाक्य काय करणार? शिष्यप्रज्ञा शुद्ध नसेल, तर अज्ञानाचा व संशयाचा नाश होणार नाहीं. शुद्धबुद्धीनें क्षणार्धांत आत्मस्वरूपाची प्राप्ति होते.

ह्या आत्मज्ञानाचें सामर्थ्य फारच थोर असून तें ए-

कवार प्राप्त झालें असतां अभंग होतें, म्हणजे तें कधीं नाश पावत नाहीं. तशी स्थिति इतर शास्त्रांची नाहीं. सर्व बहिःकला म्हणजे अनात्मविद्या अनभ्यासानें नष्ट होतात. परंत ही आत्मविद्या प्राप्त झाल्यावर ती दिवसें-दिवस अभिवृद्धिच पावते, हें

सर्वा बहिःकला जंतोरनभ्यासेन नश्यति ॥
इयं ज्ञानकला राम सकृज्जाताभिवर्तते ॥ १

—योगवासिष्ठ

ह्या वचनावरून स्पष्ट होतें. वेदशास्त्र, स्तोत्रें इत्यादिकांचा पुष्कळ अभ्यास केला, आणि त्यांचा जर अभ्यास सुटला, तर त्या सर्वांवर पाणी पडतें. तसें आत्मविद्येचें नाहीं.

आत्मा स्वयंप्रकाश जरी आहे, तथापि सद्गुरुवचना-शिवाय त्याचा प्रकाश होत नाहीं. दहा प्रवासी नदी उतरून पैलतीरीं गेल्यावर सर्वजण आले किंवा नाहीं हें पाहण्यासाठीं मोजूं लागले. मोजणार आपणास सोडून बाकीचे नऊ मोजी आणि दहाव्याचा कांहीं थांग लागेना म्हणून तो प्रवाहांत गेला ह्या समजुतीनें प्रत्येक प्रवासी काळजी करूं लागला. इतक्यांत अवचित तेथें एक पांथस्थ आला. त्याला हें समजतांच त्यानें सर्वांला उभे करून नऊ असामी मोजून दाखविले आणि ' दशमस्त्वमसि ' म्हणजे दहावा तूंच आहेस, असें प्रत्येकाच्या प्रत्ययास आणून दिलें. जो तो आपणास मोजण्यास चुकतो अशी त्यांची त्यानें समजूत घालून दिली .तेव्हां त्यांचें अज्ञान व काळजी जाऊन ते पुढील रस्त्यास लागले. ह्या गोष्टीप्रमाणेंच आत्मज्ञानाची स्थिति आहे. गुरुकृपेशिवाय आत्मज्ञानाची खूणगांठ पटत नाहीं. प्रत्येक मनुष्य ' सोऽहं '

ही भावना विसरून जाऊन शोकनिमग्न होतो. तो शोक अज्ञानामुळेंच होत असतो. तें अज्ञान दूर झालें म्हणजे आपली आपल्याशीं भेट होते. ह्याला पुष्कळ व्यावहारिक उदाहरणें आहेत. आपले गळ्यांत नथ असतां भ्रम होऊन ती सांडली असें समजून बायका घाबऱ्या होऊन शोधूं लागतात, किंवा लेखणी कानावर असून देखील कारकून लोक ती भ्रमानें दुसरीकडे शोधूं लागतात. परंतु मग ती सांपडली म्हणजे त्यांला परमानंद होतो. ह्याप्रमाणेंच अज्ञानभ्रम नाहींसा झाला म्हणजे स्वस्वरूपप्राप्ति होते.

हें वैराग्य प्रकरण म्हणजे वैदिकधर्मतत्त्वाचा पायाच होय. ह्यासंबंधानें केलेल्या निरूपणाचा तात्पर्यार्थ हाच आहे कीं, आत्मज्ञान होण्यास पूर्णवैराग्याशिवाय दुसरें साधन नाहीं. वैराग्याशिवाय इंद्रियें अंतर्मुख होत नाहींत, विवेकज्ञान उपजत नाहीं, व ईश्वरविषयकभक्तिहि उत्पन्न होत नाहीं. खरें वैराग्य झालें म्हणजे शांतिसुखादि सर्व प्राप्त होतात. अन्य कोणत्याहि साधनांनीं स्वस्वरूपप्राप्ति होत नाहीं.

न कर्मणा न प्रजया धनेन । त्यागेनैकेन अमृतत्वमानशुः ।

—**नारायणोपनिषद्**

अमृतत्व म्हणजे मोक्ष, याची प्राप्ती कर्में करून किंवा पुत्रलाभ झाल्यानें किंवा धनसंपन्नतेनें होत नाहीं, तर केवळ विषयत्यागानेंच मोक्षप्राप्ति होते, हा वेदान्तशास्त्राचा सिद्धान्त होय. पुत्रलाभानें फार तर स्वर्गप्राप्ति होईल; मोक्ष मिळणार नाहीं. कारण तो अज्ञाननिवृत्तीशिवाय सर्वथा अप्राप्त होय. ज्ञानोत्पत्तीचा मुख्य मार्ग त्या-

ग, आणि ब्राह्मप्राप्तीचा उपाय वैराग्य हा एकच होय. परमार्थप्राप्ति म्हणजे दारची भाजी नव्हे. तो मार्ग फारच त्रिकट आहे. वर सांगितलेलें पूर्व सुकृत, चित्तशुद्धि इत्यादि अनेक संस्कार त्याला लागतात.

आधुनिक काळीं उदयास आलेल्या धर्मपंथाकडे आपण पाहिलें, तर धर्माची केवळ थट्टा होऊन गेली आहे असें आढळतें. जो तो एकदम ईश्वरप्राप्तीची अपेक्षा करितो. घरांतून उठून मंदिरांत, मशिदींत, अग्यारींत, किंवा चर्चमध्यें जाऊन बसलें म्हणजे भक्ति, ज्ञान, वैराग्य ह्या सर्व परमार्थसाधनांचा ठेवा हातीं आला, असें ज्याला त्याला वाटूं लागतें. आणि वेदप्रतिपाद्यमार्ग म्हणजे उगाच कांहीं तरी थोतांड माजविलेलें आहे असें आधुनिक विद्वान् लोक म्हणतात, परंतु ही चुकी आहे. आर्यांच्या शास्त्रांप्रमाणें पाहतां असें आढळतें कीं, मनुष्याला विषयांचा आणि शरीराचा जसजसा तिटकारा येत जातो, तसतसे त्याला आत्मप्राप्तीचे खरे मार्ग दिसूं लागतात. शरीराचे सोस जितके जितके वाढवावे, तितके तितके ते आत्मज्ञानास विघातक होतात. शरीर आणि आत्मा यांचे धर्म परस्परविरुद्ध आहेत. प्लेटो ह्या प्राचीन ग्रीक तत्त्ववेत्त्यानें असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, "आत्मा हा सर्वदा शरीरांतून बाहेर पडण्याचा प्रयत्न करीत असतो. कारण त्याला शरीर हें तुरुंगाप्रमाणें वाटतें. शरीराची पुष्टि करणें व त्याचा हव्यास वाढविणें ह्यांनीं त्या तुरुंगांतील बंधनें मात्र अधिक घट्ट होतात." हें प्लेटोचें तत्त्व आर्यधर्मशास्त्रास अनुसरूनच आहे. शरीराची प्रतिष्ठा चालूं द्यावयाची नाहीं. शीतोष्णादि द्वंद्वांचा मारा

सहन करावयाचा, आणि तपश्चर्या करून आत्म्याची पुष्टि करावयाची ! तो पुष्ट होत गेला म्हणजे त्याची स्वप्रकाशता आपाप नजरेस येते. इतक्या सर्व गोष्टी होण्यास वैराग्य हाच पाया आहे आणि म्हणूनच वैराग्याला योगवासिष्ठांत आदिस्थान दिलेलें आहे. आधुनिक धर्मपंथांचा उद्देव करणाऱ्या मंडळींनें मुक्ति सवंग करून सोडिली आहे. रेलवेचें टिकीट काढिलें म्हणजे ती जशी एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं अचूक नेऊन पोहोंचविते, त्याप्रमाणें धर्मांतरसंस्काराच्या वेळचा जलसिंचनविधि झाला म्हणजे मुक्तीचा ठेवा हातीं येतो, असें रस्त्यावर भजन करणारी मंडळी सांगते, परंतु ती केवळ बकवा होय. मुक्ति अशी वाटेवर लागलेली नाही. तिचा लाभ व्हावयाचा म्हणजे आर्यधर्मतत्त्वाप्रमाणें विषयत्याग करून देहमाया नष्ट होणें व सुखदु:खादि द्वंद्वें सहन करण्याची शक्ति अंगीं येणें इत्यादि अनेक दिव्यें करावीं लागतात. तीं सहन केल्याशिवाय मुक्तीची अपेक्षा करणें व्यर्थ होय.

# प्रकरण सातवें

## जगन्मिथ्यात्व

रज्जुज्ञानेन सर्पत्व चित्तसर्पस्य नश्यति ॥
यथा तथैव संसारः स्थित एवोपशाम्यति ॥ १

—योगवासिष्ठ

वैराग्यनिरूपणानंतर जगन्मिथ्यात्व ह्या प्रकरणाचा

विचार योगवासिष्ठांत केलेला आहे. वैराग्य आणि जगन्मिथ्यात्व यांचा अति निकट संबंध आहे. जग असत्य आहे अशी एकदां खात्री झाली, म्हणजे वैराग्य दृढ होतें. वैराग्याशिवाय ज्ञानोत्पत्ति होत नाहीं आणि त्या आत्मज्ञानाशिवाय मनुष्याचें जिणें अगदीं व्यर्थ होय. चांडालगृहीं भिक्षा मागून उदरनिर्वाह करणें देखील उत्तम; परंतु आत्मज्ञान नसल्यामुळें प्राप्त होणाऱ्या मौर्ख्यांत राहणें अतिनीचतेचें आहे असें श्रेष्ठांनीं मानिलें आहे. हें जग मिथ्या आहे हा सिद्धांत मनामध्यें पूर्णपणें ठसणें फार बिकट आहे, कारण ह्या विषयाचें विवेचन करूं लागलें म्हणजे त्यांत अनेक शास्त्रांचा व दर्शनांचा संबंध येतो, व तितक्यांची माहिती झाली पाहिजे. कोणत्याहि एका शास्त्राच्या प्रमेयांची माहिती करून घेणें सोपें आहे, परंतु ज्या विषयांत अनेक शास्त्रांच्या तत्त्वांची गरज लागते, तो विषय अर्थात् सामान्य मनुष्याच्या आटोक्याच्या बाहेर असतो. हा वेदान्तविषय तर फारच गूढ आहे. त्याचें विवेचन करण्यास प्राचीन न्याय, मीमांसा इत्यादि दर्शनांत जे प्रौढ युक्तिवाद सांगितले आहेत ते युक्तिवाद समजून घेणें अगदीं अवश्य आहे. प्रसिद्ध लॉर्ड बेकनच्या "Advancement of Learning" ( विद्येचा उत्कर्ष ) ह्या लोकमान्य ग्रंथाचें परिशीलन ज्यांनीं केलें आहे, त्यांस अशा प्रकारच्या विषयाची माहिती असेलच.

ह्या जगताच्या म्हणजे प्रपंचाच्या उत्पत्तीस आणि संहारास केवळ आपलें मन कारण होय, हा वेदान्तशास्त्राचा सिद्धान्त आहे. मनाची शांति झाली असतां सं-

सारभ्रम नष्ट होतो व मनाचा उदय झाला असतां जगताचा उदय होतो. याला उत्कृष्ट दृष्टान्त हा आहे कीं, आपण बिछान्यावर निद्रिस्त असतों, तेथून हालत नाहीं किंवा कोणत्याहि अवयवांनीं कोणताहि व्यापार करीत नाहीं; तथापि मनाच्या चांचल्यामुळें नाना तऱ्हेचे पदार्थ स्वप्नांत दृष्टीस पडतात. डोळे झांकले तरीहि हत्ती, घोडे नजरेस पडतात व हस्तपादादि स्तब्ध असतां स्वप्नसृष्टींत आपण हवे तिकडे जातों येतों, व देणें घेणें करितों; परंतु जागे होतांच तें सर्व नष्ट होतें. तद्वत् ह्या संसाराची स्थिति आहे.

चित्तोन्मेषनिमेषाभ्यां संसारस्योदयक्षयौ ॥
वासनाप्राणसंरोधादनिमेषं मनः कुरु ॥ १

—योगवासिष्ठ

मनाचा उदय आणि मनाचा अस्त इहींकरून संसाराचा उदय आणि अस्त होतात, ह्यास्तव वासना आणि प्राण ह्यांचें आकर्षण करून मनाचा अस्त करण्याविषयीं प्रत्येकानें अवश्य यत्न करावा. मन प्रपंचाविषयीं जितकें जितकें उन्मुख होईल, तितका तितका संसाराचा उदय होतो, आणि स्वस्वरूपाचें विस्मरण होत जातें. तसेंच, मन प्रपंचाविषयीं जसजसें विन्मुख होत जाईल, तसतसा प्रपंच मिथ्या वाटून स्वस्वरूपाची ओळख होईल. तेव्हां ही मनाची अनिमेषता प्राप्त होण्यास प्राण आणि वासना यांचा संरोध करणें हाच मुख्य उपाय श्री वसिष्ठानीं सांगितला आहे. प्राण आणि वासना यांच्या संयोगानें मन सैरावैरा धांवूं लागतें. म्हणून प्राण निश्चल झाला पाहिजे. तसें झालें म्हणजे संकल्पजाल नाहींसें होतें. प्राण आंव-

रून धरून जरी मन निश्चल झालें, तथापि वासना अकस्मात् प्रबल होऊन त्यानें चित्त फिरून चंचल होतें. कारण त्या वासनेचें स्वरूपच फार विलक्षण आहे. **वासना** म्हणजे पूर्वकर्माच्या संस्कारानें अनेक पदार्थांची मनांत स्फूर्ति होते, ती होय. मन निश्चल असतांहि घटपटादि पदार्थ मनांत येऊं लागतात व तोच संस्कार वासनारूपानें पुनः उठतो, अथवा देहामध्यें क्रोध, लोभ इत्यादि मनोविकार प्रबळ होऊन मन चेष्टा पावतें व तें पदार्थाकार बनून जातें. तसेंच प्राणिमात्रानें एकवेळच कां होईना, जें जें पाहिलें असेल, ऐकिलें असेल किंवा अनुभविलेलें असेल, तें तें त्या संस्कारामुळें स्मरलें जातें व वासनारूपानें अंतःकरणांत दृढ राहूं शकतें. म्हणून जर मन निश्चल करणें असेल तर, प्राण व वासना यांचा निरोध करणें ह्याशिवाय दुसरे सर्व उपाय व्यर्थ आहेत. स्वस्वरूपाचें विस्मरण होऊं लागलें म्हणजे अंतःकरण बहिर्मुख होतें व चित्तवृत्तींत विकल्प उत्पन्न होऊन संसारव्यथा उपजूं लागते. एकक्षणमात्र जर आत्मस्वरूपाचें विस्मरण झालें, तर मोठाले अनर्थ होतात असें वेदान्तशास्त्राचें म्हणणें आहे. त्यांतील मुख्यार्थ हाच कीं,—प्रपंच हा सत्य भासूं लागतो. परंतु सम्यक् विचार करूं लागलें म्हणजे तोच प्रपंच भस्म पावतो. दोरीच्या ठिकाणीं आपणास सर्पाचा भ्रम होतो. परंतु त्याच रज्जूचें खरें ज्ञान झालें म्हणजे सर्पभ्रान्ति दूर होते. दुसरें उत्कृष्ट उदाहरण बागुलबोवाचें आहे. लहान मुलाला बागुलबुवा दाखविला म्हणजे तो भयचकित होऊन त्याची त्रेधा उडून जाते. तो बागुलबुवा वास्तविक खरा नसतो

तथापि त्या लहान मुलास त्याबद्दल जोंपर्यंत अज्ञान असतें, तोंपर्यंत त्याला त्याची मोठी भीतिच असते. बागुलबुवा काय आहे ह्याचें त्याला ज्ञान झालें कीं लगेच भीति संपली. हें जसें, तसेंच संसारबागुलाचेंहि आहे. जावत्कालपर्यंत अज्ञान आहे, तावत्कालपर्यंत संसार खरा वाटतो, परंतु सम्यक् विचार केला म्हणजे तो बागुलबुवा नष्ट होतो. ह्याच संसारभ्रमाला वेदान्तशास्त्रांत **माया** असें म्हणतात. ह्या मायेचा मोठा चमत्कार आहे.

ईदृशी राम मायेयं या स्वनाशेन हर्षदा ॥
न लक्ष्यते स्वभावोऽस्याः प्रेक्ष्यमाणैव नश्यति ॥ १

**—योगवासिष्ठ**

म्हणजे ही विश्वरूप माया स्वनाशेंकरून आनंद देणारी व सम्यक्दर्शनानें नाहींशी होणारी आहे; परंतु हा त्या मायेचा स्वभाव अज्ञ लोकांच्या लक्षांत येत नाहीं. मायेच्या योगानें प्रपंचांत नाना तऱ्हेच्या घडामोडी जरी झाल्या, तरी जलप्रवाहाप्रमाणें एकाच्या ऐवजीं दुसरें आल्यामुळें मनुष्यास भ्रम होतो व जगाचें सत्यत्व वाटूं लागतें. जलप्रवाहाप्रमाणें पाणी सारखें वाहत असतें; तें खळाळीबरोबर जरी पुढें गेलें तथापि त्याची जागा रिती पडत नाहीं. कारण मागून येणारें पाणी ती जागा व्यापून टाकितें, म्हणून प्रवाहांतील पाणी नाहींसें झालें असें कोणाच्याहि लक्षांत येत नाहीं. जलप्रवाहाच्या ह्या दृष्टांताप्रमाणेंच दुसरें उत्कृष्ट उदाहरण अलातचक्राचें आहे. कोलीत हातीं घेऊन वर्तुळाकार फिरविलें म्हणजे जें तेजोवलय दिसतें, त्याला ‘ अलातचक्र ’ म्हणतात. त्यांत मूळचें कोलीत अणुमात्र असलें तथापि हें तेजोवलय सत्य

आहे असें वाटतें. वस्तुतः तें सत्य नाहीं. हेच दृष्टांत जगन्मिथ्यात्वाला बरोबर लागू आहेत. जगांतील वस्तु नष्ट होतात, हें जरी आपण पाहतों, तरी दुसऱ्या वस्तु उत्पन्न होत असतात, त्यामुळें वस्तूंचा नाश झालेला बुद्धीला खरा वाटत नाहीं. जग शाश्वत व सत्य आहे अशीच समजूत होते. असा जो भ्रम होतो तो ज्ञानावर मायेचें दृढ आच्छादन पडल्यामुळें होत असतो. अशी जरी मायेची थोरवी दिसली, तथापि सम्यक् विचार केला म्हणजे ती माया क्षणांत नाहींशी होते. दुसऱ्या कोणत्याहि विचारांनीं ती नाहींशी होत नाहीं. एकाद्या खोलींत निबिड अंधकार भरलेला असतो. तेथें दिवा घेऊन गेलें म्हणजे मग काळोख कोठें शोधावयाचा ? दिवा आंत नेला म्हणजे काळोख कोठेंहि दिसत नाहीं. तसेंच मायाभ्रमाचें आहे. सम्यक्‌विचाररूपी दीपक लाविला म्हणजे मायेचा काळोख अर्थातच नष्ट होतो.

माया ही ज्ञानाला पांच प्रकारांनीं आच्छादित करिते. त्या प्रकारांला पातंजल योगशास्त्रामध्यें **पंचकोश** आणि वेदान्तांत **पंचपर्व** ह्या संज्ञा आहेत. ते पांच प्रकार म्हणजे १. अविद्या, २. अस्मिता, ३. राग, ४. द्वेष आणि ५. अभिनिवेश हे होत. त्यांचीं लक्षणें अशीं:—स्वस्वरूपावर आवरण पडून स्वतःसिद्ध जे आपण, त्याचें विस्मरण जेणेंकरून होतें, त्याला **अविद्या** म्हणतात. **अस्मिता** म्हणजे देह हाच आत्मा अशी विपरीत बुद्धि होणें. तिसरें पर्व **राग**, म्हणजे देहाच्या ठिकाणीं अति प्रीति. राग शब्दाच्या व्यावहारिक अर्थांत आणि वेदान्तांतील अर्थांत महदंतर आहे. **द्वेष** म्हणजे प्रीतीचा वि-

षय जो देह, त्याला घातक जे जे प्रतिकूल पदार्थ होतात, त्यांला पाहून क्षोभयुक्त बुद्धि होणें ह्याला द्वेष म्हणतात. पांचवें पर्व अभिनिवेश म्हणजे कृश किंवा स्थूल आहे, बाल किंवा वृद्ध आहे, जिवंत आहे किंवा मृत आहे, अशा प्रकारची देहाविषयीं जी तळमळ ती.

आपला आत्मा स्वप्रकाश, निर्मल व निरंजन असून त्याचे ठायीं सदरहु पांच प्रकारच्या देहविकारांचा आरोप करणें हें मायेचें कर्म होय. ही माया सर्व विश्वाची मोहिनी असून ती स्वस्वरूपाला भूलवून मोह उत्पन्न करिते. ह्या मोहाचें असें विलक्षण मोहकत्व आहे कीं—अनेक मण्यांमध्यें जसें एक सूत्र असावें त्याप्रमाणें सर्व विश्वाला व्यापून राहिलेला हा आत्मा असून तो मोह त्याला आच्छादून टाकितो; मनुष्याला विपरीताचें भान उत्पन्न होऊन त्यामुळें ज्ञान भ्रंश पावतें; स्वस्वरूप जें नित्यज्ञान तें प्रपंचाकार बनतें, व तें सत्य मानून दारुण मोह उत्पन्न होतो.

सर्व विश्वामध्यें आत्मा अखंड भरला आहे, हें वेदान्तशास्त्रांत अनेक दृष्टांतांनीं व्यक्त केलें आहे. साखरा जरी अनेक प्रकारच्या असल्या, तरी त्यांची गोडी म्हणून एकच. नानाप्रकारचे दीप असले तथापि त्यांची प्रभा एकच. अनेक अग्नींच्या ठिणग्या असल्या तरी त्यांतील विदाहित्व एकच. अथवा अनेक प्रकारचे पट असले तथापि तंतु म्हणून एकच. हें जसें, तसेंच आत्मस्वरूप एकच असून अखंड भरलेलें आहे. मायारूप जगत् सत्य नव्हे.

यदिदं दृश्यते किंचित्तन्नास्ति किमपि स्फुटं ॥
यथा गंधर्वनगरं यथा वारि मरुस्थले ॥ १

—योगवासिष्ठ

जगांत जी जी वस्तु दृग्गोचर होते, किंवा कोणत्याहि बहिरिंद्रियानें जिचें ज्ञान होतें, ती ती वस्तु मिथ्या होय. जी जी वस्तु आहे असें आपण म्हणतों, ती ती वस्तु सम्यक् विचारांतीं सत्य नाहीं हा सिद्धान्त आहे. ह्यावर अशी आशंका येते कीं, प्रपंच जर प्रत्यक्ष दिसत आहे, तर मग त्याला लटका कसा म्हणावा? ह्याला उत्तर असें आहे कीं, हें सर्व मनुष्याच्या भ्रमाचें कार्य होय. ज्याप्रमाणें आकाशामध्यें गंधर्वनगराचा भास होतो, किंवा मारवाड देशामध्यें मृगजलौघाचा आभास होतो,—वस्तुतः ती खरीं नसतात—त्याप्रमाणेंच जगताचें भासणारें सत्यत्व मिथ्या होय.

स्वज्ञानदर्पणेस्फारे समस्ता वस्तुजातयः ॥
इमास्ताः प्रतिबिंबन्ति सरसीव तटद्रुमाः ॥ १

—योगवासिष्ठ

सरोवराच्या तीरावरील वृक्षांची पडछाया त्या सरोवरांत पडते. ती पडछाया ज्याप्रमाणें वस्तुतः खरी नाहीं, तद्वत् स्वज्ञानरूप आरशामध्यें दिसणारें जगाचें जें प्रतिबिंब तें खरें नाहीं. ह्यावर पुनः अशी शंका निघते कीं—सरोवराच्या कांठचे वृक्ष सत्य असतात, म्हणूनच त्यांची पडछाया पडते. जर ते वृक्ष खरे नसते, तर त्यांची प्रतीति झालीच नसती.

यावर नैय्यायिकांचें असें म्हणणें आहे कीं, प्रपंच हा सत्यच आहे, आणि म्हणून त्याचा भ्रम होतो. आपणास शुक्तिका-रजतभ्रम होतो, म्हणजे शिंपीच्या ठिकाणीं रुप्याचा जो भास होतो, तो तीन कारणांनीं होतो:—पहिलें, शिंपीचें सामान्य ज्ञान आपणाला असतें,

दुसरें, तिच्या पाठीमागें जो एक नील त्रिकोण भाग असतो त्याचें ज्ञान आपणास नसतें; आणि तिसरें, देशांतरीं आपण रुपें पाहिलेलें असतें, त्याचें स्मरण होतें. त्याप्रमाणेंच (१) आपणास ब्रह्माचें सामान्य ज्ञान होतें. (२) त्यांतील विशेष पदार्थांचें अज्ञान असतें, आणि (३) सत्य जो प्रपंच, त्याचें आपणास स्मरण होतें म्हणूनच जगत् सत्य आहे असा भास होतो. आपण जर सत्य वस्तु पाहिली असेल तरच तिच्या सादृश्याची आठवण होणें शक्य आहे. ती पाहिली नसतां तिच्या सादृश्याचें स्मरण होऊन भ्रम होणें संभवनीय नाहीं. प्रपंच सत्य आहे म्हणूनच त्याचा भास होतो. ही नैय्यायिकांची कोटी.

ह्यावर वेदान्ती लोकांचें उत्तर असें आहे कीं अशा प्रकारचा भास होण्यास शिंपीचें मुख्य ज्ञान असलें म्हणजे पुरें होतें. तेथें कोणत्याहि सामुग्रीची जरूर लागत नाहीं. एकादे वेळी स्वप्नांत आपला शिरच्छेद झालेला आपण पाहतों, परंतु स्वशिरच्छेदनाचा अनुभव कोणाला तरी असतो काय ? तसेंच आपणाला पंख फुटून वातावरणांतून खगांप्रमाणें आपण गगनारोहण करीत आहोंत, अशी केव्हां तरी स्वप्नचेष्टा होते, परंतु ह्याचा अनुभव जागृतावस्थेंत कोणास तरी असतो काय ? असाच प्रकार जग सत्य भासतें याचा आहे. सादृश्याशिवाय भ्रान्ति होत नाहीं हें नैय्यायिकांचें तत्त्व घेऊन चाललें तर तें तत्त्व टिकत नाहीं. ब्रह्माचा प्रपंच हा भास आहे असें जर म्हणावें तर त्यांचें सादृश्य पाहिजे, परंतु त्यांचें कोणत्याहि प्रकारें सादृश्य नाहीं. ब्रह्म हें निर्गुण, सर्वव्यापक, स्वप्रकाश आणि स्वसंवेद्य म्हणजे आत्मानुभवि आहे,

आणि प्रपंच हा त्याचे उलट म्हणजे सगुण, परिच्छिन्न —अर्थात् मर्यादित, परप्रकाशित, आणि परसंवेद्य आहे. तेव्हां अशा ज्या परस्परविरुद्ध धर्माच्या दोन वस्तु त्यांमध्यें सादृश्यभ्रम होण्यास कांहीं एक कारण नाहीं. तो भ्रम केवळ अज्ञानानें घडतो, असेंच मानिलें पाहिजे. ब्रह्माच्या ठिकाणीं सामान्य, विशेष हा भेद मुळींच नाहीं. कारण तें निःसामान्य व निर्विशेष आहे. ब्रह्माचे ठिकाणीं सामान्य व विशेष हा भेद जर मानिला तरः—

एकमेवाद्वितीयं ब्रह्म । नेह नानास्ति किंचन ।

—बृहदारण्यक

ही श्रुति अप्रमाण होऊं लागेल, आणि श्रुतीविरुद्ध बोलणें म्हणजे पाखंडत्व आहे, म्हणून श्रुतीला धरूनच चाललें पाहिजे. ब्रह्माच्या ठिकाणीं सामान्य, विशेष हा भेद नाहीं असें नाहीं, परंतु तो अर्थभिन्नत्वानें आहे. सामान्य शब्दाचा अर्थ समस्त असा घ्यावयाचा, आणि विशेष शब्दानें व्यक्त असा अर्थ समजावयाचा. समस्त शब्दापासून निर्विकार असा अर्थ समजून व्यक्त शब्दानें प्रपंचाकार असा अर्थ समजावयाचा. विशेषाकार नाहींसा झाला असतां, निर्विशेष सामान्य हेंच शिल्लक राहतें. या रीतीनें भ्रमाची सामग्री परब्रह्माचे ठिकाणीं लागू होते. ब्रह्म हें सोन्याप्रमाणें निर्विकार आहे. सोनें जसें सर्वत्र एकच, पण अलंकाराच्या रूपानें व्यक्त होतें, म्हणजे स्पष्ट व व्यक्तिरूप होतें, त्याप्रमाणें ब्रह्म हें निर्विकार असून तेंच प्रपंचाकार भासतें.

ह्यावर अशी शंका येते कीं,—सोन्याचा विकार होऊन त्याचा अलंकाररूपानें जसा परिणाम होतो, तसाच प-

रब्रह्माचा परिणाम विश्व हा होय. परंतु असा जर परिणामवाद स्थापन करूं लागलें, तर तो मात्र एथें लागू पडत नाहीं. कारण ब्रह्म हें विकारशून्य असल्यामुळें त्याचा परिणाम जगदाकार कधींच घडणार नाहीं. दुसरी गोष्ट अशी कीं, ज्या ज्या वस्तूचा परिणाम होतो, ती ती वस्तु निराळीं नामरूपें पावून नाश पावते. ह्याला व्यवहारांतील उत्कृष्ट दृष्टांत म्हणजे दह्याचा होय. दुधाचें जेव्हां दहीं बनतें, तेव्हां त्याचीं पूर्वींचीं नामरूपें नाहींशीं होतात. श्रुतींमध्यें सर्वत्र असेंच प्रतिपादन आहे कीं, ज्याचा परिणाम होतो, त्याचा नाश होतो; परंतु ब्रह्म हें अविनाशी व अविकारी आहे. ब्रह्माचा परिणाम जर प्रपंचाकार झाला असता, तर वेदांनीं "नेति नेति" इत्यादि शब्दांनीं विश्वाचा निषेध कधींहि केला नसता.

अपूर्वं, अनपरं, अनंतरं, अबाह्यं, अस्थूलं, अनणु, अदीर्घं, अऱ्हस्वं

—बृहदारण्यक

अशा प्रकारें वेदांत ब्रह्माचें वर्णन असून प्रपंचाचा स्पष्ट निषेध केलेला आहे.

अपूर्वं, अनपरं, अस्थूलं इत्यादि विशेषणांवरून असें स्पष्ट दिसतें कीं, ब्रह्म व हें जगत् ह्यांमध्यें कोणत्याहि तऱ्हेचें सादृश्य नसून प्रपंच हा ब्रह्माचा परिणाम आहे हें म्हणणें खोटें ठरतें. जगताच्या सत्यत्वाबद्दल जो भ्रम होतो, त्याचें कारण केवळ अज्ञान हेंच होय, असें वेदान्ती मानितात. सुखदुःखाचीं आणि मोक्षबंधनाचीं कारणें ज्ञान आणि अज्ञान हीं आहेत हें पक्कें समजावें. ज्ञानापासून सुख व अज्ञानापासून दुःख होतें. अज्ञानापासून

बंध होतो आणि ज्ञानानें मोक्षप्राप्ति होते. विश्वप्रतीति मनाच्या चांचल्यामुळें उपजते.

मनः संपद्यते तस्मान्महतः परमात्मनः ॥
सुस्थिरादस्थिराकारं तरंगा इव वारिधेः ॥ १

—योगवासिष्ठ

परमात्मस्वरूप जें ब्रह्म, त्यापासून मनाची उत्पत्ति होते व मनाच्या उत्पत्तीमुळें विश्वप्रतीति होते. यावर अशी शंका येते कीं, ब्रह्म हें स्थिर व निश्चल असतां त्यापासून अस्थिर व चंचल अशा विरुद्ध गुणाच्या मनाची उत्पत्ति कशी घडावी? ह्या शंकेचें उत्तर असें आहे कीं, स्थिर पदार्थापासूनहि चंचल पदार्थाची उत्पत्ति होते. समुद्राचेंच उदाहरण पहा. तो स्थिर, गंभीर व निश्चल असून त्यापासून क्षणिक व अस्थिर असे बुडबुडे उत्पन्न होतात हें आपण नेहमीं पाहतोंच. मन हें गारुड्याप्रमाणें नाना तऱ्हेचे संकल्प करून जगाला विचित्रपणा आणितें. मनानें कल्पना केल्याशिवाय हें जग कांहींच नाहीं. मन स्वस्वरूपीं निमग्न असतां कोणतेहि विकल्प उत्पन्न होत नाहींत, ह्याचा अनुभव आत्मानुभवी जे योगी त्यांस आहेच. सामान्य जनांस याचा अनुभव सुषुप्तिकालीं येतो. सुषुप्तिकालीं मन "पुरीतति" नामक जी शरीरामध्यें एक नाडी आहे, त्या नाडींत लीन होतें, असें न्यायवैशेषिक दर्शनामध्यें सांगितलें आहे. त्या अवस्थेंत शरीरांत एकटा आत्मा तेवढा कायम राहतो, व मनाच्या अभावामुळें जग नाहींसें होतें. हा अनुभव सर्वांस आहेच. आतां जग सत्य असतें, तर सुषुप्तिकालीं सुद्धां तें भासमान् झालें असतें. कारण सत्य जी वस्तु आहे, तिचा कालत्रयींहि

नाश होत नाहीं. परंतु जगाची स्थिति तशी नाहीं. तें जागृतावस्थेंत एका तऱ्हेनें दृष्टीस पडतें; स्वप्नावस्थेंत निराळ्या प्रकारचें बनतें; आणि सुषुप्तिकालीं तें अगदींच नाहींसें होतें. तेव्हां असें जें निरनिराळ्या स्वरूपांनीं दिसणारें जगत् तें सत्य कसें म्हणतां येईल? ती नश्वर वस्तुच होय, ह्यांत कांहीं एक शंका नाहीं.

ब्रह्माच्या ठिकाणीं प्रपंचाचा आभास कसा होतो हें सोन्याच्या दृष्टांतावरून चांगलें कळून येतें. सुवर्णाचेच नानाप्रकारचे अलंकार बनविलेले असतात, परंतु अविद्वानाला प्रत्येक अलंकाराबद्दल निरनिराळी बुद्धि उत्पन्न होऊन निरनिराळ्या नांवांनीं व आकारांनीं तो त्याला ओळखितो. त्याला ज्या अलंकाराचें जें नांव व जो आकार दिसतो, तोच यथार्थ वाटतो; परंतु अलंकाराचें जें मुख्य अधिष्ठान—म्हणजे सोनें—त्यांत त्याची बुद्धि शिरत नाहीं. दृष्टीस जरी प्रत्यक्ष सुवर्ण दिसलें, तथापि अविद्वानाची चित्तवृत्ति सुवर्णाकार होत नाहीं, तो केवळ नामरूपाच्या भ्रांतींत बुडून जाऊन प्रत्यक्ष यथार्थवस्तुदर्शन होत असतांहि त्याच्या चित्ताला विपरीत भास होतो. त्याप्रमाणेंच आत्मा हा अपरोक्ष व स्वतःसिद्ध असतां भ्रम उत्पन्न होऊन नामरूपात्मक जे विरुद्ध पदार्थ तेच मनुष्याला खरेसे दिसूं लागतात. ह्याबद्दल कवींनीं म्हटलें आहे कीं,

अगा नामारूपासाठीं । वस्तु दवडिली बारा वाटीं ॥

—**रंगनाथ**

म्हणजे केवळ नामरूपांमुळें वेगवेगळे पदार्थ खरे मानून मुख्य आत्मस्वरूप जी वस्तु तिला मनुष्य बारा वा-

टास फेंकून देतो. यास्तव वेदान्ती असें म्हणतात कीं, जर शुद्धब्रह्माची प्राप्ति व्हावी असेल तर तपादि आयास करण्याची गरज नाहीं. मनुष्यानें केवळ नामरूप टाकून रहावें, म्हणजे सर्व शुद्धब्रह्मच आहे. वेदान्तशास्त्रांत नामपंचकाची व्याप्ति अशी वर्णिली आहे कीं,

अस्ति भाति प्रियं रूपं नाम चेत्यंशपंचकं ॥
आद्यत्रयं ब्रह्मरूपं जगद्रूपं ततो द्वयं ॥ १

—**योगवासिष्ठ**

म्हणजे सत्ता, प्रकाश आणि सुख ही जी त्रयी तदात्मक ब्रह्म आहे, आणि बाकी राहिलेलीं दोन म्हणजे नाम आणि रूप, तदात्मक हें जग आहे. ह्या भूपृष्ठावर जीं सुंदर शहरें, हवेल्या, वृक्ष वगैरे दिसतात व जेणेंकरून पृथ्वीला वैचित्र्य प्राप्त झालें आहे, त्यांपैकीं प्रत्येक खरेंच आहे असें अज्ञानी लोक मानितात. ह्या सर्व वस्तु मूळांत पृथ्वीच आहेत हें त्यांना अज्ञानामुळें समजत नाहीं आणि तेणेंकरून भ्रम मात्र वाढतो. पण जो परमार्थद्रष्टा आहे, तो शहरें काय, हवेल्या काय, आणि वनोपवनें काय, सर्व पृथ्वीमय आहे असें समजतो. Reduce things to their first principles, हें राजनीतीचें तत्त्व आहे, तेंच वेदान्तशास्त्रांतहि आहे. पृथ्वीवर दिसणाऱ्या सर्व पदार्थांवर लादिलेले नामरूपविकार टाकून त्यांचें मूळ शोधिलें म्हणजे सर्वच ब्रह्म आहे.

दुसरा आणखी असा चमत्कार आहे कीं, ज्याची जशी अंतर्वृत्ति असते, तद्रूप त्याला सर्व वस्तू दिसूं लागतात. जो तृप्त आहे, त्याला सर्व विश्व तृप्त दिसतें. क्षुधिताला सर्व क्षुधारूपच दिसतें. आंधळ्याला रानभुव-

नांत नेऊन बसविला, तरी त्याला आपण एकाद्या कूपांतच पडलों आहों असें वाटतें. किंवा जो धनवंत असतो, त्याला लोक आपल्याप्रमाणें रोज घृतशर्करा कां खात नाहींत ? असें वाटतें. अशीच स्थिति अज्ञान्याची आहे. त्याला हें सर्व जग दुःखमय दिसतें; परंतु ज्याला स्वस्वरूपाची ओळख आहे, त्याला सर्व आनंदमयच दिसतें. हॉरेस वॉलपोल ह्या जाडच्या तत्त्ववेत्त्यानें इंग्रजींत असा सिद्धान्त लिहिला आहे कीं,—

Life is a comedy to those who think;
But life is a tragedy to those who feel.
योगीकूं सब सुखमय यह। रोगीकूं सब दुखमय यह ॥

वरील तत्त्ववेत्त्याच्या सिद्धांतांतील आणि हिंदुस्थानी दोह्यांतील मर्म एकच आहे. स्वस्वरूपाविषयीं जो अंध, त्याला हें सर्व विश्व दुःखरूप आहे. आंधळ्याला जें राजमंदीर कूपासारखें वाटतें, तेंच राजमंदीर डोळसाला ( ज्ञान्याला ) प्रकाशमय व मनोहर दिसतें. तात्पर्य, हें विश्व जे जाणते आहेत त्यांला, प्रकाशरूप व सद्रूप दिसतें.

ब्रह्मापासून विश्वोत्पत्ति होते, ह्या सिद्धांतावर आणखी एक अशी शंका घेतात कीं, शुद्धब्रह्म हें अजड म्हणजे अविनाशी असून विश्वरूपी जड वस्तूची त्या ब्रह्मापासून उत्पत्ति होते, हें म्हणणें कसें संभवतें ? ह्याला पुढील श्लोकांत उत्तर आहे:—

यथाविशुद्ध आकाशे सहसैवाभ्रमंडलं ॥
भूत्वा विलीयते तद्वदात्मनीहाखिलं जगत् ॥ १

—योगवासिष्ठ

आकाश जरी वस्तुतः निर्मल, अनंत, अगाध व सर्व-

व्यापक आहे, तथापि त्यांत अकस्मात् अभ्रमंडळें उत्पन्न होऊन तीं कांहीं काळानें विलयास जातात. अभ्रें येऊन गेलीं तरी परिणामाला आकाश जशाचें तसेंच अभंग राहतें. अभ्रांचा मळ आकाशाला लागत नाहीं किंवा अभ्रांची व त्याची एकरूपता होत नाहीं. अभ्रें फक्त येतात आणि जातात. ह्याप्रमाणेंच शुद्ध आत्म्याच्या ठायीं जड विश्वाचा आभास होतो आणि कांहीं कालानें त्याचा विलय होऊन आत्मा जशाचा तसाच शुद्ध राहतो. तसेंच रूपरहित व विशुद्ध असें जें ब्रह्म, त्यावर अज्ञानामुळें विश्वाचा आरोप जरी झाला, तरी त्याचा लेप ब्रह्मास लागत नाहीं. वेदान्ती लोकांचें म्हणणें असें आहे कीं, विश्व आहे म्हणणें ही वाणीची विटंबना आहे. कारण—

> आदित्याव्यतिरेकेण रश्मयो येन भाविताः ॥
> आदित्या एव ते तस्य निर्विकल्पः स उच्यते ॥ १
>
> —योगवासिष्ठ

जें ज्याशिवाय नाहीं, तें तद्वस्तुरूपच मानिलें पाहिजे. सूर्याशिवाय जर किरणच नाहींत, तर सूर्य हा किरणरूपच मानिला पाहिजे. तसेंच सूर्याचा उदय झाला असतां किरण दृष्टीस पडतात आणि सूर्यास्त झाला म्हणजे किरणांचाहि अस्त होतो. यास्तव किरण सूर्यरूपानेंच जाणिले पाहिजेत. त्यांस कधींहि वेगळें मानितां येणार नाहीं. हें ज्ञान ज्याला निश्चयेंकरून झालें, त्यालाच रविकिरणांचें ज्ञान झालें असें म्हणावयाचें. ब्रह्म आणि विश्व ह्यांला हाच दृष्टांत लागू आहे. एक ब्रह्म सर्वत्र भरलेलें आहे. विश्व त्याहून निराळें भासलें तर तो भ्रम मुख्य अधिष्ठानाच्या ठिकाणीं नसून केवळ आरोपित आहे असें

समजलें पाहिजे. म्हणून जो ब्रह्म आणि विश्व ह्यांत दुजेपणा समजत नाहीं, तोच निर्विकल्प व सर्वज्ञ असून ब्रह्मसुख भोगण्यास पात्र होय. निर्विकल्पसमाधीची खूण हीच समजावी कीं, ब्रह्माशिवाय विश्वाची स्फूर्तिच होतां उपयोगी नाहीं. मी मन कोंडून निवान्त राहीन, मला त्या ब्रह्मखुणेची गरज नाहीं असें जर कोणी म्हणेल, तर त्याला समाधिसुख प्राप्त झालें असें म्हणणें ही केवळ शब्दाची विटंबना होय.

यथा न तोयतो भिन्नाः फेनोर्मिहिमबुद्बुदाः ॥
आत्मनो न तथा भिन्नं विश्वमात्मविनिर्गतम् ॥ १

—योगवासिष्ठ

पाणी हें निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या रूपानें दिसतें. म्हणजे कधीं फेणाच्या रूपानें, कधीं लाटेच्या रूपानें व कधीं बुडबुड्याच्या रूपानें दृष्टोत्पत्तीस येतें; तथापि तें मूळचें सर्व पाणीच होय. समुद्राचें पाणी वाढतें, त्या वेळीं त्याला लहरींच्या रूपानें दुजेपणा आलेला वाटतो. परंतु मागाहून तें सपाट झाल्यावर तेथें दुसरी वस्तु उत्पन्न झाली हा भास राहत नाहीं. जी वस्तु आदिअंतीं नसून मध्येंच जिचा भास होतो, ती वस्तु पहिल्याहून भिन्न नसलीच पाहिजे. तिच्या मध्यस्थितींत जो निराळेपणाचा भास होतो, त्याला वेदान्तांत नामरूपाची मिरवणी असें म्हटलें आहे. त्या भ्रमाचा निरास झाला म्हणजे पाण्याचा मानिलेला दुजेपणा अर्थात् नाहींसा होतो. व त्या ठिकाणीं एका उदकाशिवाय दुसरें कांहींच राहत नाहीं. पाण्याप्रमाणेंच सर्वत्र व्याप्त असलेल्या ब्रह्माची स्थिति आहे. विश्व जरी निराळें दिसूं लागलें, तथापि तें

ब्रह्मच होय. वस्तु एक असून ती निरनिराळ्या रूपांनीं दिसते हें केवळ भ्रमाचें कार्य आहे. तात्पर्य काय कीं, अधिष्ठान वस्तूचे ठिकाणीं जी दुसरी वस्तु अध्यारोपित असते, ती त्या मूळच्या अधिष्ठानाहून भिन्न नसते, हा सिद्धांत आहे. पूर्वीं मृत्तिका आणि तिजपासून बनविलेला घट, तंतु आणि पट, सुवर्ण आणि अलंकार, आणि पाणी व लाटा इत्यादि जे समर्पक दृष्टान्त दिलेले आहेत, त्यांवरून हें जगत् मिथ्या आहे, ब्रह्म खरें, ही गोष्ट चांगल्या रीतीनें सिद्ध होते. ब्रह्माच्या ठिकाणीं जगताचा भास होतो, ह्याला वेदान्तामध्यें **विवर्तवाद** म्हणतात. मूळरूप जशाचें तसें कायम असतां सादृश्येंकरून त्यावर दुसऱ्या वस्तूची भ्रांति होणें, ह्याचें नांव **विवर्त**. ह्याला उदाहरण शिंपीचें. शिंप जशाची तशीच कायम असते, परंतु तिजवर मिथ्या रौप्याची कल्पना होते. शिंपीच्या ठिकाणीं परिणामवाद लागू पडत नाहीं. कारण त्याचें स्वरूप अगदीं निराळें आहे. एका वस्तूचें रूपांतर होऊन म्हणजे अधिष्ठान नाहींसें होऊन तेथें अन्य वस्तु उत्पन्न होते,—जसें दुधाचें दहीं बनणें,—ह्याला **परिणामवाद** म्हणावयाचा. दुधाचें दहीं बनतें, ह्यांत प्रथम दुधाचें रूप असून मध्यें आणि शेवटीं निराळें रूप बनतें. विवर्तवादांत असें होत नाहीं. त्यांत शिंपीप्रमाणें अधिष्ठान निर्बाध कायम राहतें. शिंपीवर रौप्याभास होतो तो केवळ भ्रमामुळें. ह्या एकंदर विवेचनावरून जगत् हें सर्व मिथ्या आहे अशी मनाची खात्री होते, आणि ही कल्पना दृढ झाली म्हणजे शरीरांत वैराग्य बाणतें, व तसें झाल्यावर "जीवन्मुक्ति" म्हणून ज्या अवस्थेचें निरूपण पुढें करावयाचें

आहे, ती आपण होऊनच मनुष्याचे गळ्यांत माळ घा- लिते. एथपर्यंत जगन्मिथ्यात्वाचे संबंधानें विचार झाला. पुढील प्रकरणापासून " मनोलय " ह्या महत्त्वाच्या भागास आरंभ करूं. वाचकांनीं त्यांचें मन प्रशांत असेल अशा वेळीं ह्या विषयाचें पुनःपुनः मनन करावें. तेणेंकरून आध्यात्मिकज्ञानाचा लाभ त्यांस झाल्यावांचून खचित राहणार नाहीं.

---

# प्रकरण ८ वें

## मनोलय

आत्मतत्त्वानुबोधेन न संकल्पयते यदा ॥
अमनस्तां तदा याति ग्राह्याभाव तदग्रहः ॥ १

—गौडपादाचार्य

वैराग्य प्राप्त होणें हा वेदान्ताचा मुख्य पाया होय. तें वैराग्य अंगीं दृढ बाणण्यासाठीं सर्व विषयांकडे दोषदृष्टि होणें व प्रपंच मिथ्या भासणें—म्हणजे जगान्मिथ्यात्वदर्शन—हा नंतरचा उपाय होय, त्याचें विवेचन झालें. आतां तिसरी पायरी मनोलय ही आहे. त्याचा विचार करावयाचा. वैराग्य दृढ होण्याकरितां सद्गुरूचें पादसंवाहन करून त्यानीं कृपा केल्यावर ते जो मार्ग दाखवितील, त्याचा आभ्यास म्हणजे निदिध्यासन करीत असतां मन आणि वासना ह्यांपासून फार पीडा होते. यासाठीं मनाची व वासनेची शांति अवश्य झाली पाहिजे. सद्गुरूनीं तत्त्वोपदेश केला व महावाक्याच्या योगानें तो दृढ झाला आणि तेणेंकरून साक्षात्कार होऊं लागला म्हणजे सर्व

कार्य होतें. परंतु तसें होण्यास मन व वासना ह्या आड येतात आणि त्यामुळें असंभावना, विपरीतभावना वगैरे क्षुब्ध होतात. त्यांची शांति, श्रवण मनन, निदिध्यासन इत्यादि उपायांनीं करावी लागते. असंभावना दोन प्रकारच्या आहेत. एक प्रमाणासंभावना आणि दुसरी प्रमेयासंभावना. एकादी वस्तु ज्या प्रमाणांनीं सिद्ध होते, तीं प्रमाणेंच यथार्थ नाहींत, अशी जी शंका येणें, त्याला **प्रमाणासंभावना** म्हणतात, आणि एकादी गोष्ट अनेक प्रमाणांनीं सिद्ध झाली, तथापि, ती गोष्ट खरी कशावरून अशी शंका येणें त्याला **प्रमेयासंभावना** म्हणतात. तसेंच **विपरीत भावना** म्हणजे, एकाद्या वस्तूच्या खऱ्या स्थितीची उलट कल्पना करणें, ही होय. ह्या ज्या तीन प्रकारच्या भावना त्या दूर होण्याकरितां एकाग्रचित्त करून व प्रपंचाचें निरसन करून निदिध्यासन करावें लागतें. स्वस्वरूपाचें अनुसंधान करूं लागलें म्हणजे मन आणि वासना ह्या विषारी नागिणी फोंफावत मध्यें आडव्या येतात, व प्रपंचभान उत्पन्न करितात. यास्तव मनोलयाचा व वासनाशांतीचा अभ्यास करावा लागतो. आणि त्यानेंच ब्रह्मप्राप्ति होते. अन्योपाय कांहीं केले तरी ते वायां जातात. सर्व वेदान्तशास्त्रांत श्रेष्ठ जी जीवन्मुक्ति, तिची प्राप्ति मनोलयाच्या मार्गानेंच होते. मनुष्यप्राण्यास सुखदुःखाचा जो अनुभव होतो, तो मन आणि वासना ह्यांच्यामुळेंच होतो. म्हणून त्यांचा क्षय करणें हें अत्यावश्यक आहे.

एष स्वभावाभिमतः स्वतः संकल्प्य धावति ॥
चेतसा स्वयमम्लानस्तदेव मन आत्मनः ॥ १

—योगवासिष्ठ

ह्या श्लोकांत मनाचें लक्षण सांगितलेलें आहे. आत्म्याला जे जे पदार्थ स्वभावेंकरून आवडतात, व अज्ञानाचे योगानें जे रमणीय भासतात, ते पदार्थ ग्राह्य होत, असा संकल्प करून त्यांच्या मागें जें स्वतः धांवत जातें तें मन होय. आत्मा स्वयंप्रकाश व जशाचा तसाच आहे, परंतु कांहीं तरी संकल्प करून जें इकडे तिकडे भटक्या मारितें तेंच मन होय. हा देह, हीं इंद्रियें, हे प्राणापानादि वायु, हें जगड्व्याळ, हे घटपटादि पदार्थ इत्यादि ज्या भेदकल्पना उत्पन्न होतात, त्या विभागकल्पना मनच उत्पन्न करितें. वास्तविक पाहतां आत्म्याच्या ठायीं विकल्पभेद मुळींच संभवत नाहीं. तो आकाशाप्रमाणें निर्विकल्प, नित्यशुद्ध व सर्वसाक्षी आहे. त्याच्या शेजारीं वसतीस राहून भेदसृष्टीच्या चेष्टा करणारी जी व्यक्ति तेंच मन होय. आत्मस्वरूपावरून व वर सांगितलेल्या भेदकल्पनेवरून मनाचें लक्षण व स्वभाव ओळखावा. आत्म्याचेंहि स्वरूप जर कळलें नाहीं, तर मनाचा स्वभावहि कळत नाहीं. अज्ञजनांस तीं दोन्हीं एकच वाटतात. पांढरीं, तांबडीं, हिरवीं इत्यादि निरनिराळ्या रंगांचीं वस्त्रें एकत्र करून तीं जर एकाद्या अंधाचे हातीं दिलीं, तर त्याला रंगज्ञान होईल काय? अंधत्वामुळें—अर्थात् अज्ञानामुळें त्याला रंगज्ञान व्हावयाचें नाहीं. हें जसें, तशीच स्थिति आत्मज्ञानविरहित पुरुषाची आहे. निश्चल व निर्विकल्प अत्म्याचे ठायीं द्वैताचें भान मुळींच स्फुरत नाहीं. असें असतां भेदशक्ति उत्पन्न करून सकलसृष्टि जें भासवितें, त्याला मन म्हणावयाचें. ह्या मनाचा मोठा चमत्कार आहे. त्यानें संकल्प केला म्हणजे विश्वाचा भास

होतो, आणि विकल्प केला म्हणजे तेंच विश्व त्याला शून्यवत् दिसतें. एथें अशी एक शंका येते कीं, एकाच पदार्थापासून असे दोन प्रकारचे अनुभव कसे यावे? ह्याला अग्नीचें उदारण देणें हेंच उत्कृष्ट उत्तर आहे. वह्निज्वाला उत्पन्न होते, ती वायूच्या योगानेंच, आणि त्या ज्वाळांचा अस्त होतो, तोहिपण त्या वायूच्याच योगानें होतो.

मनाच्या वृत्ति दोन प्रकारच्या आहेत. एक मळिण वृत्ति आणि दुसरी शुद्धवृत्ति. मनाच्या मळिण वृत्तीमुळें द्वैतप्रतीति, विश्वाभास व देहादिकांची स्फूर्ति होते, परंतु ही स्थिति मनाची शुद्धवृत्ति झाल्यानें तत्काळ नाहींशी होते. मनाची शुद्धवृत्ति म्हणजे तें स्वस्वरूपाकर बनणें ही होय. तेव्हां ननोवृत्तीनेंच विश्व उत्पन्न होतें, आणि मनोवृत्तीनेंच विश्वाचा लय होतो हा सिद्धांत खरा ठरतो. मन हें द्वैताचें मूळ असून तो केवळ मिथ्या भ्रम आहे. तो भ्रम स्वस्वरूपज्ञान नसल्यामुळेंच उत्पन्न होतो. मन हें नांव वृथा आहे. त्याला भ्रमाचा गाभा म्हणणेंच योग्य होईल. स्वस्वरूपाचें अज्ञान झालें म्हणजे मन असा भाव देहांत उत्पन्न होतो. आपण स्वप्नांत मरतों एवढेंच नव्हे तर आपल्या शरीराचें दहन चाललें आहे असें सुद्धां केव्हां तरी दिसतें, परंतु जागे झाल्यावर त्यांतलें कांहीं तरी खरें असतें काय? तो जसा सर्व भ्रम, तसेंच मनाचें आहे. मन हवें तसें भ्रमण करितें आणि त्या भ्रमणामुळें त्याला सुखदुःखादि प्राप्त होतात. परंतु सम्यक् विचार केला म्हणजे आत्मप्राप्ति होते व तत्काळ मनाचा नाश होतो. म्हणून मनाचा नाश करण्यास आत्मज्ञानाशिवाय अन्य साधन कोणतेंच नाहीं.

असम्यग्दर्शनं यस्मादनात्मन्यात्मभावनं ॥
वदवस्तुनि वस्तुत्वं तन्मनो विद्धि राघव ॥ १

—योगवासिष्ठ

सम्यक् दर्शन म्हणजे ज्ञान, व असम्यक् दर्शन म्हणजे अज्ञान होय. ज्याच्या योगानें कोणत्याहि वस्तूचें यथार्थ-दर्शन होतें, तेंच खरें ज्ञान होय. न्यायवैशेषिक दर्शनांमध्यें असें स्पष्ट सांगितलें आहे कीं, यथार्थ व अनुभवसिद्ध असें जें ज्ञान, तें खरें ज्ञान होय. यथार्थ शब्दानें अयथार्थ म्हणजे मिथ्या असें जें भान त्याचें निरसन केलें जातें. अयथार्थ ज्ञान म्हणजे शुक्तिरजताभास, मृगजल, स्वप्नभ्रम इत्यादि हें होय. ह्या अयथार्थ ज्ञानाची यथार्थ शब्दानें व्यावृत्ति केली जाते.

स्मृत्यनुभवश्च । —तर्कसंग्रह

म्हणजे स्मृति आणि अनुभव हे ज्ञानाचे दोन भाग न्यायशास्त्रांत सांगितले आहेत. त्यांपैकीं अनुभव म्हणजे स्मृतिव्यतिरिक्त ज्ञान, म्हणून अनुभव शब्दानें स्मृतीची व्यावृत्ति होते. यास्तव यथार्थ, स्मृतिव्यतिरिक्त, अनुभवसिद्ध आणि प्रत्यक्षभूत असें जें त्यालाच **ज्ञान** म्हणावें, अशी सकल शास्त्रें गर्जना करितात.

आतां यथार्थ ज्ञानाचें स्वरूप पहावयाचें. जगामध्यें अनात्मा ज्यामुळें प्रकाश पावतो तें **अयथार्थ ज्ञान** होय. अनात्मा म्हणजे आपणास जो बाह्यप्रपंच दिसतो आणि देहेंद्रियादि जे सर्व नाशवंत पदार्थ दिसतात, तोच होय. ह्या अनात्म्याचे ठिकाणीं आत्मा आहे अशी भावना ज्याच्या योगानें होते, व देहादि ज्या मिथ्या वस्तु त्यांच्या ठिकाणीं वस्तुबुद्धि ज्याच्या योगानें होते, तें मन

होय. हा एक पदार्थ, तो दुसरा पदार्थ, इत्यादि प्रकारचे विभाग व भेद रचण्यास मनच कारण आहे. ह्या भेदाचें जें अभावन म्हणजे नाहीं अशी भावना ती विचारेंकरून केली असतां मन सर्वथा लय पावतें.

उपादेयानुपतनं हेयैकांतविसर्जन ॥
यदेतन्मनसो रूपं तद्बंधं विद्धि नेतरं ॥ १

—योगवासिष्ठ

ह्या श्लोकांत मनाचें लक्षण फार चांगल्या रीतीनें सांगितलें आहे. उपादेय असे जे जे विषय व जे आत्म्याला अतिप्रिय वाटतात, त्या पदार्थांवर जें तुटून पडतें तें मन होय. स्त्रियादिक रमणीय विषय व पदार्थ पाहून तदाकार वृत्ति करून घेणारें व विषयातुर होऊन नानातऱ्हेनें त्यांचा उपभोग घेण्यास जें सिद्ध होतें तें मन होय. त्याप्रमाणेंच केवळ दर्शनानेंच भय, कंप इत्यादि विकार उत्पन्न करणाऱ्या ज्या सर्पादिक वस्तु, त्यांजकडे आत्म्याची प्रवृत्ति कांहीं केल्या जें करीत नाहीं तें मन समजावयाचें. ह्या मनाला विषयांची जी विलक्षण आवड असते, त्याला उत्कृष्ट उपमा म्हटली म्हणजे मुंग्यामाशांची आहे. साखरेचा कण पाहिला म्हणजे त्याला मुंग्या माशा इतक्या लुब्ध होतात कीं, त्यांना अर्ध्या तोडल्या तरी तेथून सुटत नाहींत. असेंच मन पराकाष्ठेचें विषयलुब्ध आहे. परंतु

ममोहि जगतां कर्ता मनोहि पुरुषः स्मृतः ॥
मनःकृतं कृतं राम न शरीरकृतं कृतं ॥ १

—योगवासिष्ठ

अशी मनाची स्थिति असल्यामुळें त्याला आंवरून

धरणें म्हणजे मनोलय करणें भाग आहे. हें अखिल विश्व मनामुळेंच भासमान् होतें, म्हणून मनच जगाचा कर्ता आहे, आणि बाह्य प्रपंचाची भावना नाहींसें करणारेंहि मनच आहे. जर मनाच्या योगानें जगाचा उदय होतो, तर अर्थात् जगाचें कर्तृत्वहि मनाकडेसच येतें. मनाला पुरुष अशी संज्ञा देतात, त्याचें कारण हेंच कीं, पुरुषपण, स्त्रीपण ह्या भेदभावना त्या मनानेंच उत्पन्न होतात. मनोलय झाला म्हणजे स्त्रीपुरुष हा भेद रहात नाहीं. आमच्या प्राज्ञ वाचकांपैकीं मिल्टन साहेबांचा "पॅरडाइज लास्ट" ग्रंथ पुष्कळांनीं पाहिलेला असेल. त्यांतील आदम आणि ईव्ह हीं अगदीं दिगंबरवृत्तींत रहात होतीं. त्यांच्या ठायीं स्त्रीपुरुषभावना प्रथम मुळींच नव्हती. परंतु ज्ञानवृक्षाचें फळ खाल्ल्यामुळें तो स्त्रीपुरुषभेदभाव त्यांच्या ठायीं पुढें संचरित झाला. तात्पर्य काय कीं, पुरुषपण, स्त्रीपण ह्या मनाच्या भावना आहेत.

जें कृत्य मनःपूर्वक केलें, त्यालाच आपण कृत्य केलें असें म्हणावयाचें. केवळ शरीराकडून जी क्रिया घडली, ती आपल्याकडून घडली असें म्हणतां येत नाहीं. आपण जागृतावस्थेंत मनःपूर्वक जी गोष्ट करितों, त्याच्या पापपुण्याला मात्र आपण अधिकारी होतों; परंतु स्वप्नांतील पापपुण्यक्रियेचें फळ आपणांस भोगावें लागत नाहीं. स्वप्नांतील पापक्रियेबद्दल प्रायश्चित्त जागृत झाल्यावर आजपर्यंत कोणीं दिलें आहे किंवा घेतलें आहे काय ? तसेंच स्वाप्निक अन्नदानानें संतृप्त होऊन कोणीं ढेंकर दिली आहे काय ? नाहीं. मनःपूर्वक केलेली जी सत्क्रिया तेंच पुण्यकर्म होय. मन थाऱ्यावर नसतां जरी

आपल्याकडून पुण्यकर्म घडलें, तथापि तें व्यर्थ होय. केवळ शरीरानें जें केलें, तें आपण केलें असें नव्हे. एकाद्यानें मोठ्या प्रेमानें आपल्या स्त्रीला सर्वावयवीं आलिंगन दिलें, आणि त्यानें त्याच शरीरानें आणि बहुप्रीतीनें आपल्या मुलीलाहि आलिंगन दिलें, तर तो त्याबद्दल अधोगतीस जाईल काय? नाहीं. कांतेला दृढालिंगन देतांना व कन्येला आलिंगन देतांना त्याचें शरीर जरी एकच असलें, तथापि मन अगदीं भिन्न असल्यामुळें तो पुरुष दोषी होत नाहीं. पापपुण्यप्राप्ति मनाच्या स्थितीप्रमाणें होते. परस्त्रीचा अभिलाष प्रत्यक्ष शरीरानेंच करावयास नको, मनानें जरी झाला, तरी अधोगति प्राप्त होते. अशा प्रकारचें जें मन, तें स्वस्वरूपीं लीन झाल्यावर शरीराकडून जरी कांहीं अधर्माचरण घडलें तथापि त्यापासून अधोगति होत नाहीं. कारण त्या ठिकाणीं मनाचें अस्तित्वच नसतें. मनानें स्वस्वरूपाची ओळख करून घेतली, अथवा सगुणरूपाचें ध्यान केलें तर अतिपुण्यप्राप्ति होते, पण नुसत्या शरीरानें कितीहि कष्ट केले तरी त्याचा कांहींएक उपयोग होत नाहीं. ते वृथा कष्टच. ज्या कर्मांमध्यें मन नाहीं, त्यांत फलप्राप्ति कांहीं नाहीं. मग तीं कर्में, तीर्थयात्रा, व्रतवैकल्य, जपतप, यज्ञयाग, अध्ययन, देवतार्चन ह्यांपैकीं कोणतींहि असोत. त्यांत मन नाहीं, तर सर्व फुकट. वेदान्तमतानें सर्वांत श्रेष्ठ जी जीवन्मुक्त अवस्था, तींत शरीराकडून कांहीं जरी घडलें, तथापि त्याचा दोष त्या सत्पुरुषास लागत नाहीं, कारण तो कर्मफलापासून अलिप्त असतो.

एथपर्यंत मनाचें लक्षण काय, कोणतेंहि कर्म क-

रीत असतां त्यांत मनाची आवश्यकता किती आहे, वगैरे विषयांचें निरूपण झालें. आतां त्या मनाचा लय म्हणजे नाश कसा होईल हें पहावयाचें. ज्याप्रमाणें रोग्याची चिकित्सा भिषग्वर्याकडून अगोदर करवून मग औपधोपचार करणें हितावह होतें, त्याप्रमाणेंच अगोदर मनाची चिकित्सा करून नंतर त्याला विचाररूपी मात्रा द्यावयाची, आणि चित्तरूप जो रोग, तो अतिसाहसानें निर्दळून टाकावयाचा, हा उत्तम मार्ग आहे. वासनाबाहुल्यानें चित्ताला मालिन्य येतें, याकरितां मन निर्वासन केलें पाहिजे. चित्तशुद्धि होण्यास वासनाक्षय अगोदर अवश्य झाला पाहिजे. वासनेपासून मन मुक्त झालें म्हणजे सहजच जीवात्मा मुक्त होतो.

मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ॥

ह्या देवीभागवतांतील वचनाप्रमाणें जीवात्म्याला बंध किंवा मोक्ष होण्याला केवळ मन हेंच कारण आहे. पाणी जर मलीन असलें तर त्यांत पडलेलें प्रतिबिंब अस्वच्छच असतें, पण तेंच पाणी जर शुद्ध असलें तर त्यांतील प्रतिबिंब स्वच्छ असतें. तसेंच उदक हालत असलें तर त्यांतील प्रतिबिंबहि हालतें, आणि तें स्थिर असलें तर प्रतिबिंबहि स्थिर असतें. ह्याप्रमाणेंच आरशाचें उदाहरण होय. आरशांत कांहीं दोष असला तर प्रतिबिंबांतहि गडबड होते. एकाद्या आरशांत राक्षसासारखें भयंकर विक्राळ मुख दिसतें किंवा हातभर लांब तोंड दिसतें, हा अनुभव सर्वांस आहेच. तो जसा आरशाचा दोष तसेंच मनाचें आहे. मनरूप आरसा जर शुद्ध असला, म्हणजे जर मन निर्वासन असलें, तर त्यांत स्वस्वरूपा-

चें प्रतिबिंब स्वच्छ पडून आत्मज्ञान होतें. ह्यास्तव मन निर्वासन केलें पाहिजे.

मन निर्वासन करण्याचे अनेक उपाय आहेत. त्यांत पहिला उपाय म्हटला म्हणजे सद्गुरूच्या बोधाचें अंतःकरणाशीं विवेचन करणें हाच होय. ह्यासच वेदान्तशास्त्रांत निदिध्यासन असें म्हणतात. जेवढीं म्हणून इन्द्रियें आहेत, तेवढीं वासनायुक्त म्हणजे बहिर्मुख असतात, तीं अंतर्मुख होत नाहींत. बलात्कारानेंच त्यांचा प्रवेश अंतर्यामीं करावा लागतो, म्हणजे त्यांस अंतर्मुख करावें लागतें. जेवढा म्हणून अनात्मवर्ग आहे, तितक्याचे ठायीं चित्तवृत्ति प्रकाशित होते, यास्तव त्या वृत्तीचें महाप्रयासानें नियमन करावें लागतें. अनात्म पदार्थांच्या ठायीं चित्तवृत्ति शांत करून, सजातीय जो आत्मा त्याकडे वृत्ति नेऊन निरंतर अनुसंधान केलें म्हणजे निर्वासनास्थिति प्राप्त होते, आणि मग चित्ताला चित्तपणच रहात नाहीं. चित्तवृत्ति स्वस्वरूपामध्यें गुंतून राहिली म्हणजे तीच मुक्तता होय.

आशा ही केवळ पिशाचवत् आहे. ती शुद्धवस्तूला मालिन्य आणते. पृथ्वीवर एकादा पदार्थ नसला तथापि तो प्राप्त व्हावा ही हांव आशेमुळेंच उत्पन्न होते; आणि कितीहि मिळालें तरी त्याहून अधिकाची अपेक्षा उत्पन्न होते. अशा प्रकारच्या आशांनीं मन भरून जातें तेव्हां आपल्याला आशा-पिशाचानें घेरलें म्हणून समजावें. विषयासक्ति म्हणतात ती हीच; चित्तविक्षेप होतो तो ह्या आशेमुळेंच, आणि आत्मस्थितीपासून मनुष्य भ्रष्ट होतो तोहि ह्यानेंच. आशेनें अज्ञान वाढतें; आणि त्या अज्ञा-

नरूप ढगांनीं स्वस्वरूपरूपी चंद्र अगदीं गडद आच्छादिला जाऊन विवेकशक्ति नष्ट होते. ह्या सर्वांचें कारण पहावयास गेलें तर एक मन होय. ह्या मनाच्या योगानेंच अनेक वस्तूंची अयथार्थ प्रतीति होते. अशाबद्दल बृहदारण्यश्रुतींत पुढील वचन आहे:—

कामः संकल्पो विचिकित्सा श्रद्धाश्रद्धा धृतिरधृतिर्ह्रीर्धीर्भीरित्येतत्सर्वं मन एव ।

म्हणजे बाह्य संकल्पविकल्प, श्रद्धा, अश्रद्धा, धैर्य, अधैर्य, लज्जा, भीति, हे सर्व मनाचे खेळ आहेत. हें मनाचें सर्व अवडंबर विरून जाण्यास उपाय म्हटला म्हणजे

अंतर्मुखतया सर्वं चिद्वन्हौ त्रिजगत्तृणं ॥
जुव्हतोऽतर्निवर्तंते राम चित्तादिविभ्रमाः ॥ १

**—योगवासिष्ठ**

हाच आहे. आपलें मन व इंद्रियें हीं अंतर्मुख करून सर्व जगत् तृणाप्रमाणें मानून चिद्रूप जो अग्नि त्या अग्नींत त्याचें हवन करावें; म्हणजे चित्तादि विभ्रम तत्काल नष्ट होतात. सर्वदा विषयचिंतन, देहादि वस्तूंची सर्वकाळ भावना, आणि जग हें सत्य आहे असें वाटणें, ह्याला मनाची बहिर्मुखता म्हणतात. अंतर्मुख म्हणजे ह्याचीच उलट स्थिति होय. हें सर्व जग मिथ्या होणें, सर्व विषय सदोष आहेत असें वाटणें, आणि सर्वदा ब्रह्माकार स्फूर्ति होणें, ही मनाची अंतर्मुखता समजावी. दृश्य वस्तु तेवढी अनात्म हें तत्त्व पूर्ण ठसून स्वस्वरूपाचे ठायीं चित्तवृत्ति निमग्न होणें हीच अंतर्मुखता. अशा प्रकारें अंतर्मुखता प्राप्त झाली, म्हणजे सर्व विश्व तृणप्राय होऊन त्याचें चिद्रूप अग्नींत भस्म होऊन जातें; मग चित्त तरी र-

होणार कोठून ? तरुकोटरांतर्गत वह्नि असतां त्या ठिकाणीं तृणबीज पेरल्यास त्याला अंकुर येत नाहीं, अथवा दावानल पेटला असतां तेथें कितीहि धान्याची पेरणी केली तथापि त्याला अंकुर येत नाहीं. ह्याप्रमाणेंच ब्रह्मज्ञानरूपी अग्नि प्रदीप्त झाला असतां चित्तादि भ्रम नाश पावतात.

हेय म्हणजे त्याज्य, आणि उपादेय म्हणजे ग्राह्य पदार्थ ह्यांची कल्पनाहि मनांत आणूं नये, म्हणजे चित्त विरून जाऊन द्वैताची प्रतीति होत नाहीं आणि चित्ताला अचित्तत्व येतें. उघडच आहे कीं, ह्या सर्वांला कारण जें अज्ञान, तेंच जर मुळीं नष्ट झालें, तर कार्यरूपी जें मन त्याला थारा कोठून होणार ? मनोलय झाला म्हणजे ग्राह्य—अग्राह्य गोष्टीहि त्याजबरोबरच नष्ट होणार. कारणाच्या अभावीं कार्य रहातच नाहीं हा सिद्धांत आहे.

मनाचा नाश म्हणजे त्याच्या वृत्ति नाहींशा करावयाच्या. रज, सत्त्व आणि तम ह्या मनाच्या तीन वृत्ति असून त्या जागृति, स्वप्न, व सुषुप्ति ह्यांमध्यें अनुक्रमें भासमान् होतात. जागृतावस्थेंत रजोमय चित्त असतें व त्याला घोर रूप प्राप्त होऊन मनाचें फारच चांचल्य होतें. स्वप्नावस्थेंत मन सत्त्वगुणेंकरून शांत असतें व सुषुप्त्यवस्थेमध्यें मनाला तमोगुणाच्या प्राबल्यामुळें मूढता प्राप्त होते. ह्या तिन्ही अवस्था जेथें नाहींत, तेथेंच मन मृत होतें म्हणजे मनोलय होतो; आणि वेदान्तशास्त्रांत सांगितलेली जी "तुर्यावस्था" त्या अवस्थेचा अनुभव येतो.

चित्ताच्या योगानें मनुष्याची चलनवलनाक्रिया कशी होते, हें पुढील वचनांत सांगितलें आहे.

चित्तं जानीहि संसारं बंधश्चित्तमुदाहृतः॥
पादपः पवनेनेव देहश्चित्तेन चाल्यते ॥ १

—योगवासिष्ठ

वायूच्या योगानें वृक्षाला चलनवलन होऊन त्याच्या शाखोपशाखा हालतात व त्याची स्थिरता नाहींशी होते, त्याप्रमाणें चित्त हें देहाला चळविणारें आहे. स्वस्थ असणाऱ्या आपल्या इंद्रियांला तें बलात्कारानें चेतवितें व त्यामुळें सुखदु:खाची प्राप्ति होते. तात्पर्य काय कीं, संसाररूपी जो दृढ बंध तो मनामुळेंच होतो. निर्विकार स्थिति आपल्याला व्हावी असेल तर मनोजयच केला पाहिजे. मनोजयानें अज्ञान नष्ट होऊन शमदमादि संपत्ति मिळते व स्वस्वरूपाची भेट होते. मनोजयामुळें सुखाचा सुकाळ होतो आणि दु:खाचा दुष्काळ पडतो, असें म्हटलें म्हणजे त्यांत सर्व येतें. मनोजय व्हावा म्हणून तीर्थव्रततपोदानादि लौकिकी क्रिया लोक करितात, परंतु हे उपाय भलतेच होत. ते संसृतीला मात्र कारण होऊन जगताचा बंध करितात. अशीं साधनें सुखाकरितां अंगीकृत केलीं तथापि तीं उलट दु:खालाच कारण होतात. त्यांनीं देहकष्ट मात्र होतो; स्वस्वरूपप्राप्ति होत नाहीं. परंतु पूर्वोक्त साधनांनीं क्षणभर मनोलय केला तर सुखानें स्वस्वरूपप्राप्ति होते. हीं दोन्ही साधनें आपले हातचीं आहेत. तेव्हां, ज्यानें खरी सुखप्राप्ति होईल, अशींच साधनें करावीं हें श्रेयस्कर होय.

ज्याच्यावर सद्गुरूचा अनुग्रह झाला असेल, त्यानें एकांतवासाचें सेवन करावें व गुरुवाक्याला अनुसरून योग्य रीतीनें मनोजय करावा. श्वासनिरोधेंकरून जो

मनोजय करावयाचा, त्यानें सिद्धि होतात खऱ्या, परंतु ब्रह्मप्राप्ति होत नाहीं. ती होण्यास विचार करून वेदांमध्यें सांगितलेलीं जीं "नेति नेति" वचनें, त्यांचा निदिध्यास करून द्वैतनिरसन करावें म्हणजे मनोलय होतो. तसेंच जे विजातीय पदार्थ त्यांस सन्मुख होऊं न देतां सजातीय जो स्वस्वरूपाकार तद्रूप होऊन रहावें. स्वस्वरूपीं विक्षेप कसा होतो, हें समजण्यासाठीं वेदान्तशास्त्रांत मनोवृत्तीचे पांच दोष सांगितले आहेत; ते आधीं नीट समजून घ्यावे. ते दोष न कळतां उगाच मन कोंडून राहूं लागलें तर त्यापासून फलप्राप्ति कांहींएक होत नाहीं. प्रपंचांत अगदीं गढून जाऊन बाहेरून मात्र समाधीचा डौल केल्यानें लौकिकी परमार्थ जरी साधला, तरी, आत्महित म्हणून जें आहे त्याची प्राप्ति होत नाहीं. खऱ्या परमार्थाची प्राप्ति व्हावी असेल तर लौकिकी दंभ टाकून सद्गुरूचेच पाय धरिले पाहिजेत. सद्गुरुपादसेवनानें मनोजय तत्काळ होतो. दुसऱ्या साधनांची अपेक्षा नाहीं. कामक्रोधादि षड्रिपूंचें दमन करण्यास श्रीमद्भागवताच्या दशम स्कंधांत उत्कृष्ट उपाय सांगितले आहेत; त्यांचें निरूपण करणें अवश्य आहे.

श्रीमद्भागवतांत मनोलयाचे उपाय पुढें लिहिल्याप्रमाणें सांगितले आहेत:—कामरिपु जिंकण्याचें मुख्य साधन, संकल्पविहीन होणें हें होय. काम जिंकिला म्हणजे क्रोधहि निश्चयानें जिंकिला जातो. लोभ जिंकण्याचें साधन, जगामध्यें दृग्गोचर होणारे सर्व पदार्थ अनर्थकारक आहेत अशी दृष्टि होणें हें होय. हृदयामध्यें भय वाटणें ही जी दुष्टवृत्ति आहे, ती तत्त्वज्ञानाच्या अभ्यासा-

नें जळून जाते. शोक आणि मोह हे सांख्यशास्त्राच्या अभ्यासानें नाहींसे होतात. आतां दंभाचे नाशाचा विचार करावयाचा. ह्या विकाराला श्रीमच्छंकराचार्यांनीं " स्वधर्मप्रकटीकरण " असें म्हटलें आहे. ज्ञानेश्वरानीं ह्याचा स्पष्टार्थ केला आहे. तो असा कीं—अंतःकरण भलतीकडे असून उगाच टिळेटोपी करून बसणें ह्याचें नांव **दंभ**. हा दोष दूर होण्यास साधुचरणसेवा ह्याशिवाय अन्य उपाय नाहीं. योगाभ्यास करीत असतां मध्यंतरीं जेणेंकरून विघ्नें उत्पन्न होतात त्या दुष्टवृत्तींचा नाश मौनानें करावा. आशेला निरिच्छतेनें जिंकावी. भूतमात्रांपासून आपणांस जीं आधिभौतिक दुःखें होतात, तीं अंतःकरणांत सर्वदा कृपा धारण करून जिंकावीं. आधिदैविक दुःखाचा नाश समाधीनें करावा. योगसामर्थ्यानें अध्यात्मदुःखांपासून दूर रहावें. निद्रादोष सत्त्वसेवनानें नाहींसा करावा. सत्त्वगुणाच्या प्रकर्षानें रज आणि तम हे गुण जिंकून टाकावे. सत्त्वगुणहि शांतीनें लीन करावा. हे गुणातीत होण्याचे मार्ग आहेत.

परंतु इतका क्लेश न करितां व एकेक रिपु जिंकण्याचा प्रयास न पडतां एकदम सर्वांस जिंकण्यास सद्गुरूचे चरण भावेंकरून धरावे हा सुलभ उपाय आहे. परमभक्तीनें ईश्वराचें अनन्यभजन केलें असतां तत्काल सर्व दुष्टवृत्तींचा लय होतो, आणि पूर्णत्वाचा लाभ होतो. खरोखर विचार केला असतां केवळ ज्ञानदीप व प्रकाशिता, असा जो सद्गुरु त्याशिवाय भजन करण्यास कोण योग्य आहे हो ? सद्गुरु आपल्या भक्ताला ब्रह्मस्थितीला पोहोंचवून रक्षण करणारा आहे. सद्गुरू-

शिवाय अन्यदेवतेचें पूजन करणें हा व्यभिचार होय. गुरुकृपा ज्याला फळास आली नाहीं, व जो भक्तीला विमुख, त्याचें सर्व पाठांतर व्यर्थ होय. ह्याला पंडितांच्या भाषेंत "कुंजरशौच" असें म्हणतात.

हस्तीतें धुतलें जळीं बसविलें मालिन्यहि नाशिलें।
तेणें तें पहिलें स्वकर्म वहिलें तीरींच आरंभिलें ॥
शुंडाग्रें धरिलें धुळीस; भरिलें सर्वांगहि आपलें ।
प्रायश्चित्त दिलें तथापि न भलें ज्याचें मन क्षोभलें ॥ १

—वामन

तद्वत् असल्या पुरुषांनीं केलेलें शास्त्रपठण व वेदाभ्यास व्यर्थ होत. फार कशाला, महावाक्याचा विचार जरी त्यांनीं केला असला, तरी तो गुरुभजनावांचून व्यर्थ होय. सद्गुरूला शरण जाऊन विमल भक्तीनें त्याला भजावें व त्यानें दाखविलेल्या मार्गानीं मन जिंकावें. शोक मोह एतद्रूपी मन आहे. तें जिंकण्याचा योगशास्त्रांत पुढील उपाय सांगितला आहे:-

हस्तं हस्तेन संपीड्य दंतैर्दंतांश्च पीडयन् ॥
अंगान्यंगैः समाक्रम्य जयेदादौ स्वकं मनः ॥ १

—योगवासिष्ठ

एकादा शूर व पराक्रमी पुरुष जिंकावयाचा असतां ज्याप्रमाणें क्रोधचेष्टा होतात, त्याप्रमाणें मन जिंकण्यासाठीं विचेष्टन करावें लागतें. चरण मोडून दृढासन घालावें, हातानें हात दडपून धरून ते बळानें चुरावे, आणि दांतओंठ रागानें खाऊन ,मन जिंकण्याचा प्रयत्न करावा. मन जिंकिलें म्हणजे विश्वभ्रांतीचा पसारा मोडून सुखसमुद्रामध्यें मनुष्य बुडून जातो. त्याला जन्ममरणाची भीति रहात नाहीं. मनाचें दमन करण्यास गुरुसांप्रदायाशिवाय आपण जे जे उपाय करितों, त्यांनीं मन

स्थिर होत नाहीं; तर उलट तें अधिकच चेततें.

मनाच्या पांच प्रकारच्या वृत्ति निरोधिल्या असतां निवृत्तिक जी स्थिति ती प्राप्त होते. तोच मनाचा पराजय अथवा मनोलय होय. त्या पंचवृत्ति न जिंकितां आपण मनोजय केला अशी बढाई मारणें म्हणजे देवानें तोंड दिलें आहे म्हणून कांहीं तरी बोलावयाचें असेंच म्हणावयाचें. सद्गुरुमुखानें मनोवृत्तीचें ज्ञान करून घ्यावें आणि मग मनोजय करण्यास लागावें म्हणजे प्रयास न पडतां तो होतो. वृत्ति निरोधिल्या असतां मन अपाप निवृत्तिक होतें. मनाच्या वृत्ति म्हणजे शाखा कोणकोणत्या आहेत त्या अगोदर चांगल्या समजून घेतल्या पाहिजेत, आणि त्या शाखांची छाटणी करण्यापासून आरंभ केला पाहिजे, म्हणजे खची चांगली होते. एकाद्या महाशूराला मारावयाचा असला तर आधीं त्याचे हातपाय छाटणें हितावह होय. श्री परशुरामानीं सहस्त्रार्जुनाला युद्धांत जेव्हां अनिवार झालेला पाहिला, तेव्हां अगोदर त्याचे हजार हात तोडून रास घातली, आणि मग त्याचा संहार केला, ही पुराणप्रसिद्ध कथा वाचकांस अवगत असेलच. एकाद्याचे हातपाय छेदून त्याला जर एका जागीं बसविला, तर तो पांगळा कांहीं केल्या बाहेर जाऊं शकणार नाहीं. ह्याप्रमाणेंच मनाची स्थिति आहे. मनाचे हातपाय म्हणजे त्याच्या पांच वृति छाटून काढून त्याला पांगळें करून टाकिलें म्हणजे मग तें कोठें धांवणार ? अर्थात् त्याचें नियमन होऊन तें जागच्या जागीं बसेल, म्हणजे स्वस्वरूपाचे ठायीं स्थिर होईल. मग कांहीं केलें तरी चित्तवृत्ति ढळणार नाहीं. केवळ प-

रब्रह्मामध्यें तें निश्चल होऊन जाईल, कोणत्याहि बाह्य-वृत्तीनें त्या स्थितीला मालिन्य येणार नाहीं.

आतां मनाच्या पांच वृत्ति व त्यांचीं लक्षणें ह्यांचें निरूपण करूं. त्या पंचवृत्ति म्हणजे १. प्रमाण, २. विपर्यय, ३. विकल्प, ४. निद्रा, आणि ५. स्मृति ह्या आहेत. ह्यांपैकीं प्रमाणवृत्तीचे प्रकार सहा आहेतः—१. प्रत्यक्ष, २. अनुमान, ३. उपमान, ४. शाब्द, ५. अर्थापत्ति आणि ६. अभाव. ह्या प्रत्येकाचें थोडें विवेचन करणें अवश्य आहे. प्रत्यक्ष प्रमाणाचें निरूपण गदाधर-भट्टाचार्य म्हणून जे महान् नैय्यायिक होऊन गेले, त्यांच्या ग्रंथांत सर्वोत्कृष्ट केलेलें आहे. घटपटादि पदार्थ जे आपणांस नेत्रांनीं भासमान् होतात, ज्या ज्या वस्तूंची श्रवणानें प्रतीति होते, ज्या ज्या गंधाचें घ्राणेंद्रियानें ज्ञान होतें, जो जो स्पर्श त्वगिंद्रियास व्यक्त होतो, आणि जी जी रसवत्ति रसनेंद्रियास गोचर होते, ती ती **प्रत्यक्ष** समजावी व तें तें **प्रत्यक्ष प्रमाण** समजावें.

पर्वतो वह्निमान् धूमात् ।

म्हणजे धूर दिसला तर अग्नि तेथें आहे असा अंदाज करणें ह्याला **अनुमान** असें म्हणतात.

गोसदृशो गवयः ।

म्हणजे गवा गाईसारखा असतो असें सांगण्यानें जें परस्परसादृश्याचें ज्ञान होतें, त्याला **उपमान** म्हणतात. तो काय सिंह आहे, त्याचें मुख चंद्रासारखें आहे, इत्यादि रीतीनें एका वस्तूला दुसऱ्या उपमा द्यावयाच्या, आणि त्यावरून ज्ञान व्हावयाचें त्यालाच उपमान म्हणतात.

**शाब्द** म्हणजे शब्दांनीं सांगितल्यामुळें वस्तुज्ञान होतें तें.

नदीतीरे पंचफलानि सन्ति ।

नदीचे कांठीं पांच फळें आहेत असें एकानें दुसऱ्यास सांगितलेलें ऐकून त्या दुसऱ्या पुरुषाला त्याबद्दल जें ज्ञान होतें, त्याला शाब्द प्रमाण म्हणावयाचें. सद्गुरुमुखानें महावाक्याचें ज्ञान करून घेऊन पूर्णब्रह्म अनुभवास येणें ही योगमार्गांतील शाब्दप्रमाणाची खूण होय. असो. आतां अर्थापत्तिबद्दल विचार करूं.

पीनो देवदत्तः दिवा न भुंक्ते ।

देवदत्त नामक पुरुष दिवसास तर जेवीत नाहीं, असें असून चांगला धष्टपुष्ट आहे असें म्हटलें तर त्यावरून

रात्रौ भोजनमन्विष्यते ।

म्हणजे तो रात्रीं जेवीत असेल अशी जी भावना होणें त्याला **अर्थापत्ति** असें म्हणतात. आतां सहावा प्रकार **अभाव.**

यत्र घटो नास्ति तत्र घटाभावः ।

म्हणजे घट जेथें नाहीं तेथें घटाभाव समजावयाचा. तेव्हां षड्विध प्रमाण ही चित्ताची पहिली वृत्ति होय.

शुक्ताविदं रजतं ।

म्हणजे शिंपीच्या ठिकाणीं हें रुपें आहे अशी भावना होणें किंवा किरणाच्या ठायीं मृगजलाचा अथवा रज्जूच्या ठायीं सर्पाचा भ्रम होणें, ह्या वृत्तीला **विपर्यय** म्हणतात. एकादी वस्तु आपणास चांगली माहित असतां तिचे ठिकाणीं जो दुसरा कांहीं भास होणें, तो विपर्यय समजावयाचा. आतां विकल्पाचें लक्षणः—

वंध्यापुत्रः । व्योमसुमनः ।

म्हणजे ‘ वांझेचा मुलगा ’ किंवा ‘ आकाशपुष्प ’ ह्या शब्दांनीं तद्विषयक जी चित्तवृत्ति होते, तिला **विकल्प** म्हणावयाचें. विकल्प ह्याचा लौकिकी अर्थ “ असत्याचें स्मरण होणें ” हा आहे. मुख्य विकल्प म्हणून जो, तो संशय. ही वस्तु आहे कीं नाहीं ? असा संदेह उत्पन्न होणें, ही विकल्पाची खूण समजावी.

मनाच्या पांच वृत्तींपैकीं प्रमाण, विपर्यय आणि विकल्प ह्या तिहींचें निरूपण झालें. आतां निद्रा आणि स्मृति ह्यांचा विचार करावयाचा. **निद्रा** ह्या वृत्तीच्या योगानें आत्मस्वरूपस्थितीपासून च्युति होते. स्वस्वरूपास विघातक व मनुष्याला भवसागरांत पाडणारी ही निद्रा आहे. आतां स्मृति म्हणजे पूर्वीं अनुभव झालेल्या वस्तूचें जें यथार्थ स्मरण त्याचें नांव **स्मृति**. तेव्हां ह्या ज्या पांच प्रकारच्या मनाच्या वृत्ति यांचें अगोदर नियमन झालें पाहिजे; तें झालें म्हणजे निवृत्तिकस्थिति प्राप्त होऊन मनोजय होतो.

जागृति, स्वप्न, सुषुप्ति ह्यांच्याच पोटांत वर सांगितलेल्या पंचवृत्तींचा समावेश होतो, म्हणून हें अवस्थात्रय टाकिलें असतां “ साक्षित्व” म्हणून जी सर्वोत्कृष्ट अवस्था योगशास्त्रांत वर्णिली आहे, त्या स्थितीचा अनुभव येतो. साक्षिस्वरूप धूर्तपणें जाणिलें असतां तत्क्षणींच मनादिकांचा अभाव होतो, आणि मनोलय होण्यास हाच मुख्य उपाय होय. चित्ताचें नियमन करून जे मनोजय करूं शकत नाहींत व केवळ लौकिकी दंभ माजवितात त्यांला खरोखर लाज वाटली पाहिजे. वसिष्ठांनीं म्हटलें आहे:—

चित्तमेकं न शक्नोति जेतुं स्वातंत्र्यवर्जितः ॥
ध्यानवार्तां वदन्मूढः स किं लोके न लज्जते ॥ १
—योगवासिष्ठ

आपलें चित्त जो जिंकू शकत नाहीं, त्याची स्वतंत्रताच हरपली असें समजावें. चित्त जिंकिलें नाहीं तर विषयवासनेची वृद्धि होऊन स्वातंत्र्य आणि ज्ञातेपण हीं नष्ट होतात. मनोजय न करितां आपण ध्यानस्थ असतों अशी बडबड कोणीं केली तर ती उपहासाला मात्र कारण होते.

चित्त स्वाधीन ठेवण्याचा प्रयत्न प्रत्येकाच्या आधीन आहे. मनुष्याला विषयासक्ति कां होते? चित्ताचें नियमन करण्याच्या अभ्यासामध्यें उदासीनता कां येते? आणि तो अभ्यास केला तरी फलप्राप्ति कां होत नाहीं? असे तीन प्रश्न एथें उत्पन्न होतात. त्यांचीं उत्तरें अशीं आहेत कीं—अंगीं वैराग्य न बाणल्यामुळें विषयासक्ति होते, अनादरामुळें लोक अभ्यास करीत नाहींत, आणि तो निरंतर झाला नाहीं म्हणजे फलप्राप्ति होत नाहीं. यास्तव वैराग्य, आदर आणि नैरंतर्य ह्या तिन्ही प्रकारांचें साहाय्य घेतलें पाहिजे. वैराग्यानें विषयासक्ति नाहींशी होऊन चित्तविक्षेप घडत नाहीं. आणि आदरबुद्धि झाली असतां अभ्यासाविषयीं उदासीनता येत नाहीं. मनोजयाचा मुख्य उपाय अभ्यासच आहे. तो निरंतर केला पाहिजे. मन अभ्यासामध्यें अखंड घालण्यास जर कठिण पडूं लागलें, तर क्षणभर आपल्या चित्ताला त्याच्या कलानेंच वागूं द्यावें, पण लागलेंच त्याला इष्ट मार्गावर आणून सोडिलें पाहिजे. एकादा दांडगा घोडा असला म्हणजे तो सरळ वाटेनें जात नाहीं, तेव्हां त्याला

जो शिकविणारा असतो, तो प्रथम नीट मार्गानें जाण्याला त्याला शिकवितो. एकाद वेळ मध्यें चुकलाच तर कांहीं वेळ मर्जीप्रमाणें जाऊं देतो; पण मग लागलाच खेंचून त्याला मार्गावर आणितो. ह्याप्रमाणेंच मनाचेंहि आहे. ज्ञानी लोक मन जिंकण्याचा निरंतर अभ्यास करितात. क्षणभर ते मनाच्या इच्छेप्रमाणें वागतात, व लागलींच त्याला इष्टमार्गावरहि आणितात. तात्पर्य—वैराग्य, आदर, आणि नैरंतर्य यांचा नित्य अभ्यास केला म्हणजे चित्त स्वाधीन होतें.

एक एव मनो देवो ज्ञेयः सर्वार्थसिद्धिदः ॥
अन्यत्र विफलक्लेशः सर्वेषां तज्जयं विना ॥ १

—योगवासिष्ठ

सर्व क्लेशकर्में सोडून एक मनोजय करावा म्हणजे मनरूपी देव सर्वसिद्धि देतो. सकलेंद्रियांच्या वृत्ति मनाच्या साहाय्यानें प्रकाशित होतात. म्हणून मनाला देव ही संज्ञा आहे. देव शब्द संस्कृत दिव्=प्रकाशणें ह्या धातूपासून झालेला आहे.

भीष्मोहि देवः सहसः सहीयान् ।

असें श्रीमद्भागवतांत श्री कृष्णानीं उद्धवास सांगितलें आहे. त्याचा अर्थ असा कीं मनाचें स्वरूप फार उग्र आहे, म्हणून अगोदर त्या मनालाच ज्ञेय म्हणजे ज्ञानगम्य वस्तु करावी. सर्व पदार्थांचें ज्ञान करून देणारें जें मन त्याच्याच वृत्ति अगोदर समजून घेऊन त्यांचें नियमन करण्यास शिकावें. म्हणजे मन ज्ञेय कसें होतें तें कळतें.

अनुद्वेगः श्रियोमूलमनुद्वेगात्प्रवर्तते ॥
जंतोर्मनोजयादन्यत्त्रैलोक्यविजयस्तृणं ॥ १

—योगवासिष्ठ

कोणताहि संकल्प मनांत येऊं न देणें हाच मनोजय असा अनुद्वेग सिद्ध झाला असतां मोक्षरूप लक्ष्मी प्राप्त होते. मनोजयाशिवाय त्रैलोकप्राप्ति झाली तरी ती व्यर्थ होय. ज्यानें एक मन जिंकिलें, तो खरा महाशूर समजावयाचा. मोठाले अतिरथी--महारथी त्रैलोक्य जिंकितील, परंतु मनाला जिंकणारा पृथ्वी धुंडाळिली तरी सांपडणें विरळा !

सत्संग, वासनात्याग, आत्मज्ञानविचार आणि प्राणस्पंदनिरोधन हे मनोजयाचे चार उपाय आहेत; त्यांमध्यें सत्संग हा सर्व उपयांचें सार होय. मनोजयाच्या सर्व साधनांपैकीं साधुसंग हें शिरोरत्न आहे. साधुसंगतीचा महिमा फार मोठा आहे. तेणेंकरून आपला आत्मा असंग होऊन देहबुद्धि नष्ट होते, सत्कर्माचें अनुष्ठान घडतें. जपतपादि करावींशीं वाटतात. पूर्ण वैराग्य अंगीं बाणूं लागतें, आणि आत्म्याची खूण अनुभवास येते. मनाचें पूर्ण रीतीनें भस्म होण्यास साधूच्या चरणधूलीचें अवगाहन केलें पाहिजे. श्रीमद्भगवद्गीतेंतील

तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ॥

ह्या श्लोकावर ज्ञानेश्वरानीं केलेल्या टीकेंत असें सांगितलें आहे कीं--उत्तमज्ञानप्राप्तीची इच्छा असेल तर सर्वस्वेंकरून संतांला भजावें. " संत ज्ञानाचें घर असून सेवा हा त्या घराचा उंबरठा आहे. " यास्तव निराभिमान होऊन कायावाचामनानें संतचरणीं लागावें, म्हणजे जें जें अपेक्षित असेल तें तें सर्व ते सांगतील व त्यानें अंतःकरणास बोध होऊन मन कल्पनारहित होईल, असा सत्संगतीचा महिमा आहे. असो.

**वासनात्याग** हें मनोजयाचें दुसरें साधन होय. चित्ताच्या ज्या निरनिराळ्या वृत्ति त्या **वासना** होत. मनापासून वृत्ति उठूं लागल्या असतां साक्षिस्वरूपाकडे लक्ष देऊन त्यांचा लय केला पाहिजे. वासना जागृत होऊन विषयाकार संकल्प होऊं लागल्याबरोबर, त्यांस दाबून पदार्थाकार कधीं होऊं देऊं नये. स्वस्वरूपासून भिन्न जो अनात्मवर्ग तो स्वरूपाकार करण्यांत झटलें असतां वासनात्याग सहज होतो.

**आत्मज्ञानविचार** हें तिसरें साधन होय. आत्मविद्येच्या योगानें मनाचा मनपणा नाहींसा होतो. आत्मा कोणता व अनात्मा कोणता ह्याचा विवेक केला असतां, मनोजय पूर्ण होतो. आत्मज्ञान हेंच मनोलयाचें मुख्य कारण होय, व श्रवण, मनन, निदिध्यासन ह्या साधनांनीं मनाचें भस्म होतें.

आतां ज्याच्या योगानें वायुधारण करण्याची शक्ति येऊन मनोजयहि होतो, अशा आर्यतत्त्वज्ञानांतील प्राणस्पंदनिरोधन ह्या चवथ्या साधनाचे निरूपणाकडे आपण वळूं.

वायूचा निरोध केला असतां मनोलय होतो व मनाचा निरोध केला असतां प्राणजय होतो. ह्या परस्परावलंबनाविषयीं योगशास्त्रांत पुढील आधार आहेतः—

पवनो बध्यते येन मनस्तेनैव बध्यते ॥
मनश्च बध्यते येन पवनस्तेन बध्यते ॥ १
मनो यत्र विलीयेत पवनस्तत्र लीयते ॥
पवनो लीयते यत्र मनस्तत्र विलीयते ॥ २

—**हठयोगप्रदीपिका**

याचा अर्थ असा आहे कीं, जो योगीपुरुष प्राणवायूला

बद्ध करूं शकतो, तोच मन बद्ध करूं शकेल. तसेंच जो योगी मन बद्ध करूं शकतो, तो प्राणवायूला बद्ध करूं शकेल. ज्या आधारचक्राच्या ठिकाणीं मन लीन होतें, त्याच चक्रामध्यें प्राणवायूहि लीन होतो, तसेंच वायु ज्या आधारचक्रांत लीन होतो, त्याच चक्रामध्यें मनहि आपोआप लीन होतें. ज्यांला योगशास्त्राचा अभ्यास करावयाचा असेल, त्यांनीं वरील वचनांचा पूर्ण अभ्यास करून स्वानुभव घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आर्य लोकांच्या स्नानसंध्येचें व तपश्चर्येचें मूळ बीज ह्यांतच आहे. वायुनिरोधनासाठीं दृढासन देऊन बसल्यानंतर देहांतील षट्चक्रें मनांत आणावीं लागतात. योगशास्त्रांत ह्या चक्रांला पुढील नांवें आहेत:—१.आधारचक्र, २.लिंगचक्र, ३. नाभिचक्र, ४. हृदयचक्र, ५. कंठचक्र आणि ६. आज्ञाचक्र ( भृकुटिमध्य ). ह्या प्रत्येक चक्रामध्यें एकेका देवतेची कल्पना करून त्या ठिकाणीं वर्णात्मक देवताहि योगी स्थापन करितात. भावनाशास्त्राच्या जोरावर हें सर्व घडवून आणावें लागतें.

भावनादार्ढ्यात् निग्रहानुग्रहसामर्थ्यात् ।

असें वचन परशुरामसूत्रांत आहे. त्याचा भावार्थहि वर सांगितल्याप्रमाणेंच आहे. म्हणजे तपश्चर्येच्या कामीं शरीरांतील नियमित चक्रांत देवतांची व वर्णात्मक देवतांची भावना प्रथम करावी लागते. स्नानसंध्या पुरी होईपर्यंत त्या त्या चक्रस्थानीं त्या त्या देवता स्थिर आहेत, असा तपस्व्याचा दृढ ग्रह व्हावा लागतो. प्राणवायु व अपानवायु ह्यांचें दृढैक्य करून “ कुंडलिनी ” नांवाची जी नाडी, ती योगानें जागृत करावी लागते. ह्या नाडीला योगशा-

ह्यांत फारच महत्त्व दिलेलें असून तिला " शांभवी शक्ति " असें म्हणतात. ती नाडी उत्तेजित होण्यापूर्वी निजले-ल्या नागिणीप्रमाणें असते. विद्युल्लतेच्या देदीप्यमान् रे-खेचें सादृश्य ह्या नाडीला देतात. ही नाडी उत्तेजित झाली म्हणजे सुषुम्नेचें द्वार मोकळें होऊन प्राणवायु षट्-चक्रांतून ऊर्ध्वगतिक होतो. अर्थात् ज्या ज्या चक्रांत प्राणवायूचा प्रवेश होईल, त्या त्या चक्रांत मन अवश्य जाऊन राहिलेंच पाहिजे. किंवा उलट रीतीनें पाहतां मन ज्या ज्या चक्रांत जाईल, त्या त्या चक्रांत प्राण-वायु अवश्य जाऊन राहिलाच पाहिजे. ह्याप्रमाणें षट्-चक्रांतून प्राणवायूची खरोखर ऊर्ध्वगति झाली असतां, त्याला **हठयोग** म्हणतात; आणि केवळ भावना शास्त्रानें म्हणजे अमुक चक्रांत प्राणवायु व मन गेलीं आहेत, अशी कल्पना करून तेथील देवतेचें आराधन करणें, ह्याला **राजयोग** असें म्हणतात.

हठयोग किंवा राजयोग यांपैकीं कोणत्याहि प्रकारानें कां होईना, मनोजय झाला म्हणजे मनुष्यास सर्व प्रकारची पूर्णता प्राप्त होते; आणि ती प्राप्त झाली म्हणजे मोक्षसं-पत्ति त्याला माळ घालिते व तो केवळ सुखस्वरूप होतो.

पूर्णे मनसि संपूर्णं जगत्सर्वं सुधाद्रवैः ॥
उपानद्गूढपादस्य ननु चर्मास्तृतैव भूः ॥ १

—**योगवासिष्ठ**

आपल्या पायांत जोडा असला म्हणजे सर्व पृथ्वी च-र्मानें आस्तृत आहे असें आपणांस जसें वाटतें, त्याप्रमा-णेंच ज्याचें मन ब्रह्माकार होऊन पूर्ण झालेलें असतें, त्याला सर्व जग ब्रह्मत्वानें परिपूर्ण भरलें आहे असें वा-

टूं लागतें; व अंतःकरणांत सांठलेलें जें ज्ञानामृत, तें सर्वें-द्रियांच्या द्वारें द्रवूं लागून सर्व विश्वपसारा त्याच्या मनाला ब्रह्ममय भासूं लागतो.

द्वौ क्रमौ चित्तनाशाय योगो ज्ञानं च राघव ॥
योगश्चित्तनिरोधोहि ज्ञानं सम्यगवेक्षणं ॥ १

**—योगवासिष्ठ**

चित्तनाश होण्याला योग आणि सांख्य हे दोन मार्ग सर्वांत श्रेष्ठ होत. चित्तवृत्तिनिरोध करणें ह्याला **योग** म्हणतात, आणि सम्यक्—अर्थात् उत्तम प्रकारचें जें आत्मानात्मवस्तूचें ज्ञान, त्याला **सांख्य** असें म्हणतात. योग आठ प्रकारचा आहे. ते प्रकार असः—१. यम, २. नियम, ३. आसन, ४. प्राणायाम, ५. प्रत्याहार, ६. ध्यान, ७ धारणा, आणि ८ समाधि.

आतां अष्टांगयोगांतील प्रत्येकाचीं लक्षणें थोडक्यांत निरूपित करावयाचीं. पहिला योग

**यम**

होय. त्याचे बारा प्रकार आहेत, ते येणेंप्रमाणें:—अहिंसा, सत्य, अस्तेय, असंग, ऱ्ही, असंचय, आस्तिक्य, ब्रह्मचर्य, मौन, स्थैर्य, क्षमा आणि अभय. ह्या यमांचा अभ्यास नेहमीं केला पाहिजे. ज्ञानेश्वरीमध्यें प्रत्येक यमाचें चांगलें ज्ञान करून दिलेलें आहे. ( १ ) **अहिंसा** ह्याचा सामान्य अर्थ प्राणिमात्राची हिंसा न करणें असा आहे, परंतु योग्याच्या दृष्टीनें अहिंसेचा अर्थ दुसराच आहे. शब्दादिकांच्या योगानें कधींहि कोणास दुःख न देणें हें अहिंसेचें परमलक्षण होय. गीतेवर टीका करणाऱ्या **वामनपंडितासारख्या** महंतानींहि अहिंसेचें हेंच प-

रमलक्षण म्हटलें आहे. ( २ ) **सत्य**—म्हणजे अल्पहि फायद्यासाठीं तोंडांतून अनृत भाषण न काढितां सर्वदा सत्य भाषण करणें हें होय. परमहंस ब्रह्मानंदस्वामींनीं "योगकल्पद्रुम" ग्रंथांत सत्याचा अर्थ केला आहे. तो असा कीं,—कोणत्याहि इन्द्रियानें कोणत्याहि वस्तूचें ज्ञान ज्याप्रमाणें झालें असेल, त्याप्रमाणें वाणीनें उच्चार करणें आणि ह्याप्रमाणें झालेल्या प्रत्यक्षज्ञानावरून न्यायशास्त्राधारें जो अनुमानानें निश्चय होतो, त्याप्रमाणें भाषण करणें हें सत्य होय. सत्याचा तिसरा अर्थ असा करितात कीं,—आपले गुरु किंवा परमपूज्य मातापितरें, ह्यांच्या मुखानें आपण जें ऐकिलें, तें जसेंच्या तसेंच वाणीनें उच्चारणें व सर्व भूतमात्रांचें जेणेंकरून कल्याण होईल असें भाषण करणें ह्याला सत्य म्हणावयाचें. ( ३ ) **अस्तेय**—दुसऱ्याचा म्हणून जो जो पदार्थ, मग तो तृणादिक कां असेना त्यास हात लावावयाचा नाहीं, व मन, वाणी आणि शरीर ह्या तिहींनींहि परद्रव्याची अपेक्षा करावयाची नाहीं ह्यालाच अस्तेय म्हणावयाचें असा अर्थ याज्ञवल्क्यऋषींनीं केला आहे. ( ४ ) **असंग**-ह्याचा अर्थ कोणाशींहि संसर्ग न करणें एवढाच आहे. ( ५ ) **ऱ्ही**—म्हणजे लज्जा. ती लज्जा कोणती? तर आपण स्वतः ब्रह्मरूप असूनहि देहरूप पावलों असतां आत्मघात करण्यास प्रवृत्त होतों. हीच लज्जा. ( ६ ) **असंचय**—म्हणजे वित्तादिकांचा संग्रह न करणें हें होय. द्रव्यसंचय केला असतां दारुण दुःखें भोगावीं लागतात, म्हणून ज्ञानी लोक त्याचा संग्रह करीत नाहींत. निष्किंचन, व निष्परिग्रह ह्या अवस्थेंत ज्ञानी लोकांनीं असावें

असें गीतादि शास्त्रांत सांगितलें आहे, तें ह्याकरितांच. द्रव्यसंचय अंतःकरणांत एकदम भीति उत्पन्न होण्यास कारण होतो. प्रेमळा राणीनें दिलेलें सोनें मत्स्येंद्रनाथाच्या झोळींत पडल्याबरोबर त्याला भीति उत्पन्न झाली; परंतु तें सोनें गोरखनाथानीं काढून त्याठिकाणीं धोंडे भरल्याबरोबर त्यांची भीति गेली, ही संतलीलामृतांतील कथा आमच्या वाचकांस अवगत असेलच. ( ७ ) **आस्तिक्य**—म्हणजे गुरूनें वेदान्ताचा जो उपदेश केला असेल, त्याबद्दल मनांत कधींहि संशय येऊं न देतां तो उपदेश सत्य मानून त्यावर पूर्ण भरंवसा ठेवणें, व त्याप्रमाणें अभ्यास करणें ह्याला आस्तिक्य म्हणतात. (८) **ब्रह्मचर्य**—म्हणजे आठ प्रकारचें जें मैथुन सांगितलें आहे तें वर्ज करून शुद्धांतःकरणानें राहणें, ह्याला ब्रह्मचर्य म्हणावयाचें. शरीरानें प्रत्यक्ष स्त्रीसंभोग करणें ह्याला व्यवहारांतील मैथुन असें म्हणतात, परंतु कामशास्त्रांत

स्मरणं कीर्तनं केलिः प्रेक्षणं गुह्यभाषणं ॥
संकल्पोऽध्यवसायश्च क्रियानिर्वृत्तिरेव च ॥ १
एतन्मैथुनमष्टांगं प्रवदन्ति मनीषिणः॥—**दक्षसंहिता**

ह्या प्रकारें मैथुनाचे आठ प्रकार सांगितले आहेत. स्त्रियांचें स्मरण, त्यांचें सौंदर्यवर्णन, त्यांजकडे कामदृष्टचा अवलोकन, त्यांचा उपभोग घेण्याची इच्छा धरणें आणि क्रियानिष्पत्ति म्हणजे इच्छितभोग संपादन करणें हें मैथुनच होय. इत्यादि आठहि विकारांपासून अगदीं अलिप्त राहणें ह्यालाच खरें ब्रह्मचर्य म्हणावयाचें. ( ९ ) **मौन**—म्हणजे ग्राम्यवार्तांचें अर्थात् नीच भाषणाचें सर्वदा वर्जन करणें ह्याला मौन म्हणावयाचें. (१०) **स्थैर्य**-

म्हणजे योगाभ्यास करीत असतां मध्यंतरीं अनेक विघ्न-कल्होळ उठतात; तथापि त्यांला न जुमानतां आपला अभ्यास कायम ठेवणें ह्याला स्थैर्य किंवा धैर्य म्हणावयाचें. ह्या स्थैर्यावस्थेचें निरूपण भर्तृहरीनीं—

विघ्नैः पुनःपुनरपि प्रतिहन्यमानाः
प्रारब्धमुत्तमजना न परित्यजंति ॥

ह्या श्लोकांत उत्कृष्ट केलें आहे. तसेंच,

न प्राणान्ते प्रकृतिविकृतिर्जायते सज्जनानाम् ।

ह्या सुभाषितांतहि स्थैर्यावस्थेची महती वर्णन केली आहे. ( ११ ) **क्षमा**—ह्याचा अर्थ दुष्टांनीं ताडन केलें असतां, अपमान केला असतां, किंवा कठोर भाषणानें पीडा केली असतां तीं सर्व सहन करणें ही क्षमा होय. दुसऱ्याच्या दुर्वचनाबद्दल त्याला आपण पीडा न देतां हर्ष मानून राहिलें असतां पीडा करणाऱ्या पुरुषाच्या पुण्याचा क्षय होतो, असें महाभारतांत व स्मृतींत सांगितलें आहे. शीतोष्ण, रागद्वेष, सुखदुःख इत्यादि द्वंद्वें सहन करून निर्द्वंद्व स्थितींत असणें ह्याचा ज्ञात्यांनीं क्षमा शब्दांत समावेश केला आहे. ( १२ ) **अभय**—म्हणजे योगाभ्यास करीत असतां सिद्धि होईल कीं नाहीं? व आणखी विघ्नें उत्पन्न होतील कीं काय? अशा संशयांनीं जी भीति मनांत उत्पन्न होते, त्या भीतिबिरहित सर्वदा राहणें हें होय. ह्याप्रमाणें हे यम योगाचे बारा प्रकार झाले. आतां दुसऱ्या

## नियम

योगाचे अकरा प्रकारांचें वर्णन करावयाचें. हे अकरा प्रकार असे आहेतः—

शौचं जपस्तपो होमं श्रद्धातिथ्यं मदर्चनं ॥
तीर्थाटनं परार्थेहा तुष्टिराचार्यसेवनं ॥ १

—**योगवासिष्ठ**

नियम योगाचा पहिला प्रकार **शौच**—म्हणजे शुद्धि. ती दोन प्रकारची आहे:—बाह्यशौच आणि आंतरशौच. मृत्तिकाजलादिकेंकरून शरीरमल धुणें, ह्याला **बाह्यशौच,** आणि प्राणायामादिकेंकरून शरीरांतर्गत नाडींची शुद्धि करून व देवतांची उपासना करून जी मनाची शुद्धि करणें, ह्याला **आंतरशौच** म्हणतात. (२) **जप**—म्हणजे गायत्री-प्रणवादिक पवित्र मंत्रांचें ग्रहण गुरुमुखद्वारें ज्याप्रमाणें केलें असेल, त्याप्रमाणें आवर्तन करणें किंवा वेदांचें अथवा सच्छास्त्राचें अध्ययन करीत बसणें ह्याला जप म्हणावयाचें. (३) **तप**—म्हणजे कृच्छ्रादिक कर्मे श्रद्धायुक्त होऊन सर्वभावानें करणें. ( ४ ) **होम**—म्हणजे अग्निहोत्रादि कर्मे करून अग्नीची जी उपासना करणें, त्याला होम म्हणतात. ( ५ ) **श्रद्धा**—गुरूच्या ठायीं ईश्वरबुद्धि राहणें ह्याला श्रद्धा म्हणतात. गुरूची योग्यता ईश्वराप्रमाणें मानिली पाहिजे. म्हटलेंच आहे:—

यस्य देवे पराभक्तिर्यथा देवे तथा गुरौ ॥

—**श्वेताश्वतर**

ज्या पुरुषाची ईश्वरावर परमभक्ति आहे, व जो गुरूच्या ठिकाणीं ईश्वराप्रमाणेंच परमशक्ति आहे असें मानितो, त्याला पूर्ण श्रद्धावान् म्हणतात. ( ६ ) **आतिथ्य**—म्हणजे अग्नि किंवा अतिथि यांचें श्रद्धापूर्वक भजन करणें. ( ७ ) **अर्चन**—म्हणजे ईश्वराचें भजन, पूजन करणें हें होय. ( ८ ) **तीर्थाटन**—चित्तशुद्धीसाठीं

श्रीशैल्यमाल्लिकार्जुनादि तीर्थांच्या ठिकाणीं जाऊन तेथील पवित्रोदकानें स्नान करून तत्रस्थ देवतांचें भजनपूजन करणें हें होय. अनेक पवित्र क्षेत्रांतील ईश्वरप्रणीत विभूतींचें प्रत्यक्ष दर्शन होऊन त्यानें चित्तशुद्धि होते, हा तीर्थाटनापासून मुख्य फायदा आहे. ( ९ ) **परार्थेहा**—म्हणजे परोपकार करण्यास व परहित साधण्याविषयीं सर्वदा उत्सुक असणें. ( १० ) **तुष्टि**—यदृच्छेनें जो लाभ होईल तेवढ्यांत आनंद मानून असणें, ह्याला तुष्टि म्हणतात. ( ११ ) **आचार्यसेवन**—म्हणजे एकाग्र मनानें गुरुभजन करून सद्गुरूचा संतोष करणें, व तद्द्वारा आपणावर ईश्वरानुग्रह करून घेणें, ह्याला आचार्यसेवन म्हणतात. ह्याप्रमाणें नियम योगाचीं अकरा प्रकारचीं लक्षणें झालीं. आतां अष्टांग योगांपैकीं तिसरा योग

**आसन**

याबद्दल विचार करावयाचा. आसन सिद्ध होणें हा प्राणायामाचा मुख्य पाया आहे. स्नानसंध्येस आरंभ करण्यापूर्वी एकान्त स्थलीं सिद्धासन, पद्मासन, स्वस्तिकासन इत्यादि आसनांपैकीं कोणतें तरी एक आसन घालून बसावें लागतें. ह्या आसनांपासून पुष्कळ फायदे आहेत. त्यांपैकीं पहिला फायदा शरीरांत स्वाभाविक उत्पन्न होणारा **आळस नाहींसा होतो** हा आहे. दुसरा फायदा **उपस्थबलक्षय** होणें हा आहे. लिंगस्थान व गुदस्थान ह्यांच्यामध्यें जी एक शिवण आहे, त्या शिवणींत जी नाडी आहे, त्या नाडीच्या द्वारें नेहमीं वीर्यनिर्गमन होऊन उपस्थेंद्रियाचें बल वाढत असतें; तें बल, सिद्धादिक आसनें करून डाव्या पायाच्या घोट्याचा दाब त्या

शिवणीवर बसविला म्हणजे नाहींसें होतें. तिसरा फायदा **अनिल-निरोध-पटुत्व**—म्हणजे, प्राणवायूचा निरोध करण्याचें सामर्थ्य येतें हा आहे. चालत असतां किंवा शयनावर असतां प्राणगति कुंठित करणें अशक्य आहे. प्राणावरोधाचा अभ्यास करण्यास दृढासन देऊन बसणें हेंच अगोदर साध्य झालें पाहिजे. चवथा फायदा **अनूर्मिता**—म्हणजे क्षुधा, तृषा, राग, द्वेष, शीत, उष्ण ह्या शरीरांत उत्पन्न होणाऱ्या ज्या सहा लाटा, त्यांचें दमन आसनामुळें होतें व त्या लाटांची पीडा होत नाहीं. ह्याबद्दल पातंजल योगशास्त्रांत पुढील वचन आहेः—

ततो द्वंद्वानभिघातः ।

म्हणजे आसनजय झाला असतां शीतोष्णादिक द्वंद्वांची बाधा होऊं शकत नाहीं.

आसनापासून शेवटचा फायदा **पवनमंथरता** होय. म्हणजे आसनाच्या योगानें प्राणवायूची गति मंद मंद होऊं लागते, आणि ती मंद होणें प्राणायामाला फारच साहाय्यकारक होतें.

आसन साध्य होणें ही योगसाधक पुढें काय करणार याची कसोटीच आहे. एका आसनावर बराच वेळ एकसारखें बसणें एवढें जर साधलें नाहीं, तर योगाभ्यास काय होणार? आसनाची सिद्धि उत्तम होण्याकरितां शेष जो नाग, त्याचें स्मरण करावें असें सांगितलें आहे.

अनन्तं प्रणमेद्देवं नागेशं पीठसिद्धये ॥

**—हठप्रदीपिका ज्योत्स्ना**

याप्रमाणें आसनसिद्धि झाली म्हणजे मग प्रणवाचा जप करून प्राणायामास आरंभ करावा.

आसनजय झाल्यानंतर विद्यागुरूस नमस्कार करावा, आणि आधारादि षट्चक्रांमध्यें गणेशादि देवतांची भावना करून योग्य वर्णांची स्थापना करावी. कोणत्या चक्रांत कोणती देवता स्थापना करावी, व वर्णमय देवता कशा बसवाव्या हें पुढील कोष्टकावरून समजेल.

| चक्र | देवता | वर्ण |
|---|---|---|
| आकार | गणेश | व, श, ष, स. |
| लिंग | ब्रह्मा | ब, भ, म, य, र, ल. |
| नाभि | विष्णु | ड, ढ, ण, त, थ, द, ध, न, प, फ. |
| हृदय | महादेव | क, ख, ग, घ, ङ, च, छ, ज, झ, ञ, ट, ठ. |
| कंठ | जीवात्मा | अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ॡ, ए, ऐ, ओ, औ, अं, अः |
| आज्ञा | गुरु | ह, क्ष. |

साधक पुरुषानें मत्स्येंद्रनाथादि योगींद्रांस, विघ्ननाशक गणपतीस व महादेवास प्रणाम करून प्राणायामास आरंभ करावा.

## प्राणायाम

प्राणायाम करितांना पूरक, कुंभक, रेचक ह्या प्रकारांनीं जेणेंकरून प्राणवायूचें धारण होईल, अशा प्रकारचा अभ्यास करावा. **पूरक** प्राणायाम म्हणजे ज्याप्रमाणें आपण एकाद्या नळीनें तोंडांत पाणी आकर्षण करून घेतों, त्याप्रमाणेंच बाहेरील वायु उजव्या किंवा डाव्या नाकपुडीनें वर आकर्षण करणें, यास पूरक प्राणायाम म्हणतात.

आतां कुंभक प्राणायाम म्हणजे काय हें पाहूं. पूरक

प्राणायाम केल्यानंतर मग श्वासोच्छ्वास बंद करून शारीरांतील सर्व अवयव अचल ठेवून जें प्राणवायूचें संयमन करणें त्याला **कुंभक** प्राणायाम असें म्हणतात. हा प्राणायाम जितका अधिक वेळ करितां येईल, तितकी योगाभ्यासास जास्त मदत होते. तिसरा **रेचक** प्राणायाम— म्हणजे कुंभक प्राणायामामध्यें जो प्राणवायु खेंचून धरलेला असतो, तो सोडून देणें. एका नाकपुडीनें पूरक प्राणायाम केला तर दुसरीनें रेचक करावा लागतो. म्हणजे " इडा " म्हणून जी नाडी, त्या नाडीनें पूरक केला असतां " पिंगला " नाडीनें रेचक प्राणायाम करावा. आणि पिंगलेनें पूरक केला असतां इडा नाडीनें रेचक करावा.

प्राणायाम साध्य होण्याकरितां तीन बंध करावे लागतात. त्या बंधांस मूलबंध, उड्डियानबंध आणि जालंधर बंध अशा संज्ञा आहेत. लिंगस्थान व गुदस्थान यांच्या मध्यें एक शिवण आहे असें वर सांगितलेंच आहे. त्या शिवणीवर डाव्या पायाच्या घोट्यानें दाब दिला असतां व अधोवृत्ति जो अपानवायु, त्याचें ऊर्ध्वाकर्षण करून गुदद्वाराचें आकुंचन केलें असतां **मूलबंध** साध्य होतो. ह्या बंधाविषयीं पुढील वचन आहे.

पार्ष्णिभागेन संपीड्य योनिमाकुंचयेद्गुदम् ॥
अपानमूर्ध्वमाकृष्य मूलबंधोभिधीयते ॥ १

—**हठयोगप्रदीपिका**

उड्डियान बंधाचें लक्षण असें आहे कीं, प्राणवायूचा रेचकपूर्वक प्राणायाम करीत असतां आपल्या पोटाचा भाग पाठीकडे आकर्षण करून नाभिप्रदेशाला किंचित् ऊर्ध्व ओढ देऊन जो बंध करितात, त्यास **उड्डियान बंध** म्ह-

णतात. ह्याबद्दल योगशास्त्रांतील वचन एणेंप्रमाणेंः-

उदरे पश्चिमं तानं नाभेरूर्ध्वंच कारयेत् ॥
उड्डियानो ह्यसौ बंधो मृत्युमातंगकेसरी ॥ १

—हठयोगप्रदीपिका

तिसरा जालंधर बंधः--आपल्या कंठाचें म्हणजे गळ्याचें संकोचन करून हनुवटी हृदयाला लागेल अशी घट्ट टेंकून जो बंध करितात त्याला **जालंधर बंध** असें म्हणतात.

कंठमाकुंच्य हृदये स्थापयेच्चिबुकं दृढम् ॥
बंधो जालंधराख्योयं जरामृत्युविनाशकः ॥ १

—हठयोगप्रदीपिका

या तीन बंधांतील मूलबंध हा पूरक प्राणायामाचे वेळा करावा. जालंधर बंध कुंभक प्राणायामाचे वेळीं करावा. आणि उड्डियान बंध रेचक प्राणायामाचे वेळीं करावा.

अशा प्रकारें बंधत्रययुक्त प्राणायाम केला असतां "कुंडलिनी" म्हणून जी शरीरांतील महत्त्वाची नाडी, तिची जागृती होते. मूलबंध केल्यानंतर अपान वायूचें ऊर्ध्वाकर्षण होतें, आणि जालंधरबंधानें प्राणवायूला खालीं आकर्षण लागून शरीरांतील प्राण व अपान ह्या वायूंचें ऐक्य होतें. तेणेंकरून जठराग्नि इतका प्रदीप्त होतो कीं, त्यामध्यें प्रत्यक्ष अग्नीप्रमाणें उष्णता उत्पन्न होते. त्या उष्णतेनें कुंडलिनी नाडी व्याकूळ होऊन "सुषुम्ना" नाडीचें द्वार खुलें होतें. योगशास्त्रामध्यें ह्या कुंडलिनी नाडीस नागिणीची उपमा देतात, हें मागें सांगितलेंच आहे. स्वस्थ पडून राहिलेल्या एकाद्या नागिणीला काठी मारिली असतां ती लागलीच फणफणून व ताठ होऊन जशी बिळांत प्रवेश करण्याचा मार्ग शोधूं लागते, त्याप्रमाणेंच वर

सांगितलेल्या उष्णतेनें कुंडलिनी नाडी सरळ होऊन सुषुम्ना नाडीच्या द्वारांत प्राणवायूचा प्रवेश होतो, आणि सर्व शरीरांतील प्राणवायु एकत्र होऊन ब्रह्मरंध्रापर्यंत त्याचा प्रवेश होतो. त्या निर्विशेषस्थितीला **समाधि** म्हणतात. ह्या प्राणायामाचे प्रकारांला श्रीभगवद्गीतेंत **यज्ञ** अशी संज्ञा दिली आहेः—

अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथा परे ॥
प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥ १

शरीरस्थ प्राण आणि अपान ह्या वायूंचें ऐक्य झालें म्हणजे जठरानल किती प्रदीप्त होतो, ह्याचें उत्कृष्ट उदाहरण ज्ञानदेवचरित्रांत आपल्याला आढळतें. दसऱ्याचे दिवशीं निवृत्तीला मांडे खाण्याची इच्छा झाल्यावरून ते मांडे तयार करण्यास भाजन आणण्यासाठीं मुक्ताबाई कुंभाराकडे गेली. परंतु विसोबा चाटी नांवाचा सावकार निवृत्तिज्ञानदेवादि यतितनयांचा द्वेष करीत असल्यामुळें त्यानें कुंभाराकडे जाऊन मुक्ताबाईला भांडें देऊं नको असें सांगितलें. त्या वेळीं योगेश्वर असे जे ज्ञानदेव त्यांनीं योगधारणा करून पंचाग्निसाधन केलें, आणि आपली पाठ अग्नीसारखी लाल केली. त्या पाठीवर मुक्ताबाईनें मांडे भाजले; आणि निवृत्तीची इच्छा तृप्त केली! असो.

प्राणायामापासून शरीराला कोणकोणते लाभ होतात आणि प्राणायामाला आह्मीं विसरल्यामुळें त्यापासून आर्यांच्या आधुनिक संततीची कशी हानि झाली व होत आहे, ह्याचा विचार विषयानुरोधानें एथें करणें अत्यंत इष्ट आहे.

प्राणायामानें पुष्कळच लाभ होतात. त्यांपैकीं पहिला लाभ **सर्व नाड्यांची शुद्धि होते** हा आहे. आपण जें

अन्न खातों, त्याचा वास्तविक परिणाम शरीरपुष्टीला आवश्यक असे रस आणि वायु ( ग्यास ) तयार होणें हा होय. परंतु तें खाल्लेलें अन्न जेव्हां अपक्व राहतें, तेव्हां त्यापासून शरीरपुष्टीला प्रतिकूल असे रस व वायु उत्पन्न होऊन मल कुपित होतात, आणि मग अशा तऱ्हेनें वायु शरीरांतर्गत होऊन प्राणवायूच्या स्वस्थ चलनास त्यांचा प्रतिबंध होतो. असले हे जे दुष्ट वायु, ते प्राणायामाच्या योगानें नष्ट होतात. कपिलगीता ग्रंथांत असें स्पष्ट लिहिलें आहे कीं, उदकस्नानानें फक्त शरीराचे बाह्य मल दूर होतात, परंतु अंतर्मल नष्ट होण्यास प्राणायामानें स्नान करणें अवश्य आहे.

प्राणायामापासून **जठरानलोन्नति** होते, हा दुसरा मोठा फायदा आहे. एकांतस्थळीं बसून मूलबंधपूर्वक अपानवायूची ऊर्ध्व गति झाली असतां व जालंधरबंधपूर्वक प्राणवायूची अधोगति झाली असतां प्राणापानांचें ऐक्य होऊन जठराग्नि कसा प्रदीप्त होतो, याबद्दल मागें सांगितलेंच आहे, म्हणून त्याबद्दल एथें द्विरुक्ति नको. योगीलोकांची अन्नग्रहणाची रीत आपल्या साधारण भोजनप्रकाराहून भिन्न असते. म्हणजे ते इतर लोकांप्रमाणें एकेक पदार्थाची गोडी घेत न बसतां सर्व पदार्थ एकत्र करून प्राणाला अवश्य पाहिजेच म्हणून त्या अन्नाची आहुति देतात, व त्यांचा जठरानल प्रदीप्त असल्यामुळें त्या अन्नाचें तत्काळ पचन होऊन जातें. योग्यांचे समाजांत संचार करणारांस ह्या गोष्टी स्वाभाविक कळून येतातच.

प्राणायामापासून तिसरा लाभ **अक्षदोषापचय** हा आहे. म्हणजे शरीरांत अशुद्ध मल, रस, किंवा वायु

उत्पन्न झाले असतां स्वाभाविक रीतीनें अक्ष म्हणजे आपलीं जीं इंद्रियें, त्यांत सुद्धां दोष उत्पन्न होतात, हे दोष बंधपूर्वक प्राणायाम केला असतां नाहींसे होतात. सुवर्णादि धातूंतील मल ज्याप्रमाणें अग्नीच्या आंचेनें नाहींसे होतात, तद्वत् इंद्रियजनित पापाचें क्षालन प्राणायामाचे अभ्यासानें जो अग्नि उत्पन्न होतो, त्यानें होतें. अमृतबिंदु उपनिषदांत ह्याबद्दल पुढील वचन आहेः—

यथा पर्वतधातूनां दह्यंते धमनान्मलाः ॥
तथेंद्रियकृता दोषा दह्यंते प्राणनिग्रहात् ॥ १

**अंगलाघव** हा प्राणायामापासून चवथा फायदा आहे. पारध करण्याच्या नादास लागलें असतां मेदोनाश होऊन उदर कृश होतें, आणि आंग हलकें होऊन हवी तेव्हां चटकर उडी मारण्याची शक्ति येते, असें वर्णन आहे. त्याप्रमाणेंच प्राणायामाचे अभ्यासानें शरीर लघु म्हणजे हलकें होऊन तें अगदीं आपल्या स्वाधीन राहतें व निरोगी होतें. शिवाय इंद्रियांची विषयांकडे जी स्वाभाविक प्रवृत्ति तिला प्रतिबंध होतो. प्राणायामामुळें सुषुम्ना नाडीचें द्वार प्राणवायूस प्रवेश करण्यास मोकळें होतें; आणि तेणेंकरून **शक्तिबोध** होतो; हा पांचवा फायदा होय.

प्राणायामापासून शेवटचा फायदा असा आहे कीं, **धारणा** म्हणून जो योगाचा प्रकार पुढें सांगावयाचा आहे, तो साध्य होण्याची योग्यता प्राणायामानें प्राप्त होते; म्हणजे रजोगुण व तमोगुण ह्यांच्या साहचर्यानें जे शरीरांतले मल संचित होतात ते प्राणायामामुळें नष्ट होऊन मनाची स्थिति धारणेला पात्र होते.

योगशास्त्र हा विषय प्रत्येकानें अनुभवण्यासारखा आहे, कारण ह्या शास्त्राचा आपल्या दिनचर्येशीं व शरीराशीं अति निकट संबंध आहे. प्राचीन आर्य लोकांची रहाणी कशी होती ह्याची साक्ष पातंजल सूत्रावरून उत्कृष्ट पटते. मनुष्याचें निम्में आयुष्य गेल्यावर शरीर वातबद्ध होऊन दोंद वाढूं लागतें. तसें न होण्यास योगरूप नियमित व्यायाम करणें फार उपयोगी आहे. नियमित व्यायामानें शरीर वातबद्ध होत नाहीं, ही गोष्ट प्रिन्स बिस्मार्क यांच्या चारित्रावरून शिकण्यासारखी आहे. त्यानीं सत्तर वर्षांचें वय झालें असतां विशिष्ट व्यायाम करून आपल्या दोंदिल शरीराचें वजन साठ पौंडांनीं कमी केलें, असा लेख " सांडो मॅगेझीन " मध्यें आढळतो. व्यायामाचें मुख्य तत्त्व म्हटलें म्हणजे बेंबीशेजारचा भाग-- ज्याला मणिपूर प्रदेश अशी योगशास्त्रांत संज्ञा दिली आहे, त्या भागाचें पाठीकडे जितकें आकर्षण होईल तितकें करावयाचें, हें होय. व्यायाम करतांना बेंबीभोंवतालचा प्रदेश मागें आकर्षिला जातो खरा, परंतु ज्या वेळेस आपण स्वस्थ बसतों व कांहीं हालचाल करीत नाहीं, त्यावेळीं पोटाचा भाग प्रसरण पावून पुढें दोंद येतें. म्हणून व्यायाम करतांना जशी पोटाला आंत ओढ लागते, तशी ओढ सर्वदा असण्याचा प्रयत्न करावा. म्हणजे स्थौल्य नष्ट होऊन शरीर अतिशय हलकें व आपल्या स्वाधीन होतें. प्राणायाम करण्याचें फल हेंच आहे. प्राणायाम करीत असतां मूलबंध, उड्डियानबंध, जालंधरबंध हे सिद्ध करण्याकडे विशेष लक्ष असलें पाहिजे. तेणेंकरून नाडीशुद्धि होऊन शरीरस्थौल्य नष्ट होतें.

प्राचीन आर्यलोक प्राणायामाचें व योगाचें अवलंबन करून कसे निरोगी व दीर्घायु होत होते, हें इतिहासावरून व अवांतर माहितीवरून सर्वांला माहित आहेच. आधुनिक काळीं ह्या योगविद्येचा कसा ऱ्हास होत गेला आहे हेंहि आपण पाहतोंच. प्राचीनकाळीं आर्यांचें सर्व लक्ष शरीररक्षणाचा मुख्य पाया जो प्राण, तो आपल्या स्वाधीन करून घेण्याकडे असे, व त्यासाठीं नियमित आहारविहार आणि एकांतवास ह्यांचें अवलंबन करून प्राणदमन करून ते रहात असत. त्यांचे अन्नग्रहणाचे नियमहि अगदीं ठरींव असत. म्हणजे नियमित काळीं दोनदां आहारसेवन करावयाचें. तो आहार स्निग्ध, मधुर करावयाचा, आणि उदराचा चौथा भाग रिकामा राखून करावयाचा.

भूका राखे चौथा कोन

ह्या व्यवहार्य झालेल्या सहदेवी मतांतील मुख्य तत्त्व तरी हेंच आहे. दोन भाग अन्न व एक भाग पाणी असे उदराचे तीन भाग भरावयाचे, आणि चौथा भाग वायुसंचरणासाठीं रिकामा ठेवावयाचा. ह्यास आधारभूत पुढील वचन आहे.

द्वौ भागौ पूरयेदन्नैस्तोयेनैकं प्रपूरयेत् ॥
वायोः संचारणार्थाय चतुर्थमवशेषयेत् ॥ १

**—हठयोगप्रदीपिका ज्योत्स्ना**

प्राचीन आर्यांची महत्त्वाकांक्षा फारच मोठी असे. जरा आणि मरण ह्यांपासून देह जेणेंकरून निर्मुक्त होईल अशा मार्गांचें अवलंबन करण्याकडे त्यांचा भर असलेला योगशास्त्रांत पदोपदीं नजरेस येतो. प्राचीन आर्यांची विचारसरणी अशी होती कीं,—आपलें हें मानवी

जीवित शुक्रावर म्हणजे धातूवर अवलंबून आहे, आणि तें शुक्र चित्तावर अवलंबून आहे. म्हणून शुक्र आणि मन हीं ज्या ज्या प्रयत्नांनीं रक्षण करितां येतील ते ते प्रयत्न करण्याकडे सर्वकाळ त्यांचे प्रयत्न चालू असत. वायुस्थैर्य, मनस्थैर्य आणि बिंदुस्थैर्य ह्या तिहींकडे प्रायः आर्यशास्त्रांचा व दर्शनांचा काय तो भर असे. योगशास्त्रांत ह्याविषयीं पुढील वचनें आहेत:—

चित्तायत्तं नृणां शुक्रं शुक्रायत्तं च जीवितम् ॥
तस्मात् शुक्रं मनश्चैव रक्षणीयं प्रयत्नतः ॥ १
मनस्थैर्ये स्थिरो वायुस्ततो बिंदुः स्थिरो भवेत् ॥
बिंदुस्थैर्यात्सदासत्त्वं पिंडस्थैर्यं प्रजायते ॥ २

—हठयोगप्रदीपिका

मन स्थिर झालें असतां प्राणवायु स्थिर होतो, प्राणवायु स्थिर झाला असतां आपला बिंदुहि स्थिर होतो, आणि बिंदु स्थिर झाला म्हणजे देहामध्यें बल उत्पन्न होऊन स्थैर्य प्राप्त होतें, व जीविताविषयीं संशय राहत नाहीं. ही प्राचीन आर्यांच्या राहणीची स्थिति झाली. ह्यापैकीं आधुनिक कालीं काय राहिलें आहे हें सर्व जाणतातच. स्नान म्हणजे केवळ अंगाचा मळ घालविणें असा अर्थ होऊन तें केव्हांहि केलें तरी चालूं लागलें. भोजनोत्तर स्नान केलें किंवा स्नानास मुळींच फाटा दिला तरी खपतो ! ! प्राणायामेंकरून अंतःशुद्धि करण्याचा तर संपूर्ण अभावच झाला आहे.. आहारविहारास मुळींच नेम नाहीं. अंथरुणांतून उठल्याबरोबर तोंड सुरू होतें ! स्नानसंध्यादिकांचा काळ, तो आतां चहाकाफीचा काळ झाला आहे. खाण्यास मर्यादा मुळींच राहिली नाहीं. पेय पदार्थांचें व साखरेचें प्रस्थ फार माजलें. कलशकमंड-

लूंच्या ठिकाणीं कांचपात्रें आलीं! मनाच्या करमणुकीकरितां रात्रीच्या रात्र जागरण होऊन निद्राभंग झाला तरी बेहेत्तर, परंतु मौजेंत कमी करावयाचें नाहीं. वीर्यरक्षणाकडे तर अगदीं दुर्लक्ष झालें. त्यांतच उदरनिर्वाहासाठीं परकीय विद्या अधाशाप्रमाणें संपादन करण्यासाठीं वेळ अवेळ न पाहतां मेहनत सुरू झाली, असा अशुद्ध पाया झाला. मग ह्या तऱ्हेनें तयार झालेली आधुनिक मंडळी अल्पायुषी होऊन लवकर मरूं लागली ह्यांत आश्चर्य तें कसलें? अलीकडील विद्वान् लोक लवकर कां मरतात याबद्दल थोड्यावर्षांपूर्वीं जोराचा वादविवाद झाला. त्या वेळीं कांहीं पंडितांनीं असें प्रतिपादन केलें कीं—तरुण हिंदु ज्या प्रकारच्या अन्नाचा उपयोग करितात, त्यापेक्षां अधिक पौष्टिक ( मांसादि? ) अन्नाचें सेवन केल्याशिवाय सांप्रतच्या जीवनकलहामध्यें हिंदूंचा टिकाव लागणार नाहीं! ह्या सूचनेप्रमाणेंच सदरहु प्रश्नाचा निकाल झाल्यासारखें झालें. परंतु योगशास्त्रपद्धतीनें त्याचा विचार व्हावयास पाहिजे होता. तो त्या वेळीं झाला नाहीं ही दिलगिरीची गोष्ट होय. यापुढें तरी आर्यांनीं आहारविहारादिकांमध्यें अत्यंत नियमितपणा ठेवून प्राणायामाच्या अभ्यासापासून जे सर्वोत्कृष्ट फायदे होतात म्हणून वर दाखविलें आहे, त्यांचा लाभ करून घ्यावा. शरीरपुष्टि व जरारोगनिवृत्त शरीरें होण्यास प्राणायामाचा फार उपयोग होईल.

अष्टांगयोगाचें पांचवें अंग जो प्रत्याहार, त्याचें निरूपण आतां सुरू करावयाचें.

## प्रत्याहार

ह्या प्रत्याहारापासून समाधीपर्यंत जीं चार अंगें सां-

गावयाचीं आहत, त्यावरून आर्यधर्माचा सोज्वलपणा वाचकांच्या पूर्णपणें नजरेस येईल. एका आधुनिक विद्वानाचें मत असें आहे कीं—सर्वोत्कृष्ट रीतीचें व्यवहारनैपुण्य जर आपणांस पहावयाचें असेल, तर तें इंग्रज लोकांतच पहाण्यास सांपडेल, व धर्मविषयक उदात्त कल्पना व साक्षात् ईश्वरस्वरूपास पोहोंचण्याची योग्यता हीं व्हावीं असतील तर आर्यधर्मामध्येंच दिसतील; इतरांत दिसणार नाहींत. ह्या सिद्धांताचा प्रत्यय वाचकांस आतां येऊं लागेल.

प्राणायामाच्या दृढाभ्यासानें इंद्रियदोष नष्ट होऊन व कुंडलिनी नाडीचा उद्बोध होऊन धारणेस योग्य मन झालें म्हणजे मग प्रत्याहारास आरंभ करावयाचा. प्रत्याहार म्हणजे काय ? हें अगोदर सांगितलें पाहिजे. रूप, रस, गंध, स्पर्श आणि शब्द ह्या पांच विषयांकडे चक्षु, जिव्हा, घ्राणेंद्रिय, त्वचा आणि श्रोत्र ह्या पंचेंद्रियांचें जें नैसर्गिक आकर्षण होतें, तें आकर्षण बंद ठेवणें—म्हणजे सर्वकाळ विषयांविषयीं असंसर्ग उत्पन्न करून विषयांचे ठिकाणीं दोषदृष्टि करावयाची, आणि चित्तास अनुकूल अशी त्या इंद्रियांची स्थापना करावयाची याला **प्रत्याहार** असें म्हणतात. याज्ञवल्क्यसंहितेंत याविषयीं पुढील आधार आहे:—

इंद्रियाणां विचरतां विषयेषु स्वभावतः ॥
बलादाहरणं तेषां प्रत्याहारः स उच्यते ॥ १

इंद्रियांची विषयनिवृत्ति विवेकानें करावी लागते. व हा विवेक होण्यास विषयांविषयीं दोषदृष्टि पूर्णपणें झाली पाहिजे. दोषदृष्टीशिवाय विषयांचा परित्याग संभवतच

नाहीं. पुन्हां ती दोषदृष्टि सुद्धां क्षणिक नसून दीर्घकाल-पर्यंत टिकणारी अशी पाहिजे. क्षणिक दोषदृष्टीनें इंद्रियांचा प्रत्याहार घडत नाहीं. सुग्रास भोजनानंतर, स्मशानांत गेल्यानंतर आणि मैथुनकर्म घडल्यानंतर क्षणिक वैराग्यबुद्धि मनुष्यास प्राप्त होते, परंतु तिचें आयुष्य औट घटकेचें असतें. तीच वैराग्यबुद्धि जर कायम टिकेल, तर संसारबंधनापासून कोण निर्मुक्त होणार नाहीं? विषयांवरील इंद्रियांची दोषदृष्टि टिकावी एवढ्यासाठींच सर्व आर्यधर्माचा यत्न आहे. या दोषदृष्टीचा प्रकार योगवासिष्ठांतील पुढील श्लोकांत सांगितला आहे:—

कुरंगालिपतंगेभमीनास्त्वेकैकशो हताः ॥
सर्वैर्युक्तैरनर्थैस्तु व्याप्तस्याज्ञ कुतः सुखम् ॥ १

हरिण व्याधाच्या गायनानें मूढमति होऊन नाश पावतो, भ्रमर सुगंधमग्न होऊन त्या धुंदींत आपणास कमलांत कोंडून घेतो, पतंग रूपाला मोहित होऊन दीपज्योतीवर आपला नाश करून घेतो, हत्ती हा हस्तिनीच्या स्पर्शानें लुब्ध होऊन तिच्या मागें लागून खड्यांत पडतो, आणि मासा आमिषासाठीं मोहित होऊन आपली मान गळांत अडकावून घेतो. एकेक व्यसनाधीन झालेल्यांची जर ही स्थिति, तर पंचविषयरूपी अनर्थांनीं व्याप्त झालेल्या मनुष्याला सुखप्राप्ति कोठून होणार बरें? सुखप्राप्तीची आशा मुळींच नको. म्हणून इंद्रियांचा प्रत्याहार करणें हें आर्यधर्मांत अत्यंत महत्त्वाचें मानिलेलें आहे. वर सांगितल्या प्रमाणें शरीररक्षणास अवश्य तेवढाच आहार केला व एकांतस्थलीं आसनपूर्वक प्राणायाम केला म्हणजे विषयाकर्षित इंद्रियांला मागें खेंचतां येतें.

वर सांगितलेला हा प्रत्याहारयोगांगाचा एक प्रकार झाला. दुसरा प्रकार असा आहे कीं--मन, इंद्रियें आणि त्यांचे विषय हेच आत्मस्वरूप आहेत, अशा प्रकारची भावना करण्याचा अभ्यास करावा, म्हणजे प्रत्याहार साध्य होतो. याविषयीं अमृतबिंदु उपनिषदांत पुढील वचन आहे.

शब्दादिविषयाः पंच मनश्चैवातिचंचलं ॥
चिंतयेदात्मनो रश्मीन् प्रत्याहारः स उच्यते ॥ १

म्हणजे शब्दादिक जे पांच विषय व त्यांचें ग्रहण करणारीं पंचेंद्रियें आणि सहावें मन हे आत्मारूप सूर्याचे किरण आहेत असें जें चिंतन त्याला प्रत्याहार म्हणतात. जें चराचर जगत् आपल्या दृष्टीस पडतें, किंवा श्रवणांनीं ऐकू येतें, तें सर्व आत्मस्वरूपानें पहाणें, याला योगशास्त्रांत कुशल असे जे महात्मे ते **प्रत्याहार** असें म्हणतात. याविषयीं **गोरखानाथानीं** असें म्हटलें आहे कीं, प्रिय किंवा अप्रिय जो जो शब्द श्रोत्रेंद्रियानें श्रवण केला जातो, तो तो शब्द आत्मस्वरूपच आहे असें योग्यानें जाणावें. जो जो कोमल किंवा कठिण पदार्थ त्वगिंद्रियास भासमान् होतो, तसेंच जो जो सुरूप अथवा कुरूप पदार्थ नेत्रांनीं पाहिला जातो, जो जो मधुर अथवा कटु रस जिव्हेंद्रियानें चाखला जातो, आणि जो जो सुगंध अथवा दुर्गंध घ्राणेंद्रियास प्रतीयमान् होतो, तो तो आत्मस्वरूप जाणून योग्यानें प्रत्याहार करावा. कांसव जसें आपले हस्तपादादिं अवयव उदरामध्यें ओढून घेतें, त्याप्रमाणें योग्यानें वर सांगितलेल्या प्रकारानें श्रोत्रादि इंद्रियांचा आत्मस्वरूपाचे ठिकाणीं प्रत्याहार करावा.

वर सांगितलेले दोन प्रकार **राजयोगासंबंधी** आ-

हेत. त्यांहून भिन्न असा खालीं लिहिलेला तिसरा प्रकार हठयोगाचा आहे. शरीरामध्यें एकंदर पंचवीस मर्मस्थानें आहेत. दोन्ही पायांचे दोन आंगठे हीं दोन मर्मस्थानें, दोन्ही पायांचे घोटे हीं दोन मर्मस्थानें, त्याप्रमाणेंच दोन्ही पायांचे दोन जंघामध्य, दोन्ही पायांच्या दोन चिति म्हणजे पोटरीच्या खालचे मध्यभाग, दोन गुडघ्यांचे दोन मध्यभाग, दोन्ही मांड्यांचे दोन मध्यभाग, गुदस्थान, सर्व देहाचा मध्यभाग, लिंगदेश, नाभि, हृदय, कंठ, तालु, नासिकेचें मूलस्थान, दोन नेत्रमंडलें, भृकुटिमध्यदेश, ललाट आणि पंचविसावें ब्रह्मरंध्र. ह्या मर्मस्थानांपैकीं अंगुष्ठापासून आरंभ करून प्राणावायूचें धारण मनासहित एका मर्मस्थानापासून दुसऱ्यांत, असें वर वर करीत जाऊन शेवट ब्रह्मरंध्रापर्यंत न्यावयाचें व नंतर वर नेलेला प्राणवायु मनासहित जेथल्या तेथें आणून स्थापन करावयाचा, हा हठयोग्यांचा प्रत्याहाराचा प्रकार आहे.

एथपर्यंत प्रत्याहारचें लक्षण व भेद सांगितले. आतां त्यापासून लाभ काय होतात हें पहावयाचें. पहिला गुरुप्रसाद—म्हणजे ईश्वरी साक्षात्कार हा लाभ आहे. प्रत्याहार करून श्रोत्रादि इंद्रियांला विषयांपासून जे अंतर्मुख करितात, त्यांजवर शंकरादि देवता सुप्रसन्न होतात. इंद्रियलंपट पुरुषावर देवताप्रसाद कधींहि होत नाहीं, अशी महाभारत ग्रंथ साक्ष देत आहे. शिश्नोदरपरायण, परवित्तापहारी व कठोर भाषण करणारे यांनीं प्रायश्चित्तें करून आपल्याला कितीहि धुवून घेतलें, तथापि देवता त्यांचे वाऱ्यासहि उभ्या रहात नाहींत. परंतु जे सत्यभाषी, कृतज्ञ, आणि स्वधर्मनिरत असतात, अशांशीं दे-

वतांचे संभाषणादि प्रकार होतात. शिबिराजा, नळराजा युधिष्ठिर इत्यादि जे सत्यवादी व जितेंद्रिय राजे होऊन गेले, त्यांजकडे इंद्रादि देवता व नारदादि महर्षि येऊन त्यांच्याशीं संभाषणादि प्रकार होत असत अशाबद्दल पुराणांतरीं पुष्कळ कथा आहेत. पापी पुरुषाला हा लाभ नाहीं.

प्रत्याहारापासून दुसरा लाभ मनाची प्रसन्नता हा आहे. जितेंद्रिय पुरुषाचें मन नेहमीं प्रसन्न असतें. तशी स्थिति इंद्रियांचे स्वाधीन राहणाऱ्या पुरुषाची नसते. कारण इंद्रियें विषयासक्त झालीं असतां अर्थात् विषय संपादन करण्याकडे त्या पुरुषाची प्रवृत्ति होते, आणि तेणेंकरून मनाला भगभग लागून तें क्लेशांनीं व्याप्त होतें. जितेंद्रिय पुरुषाची प्रवृत्ति विषयोपार्जन करण्याकडे होत नाहीं. म्हणून त्याचें मन निर्मल उदकाप्रमाणें सर्वदा शुद्ध व प्रसन्न राहतें.

**तपःप्रवृद्धि** हा प्रत्याहारापासून तिसरा फायदा आहे. तपःप्रवृद्धि हा पाया करून त्यावर आर्यधर्मातील सर्व आचारविचार बसविलेले आहेत. त्याचें निरूपण आतां करूं. जो जितेंद्रिय पुरुष असतो, त्याचें तप इंद्रियनिग्रहामुळें रोज रोज अभिवृद्धि पावतें; त्यालाच तपःप्रवृद्धि म्हणतात. इंद्रियांचा निग्रह करणें हेंच परमतप होय.

मनसश्चेंद्रियाणांच निग्रहः परमं तपः ॥
तज्ज्यायः सर्वधर्मेभ्यः स धर्मः पर उच्यते ॥ १

—**स्मृति**

मन आणि इंद्रियें यांचे जे विषय, त्यांपासून त्यांला परावृत्त करणें हेंच परम तप असून सर्व धर्मांमध्यें श्रेष्ठ धर्म हाच होय. जितेंद्रिय पुरुष जी जी तपादि क्रिया क-

रितो, ती ती क्रिया यथोक्त फलाची प्राप्ति करून देते हें तत्त्व फारच महत्त्वाचें असून आर्यधर्मांतील अनेक प्रचलित गोष्टींशीं त्याचा दृढ संबंध आहे. उदाहरणार्थ आर्यलोकांतील विवाहपद्धति घेऊं. विवाहपद्धतीचे निर्णायक म्हणून जे जे सर्वमान्य ग्रंथ वेदकालापासून आजपर्यंत झाले, त्यांचा आधार घेतला असतां असें स्पष्ट कळून येईल कीं, आमच्या विवाहामुळें उत्पन्न झालेल्या सामाजिक स्थितीमध्यें इंद्रियांचा निग्रह जेणेंकरून साधेल अशीच पद्धति योजिलेली दिसते. स्त्रीपुरुषांचा संबंध घडावयाचा, तो सुद्धां अनेक नियमांनीं बद्ध केलेला असून तशा प्रकारचे नियम करण्यांत प्राचीन आर्यांचें आत्मशास्त्रनैपुण्य सहज व्यक्त होतें.

**दैन्यसंक्षय** हा प्रत्याहारापासून चवथा लाभ आहे. जे जितेंद्रिय पुरुष आहेत, त्यांच्यामध्यें दैन्य म्हणून कसें तें राहतच नाहीं, आणि राजे किंवा इतर धनिक जन यांच्या पुढें हात पसरून हांजी हांजी करण्याची त्यांला गरजहि पडत *नाहीं. भर्तृहरीनीं वैराग्यशतकांत म्हटल्याप्रमाणें दीन व क्षुधापीडित झालेलीं रडवीं पोरें अन्नासाठीं जिचें जीर्ण वस्त्र ओढीत आहेत, अशा आपल्या स्त्रीला जर पुरुषानें कधींहि पाहिली नाहीं, तर भीत भीत व कांपत श्रीमंतापुढें जाऊन उदरभरणासाठीं तो हांजी हांजीं कां करील बरें ? अर्थातच करणार नाहीं. अशा पुरुषाला दैन्य कसलेंच नाहीं. असो.

प्रत्याहारापासून पांचवा लाभ **दुर्तंप्रवेश** म्हणजे धा-

---

* हिंदुस्थान देशाचें दारिद्र्य घालविण्याची ज्यांस इच्छा असेल त्यांनीं ही गोष्ट अवश्य लक्षांत आणावी.—**ब० ग० दाभोळकर.**

रणा, ध्यान व समाधि ह्या त्रयींमध्यें द्रुत म्हणजे तत्काळ प्रवेश होतो हा आहे. ह्याप्रमाणें प्रत्याहारापासून पांच लाभ आहेत. आतां अष्टांग योगांपैकीं पुढील अंग

**धारणा**

त्याचें विवेचन करावयाचें. धारणेपासून शेवटपर्यंत जीं अंगें आहेत, त्यांला एकंदर मिळून **संयम** अशी संज्ञा आहे. आर्यधर्मांतील अत्यंत उच्च व उदात्त अशी जी कल्पना, ती ह्या अंगांत दृष्टीस पडते. आर्यतत्त्वज्ञानाप्रमाणें शरीर म्हणजे अनेक देवतांचें व तीर्थांचें वसतिस्थान आहे. योग्याचे शरीरांत जमीन, समुद्र, पर्वत, ऋषि, तारका, तीर्थें, देवालयें, देवता वगैरे सर्व कांहीं आहेत. याविषयीं उपनिषदांत पुढील वचन आढळतें.

यावतीर्वै देवतास्ताः सर्वा वेदविदि ब्राह्मणे निवसंति ।

म्हणजे जितक्या म्हणून देवता आहेत त्या सर्व वेदज्ञ ब्राह्मणामध्यें राहतात. धारणा, ध्यान व समाधि ह्यांचें मुख्य तत्त्व असें आहे कीं, शरीरांतील अनेक चक्रांमध्यें, अनेक कमलांमध्यें व मर्मस्थानांमध्यें ज्या ज्या देवतांची भावना करावी, त्या त्या देवता योग्याला सिद्ध होऊन त्यांच्या आराधनेमध्यें योगी निमग्न असतात. धारणा म्हणजे काय, हें भगवद्गीतेंतील वचनांत स्पष्ट केलें आहेः—

यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरं ॥
ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत ॥ १

म्हणजे आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक अशा प्रकारच्या विषयांवरून चंचल मन मोठ्या प्रयत्नानें काढून तें आत्म्याचे ठायीं निमग्न करणें ह्यास **धारणा म्हणतात.** मन एकदां विवक्षित ठिकाणीं स्थापन

केलें असतां तें जर फिरून विषयांकडे धांव घेऊं लागलें तर त्याचें निवारण करून त्याला पुनः धारणादेशांत नेऊन गुंतविणें हें परमधैर्याचें काम आहे. अभ्यासानें व सतत प्रयत्नांनीं तें साध्य होतें; व अशा प्रकारचे प्रयत्न प्रथम जरी साधले नाहींत, तथापि त्याबद्दल खेद कधींहि मानितां कामा नये, तर उत्साहपूर्वक मनाचा वारंवार निग्रह केला पाहिजे. योगाभ्यास करूं इच्छिणारांनीं पुराणांतरींच्या टिट्टिभ पक्ष्याच्या कथेचा कित्ता गिरविला पाहिजे. त्या टिटवी पक्ष्याचीं आंडीं समुद्रानें नेलीं, म्हणून तज्जातीयांनीं चंचुपुटांनीं विस्तीर्ण समुद्राचें पाणी आटविण्याचा प्रयत्न चालविला. तो प्रयत्न चालला असतां नारद मुनीचें तेथें सहज आगमन झालें, व त्यानीं तो प्रकार पाहून वैकुंठास जाऊन गरुडास पाचारण केलें. खगराज गरुड तेथें येऊन स्वपक्षांनीं समुद्र शोषूं लागला. तेव्हां तो निकर पाहून समुद्रानें नेलेलीं टिट्टिभाचीं अंडीं आणून दिलीं. ही कथा पुराणज्ञ वाचकांस अवगत असेलच. ह्या कथेंतील पात्रांचा साधक जो योगी त्याशीं कसा उत्कृष्ट मेळ बसतो तो पहा. वरील कथानकांतील जो टिट्टिभ पक्षी, तो साधक योगाभ्यासी समजावयाचा. समुद्रशोषण म्हणजे त्या टिट्टिभानें केलेला मनोनिग्रह होय. तेथें प्राप्त झालेले नारदमुनि म्हणजे साधकाची भक्ति आणि गरुड म्हणजे प्रत्यक्ष ईश्वर समजावयाचा. ध्यानाचा देश सोडून दुसरीकडे गेलेल्या चित्ताचें निवारण करण्यांत साधकानें कधींहि खेद करितां उपयोगीं नाहीं, हें तत्त्व वर लिहिलेल्या टिट्टिभ पक्ष्याच्या कथानकावरून घ्यावयाचें आहे. हा धारणाप्रयोग इतका कठिण

आहे कीं, तरवारीच्या धारेवर उभें राहणें सुद्धां सुलभ आहे, परंतु विक्षिप्तचित्त अशा पुरुपास धारणाप्रयोग करून राहणें अत्यंत दुर्घट आहे. साधकानें वारंवार दीर्घ प्रयत्न करून आपलें चित्त धारणादेशांत नेऊन स्थापन करण्यास शिकलें पाहिजे.

धारणाप्रयोगाच्या वेळीं योग्याचें मन कसें एकाग्र असलें पाहिजे, ह्याबद्दल योगशास्त्रांत चमत्कृतिजनक अनेक दृष्टांत दिलेले आहेत. एकादा मनुष्य हातांत तेलानें कांठोकांठ भरलेलें भांडें घेऊन शिडीवर चढत असला तर त्या वेळीं तें भांडें हालूं नये म्हणून त्याचें मन त्या भांड्याकडेसच जसें एकाग्र होतें, त्याप्रमाणें योगाभ्यासी पुरुष धारणादेशांत मन लावून समाधीच्या पायरीचें आरोहण करितो. धारणाप्रयोगाच्या अभ्यासांत, आपलें शरीर पंचभूतात्मक आहे, अशी पूर्ण भावना करून निरनिराळ्या अवयवांत निरनिराळ्या तत्त्वांची स्थापना करावयाची हा मुख्य अभ्यास आहे. पंचभूतांची वांटणी शरीरांत योगिजन पुढीलप्रमाणें करितात. ( १ ) पायांपासून गुडघ्यांपर्यंत पृथ्वी तत्त्व, ( २ ) गुडघ्यांपासून नाभीपर्यंत जल तत्त्व, ( ३ )नाभीपासून हृत्कमलापर्यंत तेज म्हणजे अग्नि तत्त्व, ( ४ ) हृदयापासून भ्रूमध्यापर्यंत वायु तत्त्व आणि ( ५ ) भ्रूमध्यापासून शिखेपर्यंत आकाश तत्त्व, अशी पंचभूतात्मक भावना करून योगी आपल्या शरीराच्या ठायीं नवीन जगत् निर्माण करितात. ह्या पंचतत्त्वांत देवतांची स्थापना ऐणेंप्रमाणें करावी:—पृथ्वी तत्त्वांत सृष्टीची उत्पत्ति करणारा जो चतुर्मुख ब्रह्मा ह्याचें ध्यान करावें; जलतत्त्वामध्यें पीतांबरधारी नारायणाचें भजन क-

रावें; अग्नि तत्त्वांत त्रिलोचन महारुद्राची उपासना करावी; वायु तत्त्वांत सर्वज्ञ सर्वशक्तिमान् जो ईश्वर त्याची भक्ति करावी आणि आकाश तत्त्वामध्यें शुद्ध स्फटिकाप्रमाणें गौरवर्ण अशा महादेवाचें ध्यान करावें. अशा रीतीनें पायांपासून शिखेपर्यंत पांच भाग करून त्यांमध्यें देवतांची स्थापना करून त्यांची उपासना करण्यांत निमग्न असणें हाच समाधीचा खरा मार्ग आहे.

### ध्यान

हें अष्टांग योगाचें सातवें अंग आहे. ध्यान हें समाधीचें केवळ द्वार होय. अन्य वृत्तींचा आश्रय न करितां चित्तवृत्तीचा तैलधारेप्रमाणें एकसारखा प्रवाह लावणें त्याला योगीजन **ध्यान** असें म्हणतात.

तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम् ।

असें पांतजल सूत्रांत वचन आहे. त्याचा अर्थ वर लिहिला तोच आहे. हें ध्यान सगुण आणि निर्गुण ह्या दोन प्रकारचें असून त्यांत सगुण ध्यानाचे विष्णुध्यान, अग्निध्यान, सूर्यध्यान, भ्रूध्यान, आणि पुरुषध्यान असे पांच भेद आहेत. चतुर्भुज, शंखचक्रगदापद्मकिरीटकेयूरधारी, कमलनयन, श्रीवत्सांकितहृदय अशा साक्षात् विष्णूची मूर्ति ध्यानांत आणून तोच मी आहें अशी भावना करून ध्यानस्थ बसणें त्याला **विष्णुध्यान** असें म्हणतात. हें वैष्णवांचें उक्तध्यान आहे. शैव असतील त्यांनीं शंकराचें ध्यान करावें, शाक्तांनीं शक्तीची व गाणपतांनीं गणपतीची उपासना करावी.

**अग्निध्यान**:—हें ध्यान उपनिषदांमध्यें जें परमात्म-

स्वरूप वर्णन केलें आहे, त्याला धरूनच आहे. नारायणोपनिषदांत पुढील वचन आहेः—

नीलतोयदमध्यस्था विद्युल्लेखेव भास्वरा ॥
नीवारशूकवत्तन्वी सैषा भास्वत्यणूपमा ॥ १
तस्याः शिखायामध्ये परमात्मा व्यवस्थितः ॥

दिव्याची न हलणारी अशी जी शांत ज्योतिशिखा तिजमध्यें परमात्मा आहे असें मानून जें ध्यान करावयाचें, त्याला **अग्निध्यान** म्हणतात. तसेंच नीलमेघांमध्यें विजेसारखा चमकणारा, व 'नीवार' नामक जें तृणधान्य त्याच्या टोंकाप्रमाणें ज्याचें अणुरूप आहे अशा प्रकारचा जो वैश्वानर म्हणजे अग्नि, तो मीच आहें असें समजून ध्यान करणें हें अग्निध्यान होय. **सूर्यध्यानः**—हृदयामध्यें सर्व जगतास प्रकाश देणारा सर्व लोकांचा साक्षी सुवर्णमय भगवान् जो सूर्य तो मीच आहें असें जें ध्यान, त्यास सूर्यध्यान म्हणतात. **भ्रूध्यानः**—देहाचे मध्यभागापासून मस्तकापर्यंत स्थाणूप्रमाणें उभा राहिलेला, सर्व बाजूंनीं प्रकाशणारा व सर्व जगताचें कारण असा जो अंतरात्मा त्याच्या तेजोबिंबाचें भ्रूमध्यस्थानीं चिंतन करून तें बिंबस्वरूप मी आहें असें जें ध्यान त्यास भ्रूध्यान असें म्हणावें. **पुरुषध्यानः**—चंद्रमंडलापासून खालीं पडणारी जी अमृताची धारा त्याचें सिंचन ज्याच्या देहावर चाललें आहे, व पुष्ट, तेजोमय शरीरानें युक्त अशा पुरुषाचें हृदयकमलामध्यें चिंतन करून तो पुरुष मीच आहें असें जें ध्यान त्यास पुरुषध्यान असें म्हणतात. ह्या ध्यानामृताचा जे अनुभव घेतात, तेच खरे जीवन्मुक्त होत.

निर्गुण ध्यानाचा प्रकार योगशास्त्रांत असा सांगितला आहे कीं--एक, ज्योतिर्मय, आदिमध्यांतवर्जित, अरूप, अरस, अगंध, अमूर्त, सर्वजगद्रूप, व सर्वांच्या अंतर्बाह्य राहणारें असें जें सच्चिदानंदाचें विराट् स्वरूप तेंच माझें ब्रह्मस्वरूप आहे, अशा प्रकारचें जें ध्यान त्याला योगेश्वर **निर्गुणध्यान** असें म्हणतात.

ध्यानाचे प्रकार याहूनहि आणखी अनेक आहेत. परंतु त्यांपैकीं मुख्य मुख्य तेवढे एथें वर्णिले आहेत. ह्या प्रकारांनीं ध्यान केलें असतां पर्वतप्राय विस्तीर्ण पापराशींचा निःपात होतो. पापाचा क्षय झाला म्हणजे चित्तशुद्धि होऊन रजोगुण व तमोगुण यांचा लोप होतो, आणि केवळ शुद्ध सोन्याप्रमाणें सत्त्वगुणरूप अवशिष्ट राहतें. व अशी स्थिति झाली म्हणजे मग आत्मसाक्षात्कार होऊं लागतो. ध्यानबिंदु उपनिषदांत असें वचन आहे कीं,

स्वदेहमरणिं कृत्वा प्रणवं चोत्तरारणिम् ।।
ध्याननिर्मथनाभ्यासादेवं पश्येन्निगूढवत् ।। १

ज्याप्रमाणें दोन लांकडें एकमेकांवर घर्षण केलीं असतां त्यापासून अग्न्युत्पत्ति होते, त्याप्रमाणें आपले देहानें उपलक्षित जें मनरूप लांकूड, त्यावर ओंकारस्वरूप दुसऱ्या लांकडाचें ध्यानरूप मंथन केल्यानें परमात्मा जो देव त्याचा साक्षात्कार होऊं लागतो. साक्षात्कार होण्याइतकें ध्यान दृढ झालें म्हणजे मग मोक्षास फारसा उशीर लागत नाहीं.

विषयसुखांत निमग्न असणाऱ्या पुरुषांनीं ध्यानधारणा केली असतां त्यांला साक्षात्कार होऊन ते सन्मार्गास कसे लागतात ह्याबद्दल अनेक रमणीय कथा आहेत.

त्यांपैकीं **विश्वंभरबावा** साधूच्या कथेचें स्मरण विषयानुरोधानें एथें करणें अत्यंत इष्ट आहे. **विश्वंभरबावा** हे पराकाष्ठेचे स्त्रैण व रंगेल गडी होते. एकनाथासारख्या भगवद्भक्तांस ढोंगी म्हणून त्यांची ते नेहमीं निंदा करीत असत. कांहीं दिवसांनीं एकदां **विश्वंभरबावा** व **एकनाथ** यांच्या गांठीचा सुयोग आला, तेव्हां **एकनाथानीं** त्यांला असा प्रश्न केला कीं, ह्या जगांत अत्यंत विलोकनीय सुंदर व मोहक अशी तुला कोणती वस्तु वाटते तें सांग. त्या वेळीं **विश्वंभरबावानीं** ज्या सुंदर स्त्रीवर ते परमासक्त होते, तिचें नांव चट्कन् घेतलें. तेव्हां ती कशी आहे हें कळण्यासाठीं तिच्या एकंदर सौंदर्याचें वर्णन कर, असें **एकनाथानीं** सांगितलें. **विश्वंभरबावा** तिचें सौंदर्य वर्णन करूं लागले, परंतु त्यांला तें साधेना. म्हणून त्या स्त्रीकडे त्याला प्रत्येक वेळीं परत पाठवून तिच्या प्रत्येक अवयवाचें व अलंकाराचें साग्र ज्ञान करून येण्यास **एकनाथ** सांगत. असा सहा महिने उपक्रम चालला होता. ह्या सहा महिन्यांच्या दृढाभ्यासानें चमत्कार असा झाला कीं, ती स्त्री **विश्वंभरबावांच्या** ध्यानांत सर्वकाल मूर्तिमंत उभी राहिली. त्या ध्यानांत असतां त्या सुंदरीकडून **विश्वंभरबावाला** बोलावणें आलें होतें. परंतु त्यानीं सांगून पाठविलें कीं आतां तिकडे येऊं कशाला? तूं सर्वकाल मजपाशीं उभीच आहेस! अशा प्रकारें त्या मोहिनीचें ध्यान **विश्वंभरबावांच्या** ठायीं पूर्णपणें बाणलेलें जेव्हां **एकनाथ** महाराजानीं पाहिलें, तेव्हां तेंच ध्यान परमात्मस्वरूपीं लाव, असा उपदेश करून आत्मसाक्षात्काराचा अनुभव **विश्वंभरबावांस** करून दिला. त्यायोगें

ते ईश्वरभजनपरायण होऊन महान् साधु झाले. कविता-रूपानें त्यानीं ज्ञानमार्गाचें निरूपण केलें तें ह्यानंतरच.

विश्वंभरबावांप्रमाणेंच, म्हशीची पराकाष्ठेची आवड असलेल्या एका पुरुषाची व योग्याची सुदैवानें एकदां गांठ पडली. त्या महिषीप्रिय पुरुषाला त्या योग्यानें महिषीचें नखशिखांत ध्यान करण्यास शिकवून तें ध्यान ठसल्यावर मग त्यास गाईचें ध्यान करण्यास सांगितलें; आणि तेंहि ठसल्यावर त्रिपाद् गायत्रीचें ध्यान करण्यास सांगून तद्वारा ब्रह्मस्वरूपाची ओळख करून दिली, अशीहि एक कथा आहे. ह्या कथा अविश्वसनीय नव्हत. अगदीं सत्य आहेत. ध्यानधारणेचा महिमाच तसा आहे. अनुभव घेण्यास मात्र लागावें, म्हणजे त्याची प्रतीति आल्यावांचून खचित राहणार नाहीं. असो.

ह्या आत्मसाक्षात्काराचे पातंजल योगशास्त्रांत दोन प्रकार सांगितले आहेत. त्यांपैकीं एक प्रकार असा कीं, ( १ ) साधक पुरुषानें जिव्हेच्या अग्रभागीं चित्ताची एकाग्रधारणा केली असतां त्याला कांहीं काळानें दिव्यरसाची उपलब्धि होते, जिव्हेच्या मध्यस्थानीं चित्तधारणा केली असतां दिव्यस्पर्शाचा अनुभव येऊं लागतो, तसेंच जिव्हेच्या मूलदेशाचे ठिकाणीं चित्तधारणा केली असतां दिव्यशब्दाचा प्रत्यय होऊं लागतो. तालुस्थानी चित्ताची धारणा केली असतां दिव्यरूपाचा आणि नासिकाग्राचे ठायीं धारणा केली असतां दिव्यगंधाचा साक्षात्कार होतो. ह्या पांच विषयांपैकीं एकाचा तरी साक्षात्कार होई तोंपर्यंत योग्यानें ध्यानाचा अभ्यास करणें योग्य आहे. ( २ ) दुसरा प्रकार असा कीं, निस्तरंग स-

मुद्राप्रमाणें शांत चित्त करून त्यांत सूर्य, चंद्र, एकादा तारा अथवा हिरा, मणि ह्यांचें ध्यान करावयाचें. असें ध्यान करीत असतां कांहीं दिवसांनीं हृदयामध्यें तेजाचा साक्षात्कार होऊं लागतो. व असें होतां होतां तो योगाभ्यासी परमात्मस्वरूपाचा साक्षात्कार होण्याला पात्र होतो. ह्या साक्षात्काराचे संबंधानें—

तमस्युपरते स्वांते तेजःपुंजं ददर्श सः ॥

असें वर्णन उद्दालक ऋषींचे आख्यानांत आहे. त्याचा अर्थ हाच कीं, धारणेच्या अभ्यासानें सर्व तमाचा नाश झाल्यानंतर हृदयामध्यें तेजःपुंजाचा अनुभव येऊं लागतो.

अगदीं अर्वाचीन योगी जे विष्णुबावा ब्रह्मचारी त्यानीं केलेल्या लोकमान्य **वेदोक्त धर्मप्रकाश** ग्रंथांत जो मानसपूजेचा सुगम प्रकार वर्णन केला आहे, त्याचा अभ्यास आईबापांनीं मुलांकडून करविला तर केवढा तरी लाभ होईल. तो मानसपूजेचा प्रकार असाः—एकांतस्थलीं, वृक्षाखालीं, किंवा देवालयामध्यें बसून आपापल्या नेहमींच्या पंचायतनांत असणाऱ्या पांच देवांपैकीं ललाटाच्या चार कोनांत चार व मध्यस्थानीं एक अशी पांच देवतांची स्थापना करावी, आणि नंतर आपण गंधपुष्पादिकांनीं देवाची प्रत्यक्ष पूजा करितों त्याप्रमाणेंच त्या मानसिक पंचायतनाची पूजा करीत आहों, अशी भावना करून त्या स्थितींतच कांहीं वेळ ध्यानस्थ बसावें. असा अभ्यास कांहीं दिवस चालला म्हणजे त्या मानसिक पूजेंतील धूपाचा ध्यानस्थाला खरोखरच वास येऊं लागेल. ब्रह्मचारी बुवांचें हें सांगणें अनुभवसिद्ध आहे. कोणाला एकाद्या वस्तूचा वास अतिशय अप्रिय असतो,

तो इतका कीं, ती वस्तु प्रत्यक्ष जरी त्याच्यापुढें नसली तरी तिच्या नुसत्या स्मरणानेंच एकाद्या वेळीं तो अप्रिय वास प्रत्यक्ष येत आहे असें त्याला वाटून उमाळे येऊं लागतात. ह्या गोष्टीचा अनुभव पुष्कळांला असेलच. हा दृढचिंतनाचाच परिणाम होय. मग त्याच दृढचिंतनानें योग्याला आत्मसाक्षात्कार होईल ह्याचें नवल कशाचें ?

## समाधि

हें योगाचें शेवटचें म्हणजे आठवें अंग होय. त्याचें निरूपण आतां करावयाचें. ज्या अवस्थेमध्यें आपलें मन ध्येय वस्तूच्या स्वस्वरूपाप्रत प्राप्त होऊन मननव्यापार विसरून जातें, व संकल्पविकल्परहित होऊन केवळ ध्येय वस्तूच्या स्वरूपामध्येंच तल्लीन होऊन जातें, त्या अवस्थेला महात्मे योगी **समाधि** असें म्हणतात. पातंजल योगशास्त्रांत याविषयीं पुढील वचन आहे.

तदेव अर्थमात्रनिर्भासं स्वरूपशून्यमिव समाधिः ।

म्हणजे, आपलें मन समाधि अवस्थेमध्यें मनपणा विसरून सर्वकाल ध्येयाकार होऊन जातें. योगशास्त्रांत अनेक दृष्टांतांनीं हें सुव्यक्त केलेलें आहे, त्यांपैकीं कांहीं दृष्टांत एथें देऊं. ज्याप्रमाणें जलबिंदु समुद्रांत प्रविष्ट झाला असतां तन्मय होऊन जातो, त्याप्रमाणें मन हें ध्येय वस्तूंत शिरून तादात्म्य पावतें. दुसरा दृष्टांत मिठाचा. मीठ हें पाण्यांत टाकिलें तर तें आपलें रूप टाकून केवळ पाण्याचेंच रूप घेतें. त्याप्रमाणेंच आत्म्याचे ठिकाणीं प्रविष्ट झालेलें मन आपलें स्वरूप विसरून आत्म्याशीं तादात्म्य पावतें. समाधि अवस्थेमध्यें प्राण आणि मन यांचा लय होतो; जीवात्मा आणि परमात्मा यां-

चें ऐक्य होऊन समरसत्व होतें; व सर्व संकल्पांचा नाश होतो. हें समाधिवर्णन राजयोगाच्या रीतीचें असून राजयोगानेंच समाधि प्राप्त करून घेणें फार चांगलें. सद्गुरूनें महावाक्याचा उपदेश केल्याशिवाय ह्या समाधिस्थितीचा अनुभव येत नाहीं. प्रथमतः विषयांचा त्याग होणें दुर्लभ व त्याहूनहि तत्त्वज्ञान होणें हें फार दुर्लभ आहे; परंतु ह्या दुर्लभ गोष्टीहि सद्गुरूनें कृपा केली म्हणजे प्राप्त होतात. त्यावांचून मात्र होत नाहींत. या समाधि अवस्थेला योगशास्त्रांत " सहजावस्था " असेंहि म्हणतात. या अवस्थेमध्यें आत्मसाक्षात्कार होत असतो. त्याच्या पुढची सर्व सिद्धि अनुभवानें मिळावयाची आहे म्हणून त्याबद्दल आतां ज्यास्त विवरण नको.

आर्यशास्त्रांत वर्णिलेली ही जी श्रेष्ठ व अत्युत्तम अवस्था ती प्राप्त होण्यास ईश्वरानुग्रहाशिवाय दुसरें साधन नाहीं. ह्यावर अशी एक शंका येते कीं, जीव आणि शिव हे एकच आहेत, असें जर श्रुतिस्मृतींनीं विधान केलेलें आहे, तर साधक पुरुषानें ईश्वराची आराधना करावयाची ती कशाला? या शंकेचें समाधान असें आहे कीं, जीव आणि ईश्वर हे परमार्थदृष्टीनें जरी एकच आहेत तथापि जीवानें ईश्वराचें आराधन केलेंच पाहिजे. याविषयीं श्रीमच्छंकराचार्यांचें वचन असें आहे कीं

सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वम् ॥
सामुद्रोहि तरंगः क्वचन समुद्रो न तारंगः ॥ १

म्हणजे—जरी वैराग्यरूप बल प्राप्त झालें व वेदान्ताचा अभ्यास करून जीवशिवांचा भेद नाहींसा झाला, तथापि जीवानें ईश्वराला असेंच म्हणणें प्राप्त आहे कीं,

“ मी तुझा आहें, परंतु तूं कांहीं माझा नाहींस. ” समुद्र आणि लाटा यांचा व्यावहारिक दृष्टांत ह्या ठिकाणीं चांगला लागू पडतो. लाटा जरी समुद्राच्या आहेत असें म्हणतां येतें, तथापि समुद्र त्या लाटांचा आहे, असें प्रतिपादन संभवत नाहीं. तेव्हां तात्पर्य असें कीं, जीवशिवांचें जरी परमार्थदृष्ट्या ऐक्य असलें तथापि जीवानें परमात्म्याचें आराधन केलेंच पाहिजे.

हें ईश्वराचें आराधन कसें करावें, ह्याबद्दल योगसूत्रांत प्रकार सांगितला आहे, तो असा:—साधकानें प्रणवाचा जप करावा. प्रणव म्हणजे ओंकार होय. हा ओंकार ईश्वरवाचक आहे. म्हणजे प्रणव आणि ईश्वर यांमध्यें वाच्यवाचक संबंध आहे. व्यवहारामध्यें एकाद्या मनुष्याचें नांव घेऊन त्याला हाक मारिली असतां तो येऊन जसा सन्निध प्राप्त होतो, त्याप्रमाणें ओंकाराचा एकसारखा जप चालविला असतां ईश्वर सन्निध होऊन सुप्रसन्न होतो. हा प्रणवाचा व ईश्वराचा वाच्यवाचक संबंध आजकालचा कांहीं नवीन नाहीं. तो अनादि संबंध आहे. आज आह्मीं तो संबंध वाणीनें व्यक्त करितों एवढेंच. पितापुत्रांचा संबंध पुत्रोत्पत्तीपासूनच जसा सिद्ध झालेला असतो, तसाच वरील संबंधहि सिद्ध आहे. पुत्र झाल्यावर पुढें हा अमक्या तमक्याचा मुलगा, किंवा अमुक तमुक हा त्याचा बाप हें फक्त वाणीनें मात्र उच्चारिलें जातें; तसाच संबंध ओंकार व ईश्वर यांचा आहे. ओंकाराचा विधिपूर्वक जप करून त्याच्या अर्थाचें चिंतन करणें हें ईश्वराचें परम आराधन होय. ओंकार शब्दाचा अर्थ श्रुतिस्मृतींनीं अनेक प्रकारें केला आहे;

परंतु त्या सर्वांत मांडूक्य उपनिषदांत केलेला अर्थ सर्व आचार्यांस व पंडितांस मान्य आहे. त्या अर्थाचें संक्षेपतः निरुपण एथें करूं. ओंकार शब्द अकार, उकार, मकार, आणि अर्धमात्रा एतद्रूप आहे. ह्यांपैकीं अकाराच्या अर्थापासून जागृत अवस्था, विश्व आणि विराट् स्वरूप हीं निष्पन्न होतात; उकाराच्या अर्थापासून स्वप्नावस्था, तैजस आणि हिरण्यगर्भस्वरूप हीं उत्पन्न होतात; मकाराच्या अर्थापासून सुषुप्ति अवस्था, प्राज्ञ आणि ईश्वर ह्यांची उत्पत्ति होते आणि अर्धमात्रेच्या अर्थापासून तुर्यावस्था साक्षी, आणि ब्रह्म हीं निष्पन्न होतात. ह्याप्रमाणें चारी मात्रांचा अर्थ चिंतन करितां करितां अकारांतून उकारांत, उकारांतून मकारांत, व शेवटीं मकारांतून अर्धमात्रेंत, ह्याप्रमाणें ओंकारामध्यें सर्व मनाचा लय करून पंचीकरण होतें. "विचारसागर" म्हणून हिंदी ग्रंथ आहे, त्यांत ह्याबद्दल उत्कृष्ट निरूपण केलेलें आहे; तें साधकांनीं पहावें.

ह्यावरून पाहतां सर्व मंत्रांमध्यें प्रणव ( म्हणजे ओंकार ) हा श्रेष्ठ मंत्र आहे. पराशरस्मृतींत म्हटलेंच आहे कीं—चारी वेद जरी मंत्ररूपच आहेत, तथापि त्या सर्वांमध्यें गायत्रीमंत्र उत्तम. त्याची उपासना ब्राह्मण, क्षत्रिय, आणि वैश्य ह्यांनीं अवश्य करावी, आणि शूद्रांनीं शिवपंचाक्षर म्हणजे " नमःशिवाय " एवढ्याच ओंकारविरहित मंत्राचा जप करावा. ओंकारमंत्र हा सर्व वेदांचें सार असल्यामुळें तो गायत्रीमंत्रापेक्षांहि श्रेष्ठ होय. छांदोग्य उपनिषदामध्यें असें वर्णन आहे कीं, ब्रह्मदेवानें सर्व जगाची उत्पत्ति करितांना प्रथम तीन लोक

निर्माण केले. त्या तिहींचें मंथन केलें, त्यांतून ऋक्, यजु, साम, हे तीन वेद निर्माण झाले. पुढें त्या वेदांचें मंथन केलें, त्यांतून भूः, भुवः, स्वः, ह्या तीन व्याहृति उत्पन्न झाल्या. पुढें त्या व्याहृतींचेंहि मंथन केलें, तेव्हां त्यांतून प्रणवरूप जो ओंकार तो उत्पन्न झाला. म्हणजे सर्वांचें सार ओंकार हें आहे. ह्या ओंकारस्वरूपानें सर्व वाणी ओतप्रोत भरून गेलेली असून त्या वाणीमध्यें सर्व जगत् ओतप्रोत भरून गेलेलें आहे, कारण वाणीशिवाय कोणत्याहि प्रकारची सिद्धि होत नाहीं. अर्थात् ओंकार हा सर्व जगद्रूप आहे असेंच सिद्ध होतें. म्हणून असा जो साररूप प्रणव ( ओंकार ) त्याचा जप करावा, व अर्थचिंतन करावें, म्हणजे ईश्वराची उत्कृष्ट आराधना होऊन आत्मसाक्षात्कार होऊं लागतो. तो झाला म्हणजे निष्कामबुद्धि होऊन ज्ञान प्राप्त होतें आणि शेवटीं मोक्षलाभ होतो.

एथपर्यंत योगाच्या अष्टांगांचें निरूपण झालें. आतां मनोलयाचें दुसरें साधन म्हणजे ज्ञान—ज्याला सांख्य असें म्हणतात, त्याचें निरूपण करावयाचें.

## सांख्यज्ञान

मोक्षप्राप्ति होण्यास ब्रह्मज्ञानाशिवाय दुसरें साधन नाहीं असें श्रुतिस्मृतींत सांगितलेलें आहे. हें ब्रह्मज्ञान केवळ वेदान्तशास्त्राच्या श्रवणानें प्राप्त होत नाहीं. तर त्याला चित्ताची एकाग्रता अवश्य आहे. हें चित्तैकाग्र्य योगाभ्यासाशिवाय होत नाहीं, म्हणून ब्रह्मज्ञानास योगसाधन हा मुख्य उपाय सांगितला आहे. योगाभ्यासानें चित्तवृत्तींचा निरोध होऊन जसा मनोलय होतो, तसाच सम्यक्ज्ञान हा मनोलयाचा दुसरा उपाय आहे. ह्यालाच

गीताशास्त्रांत सांख्य असें म्हणतात. **सांख्यज्ञान ह्याचा अर्थ**—सम्यक् अवेक्षण म्हणजे योग्य रीतीनें पहाणें असा आहे. ह्या सांख्य ज्ञानाचा मथितार्थ असा आहे कीं, जो जो पदार्थ दृष्टिगोचर होतो व जो जो खरा असा इंद्रियांस वाटतो, तो तो पदार्थ जड व परप्रकाश असून मिथ्याभूत समजावा. तसेंच, जो जो परिच्छिन्न, तो तो अनात्मा व असत्य जाणावा. हें जें असत्य व मिथ्याभूत ज्ञान, त्याहून व्यतिरिक्त जें ज्ञान, तें स्वप्रकाश होय व त्याचा अनुभव साक्षित्वरूपानें येतो. अहंकार, मन आणि बुद्धि यांच्या योगानें जें जें खरें असें भासतें, तें असत्य व म्हणून मिथ्याभूत समजावें. एकटा साक्षी तेवढा खरा, हें जें आपलें साक्षिस्वरूप म्हणजे स्वस्वरूप, तें योग्य रीतीनें समजून घेऊन आपण तद्रूप रहावें, म्हणजे विश्वाचें भान न होतां पूर्ण विश्रांति प्राप्त होते. ज्याप्रमाणें रज्जूचे ठिकाणीं सर्पाचा भास होतो, किंवा शिंपीच्या ठिकाणीं रुप्याचा भास होतो, त्याप्रमाणेंच साक्षिस्वरूपाच्या ठायीं इतर ज्ञानाचा केवळ भास समजावयाचा. अशा प्रकारचें जें ज्ञान करून घेणें, त्यास **सम्यक् अवेक्षण** असें म्हणतात. अनादिकालापासून म्हणजे अनंत जन्मांपासून देहाच्या ठायीं उत्पन्न झालेली आत्मबुद्धि सहस्रावधि उपाय केले तरी दूर होत नाहीं. ती आत्मबुद्धि नष्ट झाली पाहिजे. व तिचा नाश झाल्यानंतर आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं साक्षित्व दृढ झालें पाहिजे. अशी स्थिति झाली म्हणजे मग मुक्तीची इच्छा केली नाहीं, तरी ती आपण होऊनच माळ घालिते ! आत्म्याचे ठिकाणीं ज्याला आत्मता भासूं लागते, तोच खरा मुक्त

समजावयाचा. योगवासिष्ठ ग्रंथांत म्हटलेंच आहे कीः—

देहात्मज्ञानवत् ज्ञानं देहात्मज्ञानबाधकं ॥
आत्मन्येव भवेद्यस्य स नेच्छन्नपि मुच्यते ॥ १

म्हणजे देह हाच आत्मा अशा प्रकारचें जें पुरातन काळापासून दृढ झालेलें ज्ञान, तें ज्ञान आत्मज्ञानाला बाधक होतें. म्हणजे देह हाच आत्मा असें समजणारे जे आहेत, त्यांला आत्मविषयक ज्ञान कधींहि होत नाहीं. तसेंच, आत्म्याचे ठायीं आत्मत्वानें ज्ञान म्हणजे आपला आत्मा कोणता, ह्याचें खरें ज्ञान ज्याला झालें आहे, त्याची इच्छा नसली, तथापि तो मुक्त होतो. हें आत्मज्ञान पूर्ण ठसलें म्हणजे अर्थात् मनाचा लय होऊन त्यावर उठलेली संसाररूप इमारतहि नाहींशी होते.

एथपर्यंतच्या विवेचनांत योगाभ्यासानें मनोलय होतो आणि सांख्यज्ञानानेंहि मनोलय होतो हे दोन मार्ग दाखविण्यांत आले, परंतु त्या दोहोंतहि श्रेष्ठ मार्ग कोणता हें पाहिलें पाहिजे. सांख्यज्ञानानें ज्या प्रकारचा पक्का मनोलय होतो, तसा मनोलय योगाभ्यासानें कधींहि होत नाहीं. कारण त्याची शाश्वती नसते. योगबलानें जोंपर्यंत चित्तवृत्ति निरोधित असते, तोंपर्यंतच मन मूर्च्छित होतें. परंतु त्या चित्तवृत्तींचें व्युत्थान झालें कीं लगेच घडी उलटते, म्हणजे जगाच्या सत्यत्वाचा भास होऊं लागतो. आणि तो भास होऊं लागला म्हणजे सुखदुःखाचें लचांड पाठीशीं लागतें, कारण प्रारब्धकर्म कधीं चुकत नाहीं. तें भोगलेंच पाहिजे, असा श्रुतिस्मृतींचा सिद्धांत आहे. ही स्थिति योगाभ्यासानें केलेल्या मनोलयाची झाली. सांख्यज्ञानानें असें होत नाहीं. सम्यक् ज्ञानप्राप्ति ज्या पुरु-

षाला झाली आहे, त्याला कदाचित् प्रपंचाचा भास झाला, तथापि सुखदुःखें त्याला भोगावीं लागत नाहींत. कारण सांख्यज्ञानाचें मुख्य प्रमेयच असें आहे कीं, सुखदुःखादि जीं प्रारब्धकर्में आहेत, तीं भोगण्याचा फक्त वांटेकरी देह आहे. देहाच्या माथीं मात्र तीं बसतात. अकारी जो आत्मा, त्याच्यावर त्यांचा अंमल चालत नाहीं. तात्पर्य, खरें आत्मज्ञान झालें असतां प्रारब्धाच्या योगानें होणारीं सुखदुःखें निश्चयेंकरून टळतात. ह्यास्तव सांख्य म्हणजे आत्मज्ञान, त्यानें मनोलय करण्याचा मार्ग हाच योगमार्गानें चित्तवृत्तींचा निरोध करण्यापेक्षां श्रेष्ठ मानिलेला आहे.

मंदबुद्धि व अशुद्ध चित्त असेल तर ज्ञानग्रहण होत नाहीं. आणि ‘ तत्त्वमसि ’ ह्या महावाक्याचा अर्थ त्या अशुद्ध चित्तांत प्रवेश करीत नाहीं. गुरूचे श्रम मात्र व्यर्थ होतात. आत्म ( सांख्य ) ज्ञानास तीक्ष्णबुद्धीचीच विशेष अवश्यकता आहे. तीक्ष्णबुद्धीचे ठायीं गुरुमुखानें सांगितलेला महावाक्याचा अर्थ योग्य रीतीनें प्रतिबिंबित होतो. यास्तव जर मंदबुद्धि असेल, आणि महावाक्याचा अर्थ ग्रहण करण्याची बुद्धीची योग्यता नसेल, तर प्रथम योगाभ्यास करून मनोलय करावा असें श्रुतींनीं सांगितलें आहे. योगानें चित्ताचा निरोध करून बुद्धीला तीक्ष्णता प्राप्त झाली असतां निदिध्यासन योग्य रीतीनें होऊं लागतें. निदिध्यासन ही आत्मज्ञानाची तिसरी पायरी आहे. त्याच्या अगोदरच्या दोन पायऱ्या म्हटल्या म्हणजे श्रवण आणि मनन ह्या आहेत. योगाभ्यास केल्यानंतर मग महावाक्याचा बोध करितांना गुरूला फा-

रसे प्रयास पडत नाहींत. व निदिध्यासन उत्कृष्ट होऊं लागतें. असो. मनोलय प्रकरण एथें संपलें. आतां महावाक्याचा उपदेश होऊन साधकानें निदिध्यासन जरी सुरू केलें, तरी पूर्वकर्मांच्या संस्कारानें अनेक वासनांचा कल्होळ उठतो, व तेणेंकरून मनाची एकाग्रता नाहींशी होते. यास्तव मनोलय झाल्यानंतर पुढें आड येणाऱ्या त्या वासनांचा उपशम करण्याचा प्रयत्नहि करावा लागतो. त्या प्रयत्नाला " वासनोपशम " ही संज्ञा आहे. त्याचें निरूपण पुढील प्रकरणापासून करण्यांत येईल.

# प्रकरण नववें

## वासनोपशमन

पुण्यस्य फलमिच्छंति पुण्यं नेच्छंति मानवाः ॥
न पापफलमिच्छंति पापं कुर्वंति यत्नतः ॥ १

—जीवन्मुक्तिविवेक

आर्यतत्त्वज्ञानांत मनोलयानंतर वासनोपशमन हें प्रकरण आहे. मनोलय आणि वासनोपशमन हीं दोन्ही ज्याला साधलीं, तो केवळ जीवन्मुक्त होय. आत्मानात्मविचार केल्याशिवाय वासनांचा उपशम होत नाहीं. ह्यास्तव अगोदर आत्मा कोणता, आणि अनात्मा कोणता ह्याची निवड करितां आली पाहिजे. ह्या दोहोंतील भेद कळण्याकरितां सर्वदा आत्मविचार करावा लागतो व आ-

त्म्याचे ठिकाणीं दृढ निर्धार धरावा लागतो. असा निर्धार झाला म्हणजे अनात्मा व्यक्त होऊन तो निःसार व फोलकट असाच भासूं लागतो. मुख्य आत्मविचार म्हणजे हाच कीं,—स्थूलदेह, लिंगदेह किंवा कारणदेह ह्या तिहींपैकीं मी कोणीहि नव्हें, त्याप्रमाणेंच शरीरांतर्गत अस्थि, मज्जा, मांस आणि सप्तधातु ह्याहि मी नव्हें, इंद्रियेंहि मी नव्हें, मी म्हणून जो तो केवळ इंद्रियांला चालन देणारा आहे, बुद्धि, अहंकार वगैरे मी नसून त्यांला प्रकाश देणारा मी आहें. ह्या प्रकारेंकरून निषेधरूपानें वर्णन केलेला जो मी, तो कोण? हा जो दृढविचार करणें, त्याला **आत्मविचार** म्हणावयाचें. हा विचार पूर्ण ठसला म्हणजे कल्पनारूपी वृक्षाचा तात्काळ अंत होतो. अविद्येचें म्हणजे अज्ञानाचें हनन करण्यास समर्थ असा एक आत्मानात्मविचारच आहे.

जगामध्यें ज्या ज्या म्हणून विद्या व कला प्रचलित आहेत, त्या सर्वांत अध्यात्मविद्या ही श्रेष्ठ होय; योगी लोक ह्या विद्येलाच मोठा मान देतात. न्याय, वैशेषिक, सांख्य अशा दर्शनांला ते अनात्म दर्शनें म्हणतात. त्या दर्शनांचा अभ्यास अध्यात्मविद्येस साहाय्यभूत होऊन बुद्धि सूक्ष्म होते, एवढ्याचकरितां करावयाचा. आत्मविचार हा अध्यात्मविद्येंत राजा असून तो सर्व विद्यांचा मुकुटमणि आहे. आत्मविचार हेंच काय तें मुख्य ज्ञान, असें ज्ञानी तत्त्ववेत्ते म्हणतात. ज्ञेय म्हणून जें, तें मग ज्ञानाच्या पोटीं सांपडूं लागतें. ज्ञेय शब्द एथें ‘ निर्मलब्रह्म ’ वाचक समजावयाचा. अशा प्रकारचें जें ज्ञेय, तें इक्षुरसाच्या ठायीं जसा गोडपणा, किंवा मधामधील मा-

धुर्य, त्याप्रमाणें आत्मज्ञानाच्या पोटीं सांपडतें. गुळाच्या ठायीं जशीं गोडी आहे, किंवा क्षारोदकामध्यें जसा खारटपणा आहे, त्याप्रमाणें शब्दाच्या पोटीं अर्थचातुर्य असतें. गुरुचरणांचा लाभ झाल्याशिवाय हें कळत नाहीं. लांकडांच्या पोटीं जसा अग्नि, तंतूमध्यें जसा पट, आणि मातीच्या घटांत जशी मृत्तिका असते, तसेंच आत्मज्ञानामध्यें ज्ञेय हें ब्रह्मरूप असतें, असें प्रतिपादन योगशास्त्रांतील व वेदान्तशास्त्रांतील पूर्ण अनुभवी व ज्ञानी लोकांनीं केलेलें आहे.

सर्व इंद्रियांस चेतनायुक्त करणारा तो कोण? बुद्धि, अहंकार इत्यादिकांस सचेतन करणारा कोण? पूर्ण निद्रा झाल्यानंतर

सुखमहमस्वाप।

म्हणजे, मला स्वस्थ झोंप लागली असें म्हणणारा तो कोण? अशा प्रकारचे वेदान्तशास्त्रांतील जे गूढ प्रश्न, त्यांविषयीं श्रीमद्वसिष्ठानीं उत्कृष्ट प्रतिपादन केलें आहे. मनुष्य कोणताहि विचार मनांत आणून पाहिजे तें कार्य करितो; अशा वेळीं त्याला प्रवृत्त करणारा कोण असावा? असा प्रश्न निघाला. तेव्हां एकानें सांगितलें कीं, सर्वांस प्रकाश देणारा जो सूर्य, तोच त्याला प्रवृत्त करणारा होय. त्यावर आशंका निघाली कीं, सूर्य जर चेतना देतो, तर सूर्यास्त झाल्यानंतर मग चेतना उत्पन्न करणारा व कार्यास प्रवृत्त करणारा कोण? ह्यास उत्तर चंद्र, त्याचे अभावीं तारागण, त्याचे अभावीं अग्नि, त्याचे अभावीं मन अशीं उत्तरें येतात. परंतु त्या उत्तरांनीं पूर्तता होत नाहीं. ह्या वादाचा निर्णय जो योगवासिष्ठांत

केला आहे, तोच शेवटपर्यंत टिकतो. तो निर्णय म्हणजे साक्षिरूप आत्मा, तोच सर्व अंतर्बाह्य वस्तूंचें प्रकाशन करितो, हा होय. सर्वेंद्रियांस व रूपवंत पदार्थांस प्रकाश देणारा साक्षि हाच होय. अंतर्यामींचीं सुखदुःखें पाहणारा साक्षी तोच, आणि "सुखमहमस्वाप" असें म्हणणारा साक्षीहि तोच होय. ह्या साक्षिस्वरूपामध्यें जातिभेद, वर्णाश्रम, मी आमक्याचा बाप, आमका माझा मुलगा अशा तऱ्हेचें ज्ञान मुळींच नसतें.

न वर्णा न वर्णाश्रमाचारधर्माः।
न माता पिता वा न देवा न लोकाः ॥

असें निर्वाणदशकांत सांगितल्याप्रमाणें, वर्ण, वर्णाश्रम, आचारधर्म हीं आत्मसाक्षात्कारांत भासत नाहींत. तसेंच या अवस्थेंत माता, पिता, देव, लोक यांचेंहि भान होत नाहीं. ह्या वेळची आत्म्याची अवस्था म्हणजे शुद्ध चैतन्यमय होय. अशी स्थिति झाली म्हणजे मग वासना टिकणार तरी कशा ? त्यांचा क्षय होतो. सर्व दृश्यमान् पदार्थ मिथ्या आहेत असें ज्ञान झालें म्हणजे वासना वर डोकीं करूं शकत नाहींत. वासना कधींच उत्पन्न होऊं नयेत म्हणून वसिष्ठानीं रामबाण उपाय सांगितला आहे तो असाः—

यस्य मौर्ख्यं क्षयं यातं सर्वं ब्रह्मेति भावनात् ॥
नोदेति वासना तस्य प्राज्ञस्यांबुमतिर्मरौ ॥ १

—योगवासिष्ठ

म्हणजे, सर्व ब्रह्म आहे अशी भावना झाली म्हणजे मौर्ख्याचा—अर्थात् अज्ञानाचा—नाश होतो व मग अंतर्यामीं वासनेचा उदयच मुळीं होत नाहीं. मारवाड देशांत

प्रवास करीत असलेला वाटसरू मार्गानें चालला असतां एथें कोठें पाणी मिळेल ही कल्पनाहि त्याच्या मनांत येत नाहीं. कारण मारवाड देश निर्जल आहे, हें ज्ञान त्याला झालेलें असतें. याप्रमाणेंच 'सर्वं ब्रह्म' अशी भावना झाली म्हणजे अज्ञानास जागाच रहात नाहीं. वासनेचा नायनाट होऊन जातो. वासना म्हणजे पूर्व जन्मांतील धर्माधर्म संस्कार होय. पाप व पुण्य हे ह्याचेच अंकुर असून, विषयापेक्षा होणें तीच वासना. जो वासनांचा त्याग करितो तो प्रारब्धाचा क्षय करितो. व 'देहोहं' हा अभिमान जे धरितात, त्यांस सुखदुःखाची बाधा होते. ज्ञान्यांला सुखदुःखाची उपाधि होत नाहीं, कारण ते दोन्ही सारखींच मानितात. श्रीमद्भगवद्गीतेंत म्हटलें आहेः—

दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ॥
वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ १

म्हणजे, दुःख प्राप्त झाल्यास ज्याचें मन उद्विग्न होत नाहीं, आणि सुखप्राप्ति झाल्यास तद्विषयींचीहि ज्यास इच्छा नाहीं, व कोणत्याहि वस्तूविषयीं प्रेम, भय, आणि क्रोध हीं ज्याचीं नष्ट झालीं असून बुद्धि ठिकाणावर असते त्यास मुनि असें म्हणतात. मुनि शब्दाचा अर्थ श्रुतींत व अन्य ग्रंथांत फार व्यापकतेनें दिला आहे. **मनुते स मुनिः ।** म्हणजे जो सर्वदा मनन करितो तो मुनि, ब्रह्मवेत्ता व ज्ञानी होय. योगाभ्यासानें प्रारब्धाचा नाश कसा होतो, ह्याबद्दल निरूपण पूर्वींच झालें आहे. योगसामर्थ्यानें प्रारब्धाचा भोग भोगणें फार कठिण जात नाहीं. भोग भोगून टळतात किंवा भोगार्थ सुखदुःखें प्राप्त झालीं, तरी त्यांचें भान होत नाहीं. तेव्हां पूर्व जन्मां-

तील संस्कार नाहींसे करून व योगाभ्यास करून वासनांचा नाश करितां येतो हें सिद्ध होतें.

वासनांचा उपशम होण्याकरितां पूर्वी अनेक उपाय सांगितले. त्या सर्वांचा राजा वसिष्ठऋषींनीं सांगितला आहे तो असा:—

साधुसंगमसच्छास्त्रपरो भवसि सन्मते ॥
तद्दिनेनैव नो मासैः प्राप्तोसि परमां धियम् ॥ १

—योगवासिष्ठ

म्हणजे, ज्या दिवशीं सत्समागम आणि सच्छास्त्र ह्याविषयीं तत्पर होशील, त्या दिवशींच सद्बुद्धीतें पावशील. तसें होण्याला कांहीं माहिने नकोत. तात्पर्य असें आहे कीं, वासनांचा जोर कमी होण्यास शुद्धबुद्धि पाहिजे. ती शुद्धबुद्धि सद्गुरुमुखानें महावाक्याचा बोध झाला म्हणजे तत्काल उत्पन्न होते. श्रुतींचा मुकुटमणी जीं उपनिषदें त्यांतील सिद्धांत हेंच सच्छास्त्र होय. सच्छास्त्रश्रवणानें अखिल सृष्टि ब्रह्ममय होऊन जाते. मग वासना कोठून उत्पन्न होतील ? वासनोपशमाविषयीं श्रीमद्वसिष्ठांनीं आणखी एक उपाय सांगितला आहे तो ऐणेंप्रमाणें:—

असंगव्यवहारित्वाद्भवभावनवर्जनात् ॥
शरीरनाशदर्शित्वाद्वासना न प्रवर्तते ॥ १

—योगवासिष्ठ

जगांतील सर्व व्यवहार करावेत, परंतु त्यांमध्यें मन गुंतवून न घेणें ह्याला असंग, असें म्हणतात. असंगपणें वर्तन केलें असतां कोणत्याहि कार्याचें कर्तृत्व किंवा भोक्तृत्व आपणांस चिकटूं पहात नाहीं व आपले हातून जरी कर्में घडलीं, तरी आपण आकाशाप्रमाणें त्यांपासून

अलिप्त राहतो. तसेंच भव म्हणजे प्रपंच, त्या प्रपंचामध्यें खरेपणा आहे असें कधींहि मनांत आणूं नये; म्हणजे असत्य जो प्रपंच, तो सत्य आहे असें मानूं नये. कारण ब्रह्म तेवढें सत्य असून प्रपंच मिथ्या आहे. हा महासिद्धांतच आहे. त्याचप्रमाणें शरीराचा नाश केव्हां होईल ह्याचा नेम नाहीं असा नेहमीं पोटीं विवेक असावा. शरीर हें परिणामीं नाशवंत आहे, याबद्दल उपपादन पूर्वी पुष्कळ झालेंच आहे. ज्याच्या अंतःकरणामध्यें तीव्र वैराग्य उपजलें आहे व ज्यानें आत्मानात्मविवेक केला आहे, त्यासच क्षणोक्षणीं होणारा शरीराचा नाश दिसतो. तेव्हां ह्या तिन्ही उपायांनीं म्हणजे—सर्व व्यवहार असंगपणें केल्यानें, प्रपंच मिथ्या मानिल्यानें, आणि शरीरनाशाचा विचार नेहमीं मनांत बाळगिल्यानें वासनांचा पूर्ण क्षय होऊन फिरून त्याला अंकुर सुद्धां फुटत नाहीं. "सर्व ब्रह्म" ह्या भावनेचा अभ्यास नेहमीं करीत असावा. भावनेच्या जोरानें कसे अद्भुत प्रकार घडतात ह्याचा निर्देश पुढील वचनांत केला आहे.

दृढभावानुसंधानाद्विमूढा अपि राघव ॥
विषं नयन्त्यमृततताममृतं विषतामपि ॥ १

—योगवासिष्ठ

कोणत्याहि पदार्थाची दृढभावना केली असतां मूर्ख मनुष्य सुद्धां तदाकार होऊन जातो. विषाच्या ठिकाणीं अमृताची भावना जर केली, तर त्यापासून कांहीं अपकार होत नाहीं; तसेंच अमृताच्या ठिकाणीं जर विषाची भावना केली तर विषाचे परिणाम अनुभवास येतात. कोणा एकाला सर्पानें दंश केला. त्या वेळेस त्याला एकानें सां-

गितलें कीं, अरे, तुला सर्पानें दंश कोठें केला आहे? विंचवानें दंश केला आहे. त्याबरोबर असा चमत्कार झाला कीं, सर्प चावला म्हणून जें भय उत्पन्न झालें होतें, तें तत्काळ नाहींसें होऊन त्याचें मरण चुकलें. ह्याप्रमाणेंच एकास विंचू चावला असतां दुसऱ्यानें त्याला सर्प चावला म्हणून सांगितलें त्यामुळें झालें काय, कीं सर्प चावला ह्या भावनेच्या ध्यासानें तो खरोखरच मरण पावला. लहान मुलास बाऊ आला असें सांगितल्याबरोबर त्या मुलाचा आकांत होतो. त्याप्रमाणें कीटकाचे भृंग होऊन उडूं लागतात. हा सर्व भावनाप्रकार झाला. हाच भावनाप्रकार देहाचे ठिकाणीं लाविला असतां कसा प्रकार होतो हें पुढील वचनावरून स्पष्ट होईल.

सत्यभावेन दृष्टोऽयं देहो देहो भवत्ययम् ॥
दृष्टस्त्वसत्यभावेन व्योमतां याति देहकः ॥ १

—योगवासिष्ठ

आपला आत्मा तोच देह असें मानूं लागलें म्हणजे देहच आत्मा बनून जातो; परंतु देह हा आत्मा नव्हे असा निश्चय झाला म्हणजे देह असत्य वाटूं लागतो. देह असत्य वाटूं लागला म्हणजे भय, दुःख इत्यादि जे विकार ते उत्पन्न होत नाहींत. याकरितां मी देह आहें अशा प्रकारची बुद्धि टाकून द्यावी म्हणजे वासना उत्पन्न होत नाहींत. आत्म्याचे ठिकाणीं देहबुद्धि झाली असतां स्वस्वरूपावर आवरण पडून त्याचा अनुभव येत नाहीं. या ठिकाणीं अशी शंका उत्पन्न होते कीं, जर आपण सर्व व्यवहार देहाच्या साहाय्यानें करितों, आणि तो देह आपला कोणीच नाहीं अशी भावना केली, तर मग करावें

तरी काय? ह्या शंकेचें समाधान श्रीमद्वसिष्ठानीं केलें आहे तें असें:—

ब्रह्मैकं भावयन्साधुः शांतस्तिष्ठन्गतव्यथः ॥
यतस्तेऽसावहंभावः स्वयमेव विनश्यति ॥ १

—योगवासिष्ठ

ह्याचा अर्थ असा आहे कीं, शास्त्रश्रवणानें प्रपंच मिथ्या व ब्रह्म सत्य अशी स्थिति झाली असतां काम, क्रोध इत्यादि उर्मि लयास जातात. बुद्धीमध्यें शांति हा गुण वास्तव्य करितो व विपरीत भावना नष्ट होतात. प्रपंचाचें भान झालें नाहीं म्हणजे राग, द्वेष हेहि मावळतात व सुखदुःखाची व्यथा नाहींशी होते. अशी स्थिति झाली असतां देहाच्या ठिकाणीं अनेक जन्मांपासून दृढ झालेला जो अहंभाव तो नष्ट होतो. अंतःकरण स्वस्थ झालें असतां द्वैतदुःखाची तळमळ रहात नाहीं. व चोहोंकडे आनंद पसरलेला आहे असा अनुभव येतो. मग तेथें वासना कोठून उत्पन्न होणार ?

# प्रकरण दहावें

## आत्ममनन



प्रत्यगर्थमनालिंग्य न पराग्वर्ति किंचन ॥
विज्ञानं जायते यस्मादात्मोपास्तिः सदा ततः ॥ १

—योगवासिष्ठ

मन आणि वासना हीं जागृत असतां स्वस्वरूपप्राप्तीला विघ्नें कशीं येतात हें पूर्वीं सांगितलेंच आहे. तीं

विघ्नें म्हणजे असंभावना. सद्गुरुदर्शन जरी झालें, त्यानीं महावाक्याचा उपदेश जरी केला, सर्व जगत् मिथ्या व ब्रह्म सत्य असें जरी कळलें, तथापि अनेक जन्मांच्या उपाधीमुळें विश्व सत्य असेंच वाटूं लागतें. ही मनाची व वासनेची करणी होय. म्हणून त्यांचा उपशम श्रवणाशिवाय कधीं होणार नाहीं. श्रवणाशिवाय कितीहि उपाय केले तरी ते व्यर्थ होत. श्रवणाचे योगानें वेदवाक्य प्रमाणभूत आहे अशी खात्री होते. वेदान्तशास्त्राच्या श्रवणानें प्रमाणासंभावना तत्काळ नाहींशी होऊन सर्व सृष्टींतील व्यापारांची सोपपत्तिक जुळणी एका श्रुतींत आहे, इतर कोठेंहि नाहीं अशी खात्री होते. यास्तव श्रवण करावें म्हणून वारंवार वसिष्ठानीं सांगितलें आहे. तसेंच वेद ज्याप्रमाणें प्रमाणभूत आहेत, त्याप्रमाणेंच आपले गुरु देखील प्रमाणभूत आहेत, अशी श्रवणानें खातरी होते. जशी ईश्वरावर श्रद्धा व भक्ति, तशीच गुरूवर श्रद्धा व भक्ति असली पाहिजे.

यस्य देवे पराभक्तिर्यथा देवे तथा गुरौ ॥
तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशंते महात्मनः ॥ १

—श्वेताश्वतर

ह्याचा अर्थ—ज्याची परमेश्वरावर विमल भक्ति आहे व जशी परमेश्वरावर तशीच गुरुवरहि भक्ति असते, असा जो महात्मा पुरुष, त्याला वेदोक्त सिद्धांत आरशासारखे स्पष्ट दिसतात. श्रवणाच्या योगानें प्रमाणासंभावना नाहींशी होऊन वेद आणि गुरु सांगतात तें खरें अशी भावना झाली व सर्व ब्रह्म आहे आणि प्रपंच मिथ्याभूत आहे असें जरी समजलें, तरी ती गोष्ट स्वानुभवाला न

आल्यामुळें प्रमेयासंभावना उत्पन्न होते. प्रमेयासंभावना म्हणजे ' मी ब्रह्म कसा?' ह्याची शंका उत्पन्न होणें. ही शंका निवारण करण्याकरितां आत्ममननाकडे प्रवृत्ति झाली पाहिजे. व आत्ममनन प्रकरणाचा उद्देश तरी तोच आहे. नानाप्रकारच्या युक्ति करून आत्म्याचें जें अनुचिंतन करावयाचें त्यालाच **आत्ममनन** असें म्हणावयाचें. आत्ममननाच्या योगानें आत्मानुभव कसा घडावा ह्याबद्दल वासिष्ठानीं पुढील उपाय सांगितला आहे.

शुद्धो निरंजनोऽनंतो बोधोऽहं प्रकृतेः परः
चेष्टमानमिमं देहं पश्याम्यन्यशरीरवत् ॥ १

—**योगवासिष्ठ**

—मी शुद्धबुद्ध आहें, म्हणजे स्वप्रकाश आहें; तथापि सूर्यावर अभ्रपटलें जशीं येतात तशा मला उपाधि कांहींएक नसून मी निरुपाधिक आहें, अशी भावना करावी. तसेंच देश, काल व वस्तु या तिहींनीं अखिल पदार्थ परिच्छिन्न आहेत, तसा मी नसून अनंत आणि सर्वव्यापक आहें. त्याप्रमाणेंच मी ज्ञानस्वरूप आणि स्वयंबोध आहें. मी प्रकृतीचा नियंता जरी आहें, तरी तिच्याहून भिन्न आहें. व इतरांचे देह नानातऱ्हेचे व्यापार करितांना आपण पाहतों, त्याप्रमाणेंच पूर्वसंस्कारेंकरून अनेक कर्में व व्यवहार करणारें हें आपलें शरीर आपल्याहून भिन्न आहे असें पाहण्याचा अभ्यास करावा. अशा रीतीनें मी फक्त साक्षीभूत आहें, कोणतेंहि कर्म करणारा मी नव्हें, अशी जी नाना युक्तींनीं भावना करणें त्यालाच आत्ममनन म्हणावयाचें. आत्मबोध होण्यास वसिष्ठानीं भावनेचे आणखी प्रकार सांगितले आहेत ते असेः—

आपद्यचलचित्तोऽस्मि जगन्मित्रच संपदि ॥
भावाभावविहीनोऽस्मि तेन जीवाम्यनामयम् ॥ १

—योगवासिष्ठ

म्हणजे—नानाप्रकारचीं संकटें जरी प्राप्त झालीं, तथापि माझें चित्त गडबडत नसून मी स्वस्वरूपस्थ आहें; कारण आपत्ति ज्या येतात, त्या देहवंताला येतात. परंतु मी तर देह व इंद्रियें याहून भिन्नच आहें. मग त्या आपत्ति मला पीडा कशाला करतील? अशी भावना करावी. त्याप्रमाणेंच दैववशात् संपत्ति प्राप्त झाली तर "वसुधैव कुटुंबकं" ह्या न्यायानें जगाशीं वर्तन ठेवावें. संपत्तीच्या गर्वानें चढून गेला आहे असें मात्र होऊं नये. ह्याला व्यवहारांतील पर्वताचा व समुद्राचा दृष्टांत लागू पडतो. कितीहि झंझावात सुटला तरी त्यानें पर्वताचें स्थैर्य कधीं नष्ट होत नाहीं. तसेंच वर्षाकाळीं कितीहि पर्जन्य पडला तथापि समुद्र उचंबळून वर जात नाहीं. तद्वत् अशा पुरुषाचें चित्त, संपत्ति व विपत्ति ह्या दोन्ही अवस्थांमध्यें विकाररहित रहातें. देहरूपी मी नाहीं व देहाचा अभावहि मजमध्यें नाहीं, तर मी केवळ साक्षी आहें, अशा रीतीनें विकाररहित राहून जो बोध करून घेणें, त्याला आत्ममनन असें म्हणावें.

निरीहोऽस्मि निराशोऽस्मि खवत् स्वस्थोऽस्मि निस्पृहः॥
शांतोस्म्यहमरूपोऽस्मि चिरायुरचलस्थितिः ॥ १

—योगवासिष्ठ

मी देहेंद्रियांला चालन देऊन त्यांजकडून कर्में घडविणारा आहें; परंतु मी स्वतः कोणतींहि कर्में करीत नाहीं. जसें दिव्याच्या प्रकाशाच्या योगानें सर्व कामें घडतात,

परंतु तो दीप अचलच असतो, त्याप्रमाणें मी अचल राहून सर्वांस गति देणारा आहें; मी आकाशाप्रमाणें कूटस्थ असून मला कोणत्याहि कर्तव्याची अपेक्षा उरली नाहीं. तसाच मी शांतस्वरूपी असून गुणविहीन आहें, रूप, रंग मला कांहींएक नाहीं. अशा रीतीनें आकाशाप्रमाणें स्थिर व सर्वव्यापक मी आहें, असा भास आत्ममननाच्या योगानें आपणास होतो. तसेंच सर्व जीव मजमध्यें आहेत, व सर्व प्राण्यांचें जीवित्व माझ्या ठिकाणीं उल्हास पावतें असाहि अनुभव आत्ममननानें येतो.

मय्यनंते चिदंभोधावाश्चर्यं जीववीचयः ।।
समुल्लसंति खेलंति प्रविशंति स्वभावतः ।। १

**—योगवासिष्ठ**

याचा अर्थ—चिद्रूपी जो अगाध समुद्र, तो मीच असून, नानाप्रकारचे जे जीव तद्रूपी लाटा मजमध्यें उत्पन्न होतात, स्थिति पावतात व लयासहि जातात. अशा प्रकारच्या लाटा कितीहि जरी उत्पन्न झाल्या, तरी माझ्या ठिकाणीं क्षयवृद्धि कांहींएक भासत नाहीं. कारण मी चिदानंदस्वरूपी आहें. अशाच तऱ्हेनें मनन करून आत्मज्ञान झालें म्हणजे मग आपल्यासच नमन करावें अशी स्थिति बाणते.

सर्वभूतांतरस्थाय नित्यमुक्तचिदात्मने ।।
प्रत्यक्चैतन्यरूपाय मह्यमेव नमोनमः ।। १

**—योगवासिष्ठ**

जो मी सर्व भूतांच्या अंतर्यामीं राहणारा, त्या मला नमस्कार असो. नित्यमुक्त असा जो मी, व केवळ चिद्रूप जो मी, त्याला नमस्कार असो. त्याप्रमाणेंच स्वयंप्र-

काश व प्रत्यग्रूप जो मी त्या मला नमस्कार असो. विश्वरूप लाटा चिद्रूपामध्यें खेळत असतां माझ्याहून दुसरें कांहींच मला दिसत नाहीं, व केवळ आनंदस्वरूपीं राहणारा जो मी त्या मला पुनःपुनः नमस्कार असो. अशा रीतीनें नानाप्रकारच्या भावना रात्रंदिवस करून आत्ममनन केलें असतां मनोनाश व वासनाक्षय हीं तत्काल होतात. एथें आत्ममनन प्रकरण संपलें. पुढील प्रकरणांत शुद्धनिरूपण देऊन निदिध्यासनाचें उपपादन करूं.

# प्रकरण अकरावें

## शुद्धनिरूपण

बहुशास्त्रकथाकंथारोमंथेन वृथैव किं ॥
अन्वेष्टव्यं प्रयत्नेन तत्त्वज्ञैर्ज्योतिरांतरं ॥ १

—जीवन्मुक्तिविवेक

श्रवणाच्या योगानें प्रमाणासंभावना नाहींशी होऊन श्रुति आणि गुरु हे सत्य आहेत अशी खात्री होते, व मननाच्या योगानें प्रमेयासंभावना नाहींशी होऊन मी ब्रह्म आहें अशी खातरी होते, ह्याबद्दल पूर्वे प्रकरणांत निरूपण झालेंच आहे. अशी स्थिति जरी झाली, तथापि अनेक जन्मांच्या संस्कारामुळें देहादिक प्रपंच हा खरा भासतो व तेणेंकरून स्वस्वरूपापासून आपली च्युति होते; ह्याचेंच नांव विपरीतभावना. ही भावना दूर होण्यास निदिध्यासन करावें असें आर्यतत्त्वज्ञानांत सांगितलें आहे. हें निदिध्यासन कसें करावें हें योगवासिष्ठा-

च्या ज्या प्रकरणांत सांगितलें आहे, त्याला " शुद्धनिरूपण " अशी संज्ञा दिली आहे. शुद्धनिरूपण म्हणावयाचें कारण हेंच कीं—निदिध्यासनानें प्रपंचाचें निरसन होऊन उपाधींचा पूर्ण क्षय होतो व ब्रह्म तेवढेंच उर्वरित रहातें. म्हणजे व्यवहारांत आपण गाळून जसें शुद्ध सत्त्व काढितों, त्याप्रमाणेंच उपाधींच्या क्षयानें आत्म्याच्या शुद्धास्थितीचा आपणास अनुभव येतो. हें निदिध्यासन कसें करावयाचें, ह्याचा मार्ग श्री वसिष्ठानीं चांगला दाखविला आहे. त्या निरुपणावरून निदिध्यासन करणारा पुरुष लोकांमध्यें वर्तन कसें करतो व त्याची आंतरस्थिति कशी असते, हें चांगलें दिसून येईल.

ज्ञानाची पहिली पायरी जी शुभेच्छा, ती प्राप्त झाल्यानंतर संसाराचें भय नाहींसें होतें, आणि मनन केल्यानंतर कोणतींहि कर्में केलीं, तरी निःसंगता ढळत नाहीं.

बहिः कृत्रिमसंरंभो हृदि संरंभवर्जितः ॥
कर्ता बहिरकर्तांच लोके विहर राघव ॥ १

—योगवासिष्ठ

प्रथमतः संरंभ म्हणजे काय हें पाहूं. विषयाचे अभिलापामुळें मनामध्यें जो हव्यास उत्पन्न होतो, व जेणेंकरून मन चंचल होतें, त्यास **संरंभ** असें म्हणतात. अशा प्रकारचा संरंभ मनांतून काढून टाकून केवळ औपचारिक रीतीनें बाह्य कर्में करणें असें त्या पुरुषाचें वर्तन असतें. उघड रीतीनें तो अनेक प्रकारचीं कर्में करीत आहे, व तेणेंकरून विषयसुखाची त्या पुरुषामध्यें जरी इच्छा दृष्टीस पडली, तरी त्याच्या अंतर्यामीं कर्तेपण मुळींच असत नाहीं; मी कर्म करितों असें तो लो-

कांत कृत्रिमपणें मात्र दाखवितो. ह्यावर अशी मोठी शंका उत्पन्न होते कीं, एकादी गोष्ट जर मनामध्यें अगोदर आली, तरच तद्विषयीं बाह्य प्रवृत्ति होते. आधीं जर एकादे गोष्टीची मनांत इच्छा उत्पन्न झाली, तरच तदनुरूप बाह्य कर्में घडतात. श्रुतींत तर असें सांगितलें आहे कीं,

यद्धि मनसा ध्यायति तद्वाचा वदति ।

—बृहदारण्यक

याचा अर्थ असा कीं, अगोदर जसें पदार्थाचें मनानें ध्यान होतें, तसेंच इंद्रियांकडून घडतें. ह्या श्रुतींत वाचा हें केवळ उपलक्षण आहे. म्हणजे वाचा शब्दानें सर्व इंद्रियगण समजावयाचा. कोणताहि विषय मनांत आणिल्याशिवाय तिकडे इंद्रियांची प्रवृत्ति होतच नाहीं. मनानें जर कोणतीहि इच्छा धरिली, तरच इंद्रियांचें वर्तन होतें. असें जर आहे, तर मग अंतर्यामीं कर्तेपण नसतांना केवळ बाह्य रीतीनें कर्तेपणा प्रकट करावयाचा हें म्हणणें कसें? ह्याचें उतर असें कीं, विषयाचे संबंधानें जितकें म्हणून विपरीत कल्पन तितकें ज्ञानी पुरुषास मिथ्याभान होय. मग विषयाविषयीं संकल्प-विकल्प किंवा मनन हें कोण कशासाठीं करणार? जो अपूर्णकाम म्हणजे ज्याच्या इच्छा तृप्त झाल्या नसतील, तोच विषयाची हांव धरील. ज्याची इच्छा तृप्त झाली आहे, तो कधींहि हांव धरणार नाहीं. तसेंच आपणाहून दुसरी एकादी वस्तु थोर जर दृष्टीस पडली, तरच तद्विषयीं कामना उत्पन्न होणार. परंतु ज्ञानी पुरुष आपणास सर्वांहून उत्तम व सर्वांहून वरिष्ठ समजत असल्यानें त्यास कोणत्याहि वस्तूची वांछाच रहात नाहीं. सर्व जगाचा

एकंदर व्यवहार पाहिला असतां असें दिसतें कीं, ज्याला त्याला नेहमीं सुख पाहिजे; दुःख कोणालाहि नको. पशुपक्ष्यादिक अखिल जीवमात्रांची हीच इच्छा असते. पुत्रदारादिक देहसौख्यें मला परिपूर्ण असावींत व भूतभविष्यत् दुःखें एक घडीभरहि मला नसावींत असें प्रत्येकाला वाटतें. वास्तविक पहातां ही जी दुःखनाशाविषयीं व सुखोन्नतीविषयीं इच्छा, ती आत्मसुखावेगळी कधींहि घडत नाहीं. हें आत्मसुख ज्याला लाभलें आहे, तो साम्राज्य, भौज्य, स्वाराज्य इत्यादि राज्येंहि तुच्छ मानितो. जो निरंतर परमानंदाचें सेवन करतो, त्याला कांजी पिण्याची आठवण कशाला होईल ? तसेंच जो नित्य दिव्यान्नें जेवितो, तो वाळलेल्या काड्या कशाला चघळीत बसेल ? तद्वत् जो स्वयें ब्रह्मरूप झाला व ब्रह्मानंदानें जो तृप्त झाला, त्याचें मन विषयभोगाची इच्छा कशाला बरें करील ? अशा रीतीनें त्या पुरुषाची अंतर्यामीं जरी विषयेच्छा नाहींशी झाली, तरी जीवधर्माप्रमाणें लोकसंग्रहार्थ त्याला कर्में करणें भाग आहे. तथापि तो पुरुष जीं कर्में करितो, व इतर लोक जीं कर्में करतात, त्यामध्यें महदंतर आहे. तो पुरुष हेतूशिवाय कर्में करितो. इतरांचीं कर्में सहेतुक असतात. त्या पुरुषाची कर्माचे ठिकाणीं आसक्ति मुळींच नसते. तेव्हां जेथें अहंकार व आसक्ति नाहींत तेथें कामसंकल्प कोठला उत्पन्न होणार ? त्याचीं सर्व कर्में कामसंकल्पशून्य होतात. ह्यालाच अंतर्यामीं कांहीं नाहीं आणि बाह्य कर्में करीत आहे असें म्हणावयाचें. अशाच अर्थाचीं श्रीमद्भगवद्गीतेंत वचनें आहेत तीं अशीं:—

यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ॥
ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः ॥ १
यस्य नाहंकृतोभावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ॥
हत्वापि सइमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते ॥ २

ह्याचा अर्थ वर लिहिल्याप्रमाणेंच आहे.

निदिध्यासनाचा प्रकार वसिष्ठानीं आणखीहि असा सांगितला आहे कीं—ध्याता, ध्येय व ध्यान ह्या तिहींचें स्फुरण न होई अशा रीतीनें रहावें. जोंपर्यंत त्या त्रिपुटीचें स्मरण होतें, तोंपर्यंत अपूर्ण दृष्टि आहे असें समजलें पाहिजे. तेव्हां ध्याता, ध्येय इत्यादिकांचा त्याग करून स्वरूपस्थ रहावें, म्हणजे जीवन्मुक्त अवस्था प्राप्त होते. अशा रीतीनें लोकांमध्यें वर्तन केलें असतां देहादि प्रपंचाचें भान होत नाहीं व विपरीत भावना नाहींशी होते. आत्मसाक्षात्कारास मुख्य विघ्नें म्हटलीं म्हणजे असंभावना व विपरीत भावना हीं आहेत. तीं विघ्नें श्रवण, मनन, निदिध्यासन ह्या प्रकारांनीं दूर होतात.

प्रपंचाकार जें द्वैत उत्पन्न होतें, त्याचें निरसन सर्वदा एकांतांत बसून करावें, म्हणजे साक्षात्कारास अडचण पडत नाहीं. एकांतांत बसलें असतां आपणाव्यतिरिक्त जे जे पदार्थ अंतःकरणांत स्फुरण पावतील, त्यांचा त्याग करावा आणि स्वरूपस्थितीनें असावें. आत्म्याला सजातीय जेवढ्या वस्तु त्यांचेंच अवलंबन करून त्यांसच ध्येय करावें. हें आपलें सजातीय रूप गुरुमुखानें ओळखून घ्यावें, आणि तद्रूप रहावें. ह्यासच **साक्षात्कार** म्हणतात.

जगामध्यें निर्विभाग स्थितींत राहण्याचा प्रयत्न क-

रणें हा निदिध्यासनाचा मुख्य उपाय आहे. **निर्विभाग स्थिति** म्हणजे वस्तूंत विभाग नाहीं अशी भावना होणें. जोंपर्यंत जगांतील वस्तु निरनिराळ्या आहेत असा भास होतो, तोंपर्यंत चित्त तद्रूप होऊन त्यास विकार प्राप्त होतो. हा हत्ती, हा पशु, अशी जी प्रतीति होणें, त्याला **विभागस्थिति** म्हणावयाची. सोन्याचे दागिने अनेक प्रकारचे जरी असले, तथापि त्यांत नामरूपाचीच मिरवणी असते. वस्तुतः सर्व दागिन्यांतील सोनें म्हणून एकच. त्याप्रमाणें जगांतील वस्तु भिन्नभिन्न जरी दिसल्या, तथापि त्या सर्वांचें अधिष्ठान एकच होय. असें जें ज्ञान, त्याला निर्विभागस्थिति म्हणावयाची.

अंतरीं अकर्तेपण असून सकल बाह्यकर्में ज्ञानी पुरुष कशीं करितो, याविषयीं निरूपण झालें. त्या स्थितींतील मुख्य तात्पर्य असें आहे कीं, अहेतुकपणें कितीहि बाह्यकर्में केलीं, तरी साक्षीपण नष्ट होत नाहीं. निदिध्यासन कसें करावें हें पुढील श्लोकांत चांगलें सांगितलें आहे.

एको विशुद्धबोधोहमिति निश्चयवह्निना ॥
प्रज्वाल्य द्वैतगहनमेक एव सुखी भव ॥ १

**—योगवासिष्ठ**

ह्याचा अर्थ असा कीं, मी एकाकी असून शुद्धज्ञानस्वरूपी आहें, असा अद्वैतबोधाग्नि पेटवून त्यामध्यें द्वैततृणाच्या ज्या राशी, त्या भस्म करून टाकिल्या म्हणजे आत्मसुख प्राप्त होतें. मुख्य द्वैताचें भान होणें म्हणजे देहस्फुरण होय. ही स्फूर्ति जोंपर्यंत होत असते, तोंपर्यंत स्वस्वरूपाचा प्रकाश होत नाहीं. याकरितां मी देह नव्हें, मी इंद्रियवर्गोहि नव्हें, विश्वहि मी नव्हें, तर केवळ अ-

संगज्ञानस्वरूप मी आहें, अशी जी भावना, तीच निदिध्यासनाची खूण समजावी. निदिध्यासनाचा दुसरा प्रकार असा लिहिला आहे कीं—

अजाग्रत् स्वप्ननिद्रस्य यत्ते रूपं सनातनं ॥
सचेतनं विशुद्धं च तन्मयः सर्वदा भव ॥ १

—योगवासिष्ठ

याचा अर्थ असा कीं—जागृति, स्वप्न व सुषुप्ति ह्या अवस्थात्रयाहून निराळें व ह्या तिन्ही अवस्थांचें साक्षिस्वरूपानें पाहणी करणारें असें जें आपलें निर्मल व सनातन स्वरूप आहे, तन्मय सर्वदा रहावें. ही अवस्था साधण्याकरितां कोणतेंहि साहस करण्याचें कारण नाहीं. कारण ही अवस्था आपली स्वतःसिद्धच असते. केवळ उपाधींचा जो पडदा मध्यें येतो, तो मात्र दूर केला पाहिजे. घटपटादि पदार्थ जे आपण नेत्रांनीं पाहतों, तद्रूप कधींहि न होतां स्वस्वरूपामध्यें तन्मय होऊन जाणें हें निदिध्यासनाचें वर्म होय. विजातीय वस्तूंचा त्याग केला असतां केवळ ब्रह्म शिल्लक राहतें हें पूर्वींच सांगितलें आहे. मन आणि मनाचे संकल्प हे सोडून देऊन चिद्रूप कसें राहतां येईल, अशी शंका आली असतां त्यावर वसिष्ठानीं एक अद्भुत उपाय सांगितला आहे तो असा कीं

संकल्पेनैव संकल्प मनसैव मनो मुने ॥
स्थित्वा स्वात्मनि तिष्ठ त्वं किमेतावति दुष्करं ॥ १

—योगवासिष्ठ

स्वरूपस्थिति साधीत असतां मन आणि संकल्प यांचा कल्होळ उठून विघ्नें होतात, तीं दूर होण्याकरितां असें करावें कीं—मी देह आहें असा असत्संकल्प उत्पन्न

झाला असतां "ब्रह्माऽहमस्मि" असा संकल्प करून त्यानें तो मारून टाकावा. याशिवाय संकल्पाचा संहार होण्यास दुसरा मार्ग नाहीं. बरें, संकल्प सर्व मरून गेले तरी मूळ मन कायम राहतेंच. तें फिरून प्रपंचानुसंधान करवितें, त्याला उपाय काय करावा? अशी एथें शंका येईल. त्यावर असें उत्तर येतें कीं—विषयरूप होणारें जें अशुद्ध मन तें शुद्ध मनानें नष्ट करून टाकावें. ह्यास व्यावहारिक दृष्टांत म्हटला म्हणजे तापवून विस्तवासारख्या झालेल्या लोखंडाचा थंड अशा लोखंडानें म्हणजे कुऱ्हाडीनें जसा छेद करितां येतो, त्याप्रमाणें शुद्धसंकल्प असें जें मन त्याचे योगानें रागद्वेषरूपी जें अशुद्ध मन त्याचें दहन केलें पाहिजे. अशा रीतीनें असत्संकल्प, अशुद्धमन, रागद्वेष इत्यादिकांचा त्याग केला असतां आपण आत्म्यास सन्मुख होतों व स्वरूपस्थिति प्राप्त होते. हीं साधनें करण्यांत कांहींएक कठिण नाहीं. ज्या अवस्थेमध्यें निरंतर परमानंद आहे, व दुःखाचा लेशहि नाहीं, ती आत्मस्वरूपस्थिति केवळ सोडून देहाचा अभ्यास धरून वेडे लोक मात्र राहतात. अंतीं पाहिलें तर देह हा कांहीं आपण नाहीं व देहाशीं आपला कांहीं संबंध नाहीं, हा निश्चय होतोच.

योगवासिष्ठांत श्री वसिष्ठानीं देहाची निंदा व देह मी आहें असें समजणारे जे लोक आहेत त्यांचीहि निंदा फार केली आहे. आपलें खरें स्वस्वरूप टाकून भिकारी देह मी आहें, असें म्हणणें म्हणजे अगदीं मूर्खपण आहे.

कस्तवायं जडो मूको देहो भवति राघव ॥
यदर्थं सुखदुःखाभ्यामवशः परिभूयसे ॥ १

देहाचा व आपला वस्तुतः कोणत्याहि प्रकारें संबंध नाहीं. आत्मा व देह ह्यांचीं लक्षणें अगदीं भिन्न आहेत. देह जड असून पाषाणाप्रमाणें अप्रकाश आहे. परंतु आत्मा हा अजड आणि स्वप्रकाश आहे. दुसरें असें आहे कीं—देहाची गति केवळ परवश आहे. आत्मा तसा परवश नसून तो स्वतंत्र आहे. देह केवळ प्रारब्धाधीन आहे. ज्याप्रमाणें कळसूत्राचीं यंत्रें सूत्रधाराच्या इच्छेवर अवलंबून राहतात, त्याप्रमाणें प्रारब्ध सूत्रधाराच्या योगानें देहबाहुली नानाप्रकारचीं सुखदुःखें परतंत्रपणें भोगते. अशा रीतीचा हा जो कुत्सित व विचित्र देह आणि जो केवळ सुखदुःखांचें स्थान व परिणामीं विकारवान्, असा देह आपण आहें असें मूर्खाशिवाय कोण बरें म्हणेल ? आणखी

> क्व मांसरुधिरादीनि कृतचैतन्यविग्रहः ॥
> विजानन्नपि देहेस्मिन्नात्मबुद्धिं जहासि किं ॥ १
>
> —योगवासिष्ठ

हा देह मांस, रुधिर, अस्थि, चर्म, मज्जा, विष्ठा, मूत्र, लाळ, पू इत्यादि दुर्गंधींचें बिऱ्हाड आहे. म्हटलेंच आहे—

> देह विटाळाचा गोळा, कैसा होतोसी सोंवळा ॥
>
> —तुकाराम

तसेंच देहाच्या आंत पहावें तों कृमि, जंतु, ह्यांचें तर वसतिस्थानच आहे. आणि शरीराचीं जीं नवद्वारें तीं तर नेहमीं गळतच असतात. शिवाय देहामध्यें क्षुधा, तृषा, शोक, मोह, जरा, मृत्यु ह्या षडूर्मी तर वास्तव करून आहेतच. तेव्हां अशा रीतीनें चिळस उत्पन्न करणारा व परिणामीं नश्वर व कुत्सित गति उत्पन्न कर-

णारा असा देह कोणीकडे, आणि अविकारी, अक्षर, असा आत्मा कोणीकडे? या दोहोंमध्यें कोणत्याहि प्रकारचें साम्य नसून देहाच्या ठिकाणीं आत्मबुद्धि धरणें ह्यासारखें मौर्ख्य कोणतेंच नाहीं. देह आणि आत्मा यांचीं लक्षणें व स्वरूपें जर अशा रीतीनें अगदीं भिन्न व परस्परविरुद्ध आहेत, तर देहाच्या ठिकाणची आत्मबुद्धि टाकण्यास कांहींएक प्रयास नाहींत. वर सांगितलेलीं देहाचीं वर्मे नीट समजलीं म्हणजे सर्वांस प्रकाशित करणारा देवाधिदेव जो परमात्मा, त्याची प्राप्ति होते. देह हा काष्ठाप्रमाणें व मातीच्या लोष्ठाप्रमाणें आहे. त्याचे ठिकाणीं आसक्त होण्याचें कांहींएक कारण नाहीं, अशी खात्री होऊन देहाविषयीं नेहमीं उदास असावें, व देह हा परकीय आहे, म्हणजे दुसऱ्याचा आहे असें मानिलें असतां निदिध्यासनाची पूर्णता होऊन ब्रह्मसुखाचा अनुभव येतो.

ह्या जगाचें उफराटें कृत्य कसें आहे तें पहा! सत्य जें ब्रह्म, ज्याला त्रिकालींहि बाधा नाहीं, त्याला विसरून जाऊन असत्य व अविद्याख्य जें शरीर तें माझें आहे असें लोक म्हणतात! शरीर ह्या शब्दाचाच अर्थ **शीर्यते तत् शरीरं** म्हणजे नाशवंत असा आहे. वस्त्र नवीन असतें तोंपर्यंत त्याचे तंतु दृढ असतात, परंतु ते तंतु छिन्नभिन्न होऊं लागले म्हणजे तें वस्त्र फाटून जातें आणि मग त्याला कोणी विचारीत नाहीं. तसेंच वृक्षावर फळ असतें तोंपर्यंत तें सुंदर खासें दिसतें, परंतु तेंच परिपक्व होऊन नासूं लागलें म्हणजे त्याची मग दुर्गंधी घेववत नाहीं. त्याप्रमाणेंच तारुण्य आहे तोंपर्यंत शरीर अ-

सतें; पुढें तें विगलित होऊन गेलें व कृमिगंधींनीं युक्त झालें म्हणजे सहस्त्रावधि उपाय केले तरी तें आपोआप नष्ट होतें. ह्यामुळेंच त्यास शरीर असें म्हणतात. देह शब्दाचीहि व्युत्पत्ति **दह्यते तापैः स देहः** अशी शास्त्रज्ञ करितात. ह्याचा अर्थ असा कीं, आधिभौतिक, आधिदैविक आणि अध्यात्म ह्या त्रिविध तापास सर्वदा जें पात्र, त्यास देह असें म्हणावें. तेव्हां अविद्येपासून ज्याची उत्पत्ति, असें कुत्सित शरीर, तें मीच आहें, असें म्हणून लोक वल्गना करितात व निरनिराळ्या रीतींनें त्या देहाचें भरणपोषण करीत असतात. म्हणजे सुखरूप जी आत्मवस्तु ती टाकून देऊन हाडाची केवळ मोळी व रक्तमांसाची मोटली असा जो देह, त्याला कंवटाळतात. तेव्हां हा चमत्कार नव्हे काय? स्वतःसिद्ध ब्रह्म असतां लौकिकांत मी ब्रह्म आहें असें म्हणावयाची ज्याला त्याला लाज वाटते. परंतु त्याला जर विचारिलें कीं, तुला जिव्हा आहे काय? तर लोकांत हो म्हणण्याला लाज वाटत नाहीं. असा अविचार होण्याचें कारण हेंच आहे कीं, मुख्य गुह्य जो आत्मविचार त्या ठिकाणींच संदेहरूपी रोग उत्पन्न होतो. मग मी ब्रह्म आहें, असें म्हणण्यास लाज वाटली तर त्यांत काय आश्चर्य आहे? तात्पर्य, विजातीयाचा त्याग करून म्हणजे भेदबुद्धि टाकून देऊन सजातीय जें ब्रह्म, त्या प्रवाहामध्यें नेहमीं असणें ह्यासच निदिध्यासन म्हणावयाचें. व हें निदिध्यासन केलें असतां विपरीत भावना नष्ट होते. आणि मग साक्षिस्वरूपाचा अनुभव येऊन ब्रह्मस्थिति प्राप्त होते. एथपर्यंत शुद्धनिरूपणाचा विचार झाला.

# प्रकरण बारावें

## आत्मार्चन

-*-*-*-

यथा भवति बालानां गगनं मलिनं मलैः

तथा भवत्यबुद्धानामात्माऽपि मलिनो मलैः ॥ १

—योगवासिष्ठ

आतां आत्मार्चन ह्या प्रकरणास लागूं.—विजातीयाचा तिरस्कार करून स्वस्वरूपाची ओळख होणें व ब्रह्माचा साक्षात्कार होणें एतद्विषयीं जो प्रयत्न त्यास आत्मानुसंधान म्हणावयाचें, व तेंच **आत्मार्चन** होय. हें आत्मार्चन कसें करावयाचें, हें पुढील वचनांत सांगितलें आहे.

यदि देहं तिरस्कृत्य चिति विश्रम्य तिष्ठसि ॥

तदा तृणीकृताशेषः स्वयमेको भविष्यति ॥ १

—योगवासिष्ठ

हा जो आपला स्थूल देह व लिंगदेह या दोहोंचा तिरस्कार करून स्वरूपाचे ठिकाणीं विश्रांति घेऊन चर राहिलें तर अशेष जो प्रपंच, तो केवळ तृणवत् वाटेल आणि मी मग अद्वितीय एक आहें ( एकमेवाद्वितीयं ) ह्या स्थितीचा अनुभव येतो. ही स्थिति प्राप्त होणें म्हणजे त्याला आत्मार्चन म्हणावें.

ज्याला साक्षी चैतन्य असें म्हणतात व यदाकार निरंतर मन करावें असें म्हणतात त्या आत्मस्वरूपाचें आतां वर्णन करूं.

येन शब्दं रसं रूपं गंधं जानासि राघव ॥

तमात्मानं परं ब्रह्म जानीहि परमेश्वरं ॥ १

—योगवासिष्ठ

शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे पांच विषय व त्या विषयांकडे धांव घेणारीं इंद्रियें, त्या इंद्रियांच्या वृत्ति, आणि त्या सर्व इंद्रियांच्या व्यापारामध्यें साहाय्यकारी जें मन, त्या सर्वांला ज्यापासून प्रकाश मिळतो, त्याला **साक्षी** असें म्हणावयाचें. शब्दाला मूळ जेथून चलन प्राप्त होतें, व पुढें शब्द जेथून बाहेर येतात आणि ते बाहेर आल्यावर ज्याच्या योगानें शब्दार्थज्ञान होतें, तेंच **साक्षिस्वरूप** होय. त्याप्रमाणेंच कोणत्याहि रसामध्यें गोडी असते, तेव्हां त्या रसास व गोडीस जो निवडणारा, तो साक्षी होय. जगामध्यें रूप म्हणून जें जें दिसतें, त्याचें ज्ञान चक्षूंस होतें, परंतु चक्षूंसहित रूपाला जो जाणणारा तोच **परमात्मा** होय. त्याप्रमाणेंच त्वगिंद्रिय व त्याचे स्पर्शनव्यापार, हात आणि त्यांची देणेघेणेची क्रिया, चरण आणि चरणांची गति, उपस्थ आणि रतिविलास, गुद आणि त्याचा उत्सर्जनव्यापार हीं ज्याच्या योगानें आपल्याला समजतात, तोच साक्षी होय. तसेंच संकल्पविकल्प उत्पन्न करण्याचा ज्याचा धर्म असें जें मन व तो धर्म ह्या दोहोंसहि जो प्रकाश करितो, तो साक्षी होय. सामान्य व्यवहारामध्यें लोकांस केवळ इंद्रियें व विषय दिसतात, त्याच्या पलीकडे कांहीं ज्ञान नसतें. म्हणून ती केवळ स्थूल दृष्टि होय. ह्याकरितां सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें असतां साक्षित्वाची ओळख होते. अतएव, ज्याच्या योगानें इंद्रियांवर प्रकाश पडतो व त्यांस चित्तवृत्तींचें साहाय्य मिळतें आणि सर्व पदार्थांसहि प्रकाश मिळतो तो परमात्मा जाणावा. इंद्रियें, पदार्थ, मन, बुद्धि, **चित्त या सर्वांस** जो जाणतो, तोच साक्षी परमात्मा जाणावा.

आणखी आत्म्याचें स्वरूप म्हटलें म्हणजे सर्वव्यापकता हें होय. आत्मा ह्या शब्दाच्या अर्थावरून पाहिलें तर असें दिसतें कीं, सर्वत्र परिपूर्णपणें असणारा जो, तो **आत्मा** होय. एकाद्यानें असा प्रयत्न केला कीं, एकाद्या भांड्यामध्यें आकाश भरावयाचें, तर त्यास सूक्ष्म दृष्टीनें पहातां असें कळेल कीं, या भांड्यामध्यें आकाश अगोदरच आहे, मग आणखी भरावयाचें तें काय ? ह्याच न्यायानें आत्म्याचें ज्ञान करून घ्यावें लागतें. कोणत्याहि देशामध्यें किंवा कोणत्याहि काळांत विषयाचा जो भोग होतो, व भोक्तृत्व उत्पन्न होतें, तें आत्म्याशिवाय संभवत नाहीं. म्हणून आत्मा हा असा कांहीं पदार्थ आहे कीं, त्याच्याशिवाय कांहींएक व्यापार घडूं शकत नाहीं. आत्मा जाणण्याची आणखी एक खूण पुढील वचनांत सांगितली आहे:—

यद्यज्ज्ञेयमिदं तत्त्वं नेति संत्यज्य युक्तिभिः ॥
प्राप्यवशिष्टचिन्मात्रं सोऽस्मि सोऽस्मीति भावय ॥ १

—**योगवासिष्ठ**

नेत्रेंद्रियानें आपण जें जें पाहतों, श्रवणेंद्रियानें जें जें श्रवण करितों, त्वगिंद्रियानें ज्याचें रसास्वादन होतें, वाणीनें जें जें बोललें जातें, घ्राणेंद्रियानें ज्याच्या गंधाचा आस्वाद मिळतो व हस्तपादादि अवयवांनीं जें जें कांहीं आपण देतों घेतों, तें सर्व ज्ञेय समजावें. तसेंच मन, बुद्धि इत्यादि अंतःकरणचतुष्टयाच्या योगानें जें जें समजतें, तें ज्ञेय होय. वस्तुमात्राचा त्याग करून उर्वरित राहणारें जें चिद्रूप तोच **आत्मा** होय. "नेति नेति" इत्यादि श्रुतिवाक्यांनीं सर्व ज्ञेयाचा निषेध केलेला आहे. म्हणून

ज्ञेयाहून जें विलक्षण व सर्व प्रकारच्या निषेधांची जेथें परमावधि होते, तेंच **निर्गुण परब्रह्म** होय असें श्रुतींत सांगितलें आहे.

इंद्रियगणांस किंवा अंतःकरणचतुष्टयांस जी जी वस्तु ज्ञेय असते, ती ती मोठ्या युक्तीनें टाकून देऊन जें उर्वरित राहतें, तेंच ब्रह्म होय, असें मागील प्रकरणांत निरूपण केलें. आतां असें करण्याच्या युक्ति कोणत्या त्याचा एथें विचार करूं. जोंपर्यंत पुरुषाची बुद्धि नानात्व पावते, म्हणजे विश्व हें नानाप्रकारचें आहे असें वाटतें, तोंपर्यंत अज्ञान नष्ट होत नाहीं. म्हणून अगोदर विश्वांतील नानात्वबुद्धीचा परित्याग केला पाहिजे. म्हणजे सोन्याचे अलंकार टाकून मूळ सोनें आहे हें जसें जाणावयाचें, तसेंच सर्व वस्तूंतील उपाधि टाकून अधिष्ठान ओळखावें.

दुसरी युक्ति म्हणजे जागृति, स्वप्न व सुषुप्ति ह्या ज्या आपल्या तीन अवस्था, त्या तिहींचा द्रष्टा कोण? हें ओळखण्याचा प्रयत्न करावा म्हणजे साक्षिस्वरूप समजतें. जागृतावस्थेंत आत्मा इंद्रियद्वारें विषयोपभोग घेतो. स्वप्नावस्थेंत मन सर्व व्यापार करीत असून तें आत्मा पहात असतो व सुषुप्तिकालीं स्वसुखाचा उपभोग घेणें एवढेंच काम आत्मा करितो. सुषुप्तिकालीं आत्मा नष्ट होतो असें मुळींच नाहीं. कारण निद्रा समाप्त झाल्यानंतर मला गाढ झोंप लागली होती असें अनुभवाला येतेंच. आत्मा जर सुषुप्तावस्थेंत नसता, तर मागाहून हा सुखानुभव कोठून आला असता? तेव्हां जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तिन्ही अवस्थांहून आत्मा भिन्न कसा

असतो, हें समजण्याकरितां अवश्य प्रयत्न करावा.

त्याप्रमाणेंच, बाल्य, तारुण्य व वार्धक्य ह्या अवस्थांमध्यें जें कांहीं सुखदुःख आपण भोगतों, व दोन दिवस पसारा मांडतों, त्या सर्वांचा ज्ञाता व द्रष्टा जो आत्मा, तो कसा असतो हें समजून घेण्याचा प्रयत्न करावा. अशा युक्ति करून त्या तिन्ही अवस्थांहून आत्मा भिन्न कसा असतो हें पहावें, आणि श्रुतींत सांगितल्याप्रमाणें ज्ञेयाचा त्याग करावा, म्हणजे आपली आपल्यास भेट होते.

"सोऽस्मि सोऽस्मीति भावय।"

अशी भावना करावी म्हणून मागील श्लोकांत सांगितलं आहे, ती भावना करणें म्हणजे काय, ह्याचा बोध होण्यासाठीं थोडें जास्त विवेचन करणें अवश्य आहे. एका पदार्थाच्या ठिकाणीं दुसरा पदार्थ आहे असें मानणें म्हणजे **भावना** होय. पाषाणाला विवक्षित आकार दिला म्हणजे शंकराची पिंडी होते. मृत्पिंडाला विवक्षित आकार देऊन गणपति किंवा गौरीची भावना होते. तसेंच अनेक धातूंच्या मूर्ति करून त्याचठायीं छत्रचामर, आसन, त्रिशूलादिक आयुधें इत्यादि चिन्हें निर्माण करून शंकर, चंडिका इत्यादि देवतांची भावना होते. त्याप्रमाणें ज्ञेयाचा त्याग करून जी चिन्मूर्ति राहते, ती मीच आहें अशी भावना करून राहणें ह्यासच **आत्मार्चन** असें म्हणतात. सर्व ज्ञेयांचा निषेध केला असतां जें ज्ञानमात्र अवशिष्ट राहतें, तें ज्ञान आत्मा होय. कारण

ज्ञानं न भवतो भिन्नं ज्ञेयं ज्ञानात् पृथङ् न हि॥
अतो न द्वितरं किंचित् तस्माद्भेदो न विद्यते ॥१

**—योगवासिष्ठ**

ह्याचा अर्थ असा आहे कीं—ज्ञान म्हणून ज्याला म्ह-

णतात, व जें सर्वांचें प्रकाशक, तें आपणाहून भिन्न मुळींच नाहीं. त्याप्रमाणेंच ज्ञानाच्या योगानें जो पदार्थ समजला जातो व ज्यास ज्ञेय असें म्हणतात, तें देखील आपणच आहों असें अतिसूक्ष्म विचारांतीं कळून येतें. ज्ञेयाच्या पोटीं ज्ञान असतें असें पूर्वीं सांगितलेंच आहे.

आपणांस जें ज्ञान होतें तें घडण्याची क्रिया कशी आहे तें पाहूं. प्रत्येक पदार्थामध्यें चैतन्यांश आहे व ज्या ज्या इंद्रियांनीं त्या पदार्थांचा भोग होतो त्यांच्या वृत्तीमध्येंहि चैतन्य आहे. तेव्हां इंद्रियवृत्ति व पदार्थ ह्या दोहोंमध्येंहि चैतन्य अनुस्यूत असतें व ह्या दोन्ही चैतन्यांची जेव्हां भेट होते म्हणजे एकरूपता होते, तेव्हांच पदार्थांचें भान होऊन सुखाचा अनुभव येतो. जर जडपदार्थांत चैतन्य नसेल, तर त्यांचें आपणांस भान कधींहि होणार नाहीं. याकरितां ज्ञेय म्हणून जे जे पदार्थ आहेत, त्या सर्वांच्या ठायीं चैतन्य असून, तें चैतन्य व ज्ञान आणि त्यांस जाणणारा जो 'मी' हे सर्व एकच असून केवळ शब्दाचीच मिरवण आहे. ज्ञेयज्ञान आणि आपण हीं सर्व एकच आहेत, असें अनुभवानें समजून घ्यावें. ज्या पुरुषांची केवळ स्थूलदृष्टि असते, त्यांची एतद्विपर्यां भ्रांति कधीं नष्ट होत नाहीं. परंतु जे सूक्ष्मदृष्टीनें अनुभव घेतात, त्यांस तीं सर्व एकच आहेत असें समजतें. यास्तव आपणाखेरीज दुसरा कांहींएक पदार्थ नाहीं, जो जो पदार्थ दिसतो तो आत्मस्वरूप म्हणजे मीच आहे, असा विचार करून स्वस्थ असावें.

ह्यावर एक अशी शंका येईल कीं, भेदप्रतीति जर सर्व नाहींशी करावी, तर विष्णु, शिव इत्यादि आपणा-

हून भिन्न दिसतात व त्यांचीं कर्तृत्वेंहि भिन्न दिसतात, तेव्हां सर्वत्र अभेदबुद्धि कशी होईल? ह्यावर उत्तर असें आहे कीं,—ब्रह्मदेव विश्वोत्पत्ति करतो. विष्णु पालन करितो. इंद्र पर्जन्यधारा उत्पन्न करून धान्यादिकांची वृद्धि करितो. सूर्य सर्वांस प्रकाश देतो. चंद्र औषधींचें पोषण करितो. अग्नि अन्नपचन करितो. यम सर्वांचा संहार करितो. वायूचे योगानें प्राणांचे चलनवलनव्यापार चालतात. जलानें तृषेची शांति होते. इत्यादि कर्तृत्वें जे करितात, तद्रूप मीच आहें असें अनुसंधान सर्वदा असावें, ज्ञानरूप जे आपण, त्या चिद्रूपाचे ठायीं सर्व वस्तु निर्माण होतात अशी अनुभवानें खूण जाणून रहावें व अशा रीतीनें आपले ठायीं पूर्णत्व बाणलें म्हणजे आपणच्च सर्व कर्ता व भोक्ता आहों आणि आपल्याशिवाय जगांत कांहीं उरलें नाहीं, असा अनुभव येतो. आपणाशिवाय जनीं, वनीं, त्रिभुवनीं कांहींच्च राहिलें नाहीं असा प्रत्यय आला म्हणजे मग पुढील भावना करावीः—

अहं सर्वमिदं विश्वं परमात्माऽहमव्ययः ॥
न भूतं नास्ति नोभावी मत्तोन्यदिति भावय ॥ १

—योगवासिष्ठ

'इदं' शब्दानें जाणलेलें जें जें दृश्य विश्व तें तें सर्व मीच्च आहें, व सर्व विश्वहि मीच्च आहें हें जें अनुसंधान त्यासच्च आत्मार्चन असें म्हणावें, आणि ज्यास कालत्रयीं व्यय नाहीं, असा परमात्मा मीच्च आहें अशा अनुसंधानानें नेहमीं रहावें. षड्रसांमध्यें कटु, आम्ल इत्यादि रुचिवैचित्र्य जरी असलें, तथापि त्यांत मूळ पाहिल्यास उदकच्च आहे. नेणता जो आहे, तो मात्र त्या ष-

ड्रसांची प्रतीति घेत असतो. पण ज्ञानी पुरुषास त्या सर्व रसांत उदकच दिसत असतें. सुवर्णाचे अलंकार जरी अनेक असले तरी मूळ सोनें एकच. समुद्रावर नानाप्रकारचे तरंग व लहरी उत्पन्न झाल्या, तरी उदक म्हणून एकच असतें. नानाप्रकारच्या रागरागिण्या जरी असल्या तथापि गीत म्हणून सर्वांत एकच. तसेंच अखिल वस्तु जरी भिन्न दिसल्या तरी त्या सर्वांत आपलें चैतन्यरूप ओतप्रोत भरलेलेंच असतें. काष्ठ-पाषाण तृण-लतादिक जरी निरनिराळीं दिसलीं, तरी सर्वांत पृथ्वी एकच असते. अशा रीतीनें नानाप्रकारच्या युक्त्या करून आपली विश्वरूप स्थिति आहे, हें अनुभवानें जाणणें यासच आत्मार्चन म्हणतात. तेणेंकरून अखिल विश्वामध्यें आत्म्यावांचून कशाचाहि अनुभव येत नाहीं. ह्या आत्मबोधाचें लक्षण योगवासिष्ठांत असें सांगितलें आहे:—

ग्राह्यग्राहकसंबंधे सामान्ये सर्वदेहिनां ॥
योगिनः सावधानत्वमेतदर्चनमात्मनः ॥ १

सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं ग्राह्यग्राहकभाव असतोच, म्हणजे ग्राह्य तितके विषय व त्यांचा ग्राहक जीव, एवढेंच सामान्यपणें सर्वांस ज्ञान असतें, परंतु योगी मात्र अशा प्रसंगीं फार सावध असतो. त्याची दृष्टि निराळी म्हणजे ग्राह्य, ग्राहक व ग्रहण ह्या त्रिपुटीवर प्रकाश पाडणारा जो साक्षी तो मीच आहें, असें योगी सर्वदा ओळखीत असतो. हें जाणण्यामध्यें जी सावधानता, म्हणजे या तिहींचाहि साक्षी मी आहें अशी जी ओळख, त्यास आत्मार्चन असें म्हणावें. ह्या स्थितीनें सर्वदा राहिलें असतां पूर्णब्रह्माचा अनुभव येतो.

---

# प्रकरण तेरावें

## आत्मनिरूपण

भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यंते सर्वसंशयाः ॥
क्षीयंते चास्य कर्माणि तस्मिन् दृष्टे परावरे ॥ १

—**मुंडकोपनिषद्**

आपली विश्वरूपस्थिति अनुभवानें जाणणें व या अखिल विश्वामध्यें आत्म्यावांचून कशाचाहि अनुभव न येणें ह्यास आत्मार्चन म्हणावें हें पूर्वीं सांगितलेंच आहे. तेव्हां असा जो सर्वत्र भरलेला आत्मा, त्याचें लक्षण काय व तदाकार अंतःकरण कसें करावें, हें चालू प्रकरणांत सांगावयाचें, म्हणून त्यास **आत्मनिरूपण** हें नांव दिलें आहे. आत्मा कोणत्या प्रकारचा आहे ह्याचें वर्णन पुढील श्लोकांत आहे:—

तस्मिन्देहेंद्रियादीनां संघाते स्फुरति स्वतः ॥
अहं सोऽहमयं भावः स जीवो मलगुंठितः ॥ १

—**योगवासिष्ठ**

याचा अर्थ असा कीं—देहेंद्रियांचा जो समुदाय, त्यामध्यें स्वतःसिद्धपणें जो स्फुरण पावतो, तो **आत्मा** होय. तसेंच ज्याच्यामध्यें—

" अहं, सोहं, अयं "

हे तिन्ही प्रकारचे भाव आहेत तोच आत्मा होय. **अहं** शब्द देहाला लावितात. **सोहं** शब्द मनासहित जो इंद्रियसमुदाय त्याचा वाचक होतो व **अयं** शब्दानें आत्म्याचा बोध होतो. ते अहंकारमिश्रित जो मल,

त्या मळाचा त्याग केला असतां खरें जीवतत्त्व काय आहे ह्याचें वर्म समजतें. हा आत्मा एकच असून अनेक ठिकाणीं कसा व्यक्त होतो, व त्या सर्व ठिकाणीं त्याचें स्वरूप कसें ओळखितां यावें, हें पुढील श्लोकांत सांगितलें आहे.

मणितोयघृतादर्शेष्वेकमप्याननं यथा ॥
भात्यनेकमिवात्मापि तथा धीष्वनुबिंबितः ॥ १

—योगवासिष्ठ

स्वच्छ मणि, पाणी, तूप, आणि आरसा ह्या चार जिनसा आपल्यापुढें मांडून ठेवून त्यांत जर आपण पाहूं लागलों, तर आपलें एक मुख असून तें चार प्रकारचें चार वस्तूंत दिसतें. ह्या ठिकाणीं विचार करून पाहिलें असतां आपणांस असें कळेल कीं, आपलें एकच जरी मुख आहे, तथापि भिन्न उपाधींच्या योगानें त्यास अनेकत्व प्राप्त होतें. शिवाय वर जो स्वच्छमणि सांगितला, तो निळा, तांबडा, हिरवा इत्यादि रंगांचा जर असला तर तितक्या तितक्या रंगांचें तोंड त्यांत आपणांस दिसेल. तसेंच आरसा जर मलिन असला, तर त्यांत मुख मलिन दिसेल. परंतु हा मलिनपणाचा दोष मुखाचा नसून तो केवळ त्या आरशाच्या उपाधीचा म्हणजे मलिनत्वाचा आहे. आबालवृद्ध हें जाणतातच कीं, आरशामध्यें जर मुख मलिन दिसलें, तर तो आरसाच स्वच्छ करितात; तोंड कोणी तोडून टाकीत नाहीं ! तसेंच, आरशामध्यें एकादे वेळीं वांकडें तोंड दिसतें, एकाद वेळीं कुरूप दिसतें. या ठिकाणीं मुख जरी एकच असलें तथापि निरनिळया उपाधींच्या योगानें त्याच्या आकृति निरनिराळ्या दिसतात. हें जसें, त्याप्रमाणेंच भिन्नभिन्न

बुद्धींच्या ठिकाणीं प्रतिबिंबित जो आत्मा, तो अनेक रूपांनीं प्रकट होतो, व सामान्य जन भिन्न ठिकाणीं व्यक्त होणारा जो आत्मा, तोच खरा मानून भ्रमांत पडतात.

बुद्धिभेदाच्या योगानें आत्म्यास अनेकत्व येतें, हें व्यवहारांतील दुसऱ्या दृष्टांतानेंहि व्यक्त करितां येईल. पाण्यानें भरलेलीं अनेक भांडीं जर मांडलीं, तर त्या सर्वांमध्यें सूर्याचें प्रतिबिंब पडतें, व तेणेंकरून सूर्यासहि अनेकत्व भासूं लागतें. परंतु ज्ञानी लोक जे आहेत, ते मलिन उदक, घृत, आरसा इत्यादिकांत निराळे प्रकारचें मुख जरी दिसतें, तथापि मुख एकच समजतात; व अनेक बुद्धींमध्यें आत्मा जरी प्रतिबिंबित झाला, तथापि तो एकच आहे असें ते जाणतात.

आतां उपाधीच्या योगानें शुद्धवस्तूला मालिन्य कसें येतें व स्वयंप्रकाश वस्तु असून ती परप्रकाश कशी दिसते हें पाहूं.

धूलिधूमांबुदैर्यद्वन्मलिनी-क्रियते नभः ॥
परामृष्टस्तथैवात्मा विशुद्धः प्राकृतैर्गुणैः ॥ १

—योगवासिष्ठ

आकाश अगदीं शुद्ध आहे. तथापि वावटळीच्या धुळीच्या योगानें त्याला धूसरपणा प्राप्त होऊन आकाश धूळमयच झाल्यासारखें दिसतें; एकादे वेळीं आकाश स्वच्छ असूनहि तें जेव्हां धुरानें व्याप्त होतें तेव्हां आकाश धूममयच आहे असा भास होतो; तसेंच केव्हां केव्हां आकाश मेघाच्छादित होतें व त्यावेळीं आकाशाचें मूळस्वरूप आपल्या नजरेस येत नाहीं. मिळून काय कीं, मूळ आकाश स्वच्छच आहे, परंतु धूळ, धूर आणि मेघ

ह्या तीन उपाधींमुळें तें मलिन आहे असें दिसतें. तत्त्वतः पाहतां तें मलिन नसून स्वच्छच आहे. हाच दृष्टांत वायूसहि लागू पडतो. म्हणजे वायु स्वतःसिद्धपणें शुद्ध आहे, तथापि दुष्ट गंधादिकांच्या संमेलनानें तो दुर्गंधयुक्त होतो. अशाच प्रकारें आत्मा शुद्धबुद्ध असतां गुणत्रयाच्या योगानें अशुद्ध भासतो. प्रकृतीचे गुण तीन म्हणजे सत्त्व, रज, तम हे होत. आत्मा निर्गुण असतांहि ह्या तीन गुणांच्या योगानें तो तीन प्रकारचा भासूं लागतो. ज्या पुरुषामध्यें सत्त्वगुणाधिक्य असेल, तो सात्त्विक कर्ता भोक्ता अशी प्रतीति येते. रजोगुणाचें आधिक्य असेल तर तो पुरुष राजसगुणसंपन्न दिसूं लागतो. आणि तामसगुणाचें आधिक्य असेल, तर तो तामसी दिसूं लागतो. अशा रीतीनें निर्गुण व शुद्ध आत्मा ह्या त्रिगुणांनीं व्याप्त होतो.

ग्रहणाच्या उदाहरणानेंहि ह्या विषयाची चांगली व्यक्तता होते. वास्तविक चंद्रमंडळ पृथ्वीपासून सुमारें दोन लक्ष मैल अंतरावर आहे. परंतु मध्यें राहू (पृथ्वीछाया) आल्यामुळें चंद्राचा कधीं कधीं पूर्ण भाग व कधीं कधीं थोडा भाग अदृश्य होतो. आणि शुद्ध जो चंद्र त्यास मालिन्य प्राप्त होतें. पृथ्वी आणि चंद्र यांमध्यें पुष्कळ अंतर आहे, तरीहि चंद्राला जसें मालिन्य प्राप्त होतें, त्याप्रमाणेंच आत्मा शुद्ध व निर्गुण असून त्यामध्यें आणि सत्त्व, रज, तम ह्या गुणांमध्यें महदंतर असतांहि गुणसंगानें आत्म्याला मालिन्य येतें. ह्या उदाहरणावरून शुद्धपदार्थाला मालिन्य कसें येतें, हें कळून येईलच.

आत्मा स्थिर असतांहि आत्मा देहसंसर्गानें चांचल्य कसा पावतो, ह्याचा विचार आतां करूं.

आद्यंतवर्ति देहेऽसौ तथा भूत इवेक्ष्यते ॥
वीचिवत्यंभसि स्तंभो यथाभासचलश्चलः ॥ १

—**योगवासिष्ठ**

ज्याला आदि व अंत आहेत आणि ज्याला जन्ममरणादि विकार होतात, तो आपला देह होय. तो क्षणिक असून नश्वर आहे हें सर्वांस माहित आहेच. तथापि अशा नश्वर देहाचे गुण आत्म्याचे ठिकाणीं आहेत असें अज्ञ लोक मानितात. म्हणजे देहाला जशी चलनवलनगति आहे, तशीच आत्म्याला आहे, व देहाला जे विकार घडतात, ते आत्म्याला घडतात, देह मेला कीं आत्मा मेला, देह जिवंत आहे तर आत्मा जिवंत आहे, अशा रीतीनें देहाचे धर्माचा आरोप आत्म्याचे ठिकाणीं अज्ञ लोक करितात. जसें एकादा विस्तृत जलाशयांत उभा केलेला एक खांब असावा; तो जरी अचल असला, तथापि जलाशयामध्यें उत्पन्न होणाऱ्या लहरींच्या योगानें तो खांबच हालत आहे असें वाटतें. वस्तुतः तो खांब जागच्या जागीं अचलच आहे. हें एक उदाहरण झालें. दुसरें उदाहरण चंद्रबिंबानें. म्हणजे चंद्रबिंबावरून मेघ भरभर पुढें जात असतां चंद्रच पळत आहे असा भास होतो, त्याप्रमाणें देहधर्म आत्म्याच्या ठिकाणीं वास्तविक नसतां ते वर दाखविलेल्या उपाधींमुळें त्याच्या ठायीं अज्ञानानें स्थापना करितात.

वास्तविक पाहतां आत्मा अजड आहे व देहेंद्रियादिक जड आहेत. असें असतां जडाच्या संगानें अजडाला तद्रूपता कशी प्राप्त होते व अनात्म्याचे धर्म आत्म्याचे माथीं कसे आरोपित होतात, तसेंच सत्यवस्तूच्या संगतीनें असत्य वस्तूहि सत्यासारखी कशी भासते, हें अने-

क दृष्टांतांनीं दाखवितां येतें. आपण मृगजलाचें उदाहरण घेऊं. सत्य जे सूर्यकिरण, त्यांचे ठायीं असत्य जें जल त्याचा भास होऊन मुळांत कांहीं एक नसतां मोठा थोरला जलौघ वाहत चालला आहे असें दिसतें. हाच असत्याचे ठिकाणीं सत्याचा भास होय. जडाचे संगानें अजड कसें जडत्व पावतें हें पुढील वचनावरून स्पष्ट होईल.

अग्निसंगाद्यथा लोहमग्नित्वमुपगच्छति ॥
आत्मासंगात्तथा गच्छत्यात्मतामिंद्रियादिकं ॥ १

—योगवासिष्ठ

लोखंड हें जड व अप्रकाश आहे, तथापि अग्नीनें तप्त झालें असतां तेंच अग्निमय होऊन देदिप्यमान् दिसूं लागतें. तसेंच, देहेंद्रियादि जड पदार्थ स्वतःसिद्धपणें अप्रकाश व मिथ्याभूत असतांहि आत्म्याच्या संगानें खरोखर आत्मतेप्रत पावतात. अशा ठिकाणीं असत्य वस्तु सत्यासारखी दिसूं लागते, ह्याचें मुख्य कारण अधिष्ठानाचें ज्ञान पूर्ण झालें कीं भास नाहींसा होऊन सत्य वस्तु दिसूं लागते. शिंपीच्या ठायीं रुप्याचा भास होतो, परंतु तेथें अधिष्ठानाचें ज्ञान झालें कीं सत्य वस्तु दिसूं लागते. हें जसें, तसेंच मुख्य अधिष्ठान जो आत्मा, त्याचें ज्ञान झालें म्हणजे मिथ्याभूत जे देहेंद्रियादिक ते नष्ट होतात. ह्यावर अशी शंका येते कीं, देहेंद्रियादिक हे जड आहेत, तर मग त्यांच्या द्वारा अजड जो आत्मा त्याचें ज्ञान कसें होईल? ह्या शंकेचें निवारण वसिष्ठ महामुनींनीं केलें आहे, त्याचें निरूपण एथें करणें अवश्य आहे.

देहेंद्रियादिक जड पदार्थ असून त्यांच्या साहाय्यानें अजड जो आत्मा, त्याचें स्वरूप कसें समजतें, ह्याबद्दल

आतां विचार करूं. दृश्य पदार्थांच्या योगानें अदृश्य अशा सूक्ष्म पदार्थांचें कसें ज्ञान होतें, हें 'शाखाचंद्र' न्यायावरून उघड होतें. सूक्ष्मचंद्र असतां तो जसा वृक्षशाखांतून पाहिला असतां स्पष्ट दिसतो, त्याप्रमाणें देहेंद्रियांकरवीं सूक्ष्म दृष्टीनें आत्म्याचें ज्ञान होतें. जड पदार्थांच्या संगतीनें अजड पदार्थ जड होतो, व जड पदार्थ अजडत्वाप्रत पावतो हें पुढील वचनावरून व्यक्त होईल.

आत्मनो जडसंगास्यादनात्मत्वं जडस्य तु ॥
स्यादात्मसंगादात्मत्वं जलाग्न्यो संभवन्मिथः ॥ ५

—योगवासिष्ठ

याचा अर्थ असा कीं—जड जें शरीर, त्याच्या संगतीनें अजड जो आत्मा त्यालाहि जडत्व येऊं लागतें. म्हणजे हाच आत्मा असें वाटूं लागतें आणि जड जे देहेंद्रियादिक त्यांच्या ठिकाणीं अजडाची म्हणजे आत्म्याची प्रतीति होऊं लागते. एकमेकांच्या संगतीनें होणारें हें रूपांतर जल व अग्नि यांच्या सान्निध्यानें होणाऱ्या परिणामास उत्कृष्ट लागू पडतें. कसें तें पहा. अग्नि व जल यांचा संयोग झाला असतां अग्नीच्या अंगीं शीतलत्व येतें व दुसऱ्या पक्षीं जलहि उष्ण होऊन त्यामध्यें तैजस धर्म इतका उत्पन्न होतो कीं, विस्तवास स्पर्श करणें जितकें दुर्घट, तितकेंच अत्युष्ण झालेल्या पाण्यास स्पर्श करणें कठिण जातें. दुसरें अगदीं प्राकृत उदाहरण म्हटलें म्हणजे पुष्पांच्या संबंधानें सूत्राला शिरीं वास घडतो हें आहे. गुणवानाच्या संगतीनें नीच पदार्थालाहि महत्त्व प्राप्त होत असतें. एवढा वेळ सांगितला हा संगतीचा परिणाम होय. वर सांगितलेलें जें रूपांतर,

त्यांतून शुद्ध स्वरूप उमगून काढणें हें मोठ्या चातुर्याचें काम आहे.

उपाधीच्या योगानें शुद्धपदार्थाचें रूपांतर कसें होतें, ह्यास उदाहरणें आह्मीं पूर्वीं अनेक दिलींच आहेत. जल एकच, परंतु तें उंसामध्यें माधुर्यरूपानें भासमान् होतें; समुद्रोदकांत लवणाच्या रूपानें दिसतें; आम्ल पदार्थांत आंबट रूपानें दिसूं लागतें. त्याप्रमाणेंच आत्मा हा देहेंद्रियांहून निराळा आहे. तथापि त्यांच्या सान्निध्यानें तो राहत असल्यामुळें तन्मय झालेला दिसतो. तो त्यांतून निराळा करणें हें फार दुर्घट काम आहे. अति सूक्ष्म विचारानें आंत शिरल्याशिवाय मूळ स्वरूप व्यक्त होत नाहीं. आत्मा हा जडपदार्थामध्यें इतका मिसळून जातो कीं, तो ओळखणें महाप्रयत्नाचें काम होतें. परंतु विवेकसंपत्तीच्या योगानें तो साधून घेतां येतो. ह्याविषयीं पुढील वचनांत उत्कृष्ट दृष्टांत दिलेला आहे:—

इक्षौ गुडस्तिले तैलं काष्ठे वह्निर्दृषद्ययः ॥
धेनावाज्यं वपुष्यात्मा लभ्यते चैव यत्नतः ॥ १

—योगवासिष्ठ

उसांतून गूळ जसा महाप्रयासानें काढितां येतो, तिळांतून तेल जसें महाप्रयासानें निघतें, किंवा काष्ठामध्यें स्वतःसिद्ध असणारा जो अग्नि तो मंथन करून जसा अतिप्रयासानें उत्पन्न होतो, पाषाणाचें चूर्ण करून त्याचा अग्नीमध्यें पाक करून जसें महत्प्रयासानें लोखंड उत्पन्न होतें, किंवा गाईच्या ठिकाणीं दोहन करून जसें आज्य म्हणजे तूप प्राप्त होतें, तद्वत् देहामध्यें स्वतःसिद्ध असणारा जो आत्मा, तो ज्ञानरूपी महाप्रयासानें-

च प्राप्त होतो. वरील वचनामध्यें चकार आणि एवं कार यांची जी योजना केली आहे, त्यावरून असा अर्थ निष्पन्न होतो कीं, महाप्रयत्न केल्याशिवाय ह्या गोष्टी सर्वथैव अलभ्यच होत. तेव्हां सर्वव्यापक व स्वतःसिद्ध जो आत्मा, तो केवळ भ्रमाच्या योगानें पदार्थरूप भासतो. असें जरी झालें, तथापि विचारदृष्टीच्या पाहिलें असतां आत्मा सर्वत्र एकच आहे असा अनुभव येतो. ह्यासंबंधानें पुढील दृष्टान्त फार विचार करण्यासारखा आहे.

स्फटिकात्मनि नीरंध्रे स्थितं संवीक्ष्यते यथा ॥
तथा सर्व पदार्थेषु चिद्रूपः परमेश्वरः ॥ १

**—योगवासिष्ठ**

एकादा स्फटिकाचा मणि आपण हातीं घेतला असतां तो रंध्ररहित भरींव दिसतो. तथापि त्यामध्यें आकाश व्यापून असतेंच. त्यामध्यें जर आकाश नसेल, तर घणांनीं त्याचा भेद केला असतांहि साच्छिद्रपणा त्याला येणार नाहीं. पण साच्छिद्रत्व ज्याअर्थीं त्या स्फटिकमण्याला येतें, त्याअर्थीं स्फटिकाचे पोटीं आकाश आहे हें सिद्ध आहे; व म्हणून स्फटिकमणी हातामध्यें घेतला असतां तन्निष्ठ आकाशाचें ज्ञान होतें. हें जसें, त्याप्रमाणेंच सर्व पदार्थांच्या ठायीं सूक्ष्म विचारानें पाहतां आत्म्याची भेट होते. चिद्रूप जो सच्चिदानंद परमेश्वर, तो सर्व पदार्थांच्यामध्यें निरंतर राहतो, हें दृढतर विचार केला म्हणजे समजूं लागतें.

एथें अशी एक मोठी शंका उत्पन्न होते कीं, ज्ञानस्वरूप आणि व्यापक असा जर आत्मा आहे, तर तरुपाषाणादिकांमध्यें त्या चित्कलेचा प्रकाश कां होत नाहीं ?

आणि सर्व जड पदार्थांमध्यें ज्ञानस्वरूप कां प्रकट होत नाहीं ? या शंकेचें समाधान असें आहे कीं, चित्स्वरूप प्रकट होण्याला योग्य अशी भूमिका पाहिजे. ती भूमिका म्हणजे शुद्धबुद्धि होय. जड मलीन जे पदार्थ, त्यांमध्यें कांहीं प्रकाश उपलब्ध होत नाहीं. जसें सूर्य जरी सर्व पदार्थांवर प्रकाशित होतो, तथापि सूर्यकांत मण्याचे ठायीं ग्राहकशक्ति विशेष असल्यामुळें तेथें किरणांची वृद्धि होऊन जसा लख्ख प्रकाश पडतो, तसा एकाद्या दगडावर पडत नाहीं. चंद्रोदय झाला असतां चंद्रकांत मण्याला मात्र पाझर सुटतो, पाहिजे त्या पाषणास कांहीं तसा पाझर सुटत नाहीं. ह्या दृष्टांताप्रमाणेंच आत्म्याचें आहे. सर्व इंद्रियांहून शुद्ध जी बुद्धि, तिचे ठिकाणीं परेश जो आत्मा त्याचा तत्काळ प्रकाश होतो. परंतु इतर घटपटादि पदार्थ बुद्धिहीन असल्यामुळें तेथें ज्ञानप्रकाश होण्याचा संभवच नाहीं. आपण आंगणांत ठेविलेल्या स्वच्छ आरशावर जर सूर्याकिरण पडले, तर तो कवडशाच्या रूपानें गृहादिकामध्येंहि चांगला प्रकाश पाडतो. तेंच जर एकादें खापर उन्हांत ठेविलें, तर त्यापासून काय उपयोग होणार आहे बरें ? तद्वत् चिद्रूप जो आत्मा, त्याचा प्रकाश केवळ शुद्धपदार्थांमध्येंच होतो. जरी आत्मा शुद्ध आणि अशुद्ध ह्या दोन्ही प्रकारच्या पदार्थांमध्यें भरलेला आहे, तथापि त्याचा प्रकाश व्हावयाचा म्हटला म्हणजे त्याला वर सांगितलेल्या आरशाप्रमाणें शुद्ध जागाच पाहिजे, खापरांत तो कधींहि प्रकाशित होणार नाहीं. तें सांगून संवरून खापरच !

वरील विवेचनांत अंतःप्रदेशांतच आत्मा प्रकाशित हो-

तो, असें सांगितलें; तथापि तेवढ्यावरून तो फक्त अंतरींच प्रकाशित होतो असा अर्थ घ्यावयाचा नाहीं. कारण आत्म्याचा असा कांहीं विशिष्ट धर्म आहे कीं, तो अंतर्बाह्य प्रकाशित करितो. ह्यास उत्कृष्ट दृष्टान्त म्हटला म्हणजे रत्नाचें बनविलेलें एकादें भांडें असावें व त्यामध्यें आपण दिवा लावून ठेवावा. तो दिवा आंतल्याआंत प्रकाशित होऊनच राहील असें नाहीं; तर तो बाहेर सुद्धां प्रकाश पाडील. तद्वत् बुद्धीच्या अंतरीं आत्म्याचा प्रकाश पडून सर्व बाह्यवस्तूंवरहि त्याचा प्रकाश पडतो. ह्या रीतीनें पाहतां सबाह्याभ्यंतरीं आत्म्यावेगळें दुसरें कांहींच नाहीं असें सिद्ध होतें.

ह्यावर दुसरी अशी मोठी शंका उत्पन्न होते कीं, विश्व प्रत्यक्ष दिसत असतां व देहेंद्रियांचा प्रत्यक्ष भास होत असतां सर्वत्र आत्मा भरलेला आहे हें म्हणणें कसें संभवतें ? ह्याचें समाधान असें आहे कीं, विश्व जें दृष्टिगोचर होतें, तो केवळ आभास होय; त्यामध्यें खरेपणा मुळींच नाहीं.

> तत्रास्थितेयं विश्वश्रीः प्रतिमामात्ररूपिणी ॥
> रज्वां भुजंगवद्भाति स्वयमात्म[ं] सदोदितः ॥ १
>
> --योगवासिष्ठ

रज्जूच्या ठिकाणीं जसा सर्पाचा भास होतो पण खरोखर तेथें सर्प मुळीच नसतो; त्याप्रमाणें सदोदित सर्वत्र आत्मा भरला असतां आत्म्याचे ठिकाणीं प्रतिमामात्र जगाचें रूप व्यक्त होतें; व तो केवळ लटिका भ्रम आहे. आकाशांत कोणीकडे पाहिलें तरी नीलवर्ण भरलेलाआहे असें दिसतें; परंतु मुळांत आकाशाच्या नीलत्वाचा कां-

हींच संबंध नाहीं. तसेंच देहेंद्रियांहून विलक्षण असा आत्मा असूनहि त्याच्या ठिकाणीं देहेंद्रियत्वाची खोटी बुद्धि उत्पन्न होते.

अशा प्रकारचा सर्वव्यापी जो आत्मा, त्याचें लक्षण काय, ह्याचें विवरण आतां करूं.

आत्म्याचें लक्षण काय व अपरोक्षपणें आत्मज्ञान झालें असतां तद्रूप होऊन संपूर्णता कशी साधावी ह्याचें आतां उपपादन करूं. प्रथमतः आत्म्याचें लक्षण काय हें सांगूं.

> आद्यंतरहितः सत्यश्चिद्रूपो निर्विकल्पकः ॥
> आत्मसंपूरिताकाशो जीवस्याद्यः परात्परः ॥ १
>
> —योगवासिष्ठ

ज्यास आदि, अन्त व मध्य नाहीं, जो सत्य, चिद्रूप व संकल्पविकल्पविहीन, जीवात्म्याचें मूळ कारण, आणि पर जो ब्रह्मादिक त्याहूनहि पर म्हणजे श्रेष्ठ असा जो तो आत्मा होय. आत्मा अविकारी असून विश्व हें आत्म्याचा परिणाम नव्हे. ज्यांस शास्त्रश्रवण नाहीं व आत्मानुभव नाहीं, ते आत्म्याचा परिणाम विश्व आहे असें म्हणोत; परंतु सद्गुरुकृपेनें ज्यांला अपरोक्षज्ञान प्राप्त झालें आहे, ते तरी असें कधीं म्हणणार नाहींत. आत्म्याचें ज्ञान केवळ दृढ अनुभवानेंच होतें ह्याविषयीं पुढील वचन आहेः—

> आत्माऽनुभवमात्रात्मा सर्वगः सर्वसंश्रयः ॥
> प्रकाशानंदचैतन्याव्यतिरिक्तोऽनलौष्ण्यवत् ॥ १
>
> —योगवासिष्ठ

आत्म्याचें ज्ञान केवळ अनुभवजन्य आहे. आत्मा

इंद्रियग्राह्य नसून तो कोणाला देतां घेतां येत नाहीं; किंवा त्याचें वर्णनहि करितां येत नाहीं. आत्म्याचा अनुभव होऊं लागला म्हणजे कोणताहि दृश्य पदार्थ अणुमात्र स्फुरण पावत नाहीं. वृत्तिरूप जें ज्ञान तें स्वस्वरूपामध्यें मुरून जातें. ग्राह्यग्राहकभावहि संपूर्ण नाहींसा होऊन ज्ञेयज्ञानाची त्रिपुटी नाहींशी होते. अशा अवस्थेमध्यें अज्ञान निःशेष मावळून जाते आणि मुख्य वस्तु जी ब्रह्म, त्याशिवाय दुसरें कशाचेंहि भान रहात नाहीं. जेवढें म्हणून स्वस्वरूपज्ञान त्याचाच केवळ अनुभव येतो; ह्याकरितां आत्मा हा अनुभवमात्रच आहे असें म्हणतात.

शिवाय आत्मा हा सर्व वस्तूंस व्यापून राहणारा आहे. कोणत्याहि दिशेस आपण गेलों तरी तेथें जसें अगोदर आकाश भरलेलेंच असतें; त्याप्रमाणें सर्व दिशांस व्यापून आत्मा राहिला आहे. आत्मा हा सर्व वस्तूंचा आश्रय आहे व त्यामध्यें सर्व जग भरलेलें आहे. ह्या आत्म्यामध्यें प्रकाश, आनंद आणि चैतन्य हीं अभिन्नपणें राहतात. ह्या तीन वस्तु आत्म्यामध्यें अभेदपणें कशा राहतात, हें अनेक दृष्टांतांनीं व्यक्त करूं. अग्नि आणि उष्णता ह्यांची वेगळी निवड कधीं तरी करितां येईल काय? नाहीं. कारण अग्नि तीच उष्णता; उष्णता अग्नीहून भिन्न करितां येत नाहीं.

तसेंच नानाप्रकारचे वायु आणि गति ह्यांमध्यें भेदभाव करितां येत नाहीं. अवकाश आणि आकाश हीं कधींहि भिन्न होत नाहींत. तसेंच आर्द्रता आणि उदक हीं एकच होत. पर्जन्य आणि धारा एकच होत. कापूर, त्याचा वास आणि त्याची ज्योत हीं तिन्ही एकच आ-

हेत. त्यांच्यांत भेद करितां येत नाहीं. त्याप्रमाणें प्रकाश, आनंद व चैतन्य ह्या तिन्ही पदार्थांपासून एक आत्माच जाणिला जातो.

असा जो आत्मा, त्याचे ठायीं नानाप्रकार मुळींच नाहींत, व ब्रह्माचे ठिकाणींजाति, वर्ण, आश्रय ह्यांचा भेद मुळींच रहात नाहीं. पुढील वचनांत ह्याचें निरूपण केलें आहे.

न वर्णा न वर्णाश्रमाचारधर्माः ॥
न मे धारणा ध्यानयोगादयोऽपि ॥ १

—**निर्वाणदशक**

मला कोणताहि वर्ण नाहीं; व जाति, आश्रम यांचे धर्म मला लागू नाहींत. धारणा, ध्यान वगैरे योगाचे प्रकार तेहि मला लागू नाहींत. कारण मी सर्व वस्तूंपासून अलिप्त आहें व माझें स्वरूपवर्णन म्हटलें म्हणजे पुढील प्रकारानें होतें.

ब्रह्मांडेच यथा वायुः सर्वभूतगतस्तथा ॥
स एव भगवानात्मा तनुमुक्तो व्यवस्थितः ॥ १

—**योगवासिष्ठ**

ब्रह्मांडांत वायु सर्वत्र संचार करीत असतो, परंतु त्यास कशाचाहि संग होत नाहीं. त्याप्रमाणेंच आकाश सर्वत्र व्यापून राहिलेलें आहे, त्यालाहि कोणाचा संग घडत नाहीं. तसेंच सर्वव्यापक जो आत्मा, तोहि निर्मल असून असंग आहे. आत्मा हा **षड्गुणैश्वर्य**संपन्न आहे, असें श्रुतीमध्यें वर्णन आहे. **षड्गुणैश्वर्य** म्हणजे १. धर्म, २. यश, ३. श्री, ४. लक्ष्मी, ५. वैराग्य, व ६. ज्ञान हीं होत. ह्या षड्गुणांची जी संपत्ति तिला **भग** असें म्हणतात आणि त्या ऐश्वर्यानें युक्त असा जो, तो

**भगवान्** होय. आणि परमात्माहि त्याच षड्गुणांचा अंगीकार करून परिपूर्णत्वानें राहतो. म्हणजे ते दोनीहि एकरूपच असतात, अशा रीतीनें आत्मानुभव घेऊन जो पुरुष जीवन्मुक्त होतो, त्याला आत्म्याचा लाभ होतो. एथें अशी एक शंका येते कीं-जीवन्मुक्तावस्थेमध्यें मात्र जर आत्म्याचा अनुभव होतो, तर इतर ठिकाणीं आत्मा सांपडतच नाहीं काय? ह्याचें उत्तर असें आहे कीं, आत्मा सर्वत्र भरलेला आहे, तथापि त्याचें वास्तविक ज्ञान होणें दुर्लभ आहे. पहा कीं—जागृति व स्वप्नावस्था यांमध्यें आत्मा असतोच, परंतु देहेंद्रियसमुदायामध्यें तो निमग्न होऊन गेलेला असल्यामुळें त्याचा त्यावेळीं भास होत नाहीं. आत्म्याचें स्वरूप कांहीं अंशीं सुषुप्तिकाळीं समजतें. त्याहूनहि मुक्तावस्थेमध्यें आत्म्याचें संपूर्ण स्वरूप प्रकट होतें. तात्पर्य काय कीं आत्म्यास उपाधीच्या योगानें विशिष्टता प्राप्त होते. परंतु मुक्तावस्थेमध्यें उपाधि नाहींशी होत असल्यामुळें अर्थांतरा आत्म्याचें पूर्ण ज्ञान घडतें.

मुक्तावस्था बाणली असतां केवळ जो आत्मा त्याची उपलब्धि होते. त्या मुक्तावस्थेचें लक्षण असें आहे कीं, प्रपंचाचें भान जरी होत असलें तरी पूर्ण ज्ञानानें तें बाधित होतें. जें जें काहीं दृश्यमान् असेल, तें तें आरोपित असून मायामय आहे अशी खात्री होऊन अंतर्बाह्य एकच चैतन्य भरलें आहे, ब्रह्माशिवाय दुसऱ्या कशाचाहि भास नाहीं व परमानंदाचाच केवळ आस्वाद येऊं लागणें ह्याला **मुक्तावस्था** म्हणतात. या स्थितीमध्यें चित्कलेची प्रतीति पूर्ण होते.

एवं चिद्गगनाभोगे भूषणे व्योम्नि भास्करे ॥
धराविवरकोशस्था सैव चित्कीटकोदरे ॥ १

—योगवासिष्ठ

सर्वत्र ठिकाणीं चित् म्हणजे ज्ञान भरलेलें आहे. स्वर्ग, पृथ्वी, पाताल, आकाश या सर्वांमध्यें चिद्रूप व्यापून राहिलें आहे. फार कशाला? पृथ्वीच्या विवरामध्यें आणि पशु, पक्षि, कीटक यांच्या उदरामध्येंहि चिद्रूप जें ज्ञान त्यानें सर्व व्यापून टाकिलें आहे. असें जें चिद्रूप तें ज्या पुरुषामध्यें पूर्ण बाणलें आहे तो **मुक्त** होय. अशा पुरुषाला बंध किंवा मोक्ष कशानेंहि होत नाहीं. उघडच आहे कीं, दुसऱ्या कोणत्याहि वस्तूची भावनाच जर त्याच्या ठायीं नाहीं, तर त्याला बंध किंवा मोक्ष कशाचा होणार? त्याच्या आत्म्यास अज्ञानामुळें बंध होतो असें म्हणणें शक्यच नाहीं. कारण अशा अवस्थेमध्यें अज्ञानाचा पत्ताच मुळीं लागणार नाहीं. वंध्यापुत्राची जन्मपत्रिका कोणीं ज्योतिष्यानें केली आहे काय? स्वप्नांत पाहिलेला शत्रु जागें झाल्यावर कधीं आपणांस बंधन करितो काय? सिंहास सशानें आपल्या शिंगावर उचलून घेतलें असें कधीं झालें आहे काय? किंवा सांवलीनें कोणा पुरुषाला गिळून टाकिलें असें झालें आहे काय? ह्या सर्व गोष्टी घडणें केवळ अशक्य आहेत; त्याप्रमाणें मुक्तावस्थेमध्यें आत्म्याला अज्ञानाचें बंधन कधींहि होणें शक्य नाहीं. आतां ज्ञानाच्या योगानें आत्म्याची सर्वव्यापकता कशी दृष्टोत्पत्तीस येते ती पाहूं.

अज्ञानाच्या योगानें आत्म्याची सर्वव्यापकता कशी दृष्टीस पडते, हें पुढील वचनावरून स्पष्ट होईल.

ब्रह्म चिद्ब्रह्मभुवनं ब्रह्मभूतपरंपरा ॥
ब्रह्माहं ब्रह्म मच्छत्रुर्ब्रह्मसन्मित्रबांधवाः ॥ १

—योगवासिष्ठ

चित्स्वरूप जें कांहीं आहे, तें परब्रह्म होय. स्वर्ग, मृत्यु व पाताळ हीं ब्रह्म होत; पर्वतादि अखिल दृश्यसृष्टि—हीं सर्व ब्रह्म होत. आपण स्वतः ब्रह्मरूप आहों. व आपले शत्रु देखील ब्रह्मस्वरूप आहेत; तसेंच पुत्र, मित्र हे सर्वहि ब्रह्मरूप होत. अशा प्रकारची भावना पूर्ण ज्ञान झालें असतां सहज उत्पन्न होते.

आतां बंध आणि मोक्ष कशाला म्हणतात, ह्याविषयीं विशेष विचार करूं. वास्तविक पाहतां चैतन्यास, बद्ध किंवा मुक्त असें मुळींच म्हणतां येत नाहीं. केवळ दृश्य पदार्थांशीं जर चैतन्याचें तादात्म्य झालें, तर मात्र बद्धता प्राप्त होते. आणि दृश्यापासून भिन्नपणें राहिलें असतां मुक्तता प्राप्त होते. चित्तचैतन्याची गांठ पडली म्हणजे मी देह आहें ही कल्पना जोरावते; आणि तीच गांठ म्हणजे चिदचिद्ग्रंथि तुटली म्हणजे देहाभिमान नष्ट होऊन ब्रह्मस्थिति प्राप्त होते. मुक्ति तिलाच म्हणावयाचें. ह्याकरितां जें जें आपण ऐकतों किंवा पहातों, मग तें पृथ्वीवर असो अगर आकाशांत असो, तें सर्व ब्रह्मरूपानें चहूंकडे पसरलेलें आहे, हाच वेदशास्त्रांचा मथितार्थ होय. एतद्विषयीं मुख्य श्रुति म्हटली म्हणजे ही होयः—

"सर्वं खल्विदं ब्रह्म।"

—छांदोग्य

इतकें निरूपण झाल्यावर श्री वसिष्ठमहामुनींनीं श्री रामचंद्राला सांगितलें कीं—ह्या ब्रह्मस्थितीचें वर्णन आतां

पुरे. एकच गोष्ट तुला सांगतों, ती ही कीं—तूं स्वतः ज्ञानस्वरूप असून मीहि स्वतः ज्ञानस्वरूप आहें. ह्या अवस्थेमध्यें मीपण किंवा तूंपण मानणें हें केवळ अज्ञान होय. ह्याचें कारण ब्रह्मशिवाय कोणताहि पदार्थ व्यक्त होत नाहीं. म्हटलेंच आहे:—

यदस्ति यद्भाति तदात्मरूपं । यच्चान्यतो भाति न चान्यदस्ति ॥
स्वभावसंवित्प्रतिभाति केवला । ग्राह्यं ग्रहीतेति मृषा विकल्पः ॥१

—योगवासिष्ठ

जी जी वस्तु आहे असें आपण म्हणतों, किंवा जी जी आपणांस भासमान् होते, ती सर्व चैतन्य होय. आत्म्याव्यतिरिक्त जें जें दृश्य भासतें, किंवा अमुक वस्तु नाहीं, असें जें जाणलें जातें तें सर्वहि आत्मस्वरूपच होय. व्याप्य, व्यापकता, व्याप्यांश; ज्ञान—ज्ञेय—ज्ञाता; भासविता, भासतें आणि भास्य अशा जितक्या म्हणून त्रिपुटी आहेत, त्या सर्व चिदानंदमय होत. इंद्रियें, देह, अहंकार, मन, बुद्धि इत्यादि सर्व पदार्थ हे चिद्रूप असून ज्ञानाच्या ठिकाणींच सर्वांची कल्पना केली जाते. ह्यास पूर्वीं अनेक दृष्टान्त दिलेले आहेतच. तथापि आणखी एक दृष्टान्त देऊं. साखरेचे हत्ती, घोडे जरी केले, त्यांवर राऊत बसविले, व त्यांवर नानाप्रकारचे साखरेचे अलंकार घालून छत्रचामरेंहि धरलेलीं असलीं आणि अशा नाना आकृतींचीं चतुरंग सैन्यें जरी बनविलीं, तरी त्यापैकीं कोणताहि भाग मुखांत घातला तरी ती अवघी शर्कराच ! त्याप्रमाणेंच विश्वामध्यें जरी अनेक पदार्थ दृग्गोचर झाले, तरी ते सारे साखरेच्या घोड्याप्रमाणें साखररूपी म्हणजे चैतन्यरूपीच होत. एत-

द्विषयीं पुढें लिहिल्याप्रमाणें सर्वमान्य श्रुति आहेः—

एको देवःसर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतांतरात्मा ॥
कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षी चेता केवलो निर्गुणश्च ॥ १

ह्या श्रुतीचा अर्थ असा आहे कीं,—दिव् म्हणजे प्रकाशणें ह्यावरून देव शब्द होतो. बुद्ध्यादि जे सर्व दृश्य पदार्थ त्या सर्वांना प्रकाश देणारा, भूतमात्रांमध्यें व्यापून राहणारा, इंद्रियांस अगम्य, आकाशाप्रमाणें सर्व वस्तु व्यापून राहिलेला, सर्व वस्तूंच्या अंतर्यामीं संचार करणारा, आणि बुद्ध्यादि इंद्रियांस प्रेरणा करून सूर्याप्रमाणें सर्वांमध्यें चेतना म्हणजे चलन उत्पन्न करणारा व सर्व भूतांचें निवासस्थान असा एक आत्मा होय. हा आत्मा केवळ साक्षिस्वरूपानें राहतो व जरी कांहीं करीत नाहीं, तथापि इतरांकडून सर्व कामें करवितो. तो स्वतः जरी भोग भोगीत नाहीं, तरी दुसऱ्याकडून भोगवितो. ज्याप्रमाणें सूर्य आकाशांत अलिप्त राहून सर्व पृथ्वीमध्यें चेतना उत्पन्न करितो, त्याप्रमाणें हा आत्मा होय. आत्म्याचा सर्व भूतांचे ठायीं लोहचुंबकाप्रमाणें वेध असतो. म्हणजे लोहचुंबक सन्निध असतां, त्याच्या सभोंवार लोखंडाचे तुकडे ज्याप्रमाणें चलन पावून आकर्षित होतात, त्याप्रमाणें आत्म्याचा वेध लागल्याबरोबर सर्व भूतें चलन पावून म्हणजे त्यांचे ठायीं गति उत्पन्न होऊन तीं कर्में करण्यास प्रवृत्त होतात.

इतकें असून तो आत्मा केवल म्हणजे निर्विकारी असून निर्गुण आहे. आत्मा केवल आहे, अशाबद्दल श्रुतिवचनें अनेक आहेतः—

एकमेवाद्वितीयं ब्रह्म ।

नेह नानास्ति किंचन ।
सदेव सौम्येदमग्र आसीत् ।

ह्या वचनांनीं ब्रह्माविषयीं नानात्वाचा आरोप नष्ट होतो; आणि तें एकच केवल आहे अशी खातरी होते. अशा प्रकारें ब्रह्माशिवाय अणुमात्रहि दुसरा पदार्थ नाहीं व ती स्थिति जाणून त्याच स्थितीमध्यें सर्वदा रहावें व आपणाखेरीज दुसरें कांहींहि पाहूं नये.

असें स्वरूपवर्णन वसिष्ठमुनीनीं केल्याबरोबर श्री रामचंद्रास ब्रह्मस्थितीचा पूर्ण अनुभव येऊन
" ब्रह्मानंदीं लागली टाळी । कोण देहातें सांभाळी "
अशी स्थिति होऊन गेली. आणि त्यांला ब्रह्माशिवाय कांहींएक दिसेनासें झालें. शरीर, इंद्रियें, मन, बुद्धि, अहंकार इत्यादिकांची ओळख नाहींशी झाली. निर्विकल्प स्थिति होऊन सर्व इंद्रियांचे व्यापार तटस्थ राहिले. अशा प्रकारच्या ब्रह्मानन्दसागरांत श्री रामचंद्रांस निमग्न ले पाहून श्री वसिष्ठांस परम धन्यता वाटली. आणि अतिप्रयासानें रामचंद्र देहावर आल्यानंतर त्यांस वसिष्ठानीं मोठ्या प्रेमानें आलिंगन देऊन असें सांगितलें कीं—एवढा वेळपर्यंत स्वरूपलक्षण म्हणून जें तुला निरूपण केलें, त्याचा तूं अनुभव घेत आहेस, व एवंभूत जो आत्मा, तो जाणून तदाकार स्थिति करून तूं पुढें निरंतर रहा; म्हणजे तीच जीवन्मुक्ति होय. अशी जी जीवन्मुक्ति, तिचीं लक्षणें काय, जीवन्मुक्त पुरुष जगांत कसा वर्ततो, त्याचे सर्व व्यवहार कसे चालतात, आणि ज्ञानाच्या सात भूमिका—ज्या एकेका भूमिकेचें वर्णन ऐकूनच परमानन्द होतो—त्यांविषयींच्या निरूपणाबद्दल

" जीवन्मुक्ति "
म्हणून एक निराळेंच महत्त्वाचें प्रकरण आहे, त्यास आतां आरंभ करूं.

# प्रकरण चवदावें
## जीवन्मुक्ति

रागद्वेषभयादीनामनुरूपं चरन्नपि ॥
योऽन्तर्व्योमवदत्यच्छः स जीवन्मुक्त उच्यते ॥ १

—योगवासिष्ठ

पूर्वी जें आत्मनिरूपण झालें, तें पूर्णपणें लक्षांत आणून खरोखर आत्मस्वरूप जाणून तद्रूपस्थितीमध्यें रहावें, म्हणजे चोहोंकडे चिदानंदघन भरलेला आहे असें अनुभवास येतें. ही स्थिति बाणली असतां जीवन्मुक्तावस्था प्राप्त होते. जीवन्मुक्ताचीं लक्षणें अशा प्रकारचीं आहेत कीं—त्यांचें वारंवार चिंतन करून आपल्या वृत्तीशीं त्यांचा मेळ कितपत बसला आहे अशाबद्दलचा प्रयत्न प्रत्येक जिज्ञासु पुरुषानें अवश्य करावा. मूळ योगवासिष्ठामध्यें हीं लक्षणें नानातऱ्हेचीं दिलेलीं असून त्याबद्दलच्या कथाहि दिल्या आहेत. तीं सर्व लक्षणें देऊं लागल्यास फार विस्तार होईल, म्हणून त्यांतील मुख्य मुख्य लक्षणेंच आह्मी देत आहों.

जीवन्मुक्त पुरुष लौकिकामध्यें कसा राहतो व त्याचें आचरण कसें असतें हें साधुपुरुषाचा प्रत्यक्ष समागम

असल्याशिवाय पूर्णपणें समजत नाहीं. केवळ पुस्तकी ज्ञान उपयोगीं पडत नाहीं असें जें म्हणतात, तें ह्या स्थळीं उत्कृष्ट लागू पडतें. रासायनिक किंवा शास्त्रीय प्रयोग पाहिल्याशिवाय रसायनशास्त्राचीं किंवा सृष्टपदार्थविज्ञानशास्त्राचीं तत्त्वें जशीं अंतःकरणावर ठसत नाहींत, त्याप्रमाणेंच जीवन्मुक्तांचीं लक्षणें अक्कलकोटचे स्वामीमहाराज, आळंदीचे नृसिंहसरस्वती, देवमामलेदार, विठोबाअण्णा, शृंगेरी मठाचे शंकराचार्य, अशांसारख्या विभूतींची प्रत्यक्ष वागणूक वगैरे पाहिल्याशिवाय मनावर ठसणार नाहींत. असें जरी आहे, तथापि निदान साधुपुरुषांचीं लक्षणें तरी माहीत असावीं, दैववशात् असा महान् साधु भेटला असतां त्या लक्षणांचा त्याच्या वृत्तीशीं मेळ पटवून आपणांस कृतकार्य होतां यावें, एतदर्थ आह्मी जीवन्मुक्ताचीं मुख्य लक्षणें निरूपित करीत आहों.

आतां जीवन्मुक्ति म्हणजे काय, जीवन्मुक्तीचें लक्षण कोणतें, ह्याविषयींचे विचारास लागूं. प्रथमतः आत्मबोध झाला हें कसें समजावयाचें ह्याविषयीं पुढील वचन आहे.

तत्त्वावबोध एवैकः सर्वाशातृणपावकः ॥
प्रोक्तः समाधिशब्देन न तु तूष्णीमवस्थितिः ॥ १

—**योगवासिष्ठ**

ह्या वचनामध्यें तत्त्वावबोध ह्याचा अर्थ अपरोक्षज्ञान असा समजावयाचा. तो ज्ञानाग्नि प्रज्वलित झाला असतां सर्व वासनारूप आशा तृणप्राय भस्म होऊन जातात. अशा प्रकारचा आत्मबोध होणें ह्यालाच **समाधि** म्हणतात. उगीच डोळे मिटून स्वस्थ बसणें ह्याला समाधि

म्हणावयाची नाहीं. अशा प्रकारें ज्याला ज्ञान प्राप्त झालें आहे तो इतर लोकांत जरी मिसळून वागला, तथापि सर्व ब्रह्मरूप आहे असें समजून तो वागतो. अशा पुरुषाला सर्व जग कसें दिसतें हें पुढील वचनांत सांगितलें आहे.

चिदाकारमिदं सर्वं जगदित्येव भावयन् ॥
यस्तिष्ठत्युपशांतात्मा स ब्रह्मकवचः सुखी ॥ १

—योगवासिष्ठ

आत्मबोध ज्यास पूर्ण झाला आहे, तो सर्व जग व त्यांतील जन चिद्रूप आहेत असें पाहतो. त्याचें मन सर्वदा शांत असून त्याचें चिलखत ब्रह्म हेंच असतें. सर्व जग त्याला ब्रह्मरूप दिसतें. व तो स्वतःहि ब्रह्मरूप असतो. म्हणून त्याला आपल्याशिवाय जगांत दुसरें कांहींच दिसत नाहीं. मग असा पुरुष पूर्णानंदाचा अनुभव घेतो, हें निराळें कशास सांगावयास पाहिजे? असा जो जीवन्मुक्त पुरुष त्याचीं लक्षणें आतां निवेदन करितों. पहिलें लक्षणः—

सर्वातीतपदालंबी पूर्णेंदुशिशिराशयः ॥
यस्तिष्ठति सदा योगी स एव परमेश्वरः ॥ १

—योगवासिष्ठ

ह्याचा अर्थ असा कीं—सर्वातीतपद म्हणजे सर्वांच्या पलीकडे असणारी जी संतवस्तु (म्हणजे ब्रह्मपद) त्याचे ठायीं अढळपणें राहून पूर्णचंद्रासारखें शीतल ज्याचें अंतःकरण आहे, ज्याच्या मनांत द्वैतबुद्धीची तळमळ यत्किंचित् देखील नसते, जो केवळ नित्यमुक्त व जो देहधारी असूनहि साक्षात् परमेश्वराप्रमाणें वागतो, तो **जीवन्मुक्त योगीश्वर** होय असें समजावें. जीवन्मुक्ताचें दुसरें लक्षण पुढील वचनांत आहे.

ब्रह्मोपनिषदां तत्त्वं भावयन्योऽन्तरात्मना ॥
नोद्वेगी नच हृष्टात्मा संसारे नावसीदति ॥ १

—योगवासिष्ठ

उपनिषदें हाच कोणी समुद्र त्याचें समग्र मंथन करून तत्प्रतिपाद्य जें ब्रह्म, त्याचे ठायीं आपली बुद्धि जो नेहमीं लावितो, तोच **जीवन्मुक्त** होय. उपनिषदांतर्गत व केवळ उपनिषदांच्या अभ्यासानेंच जें ज्ञेय होतें, असें जें तत्त्व, त्याच्या ठिकाणीं जीवन्मुक्ताची बुद्धि नेहमीं निश्चित झालेली असते. त्याचें सर्व लक्ष केवळ स्वस्वरूपानुसंधानाकडे असतें. म्हणून त्याला संसारामध्यें कांहींएक तळमळ रहात नाहीं. व तो अकर्ता व अभोक्ता असल्यामुळें कर्माकर्में त्याला स्पर्श करीत नाहींत. पुण्य व पाप एतद्रूपी जे दोष ते अमंगल असून त्याला लेप करूं शकत नाहींत.

ह्याला उत्कृष्ट दृष्टान्त म्हटला म्हणजे दावाग्नीचा होय. पर्वतास दावाग्नि लागला असतां मृग, पक्षी इत्यादि सर्व वनचरं दशदिशा पळून सुटतात; त्या पर्वताचा आश्रय करण्याची कोणाचीहि इच्छा रहात नाहीं. तद्वत् पर्वताप्रमाणें अचलस्थिति जो योगी, त्याचे ठायीं ज्ञानाग्नीच्या ज्वाला भडकूं लागल्या, म्हणजे पुण्यापुण्य दोषरूप जीं वनचरें तीं भस्म होऊन दिगंताप्रत पोहोंचतात.

ह्या निरूपणानंतर अशी शंका येते कीं—जे ज्ञानीलोक आहेत, त्यांचे ठायींहि दोष भासतात व कामक्रोधादि लहरी त्यांचे ठायींहि दृष्टीस पडतात हें कसें घडतें? ह्या शंकेचें समाधान असें कीं—वास्तविक पाहतां ज्ञान्याचे ठिकाणीं राग, लोभ हे मुळींच नसतात. परंतु

लौकिकांत मात्र विपरीत अर्थ दृष्टोत्पत्तीस येतो, व त्याचें कारण अगदीं भिन्न आहे. अज्ञानी लोकांप्रमाणें ज्ञानी लोकहि दुसऱ्या पुरुषांमध्यें राग उत्पन्न करितात; तो कशाकरितां म्हणाल तर क्षांति, तितिक्षा इत्यादि जे विलोभनीय गुण, ते आपल्या अंगीं कितपत आहेत, ह्याची परीक्षा करण्याकरितांच होय. कारण खरोखर पाहतां इतरांनीं आपला सत्कार केला काय किंवा निर्भर्त्सना केली काय, दोन्ही त्यांला सारखींच आहेत. सत्कार केल्यामुळें ज्ञान्याच्या चित्ताला हर्ष होत नाहीं, किंवा निंदा केली असतां त्याला विषादहि होत नाहीं.

असन्मानात्तपोवृद्धिः सन्मानात्तु तपःक्षयः ॥
अर्चितः पूजितो विप्रो दुग्धा गौरिव सीदति ॥ १

—स्मृति

म्हणजे विप्राचा अवमान झाला असतां त्याच्या पुण्याची वृद्धि होते, व सन्मानानें त्याच्या पुण्याचा क्षय होतो. विप्राची जसजशी अर्चापूजा अधिक करावी तसतसें त्याचें तेज, दूध काढिलेल्या गाईप्रमाणें कमी होतें. तेव्हां लौकिकजनांप्रमाणें वागून ज्ञानी लोक जर दुसऱ्याला क्रोध आणितांना दिसले, तर तें आपल्या गुणांच्या परीक्षेकरितांच होय असें समजलें पाहिजे.

वरील शंकेचें दुसऱ्या प्रकारें उत्तर असें आहे कीं, ज्ञानी लोकांच्या ठायीं कामक्रोधादिक जे दृष्टोत्पत्तीस येतात, ते पूर्वकर्मसंस्कारामुळेंच होत, असें समजलें पाहिजे. अज्ञान जरी नष्ट झालें, तरी प्रारब्धरूपानें जें कर्म शेष राहतें, त्याच्या योगानें जीवन्मुक्त पुरुषाच्या ठिकाणीं सुद्धां राग, लोभ दृष्टीस पडतात.

ह्यावर पुनः अशी शंका उत्पन्न होते कीं,--उपनिषद्रूपी समुद्राचें आलोडन करून उत्पन्न झालेला जो तत्त्वावबोध तो झाला तरी देखील जीवन्मुक्त पुरुषास मोहकार्य कां बरें सुटत नाहीं? सर्व मोहांचें कारण अज्ञान होय आणि तें अज्ञान जर आत्मावबोधानें नष्ट होतें, तर मोह कोठून राहतील? कारण नासलें असतां कार्य नाहींसें झालेंच पाहिजे, हा तर सर्वशास्त्रसंमत सिद्धान्त आहे. ह्या शंकेचें समाधान असें आहे कीं,—संस्काराची अवधि ज्या मानानें भ्रम असेल त्या मानानें होत असते. म्हणजे एकाद्याला अंधारामध्यें दोरीच्या ठिकाणीं सर्पाचा भास झाला, तर भय उत्पन्न होतें. मागाहून दोन क्षणांनीं

'अरे! हा सर्प नव्हे, ही दोरी आहे!'

अशी जरी त्याची खात्री झाली, तरीहि त्याला सर्पाच्या भीतीमुळें जो भयकंप झालेला असतो तो लागलाच नाहींसा होत नाहीं. दोरी आहे असें समजल्यावर सुद्धां मागाहून कित्येक वेळ तो कंप राहतोच. ही जशी गोष्ट तशीच प्रारब्धकर्माची गोष्ट आहे. सर्पाची भीति दोन क्षण असते. त्याचें भय जर मागाहून बराच वेळ राहतें, तर अनेक कल्पपर्यंत अज्ञानकृत भ्रम झाला असल्यामुळें तो जबरदस्त संस्कार राहून देहपात होईपर्यंत ज्ञान्यालाहि प्रारब्धकर्म भोगावें लागतें, ह्यांत नवल तें कोणतें? कारण जितका आघात तितका प्रत्याघात होणें साहजिकच आहे. बाणाचा वेग त्याला जितकी गति मिळाली असेल, तितका असतो. या विवेचनावरून पाहतां जीवन्मुक्त पुरुष जरी झाला, तथापि अनेक-पूर्वजन्म-सं-

स्कारांमुळें रागद्वेषादि त्याच्या ठायीं दृष्टीस पडतात यांत आश्चर्य नाहीं.

जीवन्मुक्ताचें पुढील लक्षण योगवासिष्ठामध्यें अत्यंत श्रेष्ठ असें वर्णन केलें आहे:—

अंतर्मुखतया तिष्टन् बहिर्वृत्तिपरोपिसन् ॥
परिभ्रांततया नित्यं निद्रालुरिव लक्ष्यते ॥ १

ज्ञानी पुरुषांचीं इंद्रियें कधींहि बहिर्मुख असत नाहींत. तीं सर्वदा अंतर्मुख म्हणजे जो प्रत्यगात्मा, त्याकडे वळलेलीं असतात. म्हणून असा पुरुष बाह्यव्यापार कितीहि जरी करीत असला, तरी त्या व्यापाराचे ठिकाणीं त्याची आसक्ति नसते. त्याचें मन स्वस्वरूपामध्यें गुंतल्यामुळें तो परमसुखांत निमग्न असतो. त्याच्या स्थितीला उत्कृष्ट दृष्टान्त म्हटला म्हणजे झोंपेंतून उठविलेल्या मनुष्याचा होय. झोंपेंतून उठलेला मनुष्य जरी कांहीं काम करितो, तरी त्याचें चित्त निद्रासुखांत भरलेलं असतें; यामुळें त्यानें बाह्य व्यापार जरी केले, तरी त्यांचें कर्तृत्व त्याजकडे असत नाहीं. त्याप्रमाणेंच जीवन्मुक्त पुरुष बाह्येंद्रियव्यापार जरी करीत असला, तथापि त्याचें मन मूळ अधिष्ठानाचे ठिकाणीं रमलेलें असतें. असा पुरुष आत्मसुखामध्यें संतुष्ट असल्यामुळें देहाकार असून देहातीत असतो. कर्मे करून सुद्धां कर्मफलांनीं तो अलिप्त असतो. जीवन्मुक्ताचें आणखी एक लक्षण पुढें लिहिल्याप्रमाणें आहे:—

अद्वैते स्थैर्यमायाते चित्तेच प्रशमं गते ॥
योगिनः कर्म कुर्वन्ति पश्यन्ति स्वप्नवज्जगत् ॥ १

—योगवासिष्ठ

योगी पुरुषांची अद्वैतस्थिति अगदीं अढळ झालेली असते. म्हणजे श्रीमच्छंकराचार्यांनीं अनेक द्वैतपंथांचें खंडन करून जें अद्वैतमत प्रस्थानत्रयामध्यें सिद्ध केलें आहे, त्या मताचा जीवन्मुक्त पुरुष पूर्ण अवलंब करितो. मग त्याची द्वैतबुद्धि निःशेष विरून जाते, व अशा साधूंचें चित्त परमशांतीप्रत पावतें.

भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः ॥

--मुंडकोपनिषद्

अशा प्रकारची त्याची बुद्धि होऊन राहते. हृदयामध्यें कोणत्याहि प्रकारचा संदेह राहत नाहीं. योगी लोक पूर्वसंस्कारामुळें आपलें कर्म प्रांजलपणें करीत असतात, तथापि सर्व जग मृगजलाप्रमाणें लटिकें आहे असेंच मानितात.

असे साधुपुरुष यथाकालीं विधीचें आचरण करितात, व निषिद्ध कर्मांचा आव्हेर करितात. ह्या विधियुक्त कर्माचरणानें किंवा निषिद्ध-कर्मवर्जनामध्यें आपणांस कांहीं पापपुण्य प्राप्त होईल, असें त्यांला वाटत नसतें. कारण, हजारों जन्म सत्कर्में करून व निषिद्धकर्मांचा त्याग करून त्यांची चित्तशुद्धि झालेली असते. चित्तशुद्धि झाल्यामुळें त्यांस पूर्णज्ञान होतें व ज्ञान झाल्यानंतरहि त्यांचें आचरण पूर्वसंस्कारानें जसेंच्या तसेंच कायम राहतें.

ज्ञानी लोक कर्में करितात, परंतु कर्मफलांची आसक्ति धरून ते तीं कर्में करीत नाहींत, तर ते लोकसंग्रहासाठीं कर्में करीत असतात. ह्या सिद्धान्ताचा आधुनिककाळीं जितका जास्त विस्तार होईल, तितका एकंदर लोकसमाजास जास्त फायदा होईल ह्यांत कांहींएक शं-

का नाहीं. प्राचीनकाळचीं वैदिकमतें झुगारून देऊन अलीकडे समाजादि जे नवीन पंथ निर्माण झाले आहेत, त्या पंथांचे आधुनिक सामाजिकस्थितीवर कोणकोणते परिणाम घडत चालले आहेत, ही गोष्ट सूक्ष्मरीत्या अवलोकन करणारास सहज कळण्यासारखी आहे. सांप्रत कर्माचरणाचा लोप होत चालला आहे व त्यामुळें मनुष्याच्या मनावर धर्माचा संस्कार बिलकुल घडत नाहीं, आणि धर्मसंबंधाची पूज्यबुद्धि उत्पन्न होत नाहीं. ह्या स्थितीमुळें अलीकडील विद्वान् सनातन धर्मकृत्यें टाकून देऊन कर्मशून्य होतात, आणि त्याचा परिणाम भावी संततीच्या आचरणावर फार वाईट प्रकारचा घडतो. सांप्रत आमच्या लोकांची स्थिति कांहीं अशीं अशीच होत चालली आहे. स्नानसंध्या, देवपूजा इत्यादि नित्यकर्में बाप करीत नसला म्हणजे अर्थात् घरांतल्या मुलांस त्यांची जरूरी वाटत नाहीं. कदाचित् बापाला समाजाचीं उच्चधर्मतत्त्वें माहीत असतात, ह्यामुळें कर्मवर्जनापासून होणारा अनर्थ त्याला अनुभवावा लागत नसेल. परंतु त्याच्या मुलांस पूर्वींच्या वेदप्रतिपादित नित्यनैमित्तिक कर्मांची ओळख तर नसतेच, आणि बापाला जीं समाजाचीं मतें समजलेलीं असतात, तींहि त्याला ठाऊक नसतात. अर्थात् मुलगा सर्व बाजूंनीं गुंडाच रहातो. गरीब बिचारीं मुलें अशा परिस्थितींत अधर्माकडे प्रवृत्त होऊन स्वेच्छाचार करूं लागतात. ह्याचीं उदाहरणें सर्वत्र दृष्टीस पडतातच. तेव्हां अशा तऱ्हेचे होणारे जे परिणाम ते टाळण्याकरितां अलीकडील विद्वानांनीं सुद्धां अवश्य कर्माचरण केलेंच पाहिजे. ज्ञान प्राप्त झालें ह्य

घमेंडीवर जर कर्म सोडिलें, तर त्याचा परिणाम भावी संततीवर फार वाईट होतो, हें लक्षांत आणूनच जीवन्मुक्त पुरुष सुद्धां नित्यनैमित्तिक कर्में यथासांग संपादन करून जगास उत्कृष्ट उदाहरण घालून देतात. भगवद्गीतेंत श्री कृष्णानीं अर्जुनास स्पष्ट सांगितलें आहे कीं— हा अर्जुना, सत्कर्में करून मला म्हणजे कांहीं प्राप्त करून घ्यावयाचें आहे असें नाहीं; तथापि सर्व लोकांला अनुकरण करण्यास कांहीं तरी कित्ता पाहिजे म्हणूनच मी सर्व कर्में यथासांग करितों. तीं करण्यांत माझा दुसरा कांहीं उद्देश नाहीं. असो.

जीवन्मुक्त पुरुषाची स्थिति भूमिकाभेदानें निरनिराळी असते. ह्या ज्ञानाच्या सात भूमिका असून त्या एकाहून एक श्रेष्ठ आहेत व त्या भूमिकांचें नुसतें वर्णन ऐकलें तरी सुद्धां पाहिजे त्या मनुष्यास परमानंद होण्यासारखा असतो. ह्या सात भूमिकांपैकीं पहिल्या तीन भूमिकांस "अज्ञान भूमिका" असें म्हटलेलें आहे. चवथी आणि पांचवी ह्या दोन भूमिकांत व्युत्थानकालीं सुखदु:खांचा अनुभव येतो. परंतु सहाव्या व सातव्या भूमिकांमध्यें ज्ञानी पुरुषास सुखदु:खाचें भानच मुळीं होत नाहीं व दुसऱ्यानें डिवचिलें तरी ते देहस्मृतीवर येत नाहींत. सातवी भूमिका हें ज्ञानाचें शिखर होय. त्या अवस्थेमध्यें असतां विषयसुखानें सुख होत नाहीं. व दु:खानेंहि दु:ख पावत नाहीं. कारण प्रारब्धभोग आहेत ते देहाच्या माथां, आपला त्यांचा कांहींएक संबंध नाहीं, देह पाहिजे तर रडेल, अशी त्या पुरुषाची खात्री होऊन अनुभव झालेला असतो.

वर सांगितलेल्या **ज्ञानभूमिका** येणेंप्रमाणें आहेतः--

( १ ) शुभेच्छा, ( २ ) विचारणा, ( ३ ) तनुमानसा, ( ४ ) सत्त्वापत्ति, ( ५ ) असंसक्ति, ( ६ ) पदार्थाभाविनी, ( ७ ) तुर्यगा.

आतां वर नामनिर्दिष्ट केलेल्या सात ज्ञानभूमिकांचा अभ्यास कसा करावा व प्रत्येक भूमिकेचीं चिन्हें काय काय आहेत ह्याचें निरूपण करूं. पहिली भूमिका जी शुभेच्छा, तिचें स्वरूप व साधनें हीं समजण्यापूर्वीं प्रवृत्त व निवृत्त अशा प्रकारच्या पुरुषांचीं लक्षणें समजणें अवश्य आहे. प्रवृत्ताचें लक्षण पुढील वचनांत सांगितलें आहे.

> किमेतन्नाम निर्माणं वरं संसृतिरेव मे ।
> इति निर्णयकर्ताच स प्रवृत्त उदाहृतः ॥ १
>
> ---**योगवासिष्ट**

ह्याचा अर्थ असा कीं,—निर्वाण म्हणजे मोक्ष हा आपणास कशाला पाहिजे? संसाराचा मार्ग हाच उत्तम, ह्याप्रमाणें जो आपल्या मनाची समजूत करून प्रपंचांतच निमग्न असतो, त्याला **प्रवृत्त पुरुष** असें म्हणावें. प्रवृत्तमार्गाचा आश्रय करणारे पुरुष सकाम धर्मानुष्ठानें करितात. ते असें म्हणतात कीं, जे अहेतुकपणें निवृत्तिमार्गानें कर्में करितात, ते व्यर्थ शीण मात्र पावतात. कर्में करून ते फुकट दवडितात व त्यांला विषयसुखाची प्राप्ति मुळींच होत नाहीं. ज्या कर्मांत विषयसुख नाहीं, तें कर्म करून तरी उपयोग काय? यास्तव इहपरलोकीं विषयसुखाची प्राप्ति करून घेण्याकरितांच नानाप्रकारच्या कर्मांचें आचरण करावें. रंभादि वनितांचे भोग मिळविण्याचीं साधनें संपादन करण्यांतच खरा पुरु-

षार्थ आहे, असा ज्यांचा दृढनिश्चय असतो, आणि अशा बुद्धीनें जे काम्यकर्मे करितात, त्यांस प्रवृत्त असें म्हणावें.

निवृत्त पुरुषाचीं लक्षणें पुढील वचनांत निर्दिष्ट केलीं आहेत:—

अनेकजन्मनामंते विवेकी जायते पुमान् ॥
इति निश्चयवान् योंतः सनिवृत्त इति स्मृतः ॥१
कथं विरागवान् भूत्वा संसाराऽब्धिं तराम्यहं ॥

-----योगवासिष्ठ

ह्याचा अर्थ असा कीं—अनेक जन्म गेल्यानंतर विवेकबुद्धि पुरुषास उतपन्न होते; आणि ती झाल्यावर मी विरक्त कसा होईन व संसारसमुद्रांतून कसा तरून जाईन, ह्या चिंतेमध्यें जो सर्वदा निमग्न असतो, त्यास **निवृत्त** असें म्हणावें. निवृत्त पुरुषास संसारांतील दुःखाची नेहमीं आठवण होत असून संसार हें वणवा लागलेलें अरण्यच आहे असें त्याला वाटतें. पाठीस वाघ लागला आहे आणि पुढें जावें तर समुद्र पसरलेला आहे, अशा कचाटींत सांपडलेल्या मनुष्याच्या मनाची जी स्थिति असते, तशीच निवृत्त पुरुषांचे मनाची स्थिति सर्वदा झाली असते. गर्भवासांतील असह्य यातना, व त्यानंतर प्राप्त होणाऱ्या बाल्यादि अवस्था व मृत्यु यांची आठवण होऊन संसार म्हणजे शुद्ध यमयातना आहे असें त्याला वाटत असतें. अशा संसारांत नानाप्रकारचीं पुण्यकर्मे केलीं व त्यामुळें उत्तम जन्म प्राप्त झाले, तथापि कर्माचें फल भोगल्यानंतर फिरून दुःख आहे तें आहेच; त्यांत कांहींएक कमीपणा होत नाहीं. म्हणून कर्माचें फल केवळ दुःख होय असें मानून ते

पुरुष केवळ आत्मविचारांत निमग्न असतात. त्यांची विषयांवरील प्रीति समूळ नष्ट झालेली असते व ते साधनचतुष्टयानें पूर्ण संपन्न असतात. मी भवसमुद्र कोणत्या उपायांनीं तरून जाईन व मुक्त कसा होईन? ह्या विवंचनेनें ते सर्वदा प्रेरित असतात. अशा प्रकारचे जे मुमुक्षु त्यांस **निवृत्त पुरुष** असें म्हणावयाचें.

वर सांगितलेल्या लक्षणांपैकीं प्रवृत्तीचीं लक्षणें ज्याच्यामध्यें नाहींत, आणि जो निवृत्तलक्षणांनीं पूर्ण संपन्न असतो, त्यासच **शुभेच्छावान्** असें म्हणावें. तेव्हां शुभेच्छेचें स्वरूप वर्णन करणें म्हणजे निवृत्त पुरुषाचें लक्षण देणेंच होय. आतां ही भूमिका साध्य होण्यासाठीं कोणकोणत्या साधनांचें अवलंबन करावें लागतें हें पाहूं. शुभेच्छा ही ज्ञानभूमिका ज्याला साध्य झाली, त्याची कोणत्याहि विषयाच्या ठायीं आसक्ति राहात नाहीं. त्याचे ठिकाणीं वैराग्य बाणलेलें असतें. कोणत्याहि प्रकारचें कर्म करण्यापूर्वीं जी अंतर्वासना उत्पन्न होते, ती त्या पुरुषाची अगदीं विरून गेलेली असते. व अशा रीतीनें प्रवृत्तमार्गाचीं जीं कर्में, त्यांचा तो जों जों त्याग करूं लागतो, तों तों अंतर्यामीं त्याला खरें सुख होऊं लागतें. जो शुभेच्छवान् ( शुभ म्हणजे चांगल्या प्रकारची जी इच्छा, ती प्राप्त झाली आहे ज्यास तो ) असतो तो नीच भाषण किंवा कोणत्याहि प्रकारची नीच क्रिया वर्ज करितो. कारण अशा प्रकारचीं भाषणें व क्रिया हीं केवळ मूर्खपणाचीं आहेत अशी त्याची खात्री झालेली असते. इतकेंच नव्हे, तर हलकट विचार त्याच्या मनांत

कधीं उत्पन्न होत नाहींत. तो नेहमीं सद्विचारामध्यें निमग्न असतो. तो असें समजत असतो कीं, ईश्वरनिष्ठेवांचून प्रपंचामध्यें इतर काम करणें हें केवळ वेडेपण होय. शुभेच्छासंपन्न पुरुष कधींहि कोणाचें वर्म मुखावाटें काढीत नाहीं. त्याची चालचलणूक अतिशय प्रांजलपणाची असते. म्हणजे कोणत्याहि प्रसंगीं जी वास्तविक स्थिति असेल, तदनुरूप भाषण किंवा विचार त्याचे होतात. असा पुरुष उगीच डौलानें पोकळ पांडित्य करीत नाहीं. कोणताहि विषय निघाला असतां आपले विचार ज्या मर्यादेपर्यंत खरोखर पोहोंचले असतील, त्या मर्यादेपर्यंतच आपली धांव आहे, त्याच्या पुढें नाहीं, हें स्पष्ट कबूल करावयाचें, अशी जी प्रामाणिक बुद्धि, ती प्रांजलपणाच्या वागणुकीचें मूळ बीज होय. असा पुरुष निरंतर पापभीरु असतो. त्याचे अंतःकरणांत पापाचा कधींहि प्रवेश होत नाहीं. त्यास कोणत्याहि प्रकारच्या भोगाची अपेक्षा राहिलेली नसते. शुभेच्छावान् पुरुष सर्व लोकांशीं मोठ्या स्नेहानें मृदु भाषण करितो, त्याच्या भाषणांतील मुख्य गुण म्हणजे आदर व नम्रता हे होत. तसेंच त्याचें भाषण सुंदर व अर्थप्रचुरित असतें. तसेंच देशकालास उचित असें त्याचें वचनामृत असतें. अशा प्रकारचीं लक्षणें ज्या पुरुषामध्यें दृष्टोत्पत्तीस येतात त्यास ज्ञानाची पहिली भूमिका पूर्ण साध्य झाली असें समजावें.

शुभेच्छावान् पुरुष कायिक, वाचिक, मानसिक सर्व तऱ्हांनीं साधूंला शरण गेलेला असतो, आणि सद्गुरुचरणांचे ठायीं त्याची पूर्ण निष्ठा असते. साधुसंगमाविषयीं त्याला फारच आवड असून त्याचा सर्व उद्योग

म्हणजे अध्यात्मशास्त्र समजून घेणें एतदर्थ असतो. तो अध्यात्मविषयाचा स्वतः विचार करितो. व संसारांतून मी कसा तरून जाईन हा त्याला अहोरात्र निदिध्यास लागलेला असतो. साधुसमागमानें त्याचे ठायीं पूर्ण वैराग्य बाणलेलें असतें. शुभेच्छावान् पुरुषाचीं हीं लक्षणें होत.

ज्ञानाची दुसरी भूमिका जी **विचारणा**, तिचें स्वरूप व लक्षणें कोणतीं ह्याविषयी आतां विचार करूं.

शास्त्रसज्जनसंपर्कवैराग्याभासपूर्वकं ॥
सदाचारे प्रवृत्तिर्या प्रोच्यते सा विचारणा ॥ १

**—योगवासिष्ठ**

याचा अर्थ असा आहे कीं—प्रथम प्रकरणांत जें साधनचतुष्टयाचें वर्णन केलें आहे, त्या साधनचतुष्टयानें संपन्न, वैराग्यवान् व अनन्यभावानें सद्गुरूला शरण गेलेला असा जो, तो दुसऱ्या भूमिकेप्रत पोहोंचला असें समजावें. सद्गुरूला शरण जाण्याची पद्धति मुंडक उपनिषदांत वर्णन केली आहे ती अशी:—

तद्विज्ञानार्थं सगुरुमेवाभिगच्छेत्सामित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठं ॥

**—मुंडक**

म्हणजे त्या ब्रह्माची प्राप्ति होण्याकरितां ज्यानें हातामध्यें समिधा धारण केली आहे अशा शिष्यानें ब्रह्मनिष्ठ श्रोत्रिय पाहून त्यास गुरु करावा म्हणजे इष्टप्राप्ति होते.

तस्माद्गुरुं प्रपद्येत जिज्ञासुः श्रेय उत्तमं ॥
शाब्दे परेच निष्णातं ब्रह्मपरेच समाश्रयं ॥ १

**—श्रीमद्भागवत**

ज्याला आपलें खरें श्रेय साधावयाचें असेल, त्यानें

गुरुचरणाकडे धांव घ्यावी. तो गुरु असा असावा कीं, शाब्दिक ज्ञानाच्या पलीकडील जें ब्रह्म, त्या ब्रह्माचे ठिकाणीं ज्यानें पूर्णपणें आश्रय केला आहे ज्याला सद्गुरूची भेट झाली त्यास आत्मवेत्ता असें म्हणावें.

सर्व कालज्ञान जरी असलें, तरी ज्याला सद्गुरूची भेट झाली नाहीं, तो सच्छास्त्राविषयीं आंधळा असें समजलें पाहिजे. सद्गुरूला शरण जाऊन त्याला आपलें सर्वस्व अर्पण करून भजावें. खरोखर पाहिलें असतां गुरूपेक्षां दुसरें कोणीहि उपासना करण्यास योग्य नाहीं. जे भावानें सद्गुरूला शरण जातात, तेच जीवन्मुक्त पुरुष समजावे. सज्जनाच्या संपर्कानें गुरुभजन करून, गुरुमुखानें महावाक्याचें श्रवण करावें. महावाक्याच्या स्मरणानेंहि जर साक्षात्कार झाला नाहीं, म्हणजे असंभावनादि वृत्ति जर अंतःकरणामध्यें प्रादुर्भूत झाल्या, तर वेदान्तशास्त्राचा विचार करावा. वेदान्त म्हणजे सकल वेदांचें मंथन करून व वारंवार चिंतन करून जी अंतःस्थिति प्राप्त होते, तिचें निर्णायक जें शास्त्र तेंच वेदान्त होय. अशा रीतीनें म्हणजे शास्त्राच्या व सज्जनांच्या संपर्कानें वैराग्य उत्पन्न होऊन तें पूर्णपणें बाणलें असतां सदाचारवृत्तीची ती खूणच असें समजावें.

दुसऱ्या ज्ञानभूमिकेस प्राप्त झालेला जो सत्पुरुष त्याच्या वृत्तींत वरील खूण पटते. तो अद्वैतब्रह्माचें जें तात्पर्य तद्विषयींच्या निरूपणास लुब्ध होतो. आणि मग तो युक्तींनीं त्याचें अनुचिंतन म्हणजे मनन करूं लागतो. अशा प्रकारची ज्याची पूर्णपणें सदाचारप्रवृत्ति झालेली असते, व जो यथोचित वर्णाश्रमधर्माचा अवलंब करितो,

त्याला श्रवणमननांमध्यें फारच गोडी वाटते. असा पुरुष सर्व वस्तूंचा संग सोडून फक्त सद्गुरूंची संगति दृढ धरितो. त्याच्या अंतर्यामाचे ठायीं नित्यानित्यविवेकबुद्धि पूर्ण जागृत असते. आणि घरचा यजमान जसा रात्रंदिवस स्वकीयांच्या व स्वसंपत्तीच्या रक्षणांत डोळयांत तेल घालून सारखा टपत असतो, त्याप्रमाणें ज्ञानसंपन्न पुरुष सर्वदा जागृत असतो. ही जागृतीची अवस्था म्हणजे भगवद्गीतेंत वर्णिलेल्या

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ॥

ह्या वचनांतील अवस्था होय. सर्व भूतमात्रांची जी रात्र, त्या वेळेस ज्ञानी पुरुष जागृत राहतो; व भूतमात्र ज्या वेळेस जागृत असतो, त्या वेळेस ज्ञानी निद्रिस्त असतो. निद्रिस्त म्हणजे निद्रावश असा एथें अर्थ घ्यावयाचा नाहीं. ह्याचा अर्थ फारच गूढ आहे. तो असा कीं, व्यावहारिक लोक प्रापंचिक गोष्टींत जी आसक्ति धरितात, तिच्या अभावी ज्ञान्याची त्या गोष्टीवर पूर्ण अप्रीति असते व ज्या गोष्टी अज्ञानी प्रापंचिक लोक तुच्छ अशा मानितात, त्या गोष्टींवर ज्ञानी लोकांचें पूर्ण प्रेम बसलेलें असतें. ज्ञान्याची जागृति ती हीच समजावयाची. अशा चिन्हांनीं युक्त जो पुरुष असतो तो दुसऱ्या म्हणजे विचारणा ह्या ज्ञानभूमिकेप्रत पोहोंचला असें समजावयाचें.

आतां तिसरी ज्ञानभूमिका तनुमानसा होय. तिचें स्वरूप व लक्षण असें आहे:—

विचारणाशुभेच्छाभ्यामिंद्रियार्थेष्वसक्तता ॥
यत्र सा तनुताभावात्प्रोच्यते तनुमानसा ॥ १

—योगवासिष्ठ

शुभेच्छा आणि विचारणा ह्या ज्या दोन ज्ञानभूमिका, त्यांच्या दृढाभ्यासानें संपूर्ण विषयांचे ठिकाणीं विरक्तता प्राप्त होते. अशी जी अवस्था त्या अवस्थेमध्यें मनाला अत्यंत सूक्ष्म रूप येतें. म्हणून तिला **तनुमानसा** हें नांव दिलेलें आहे. पहिल्या दोन भूमिकांमध्यें श्रवण, मनन हीं होतात. त्यांचा अभ्यास पूर्ण झाला म्हणजे सच्छिष्यानें निदिध्यासन करावें. निदिध्यासन केल्यानें मन क्षीण होतें; म्हणून या अवस्थेला तनु ( क्षीण ) मानसा असें शास्त्रज्ञ म्हणतात. अध्यात्मशास्त्र म्हणून जें आहे, त्यांतील निश्चित वाक्याचा ( तत्त्वमसि इत्यादि ) अर्थ ब्रह्मात्मपर व स्वयंज्योतिपर करण्यामध्यें ज्यांची विमलबुद्धि सर्वदा गर्क राहते, ते तनुमानसेप्रत प्राप्त झाले असें समजावें.

पहिल्या दोन भूमिकांचा मुख्य उपयोग म्हणजे बुद्धीची शुद्धता हा होय. देहादिक विजातीय जें प्रपंचजात त्याचा तिरस्कार करून सावधानपणें परब्रह्माचे ठिकाणीं जीवन्मुक्ताची बुद्धि सर्वदा लीन असते. अशा अवस्थेमध्यें ब्रह्म ध्येय आहे व आपण ध्याता आहों, ही द्वैतकथा विसरून जाते, व ब्रह्माशीं ऐक्य करून सुखस्वरूपानें ज्ञानी पुरुष राहतो. अशा प्रकारचा जो अभ्यास करणें त्यालाच **निदिध्यासन** म्हणावयाचें. द्वैताचा अभाव होऊन स्वस्वरूपामध्यें राहतां येऊं लागलें म्हणजे पूर्ण साक्षात्कार समजावा. ह्या भूमिकेमध्यें न्यून काढूं लागलें तर तें इतकेंच आहे कीं, बुद्धि स्वस्वरूपामध्यें गुंतून राहते, परंतु मागून जेव्हां बुद्धीचें व्युत्थान होतें, तेव्हां देहादिकांचें स्फुरण पूर्वींप्रमाणें होऊं लागतें. असें झालें असतां फिरून सावध होऊन व देहादिक प्रपंचा-

चा तिरस्कार करून, बुद्धीला मागें वळवून ब्रह्माचे ठायीं योगी पुरुष तिला लीन करितो. इतकें चाललें असतांहि पुनः बुद्धि तेथून निघून जाते व प्रपंचाकार होते. असें झालें असतां पुनः तिला ब्रह्मात्मस्थानीं लीन करावी. ही जी वारंवार चालणारी झटपट व जीमध्यें बुद्धि पूर्ण कसोटीस लागते, तिला निदिध्यासन म्हणावयाचें; व ही जी निदिध्यासनाची अवस्था, तिलाच तनुमानसा असें म्हणतात. अभ्यासाच्या योगानें मन तनुतेप्रत पावतें, म्हणून या भूमिकेस तनुमानसा म्हणतात. **मनाचें तनुत्व** म्हणजे काय? तर प्रपंचानुसंधान नाहींसें होऊन ब्रह्माकारानें त्याचा परिणाम होतो. प्रपंचांतलि हजारों वस्तूंमध्यें मन गुंतून राहणें, हें मनाचें पुष्टपण होय, आणि त्याच प्रपंचाचा क्षय झाला असतां मनाची क्षीणता व्यक्त होते. तिसऱ्या ज्ञानभूमिकेस जो सत्पुरुष पोहोंचतो, त्याच्या ठायीं हीच खूण दृष्टीस पडते.

ह्यावर एक अशी शंका उत्पन्न होते कीं, गुरुकृपा झाली असतांहि मग असंभावना व विपरीत भावना उत्पन्न होतात त्या कां? अशा प्रकारच्या असंभावना साक्षात्काराला फार विघ्न करितात; मग शिष्यास फिरून श्रवण-मनन-निदिध्यासनादि प्रकार करावे लागतात. ह्या शंकेचें उत्तर असें आहे कीं, सद्गुरूनें परब्रह्म जरी दाखविलें, व आत्मस्वरूप प्रकट केलें, तथापि जन्मांतरीच्या व इहजन्मींच्या संस्कारामुळें असंभावना व विपरीत भावना यांस प्रवेश करण्यास संधि मिळते. ह्या असंभावनांचें निरसन होण्यास चार उपाय आहेत. ते उपाय सावधान चित्तानें ऐकले असतां, पाहिजे त्या पुरुषाचें समाधान होईल.—

( १ ) विषयासक्ति ( २ ) प्रज्ञामांद्य ( ३ ) कुतर्क ( ४ ) विपर्ययाग्रह. हीं कारणें साक्षात्कारामध्यें विघातक होतात. ह्या चार विघ्नांचें निवारण करण्यास मुख्य साधनें म्हटलीं म्हणजे शम, दम, श्रवण, मनन, निदिध्यासन हींच होत. ह्यांच्या योगानें हीं विघ्नें क्षणांत भस्म होऊन जातात. ह्याविषयीं पुढील वचन आहे.

अहं ब्रह्मेति वाक्यार्थबोधो यावद् दृढीभवेत् ॥
शमादिसहितस्तावदभ्यसेच्छ्रवणादिकं ॥ १

—योगवासिष्ठ

( १ ) विषयासक्ति झाली असतां साक्षात्कार होईल कसा? होणार नाहीं. ह्याकरितां जे शमदमादि षट्काचा अवलंब करितात, त्यांनीं त्याचाच अभ्यास वारंवार करावा, म्हणजे विषयासक्ति नाहींशी होते. ( २ ) दुसरें विघ्न जें प्रज्ञामांद्य त्याच्या योगानें मोठाच अनर्थ उत्पन्न होतो. अल्प ज्ञानामुळें मन निश्चल कधींहि होत नाहीं. प्रज्ञामांद्याच्या योगानें प्रमाणासंभावना उत्पन्न होते. सर्व वस्तूंमध्यें वेद आणि सद्गुरु हे प्रमाणभूत होत. परंतु अशा ठिकाणीं ही असंभावना म्हणजे अश्रद्धा उत्पन्न होऊन मग तो वेडा झालेला पुरुष असें म्हणूं लागतो कीं, वेद हे खरे कशावरून? असला वेडगळ मनुष्य सद्गुरूला मनुष्यरूपी समजतो. तें प्रज्ञामांद्य नाहींसें होण्याकरितां श्रवण अवश्य करावें. त्याच्या योगानें प्रज्ञामांद्य लय पावतें. (३) तिसरें विघ्न कुतर्क हें होय. ह्याच्या योगानें प्रमेयासंभावना उत्पन्न होते व ती सर्वस्वाचा नाश करिते. प्रमाण म्हणून जें महावाक्य त्याच्या योगानें सर्व प्रमेयांची पूर्णपणें ओळख होते. तेंच ब्रह्म व त्यासच प्र-

मेय म्हणावयाचें. प्रमेय शब्दाचा अर्थ शास्त्रीयरीत्या असा आहे कीं—

**यत् प्रमीयते तत् प्रमेयं ।**

म्हणजे, ज्याचें यथार्थज्ञान प्राप्त होतें तें प्रमेय होय. असें जें ब्रह्म तें आहे कशावरून? अशी जी शंका करणें, त्याला **कुतर्क** असें म्हणतात. नाना साधनांनीं जें कोणासहि प्राप्त होत नाहीं, तें अनायासानें आपणांस प्राप्त कसें होईल? ह्या कुतर्कांनीं साक्षात्कार कधींहि घडत नाहीं. कारण जेथें खरोखर साक्षात्कार होतो तेथें असंभावनांची भेट कशी होईल? हें विघ्न मोडून टाकण्याचें साधन म्हणजे युक्तींवरून रात्रंदिवस अनुचिंतन करावें हेंच होय. सूक्ष्म दृष्टीनें युक्तींचा अवलंब केला असतां पूर्णावस्थेची भेट होते. तेणेंकरून स्वस्वरूपाचें विज्ञान होऊं लागतें, आणि ब्रह्माची व आपली एकरूपता आहे असा अनुभव येऊं लागतो. ब्रह्म जें म्हणतात तें मीच होय, असा अनुभव येतो, व ह्याशिवाय इतर अनुभव व्यर्थ होत असें वाटूं लागतें. असा दृढनिश्चय झाल्यानंतर मग एकच विघ्न उरलें तें ( ४ ) विपर्ययाग्रह होय.

चवथें विघ्न जो विपर्ययाग्रह त्याविषयीं आतां विचार करावयाचा. विपर्ययाग्रह टाळण्याकरितां निदिध्यासनाचा पूर्ण अभ्यास करणें अवश्य आहे. देहादि प्रपंचाचा सर्वथा भास होणें हें विपर्ययाग्रहाचें मुख्य लक्षण होय. देह हाच आत्मा होय, पुत्रवित्तादिक सर्व माझीं आहेत, अशा प्रकारची प्रपंचाची स्फूर्ति होऊं लागली, म्हणजे चित्त सर्वदा प्रपंचाकार बनतें व मग आत्मसाक्षात्कार घडणें अशक्य होतें. याकरितां निदिध्यासनाचा अवलंब करावा,

विपरीताचा त्याग करून स्वस्वरूपामध्यें अंतःकरण एकनिष्ठपणें लीन करणें हें निदिध्यासनाचें लक्षण होय. अशा प्रकारचें निदिध्यासन केलें असतां विपरीतभावना निःशेष नष्ट होते आणि स्वस्वरूप प्रकट होऊन आत्मसाक्षात्कार होऊं लागतो.

जो सर्वदा निदिध्यासन करितो, तो ज्ञानाच्या तिसऱ्या भूमिकेप्रत पावला, असें समजावें. असा पुरुष आपला काळ कसा घालवितो व त्याचें आचरण कसें असतें हें समजणें अत्यंत इष्ट आहे. अशा पुरुषास साधुसमागम व सच्छास्त्र याशिवाय कशांतहि गोडी वाटत नाहीं. वानप्रस्थ व तापसी यांचे जे आश्रम, त्यांमध्यें तपश्चर्यादि करून जे विश्राम पावले व परब्रह्मांत जे निमग्न झाले त्यांस आध्यात्मनिष्ठ ब्रह्मवेत्ते म्हणतात. अशा साधूंचा समागम करून त्यांच्या मुखानें अध्यात्मशास्त्राचें श्रवण करणें हें निदिध्यासन होय. त्याप्रमाणेंच अध्यात्मशास्त्राच्या सिद्धांतांचें स्वतः विवरण करणें हेंहि निदिध्यासन होय. ज्याच्या योगानें संसाराची निःशेष निवृत्ति होते व ज्यांत वैराग्याचें उपपादन केलेले असतें, तें **अध्यात्मशास्त्र** होय. त्याच्या अभ्यासानें संसाराविषयीं विरक्ति उत्पन्न होते; इंद्रियें विषयांपासून पराङ्मुख होतात व शेवटीं ब्रह्मरूपता प्राप्त होते. म्हणून ह्या शास्त्राच्या अभ्यासानें साधुपुरुष कालक्षेप करितात. साधुपुरुषास अरण्यवास फारच आवडतो. वन पाहिल्याबरोबर त्याच्या मनास संतोष वाटतो. वनविहार केला असतां स्वभावेंकरून चित्ताची शान्ति होते.

तनुमानसा ही भूमिका ज्ञानाची व विवेकाची सीमा

होय, असें म्हटलें तरी चालेल. या अवस्थेमध्यें असंगपण पूर्ण बाणलें असतें. असंगपण दोन प्रकारचें आहेः—एक सामान्य व दुसरें श्रेष्ठ. सामान्य असंगपण ज्या पुरुषांत असतें तो असा विचार करितो कीं, मी कर्ता नसून क्रियाविरहित आहे, कारण क्रिया व कर्तेपण हीं अहंकारापासूनच निष्पन्न होतात. ज्याचा अहंकार गळून गेला आहे, त्याला कर्तव्यतेचा बाध कसा होईल! भगवद्गीतेंत पुढील वचन आहेः—

यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ॥
हत्वापि स इमाँल्लोकान् न हन्ति न निबध्यते ॥ १

—भगवद्गीता

याचा अर्थ असा आहे कीं, अहंकारावीण जें क्रियाचरण घडतें तें कधींहि कर्तेपण उत्पन्न करीत नाहीं. अहंकाराशिवाय पापपुण्याचा लेप घडत नाहीं. त्याप्रमाणेंच सामान्य असंगपण ज्या पुरुषामध्यें असतें, तो असें समजतो कीं, मी भोक्ता नसून भोगाविरहीत आहे. कारण भोग व भोक्तेपण हीं अहंकारापासूनच उत्पन्न होतात. अहंकारव्यतिरिक्त असणें हेंच ज्ञातृत्व समजावें. असा पुरुष नित्य तृप्त असल्यामुळें तो कोणत्याहि वस्तूविषयीं लंपट असत नाहीं. सामान्य असंगता जी म्हणतात ती हीच होय.

आतां श्रेष्ठ असंगपण कशास म्हणतात तें पाहूं. पूर्वोक्त अभ्यासाच्या योगानें खलसंगाचें वर्जन करून व साधुसंगाचा अवलंब केल्यानें आत्मविचारणेचा प्रयोग सिद्ध होतो आणि मुख्य वस्तु जें ब्रह्म तें करतलमलकवत् भासमान् होऊं लागतें. त्याची अशी बुद्धि होते कीं

प्राक्तनकर्म केवळ देहाच्या माथीं बसतें, व मी ब्रह्मस्वरूप असून कर्माचा भोक्ता कधींहि होणार नाहीं. अशा रीतीनें ब्रह्मस्वरूपांत निमग्न राहून शांतवृत्तीनें असणें हेंच **श्रेष्ठ असंगपण** होय; व त्यासच **स्वरूपस्थिति** असें म्हणतात. तात्पर्य, प्रपंचाचा तिरस्कार करून स्वस्वरूपांत एकवृत्तीनें राहणें हेंच श्रेष्ठ असंगपण जाणावें.

ह्या दोन्ही प्रकारच्या असंगतेनें जो युक्त पुरुष राहतो तो ज्ञानाच्या तिसऱ्या भूमिकेस योग्य होतो. अशा पुरुषाचें चित्त शांत व निर्विकार असतें. असा पुरुष संतोषाची केवळ मूर्तिच होय. तो कशाचीहि अपेक्षा करीत नाहीं. तो केवळ ज्ञानाचा कल्पवृक्षच होय. तो वैराग्यपुष्पांनीं ओथंबलेला असून ज्ञानरूप फळांनीं शोभायमान् असतो. एथवर तनुमानसा या अवस्थेप्रत पोहोंचलेल्या साधूचें वर्णन झालें. आतां चवथी ज्ञानभूमिका जी सत्त्वापत्ति, तिच्या निरूपणास सुरवात करूं.

शुभेच्छा, विचारणा व तनुमानसा ह्या ज्ञानभूमिका जागृतिस्थानीं मानितात, आणि चवथी जी सत्त्वापत्ति तीस अध्यात्मशास्त्रामध्यें स्वप्न असें समजतात. शिवाय पहिल्या तीन अवस्था साधनकोटींतच मोडतात, कारण पुढील अवस्थांमध्यें साध्यदशा प्राप्त होते. सत्त्वापत्तीचें लक्षण पुढील वचनांत सांगितलें आहे:—

तृतीयभूमिकाभ्यासाच्चित्तेर्थविरतेर्वशात् ।।
सत्त्वात्मनि स्थिते शुद्धे सत्त्वात्पत्तिरुदाहृता ।। १

**—योगवासिष्ठ**

**याचा अर्थ असा कीं, तृतीय भूमिकेच्या अभ्यासानें अनात्म म्हणून जितके पदार्थ आहेत, त्या सर्वांविषयीं**

चित्त उदासीन होतें, आणि विषयांपासून चित्त विमुख झालें असतां, तें आपोआप प्रसन्न होतें. चित्त प्रसन्न झालें असतां परब्रह्माचे ठायीं लीन होतें. मनाला विषयांचा एकदां वीट आला म्हणजे तें एकाग्र होत होत अकस्मात् अज्ञान नाहींसें होतें. नंतर मनाचें वस्तुग्राहकपण नष्ट होतें; म्हणजे बाह्य वस्तूंचें परिज्ञानच मनाला घडत नाहीं आणि वृत्तिसहित मन लीन होऊन स्वसंवेद्य असा पूर्ण अनुभव येऊं लागतो. सत्त्व शब्दानें उपलक्षित जें परब्रह्म, तेथें मन विश्रांतीप्रत पावतें. म्हणून या अवस्थेस **सत्वापत्ति** अशी संज्ञा दिली आहे.

ह्या चवथ्या भूमिकेचा जे अनुभव घेतात, त्यांचीं अंतर्बाह्य चिन्हें कशीं असतात हें पुढील वचनांवरून स्पष्ट होईल:—

सम्यग्ज्ञानोदये चित्ते पूर्णचंद्रोदयोपमे ॥
निर्विभागमनाद्यंते योगिनो युक्तचेतसः ॥ १
समं सर्वं प्रपश्यंति चतुर्थीं भूमिकां गताः ॥
अद्वैते स्थैर्यमायाते द्वैते च प्रशमं गते ॥
पश्यन्ति स्वप्नवल्लोकं चतुर्थीं भूमिकामिताः ॥ १

**—योगवासिष्ठ**

याचा अर्थ असा कीं, असंदिग्ध ज्ञान झालें असतां आणि असंभावना गेल्या असतां पूर्णचंद्राप्रमाणें चित्त प्रसन्न होतें. निर्विभाग व आदिमध्यांतविहीन स्वयंजोतीमध्यें रममाण होणारे योगी बाह्य जगतांतील सर्व वस्तु समदृष्टीनें पाहतात. अद्वैतस्थिति स्थिर होऊन द्वैत निःशेष लयास जातें. असें झालें असतां सर्व जगतांतील व्यापार स्वप्नाप्रमाणें भासतात. सत्त्वापत्ति ही ज्ञानाची मुख्य भूमिका

होय. पांचवीपासून सातवीपर्यंत अवस्थांमध्यें निर्विकल्पाचा अभ्यास होतो, व या तिन्ही अवस्था सुषुप्तिप्रमाणेंच समजाव्या. कारण यांमध्यें विश्वाचें भान मुळींच होत नाहीं.

असंसक्ति ही पांचवी ज्ञानभूमिका होय. पूर्वी सांगितलेल्या चार अवस्थांच्या दृढ अभ्यासानें योगी या अवस्थेमध्यें सूक्ष्म ब्रह्मानंद भोगतो, व कोणत्याहि प्रकारच्या फलाची त्यास आशा रहात नाहीं. कशाचाहि संसर्ग नसणें हींच **असंसक्ति** होय. या अवस्थेचें लक्षण येणेंप्रमाणें आहे:—

गलितद्वैतनिर्भासो मुदितोऽतः प्रतापवान् ॥
सुषुप्तघन एवास्ते पंचमी भूमिकां गतः ॥ १
अंतर्मुखतया तिष्ठन् बहिर्वृत्तिपरोऽपि सन् ॥
परिश्रांततया नित्यं निद्रालुरिव लक्ष्यते ॥ २

—योगवासिष्ठ

याचा अर्थ असा कीं—द्वैतमात्राची स्फूर्ति न होतां केवळ अद्वैतस्थिति बाणली जाते. मग योगी अंतर्यामीं स्वानुभवेंकरून डुलत असतो, आणि सुषुप्तिप्रमाणें ब्रह्मानंदसागरांत लीन होतो. बाह्यात्कारीं मात्र तो घेणें देणें इत्यादि लौकिक व्यवहारांत गुंतलेला दिसतो, परंतु त्याचीं इंद्रियें अंतर्मुख असल्यानें परमशान्तीचा अनुभव घेत असतो. ज्याप्रमाणें एकादा मनुष्य निद्राभरानें व्याप्त असतां मुद्दाम त्यास जागा करून त्याच्याकडून काम करून घ्यावें, तद्वत् योग्याची या अवस्थेंत स्थिति बनते. बाहेरून सर्व लोकांला तो जागृत आहे असा भास होतो, पण खरोखर इंद्रियवृत्ति विषयांपासून परतल्यामुळें त्या अंतर्मुख होऊन तो अंतरीं केवळ सुखरूप हो-

ऊन जातो. म्हणून तो जगतांत निद्राग्रस्त पुरुषाप्रमाणें दिसतो.

या अवस्थेमध्यें सकल वस्तूंचा निरास करून केवळ सत्तामात्र निरंजन जें उरतें, तद्रूप योगी होऊन प्रपंचाचें भान त्याला मुळींच होत नाहीं. सुषुप्तिप्रमाणेंच स्वस्वरूपामध्यें योगी लीन होतो, आणि पशु, पक्षी, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, इत्यादि जे विशेष त्यांचें ज्ञान नष्ट होतें. फार सांगणें कशास पाहिजे? या अवस्थेंत स्त्रीपुरुषभेदज्ञान सुद्धां रहात नाहीं. मुक्ताबाईविषयीं अशीच एक आख्यायिका प्रसिद्ध आहे. एकदां मुक्ताबाई नग्न स्थितींत नाहात होती, व तेवेळीं चांगदेव तिच्या भेटीस आले होते; परंतु मुक्ताबाई नग्न पाहून चांगदेव परतले; तेव्हां त्यांस परत बोलावून तिनें त्यांची निर्भर्त्सना केली. ती म्हणाली कीं, स्त्रीपुंभाव जर विसरला नाहीं, तर ब्रह्मज्ञान कोठून होईल? स्त्रीपुंभाव फक्त नामरूपावर अवलंबून असतो. नामरूप विसरून गेल्यावर स्त्रीपुंभाव कोठचा? तेव्हां अशा रीतीनें बाणलेल्या स्थितीस असंसक्ति असें म्हणतात.

आतां ज्ञानाच्या सहाव्या भूमिकेचें वर्णन सुरू करावयाचें. ह्या भूमिकेस **पदार्थाभाविनी** असें म्हणतात. पूर्वीं सांगितलेल्या पांच भूमिकांच्या अभ्यासानें, योगी स्वस्वरूपामध्यें रममाण होत होत त्याची स्थिति अशी बनते कीं, त्याला कोणत्याहि पदार्थाचें भानच राहत नाहीं. म्हणून या भूमिकेस पदार्थाभाविनी असें म्हणतात. मन, बुद्धि, अहंकार, काम, क्रोध, मद, मत्सर, दंभ, लोभ, इत्यादि उर्मि त्याच्या अंतःकरणास स्पर्श करूं शकत

नाहींत. त्याप्रमाणेंच बाह्य घटपटादि समस्त पदार्थ—यां-पैकीं कशाचेंहि त्यास स्मरण होत नाहीं. ह्या भूमिकेस प्राप्त झालेला योगी ब्रह्मानंदांत डुलत असतो. अशा यो-ग्याची स्वरूपस्थिति नुसती कानांनीं ऐकली असतां चि-त्तास फार चमत्कार वाटेल. ह्या स्थितीचें वर्णन पुढील वचनांत केलेलें आहे:—

यत्र नासन्नसद्रूपो नाहं नाप्यनहंकृतिः ॥
केवलं क्षीणमनन आस्तेऽद्वैतैक्यमागतः ॥ १
निर्ग्रंथिः शांतसंदेहो जीवन्मुक्तो विभावनः ॥
अनिर्वाणोऽपि निर्वाणश्चित्रदीप इव स्थितः ॥ २
अंतः शून्यो बहिः शून्यः शून्यः कुंभ इवांबरे ॥
अंतः पूर्णो बहिः पूर्णः पूर्णः कुंभ इवार्णवे ॥ ३

—योगवासिष्ठ

याचा अर्थ असा:—ज्ञानाच्या सहाव्या भूमिकेप्रत पा-वलेला जो योगी, त्याचें लक्षण असें असतें कीं, तो अ-सद्रूप नसून सद्रूपहि नसतो. म्हणजे अशा प्रकारचा यो-गी सर्व प्रकारचे प्रापंचिक व्यवहार करितांना दिसतो, तेव्हां त्यास असद्रूप कसें म्हणावें ? तसेंच तो अंतरीं सर्वदा निर्वासन असल्यामुळें त्या व्यवहारापासून त्याचें चित्त अलिप्त असतें म्हणून तो सद्रूपहि नसतो, असें म्हणावें लागतें. बाह्य रीतीनें जरी तो देहवान् दिसतो तथापि विदेही अवस्थेप्रत तो पोहोंचला असल्यामुळें अहंभाव त्या-चेठायीं मुळींच दिसत नाहीं; तसेंच देहेंद्रियांचा प्रवर्तक असल्यामुळें त्याला अहंकारशून्य असेंहि म्हणतां येत नाहीं. तर तो कोणत्या अवस्थेमध्यें असतो ? ह्या प्रश्ना-चें उत्तर असें कीं, संकल्पविकल्पातीत होऊन त्याचें

मन परमात्म्यामध्यें लीन झालेलें असतें आणि अद्वैत-स्थितीशीं त्याचें पूर्ण समरसत्व होऊन गेलेलें असतें. अशा साधूची चिदाचिद्ग्रंथि तुटून गेलेली असते, म्हणजे चित् व अचित् या दोहोंचा भेदभाव त्यास पूर्ण समजलेला असतो, व अहंकार नष्ट झाल्यामुळें सर्व प्रकारच्या शंकांपासून तो निवृत्त झालेला असतो. तसेंच तो निर्वासन झाल्यामुळें विश्वाची कल्पनाहि त्याला भासत नाहीं. अशा प्रकारचा जो योगी, तोच खरा जीवन्मुक्त समजावा. त्याची अहंबुद्धि नष्ट झालेली असते; तो सर्वदा निर्वासन राहतो, म्हणून देहवान् असूनहि तो मुक्तच समजला पाहिजे. ह्यास उत्कृष्ट दृष्टांत म्हटला म्हणजे चित्रांतील दीपकलेचा होय. चित्रांतील दीपकला इतर दिव्याप्रमाणें सर्व लोकांना भासते तथापि ती दीपकला सर्वदा निश्चल असते; त्याप्रमाणें असा योगी देहेंद्रियांनीं जरी व्यवहार करितांना दिसतो, तरी अंतर्यामीं तो स्वस्वरूपांत स्थिर असतो. अशा प्रकारच्या जीवन्मुक्त पुरुषामध्यें कर्तृत्वभोक्तृत्वादि क्रिया संसारी लोक जरी पाहतात, तरी हा त्यांचा केवळ भ्रम होय. चंद्र अभ्राच्छादित असतांना अभ्रांच्या गतीनें चंद्रासहि गति प्राप्त झालेली आहे अशी लहान मुलांची समजूत असते. तद्वत् जीवन्मुक्ताच्या माथीं कर्तृत्वभोक्तृत्वादि संबंध प्रापंचिक लोक लादितात. जीवन्मुक्त पुरुषाच्या अंतर्यामीं वासनादि प्रपंच मुळींच नसतो आणि बाह्य रीतीनेंहि त्याला देहादिकांचें भान नसतें. म्हणून आकाशांत ठेविलेल्या रित्या घटाप्रमाणें तो अंतर्बाह्य शून्य असतो. तसेंच अंतर्यामीं त्याचें चित्त परब्रह्मांत गुंतलेलें असतें व सर्व बाह्य

वस्तूंमध्यें त्यास ब्रह्मच बाणलेलें असतें, म्हणून समुद्रांत ठेविलेल्या घटाप्रमाणें तो अंतर्बाह्य परिपूर्ण असतो. अशा प्रकारची स्वरूपस्थिति ज्या पुरुषास प्राप्त झालेली असते, तो ज्ञानाच्या सहाव्या भूमिकेंत स्थिर झाला असें समजावें.

आतां सातवी भूमिका जीस 'तुर्यगा' असें म्हणतात तिचें वर्णन करावयाचें. पदार्थाभाविनी या अवस्थेमध्यें स्थैर्य पूर्णपणें प्राप्त झालें असतां तुर्या ही भूमिका हस्तगत होते. **तुर्यावस्था** अशा प्रकारची आहे कीं, तिजमध्यें कोणत्याहि प्रकारचें कर्तव्य उरत नाहीं. ह्या अवस्थेंत योगी अखंड स्वरूपानंदांत खेळत असतो, त्यास द्वैताचा स्पर्श हि होत नाहीं, व दुसऱ्यानें कितीहि जागा करण्याचा प्रयत्न केला तरी तो जागा होत नाहीं. अशा अवस्थेचा अगदीं व्यावहारिक दृष्टांत म्हटला म्हणजे श्रीमत् अक्कल-कोटकर स्वामींचा प्रसिद्ध आहे. ही अवस्था सुषुप्तिच समजावयाची. पांचवी व सहावी ह्या दोन भूमिका अर्धोन्मीलिका समजाव्या. चवथी ही स्वप्न होय. व पहिल्या तीन जागृतिस्थानीं समजाव्या.

तुर्यावस्था हीच विदेहमुक्ति होय. मृत्युलोकीं इति-कर्तव्यता म्हटली म्हणजे हीच होय. भूमातेचे केवळ अलंकार असे जे वामदेव, शुक, सनक, जडभरत, जनक, व्यास, वसिष्ठ इत्यादि, ते सर्व महर्षी ह्या अवस्थेप्रत पोहोंचलेले आहेत. तूर्य भूमिका ही अखंडस्व-रूपस्थितिच होय. सहजस्थिति म्हणतात ती हीच. या अवस्थेमध्यें भेदभाव मुळींच घडत नाहीं. चवथ्या व पांचव्या भूमिकांमध्यें जगाचा आभास कोणत्या तरी रूपानें प्रकट होतो, व त्या अवस्थांमध्ये कर्माकर्मे घडत असतात,

तुर्यावस्थेमध्यें योग्याच्या हातून जरी कर्में घडलीं किंवा न घडलीं तथापि स्वरूपस्थितीपासून त्याची च्युति क्षणभरहि घडत नाहीं. हातून कर्म घडो किंवा न घडो, त्यापासून योग्याला बाधा मुळींच होत नाहीं. कारण तो दोहोंच्याहि पलीकडे गेलेला असतो. देहसंगानें त्यास संग घडत नाहीं व कर्म करून त्याचें फल त्यास चिकटत नाहीं. तसेंच कर्म केलें नाहीं, म्हणून देखील त्याला दोष लागत नाहीं.

देह जोंपर्यंत आहे तोंपर्यंतच जीवन्मुक्तीची प्राप्ति होते. देह पडल्यावर विदेहमुक्ति प्राप्त होते. या दोहोंमध्यें जीवन्मुक्ति हीच श्रेष्ठ मानिली जाते. कारण देहसंग असतांहि विदेही अवस्थेचा अनुभव असणें, हें अधिक पूर्णत्वाचें लक्षण होय. जीवन्मुक्त झालेल्या पुरुषास देहत्यागापासून अधिक काय मिळणार आहे? किंवा देह असूनहि त्याचें ब्रह्मत्व जाईल काय? किंवा त्याचें उणें काय पडेल? म्हणून जीवन्मुक्त पुरुष विदेहावस्थेची आशा करीत बसतच नाहीं. देह असला म्हणून कर्माकर्मांची बाधा त्याला होतच नाहीं; कारण अपरोक्ष साक्षात्कार झाल्याबरोबर तो निर्विकार ब्रह्मरूप झालेला असतो. ह्याविषयीं पुढील वचन लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

अद्यैव मरणं वाऽस्तु कल्पकोटिलयेऽथवा ॥
तज्ज्ञः कलंकं नाप्नोति हेम पंकगतं यथा ॥ १

**—योगवासिष्ठ**

याचा अर्थ असा कीं:—जीवन्मुक्ताच्या देहाला आतांच क्षण न लागतां मरण येवो किंवा कोटिकल्पांच्या अंतीं येवो; तरी त्याला कांहीं त्यापासून लाभ किंवा हानि हो-

णार नाही. कारण तो ब्रह्मस्वरूप बनलेला असतो. देह चिरकाल राहिला असतां पाप लागेल, किंवा कर्तेपण अंगीं येईल, अथवा लवकर मरण आलें असतां पाप लागणार नाहीं किंवा कर्तेपण अंगीं येणार नाहीं अशांतली गोष्ट मुळींच नाहीं.

ज्ञानाच्या सातव्या भूमिकेप्रत पावलेला योगी देहधारी असूनहि खरोखर विदेही असतो, असें विवरण झालें. देहरूपानें जरी तो प्रपंचांत वागतो व अनेक कर्मे करितो, तरी तो असंग राहतो, व साक्षीरूपानें सर्व व्यवहाराचा अनुभव घेतो. ह्या स्थितीस उत्कृष्ट दृष्टांत म्हटला म्हणजे शुद्ध सुवर्णाचा होय. शुद्ध सोनें चिखलांत पडलें म्हणून त्याला मळ लागत नाहीं किंवा त्याचा रंगहि बदलत नाहीं. चिखलांतून बाहेर काढल्यानंतर तेंच सोनें जरी कसोटीला लावून पाहिलें तरी तें कसास कमी होत नाहीं, कारण तें सर्वस्वी शुद्ध असतें. जीवन्मुक्ताच्या स्थितीस आणखी दृष्टांत म्हटले म्हणजे कमल व गगन हे होत. पद्मपत्र जलामध्यें असूनहि सदा अलिप्त असतें व आकाश धुरानें कितीहि व्याप्त झालें तरी तें मळत नाहीं. तद्वत् जीवन्मुक्त पुरुषाचा देह असो वा नसो तो देहातीतच होऊन गेलेला असतो, व याचें मुख्य बीज असें असतें कीं, स्वरूपस्थितीच्या अनुभवांत तो सर्वदा गुंतलेला असतो.

"तज्ज्ञः कलंकं नाप्नोति"

या वचनामध्यें तत् शब्देंकरून पूर्णब्रह्माचा बोध होतो व त्या ब्रह्माचा अनुभव घेणारा जो तो तज्ज्ञ समजावा. असा जो ब्रह्मज्ञ पुरुष त्याला देहाच्या संगती-

नें क्षणभरहि कलंक लागत नाहीं. ह्यास उत्कृष्ट दृष्टांत म्हटला म्हणजे घटाचा होय. घटामध्यें शुद्ध गंगोदक भरलें म्हणून तो पवित्र होत नाहीं किंवा त्यांत मद्य घातलें म्हणून तो विटाळत नाहीं. त्यांत तांदूळ घातले म्हणून बुजून जात नाहीं. घटामध्यें तूप घातलें म्हणून त्यास सोज्वळपणा येत नाहीं, त्यांत दूध घातलें म्हणून तो पुष्ट होत नाहीं, अग्नींत घातला म्हणून जळत नाहीं, किंवा चंदनानें चर्चिला म्हणून थंड होत नाहीं. त्याप्रमाणेंच जीवन्मुक्ताच्या देहाच्या हातून सत्कर्म घडो किंवा प्रपंचसंग वाढो; त्याचा देह तीर्थामध्यें पडो किंवा चांडाळाच्या घरांत पडो, अथवा मनकर्णिकेमध्यें बुडो. जीवन्मुक्ताला कशाचीहि पर्वा नसते. हें पुढील वचनावरून स्पष्ट होईल.

तनुं त्यजतु वा काश्यां श्वपचस्य गृहेथवा ॥
ज्ञानसंप्राप्तिसमये मुक्तोऽसौ विगताशयः ॥ १

—योगवासिष्ठ

याचा अर्थ जसा कीं—जीवन्मुक्त पुरुष स्वप्रकाश व अद्वैतानंद या स्थितीचा पूर्ण अनुभव घेत असतो, तेव्हां देहधारणामुळें त्याला दोष कसा लागेल ? तो देहातीत असून केवळ साक्षीपणानें राहतो. मग त्यास कोणत्या कारणानें बाधा होईल बरें ? त्याचा देह काशीमध्यें पडो किंवा चांडाळाच्या घरांत पडो, त्याला कांहींएक बाधा होत नाहीं. कारण तो सर्व प्रकारें मुक्तच असतो. सत्संगतीनें त्याला मोठेपणा येत नाहीं किंवा असत्संगतीनें त्याची कांहींएक हानि होत नाहीं. उघडच आहे कीं, प्रेताला पुष्पमालेचा किंवा चंदनाचा वगैरे सोहळा केला, अलंकारांनीं लेवविला, किंवा तें प्रेत चंदनाच्या लांकडां-

मध्यें जाळिलें किंवा नासक्या कुजक्या लांकडांमध्यें दहन केलें तथापि त्या प्रेताला त्यापासून काय लाभ होणार आहे बरें ? त्याप्रमाणें आत्म्याला देहसंबंध घडला एवढ्यानेंच कोणत्याहि पदार्थाची संगति होत नाहीं. किंवा शुभाशुभाची प्राप्ति होत नाहीं. अशा प्रकारची शुभाशुभाची प्राप्ति देह हाच आत्मा असें समजणाऱ्या पुरुषासच होईल. जीवन्मुक्तास यांपैकीं कांहीं एक होत नाहीं.

जीवन्मुक्त पुरुषाला ज्या समयीं ज्ञानप्राप्ति झाली, त्याच समयीं तो सर्व प्रकारानें मुक्त होऊन जातो. त्याच्या वासनेची शांति होते, त्याच्या मनाचा लय होऊन तें मनपणावर कांहीं केल्या येतच नाहीं. ज्ञानप्राप्ति झाल्याबरोबर जीवन्मुक्ताचे आशापाश तुटून जातात आणि सूर्याप्रमाणें त्याचे ठायीं अंतर्बाह्य तेजस्विता उत्पन्न होते. जीवनमुक्त पुरुषाला मन असून तो मनहीन होतो, त्याला कान असून तो श्रवणहीन होतो. त्याला नेत्र असून तो नयनहीन होतो, व त्याला चरण असून तो चरणहीन असतो. ज्ञानप्राप्ति झाल्याबरोबर सर्व वस्तु असूनहि त्या नाहींतशा होतात, कर्तेपण असूनहि कर्तृत्वसंबंध आंगीं जडत नाहीं. साक्षिस्थितीचा अनुभव येऊं लागल्यानें त्यास कशाचाहि संग होत नाहीं. याकरितां ज्ञानप्राप्ति झाल्याबरोबरच योगी मुक्त होऊन जातो, मग त्यास पापभूमि किंवा पुण्यक्षेत्र ह्याचें ज्ञान होत नाहीं.

आत्मानं सर्व भूतेषु । सर्व भूतानि चात्मनि ॥

या गीताशास्त्रांतील वचनाप्रमाणें जीवन्मुक्त पुरुष सर्व ठिकाणीं आपणच आहों व सर्व वस्तु आपल्या ठिकाणीं भरल्या आहेत असें मानितो. तेव्हां उत्तम, मध्यम, क-

निष्ट असा भाग त्याला उरतच नाहीं. जीवन्मुक्त पुरुषाला सर्व देश, सर्व काल, आत्मरूपानेंच दिसतात; म्हणून त्याला काल अकाल कांहींच नाहीं. तीर्थ अतीर्थ असेंहि काहीं नाहीं. कारण तो आपणास सर्व वस्तूंनीं पूर्ण समजतो व सर्व वस्तु आत्मपरिपूर्ण अशा मानितो. यास उत्कृष्ट दृष्टांत म्हटला म्हणजे घटाकाशाचा होय. घट सुमुहूर्तीं फुटला म्हणजेच तदंतर्गत आकाश महदाकाशामध्यें मिळून जातें, व अकालीं घट फुटला तर घटाकाश मध्येंच कोठें चुकून राहतें अशी गोष्ट कधींहि संभवत नाहीं. आकाश घटामध्यें असो किंवा बाहेर असो तें आकाशच होय; व घटाकाश घटाचा भंग झाला तरच आकाश राहतें, एरव्हीं तें आकाश नसतेंच अशीहि गोष्ट संभवत नाहीं. त्याप्रमाणेंच जीवन्मुक्त पुरुष देहधारी असतांच ब्रह्मरूपी असतो, तर मग देहान्त झाल्यानंतर तो कांहीं निराळा बनणार आहे काय? देहामध्यें असतां किंवा विदेहस्थितीमध्यें असतां जीवन्मुक्ताचें एकच स्वरूप राहतें. तें निराळें कसें होईल? अशा प्रकारचा योगी देह असतांच ब्रह्म झाला, मग देहसंबंधानें त्याच्यांत काय फरक होणार आहे? वरील वाक्यांत 'झाला' हा शब्द केवळ औपचारिक आहे असें समजावें, कारण तो जर स्वतःसिद्ध ब्रह्म तर त्याला झालेपण कसें संभवेल? ह्याविषयीं पुढील श्रुतिवचन फारच महत्त्वाचें आहेः—

ब्रह्मेव सन्ब्रह्माप्येति । विमुक्तः सन् विमुच्यते ॥

ह्या श्रुतीचा अर्थ असा आहे कीं—अगोदरच ब्रह्मरूपी असून नंतर ब्रह्म होतो; अगोदरच मुक्त असून,

नंतर मुक्त होतो. तेव्हां 'झाला' हा शब्द केवळ औपचारिक आहे हें उघडच आहे. कारण ब्रह्म जसें तसेंच असतें, त्याचे ठायीं विचार भासत नाहीं, त्याचे ठायीं क्रियाफल मुळींच नसतें. यावरून पाहतां जीवन्मुक्ताची ब्रह्मस्थिति सिद्धच आहे; त्याचा देह असो किंवा नसो मग 'झालेपण' जें उत्पन्न होतें, तें अज्ञानाचें व्यवधान नष्ट झाल्यामुळेंच संभवतें. देह तीर्थीं पडला असतां स्वार्थ होतो व अतीर्थीं पडला असतां अनर्थ होतो अशा प्रकारचे अर्थानर्थ देह हाच आत्मा अशा अज्ञानामुळें उत्पन्न होतात. देहातीत जो पुरुष असतो, त्याला हें कोणत्याहि प्रकारें लागू होत नाहीं. जीवन्मुक्त पुरुष देहाच्या ठिकाणीं विरक्त असतो व देहाचा तो केवळ साक्षी असतो. अशा प्रकारच्या पुरुषाचें लक्षण पुढील श्लोकांत सांगितलें आहे.

गोष्पदं पृथिवी मेरुः स्थाणुराकशमुद्रिका ॥
तृणं त्रिभुवनं राम नैराश्यालंकृताकृतेः ॥ १

**—योगवासिष्ठ**

याचा अर्थ असा कीं—सर्व विषयांविषयीं वैराग्यरूपी अलंकार ज्यानें धारण केला आहे, तो सर्व पृथ्वीला गोष्पदाप्रमाणें आणि मेरूला स्तंभाप्रमाणें मानितो, सर्व दिशांची पेटी करून त्यावर आकाशरूपी मोहोर केलेली आहे असें मानितो. मग तद्विषयीं आशेची तळमळ त्याला मुळींच लागत नाहीं. जीवन्मुक्ताचें आणखीहि लक्षण पुढील वचनांत वर्णिलें आहे:—

ईप्सितानीप्सिते न स्तो यस्यांतर्वस्तुदृष्टिषु
चरेत्सुषुप्तइव यः स मुक्त इति कथ्यते ॥ १

**—योगवासिष्ठ**

ह्याचा अर्थ असा कीं--सर्व जगांतील लोक केवळ बाह्यदृष्टि असतात, परंतु योगी अंतर्दृष्टि असतो. तो आत्मविलासामध्यें निमग्न असल्यामुळें इष्ट किंवा अनिष्ट अशा प्रकारचें त्याला कांहीं दिसत नाहीं. एकादी वस्तु आपणाहून भिन्न आहे अशी जर समजूत झाली, तरच ती इष्ट वाटते व अशा इष्ट वस्तूहून निराळी अशी दुसरी वस्तु भासूं लागली तरच ती अनिष्ट अशी वाटूं लागते, व तद्विषयीं द्वेषबुद्धि उत्पन्न होते. परंतु जीवन्मुक्ताला कोणत्याहि प्रकारचें इष्ट किंवा अनिष्ट रहात नाहीं. कारण आत्मलाभाशिवाय दुसरा कोणताहि लाभ तो समजतच नाहीं. अर्थात् जो निरतिशय सुखसंपन्न झाला, तो इतर सुखाची आशा कशाला करील बरें? तसेंच देहबुद्धीवर जर मनुष्य येईल तरच त्यास दुःखाचा अनुभव येईल व अमुक गोष्ट अनिष्ट आहे असें त्याला वाटूं लागेल. परंतु निरंतर सुखामध्यें जो निमग्न असतो, त्याला अशा प्रकारचें अनिष्ट कांहींच उरत नाहीं. आत्मसुखाहून जर कांहीं वस्तु थोर असेल तरच तिच्या लाभाची इच्छा करावी, व दुःख अनिष्ट वाटेल तरच त्याचा त्याग करावा हें संभवतें. परमलाभ जो 'आत्मलाभ' तो झाल्यावर मग ईप्सित किंवा अनीप्सित कांहीं रहात नाहीं. जीवन्मुक्त पुरुष सदा इच्छाविरहित असल्यामुळें त्याची वागणूक निजलेल्या मनुष्याप्रमाणें असते. इच्छा व अनिच्छा नाहींशा झाल्यानंतर कोणतीहि क्रिया उरतच नाहीं, व अशा रीतीनें अकर्तृत्व आंगीं बाणलें असतां योगी मुक्तच होऊन जातो. 'चिदचित्' ग्रंथि म्हणून पूर्वीं सांगितलेली आहे, ती तुटून गेली अ-

मतां व सर्व संदेह नष्ट झाले असतां जी स्थिति प्राप्त होते, ती जीवन्मुक्ताची होय. अज्ञानामुळें मनुष्य मनो-बुद्धींचा व्यापार आपल्याच शिरावर घेतो व त्यामुळें सुखदुःखादि प्रकार अनुभवास येतात. मन हें वास्तविक पाहतां जड आहे. असें असून मनाचा जडपणा आप-ल्यावर येऊं पाहतो, मग अर्थात् आत्मप्रकाश मनावर येतो, व अशा रीतीनें चित् व अचित् यांची ग्रंथि पडून जाते. ही ग्रंथि ज्ञानानें नष्ट झाली म्हणजे आत्मज्ञान होण्यास उशीर लागत नाहीं. तसेंच साक्षित्वाचा अनुभव आल्यानंतर बुद्धि ही आपणाहून भिन्न आहे व बुद्धीला प्र-काश देणारा आत्मा आहे हेंहि ज्ञान प्राप्त होतें. तदनंतर

यत् श्रोत्रेण न शृणोति । येन श्रोत्रमिदं तं ।

—केनोपनिषद्

इत्यादि वाक्यांची संगति होऊं लागते. म्हणजे श्रोत्र इत्यादि इंद्रियांनीं आत्म्याचा बोध होत नाहीं, तर श्रोत्र इत्यादि इंद्रियें श्रवणादि व्यापार करण्यास जीं समर्थ हो-तात तीं आत्मप्रकाशामुळें होत. कर्णाला कोणत्याहि ध्व-नीचें श्रवण करण्याची जी योग्यता येते, ती केवळ आ-त्म्याचे प्रेरणेमुळें होय, ह्यांत संशय नाहीं. बुद्धीचीहि गोष्ट अशीच आहे, म्हणजे केवळ बुद्धिसामर्थ्यानें आत्म-ज्ञान होऊं शकत नाहीं, तर बुद्धीचे अंगीं जें ग्राहकत्व उ-त्पन्न होतें, तें आत्मस्फूर्तीमुळेंच होय. ही चिदचित् ग्रंथि तुटली म्हणजे बुद्ध्यादिकांहून स्वप्रकाश आत्मा कसा भिन्न असतो व सर्व वस्तूंचे साक्षी आपण कसे होतों, ह्याचा पूर्ण अनुभव येऊं लागतो. मग श्रुतिवचन किंवा सद्गु-रुवचन प्रमाणभूत आहे किंवा नाहीं अशा प्रकारचा सं-

शथ नष्ट होतो. जीवन्मुक्ताचें आणखी एक लक्षण पुढील वचनामध्यें दिलेलें आहे:—

अहंकारमयीं त्यक्त्वा वासनां लीलयैव यः ॥
तिष्ठति ध्येयसंत्यागी जीवन्मुक्तः स उच्यते ॥ १

—योगवासिष्ठ

याचा अर्थ असा कीं—अहंकारमय ज्या वासना त्या सहजगतीनें टाकून देऊन शेवटीं ध्याता, ध्येय व ध्यान ह्या त्रिपुटीचेंहि स्फुरण मग जीवन्मुक्तास होत नाहीं. कोणता जरी संकल्प झाला तरी तो अहंकारानें वेढलेला असतो. अहंकाराशिवाय कोणतीहि वासना उपजत नाहीं. स्वरूपाचा आश्रय करून राहणारें जें ज्ञान त्याचे ठिकाणीं अज्ञानामुळें ‘ अहं ’ अशी जी भावना होते तोच अहंकार समजावा. अहंकार हा सामान्य व विशेष ह्या भेदेंकरून दोन प्रकारचा आहे. मी ब्राह्मण, मी क्षत्रिय, मी वैश्य, मी शूद्र इत्यादि विशेष अहंकार समजावा. तसेंच मी पिता, अमुक पुत्र, मी गुरु, अमुक शिष्य अशा प्रकारचाहि अहंकार विशेष समजावा. सर्व देहामध्यें ‘ मी ’ अशा प्रकारचा जो अहंकार उत्पन्न होतो तो सामान्य समजावा.

अहंकारापासून संकल्प उत्पन्न होतात व संकल्पाचा धर्मच असा आहे कीं, अशुभ जे विषय ते शुभ करून दाखविले जातात; मग असे जे संकल्प ते पूर्ण व्हावे अशी इच्छा उत्पन्न होते, त्याच कामरूप वासना होत. ज्यांच्या योगानें संसाररूपी वृक्ष वाढत जातो ते संकल्प अहंकाराच्या पोटीं संस्काररूपानें शेवटीं राहतात, व वासनेप्रमाणेंच दुसऱ्या वेळीं उत्पन्न होतात. जे संकल्प दि-

वसा मनुष्य करितो तेच अहंकारामध्यें राहून स्वप्नामध्यें नजरेस येतात व त्याच वासना होत. जागें झाल्यानंतर अहंकार आपोआप बळावतो. आणि पूर्वकृत संस्काराच्या योगानें वासनेचीं फळें टवटवीत होतात. ह्याकरितां अहंकारानें वेढलेल्या अशा वासना प्रबल होतात. म्हणून अहंकारासहित ज्यानें वासना टाकून दिल्या, तो खरा जीवन्मुक्त होय. जीवन्मुक्तास अशा प्रकारच्या वासना टाकून देण्यास फारसे श्रम करावे लागत नाहींत. कारण अपरोक्ष साक्षात्कार झाला असल्यामुळें वासनारूप अभ्र सहजच विरून जातें, आणि ज्ञेय म्हणून जें तेंच केवळ उरतें. जीवन्मुक्तास ध्याता, ध्येय व ध्यान अशा रीतीची त्रिपुटी स्फुरत नाहीं. ध्येय पदार्थ अहंकार व ममकार यांनीं संपूर्ण असतो, म्हणून त्याचें अखंड चिंतन मनामध्यें चाललेलें असतें. अहंकाराच्या योगानें आपण देहविशिष्ट असून अमुक जातीचे व अमुक वर्णाचे आहों असें स्फुरण होतें. तसेंच ममकाराचे योगानें स्त्री, पुत्र इत्यादिकांचे भरणपोषणाविषयीं योजना मनांत होऊं लागते व धनाची प्राप्ति कशी होईल व त्याचें संरक्षण कसें होईल याचा विचार मनांत येऊं लागतो. तेव्हां अशा प्रकारचें जें अखिल ध्येय त्याचा त्याग जीवन्मुक्त पुरुष सहजच करितो.

सर्वसंगपरित्याग व स्वरूपस्थिति हीं श्रवणाचीं फळें होत. श्रवणाचे ठिकाणीं ज्या पुरुषाची आदरबुद्धि असते, तोच पुरुष मनन आणि निदिध्यासन करण्यास पात्र होतो. श्रवण या शब्दाचा अर्थ पुढील वचनांत स्पष्ट केला आहे:—

षड्विधलिंगैः सर्वेषां वेदान्तवाक्यानामद्वैते ब्रह्मणि तात्पर्यावधारणं श्रवणं ।

याचा अर्थ असा कीं—वेदान्तशास्त्रांत जितकीं वचनें सांगितलीं आहेत त्यांचा शेवट कशामध्यें होतो हा तात्पर्यार्थ समजून घेणें तेंच खरें श्रवण होय. प्रत्यक्ष, अनुमान इत्यादि सहा प्रकारच्या प्रमाणांनीं सर्व वेदान्तवाक्यांचें अद्वैतब्रह्मामध्यें तात्पर्यावधारण होतें. या ज्ञानास खरें श्रवण म्हणतात. अशा प्रकारचें श्रवण होण्यास एकाग्रता पाहिजे. ती एकाग्रता नसेल तर व्यर्थ कालक्षेप होऊन पुण्यप्राप्ति होणार नाहीं. पुण्यप्राप्ति जर झाली तरच श्रवणाला श्रवणपण येतें. जसें सांग यज्ञ सिद्ध झाला असतां यज्ञास यज्ञपणा येऊन पुण्यप्राप्तिहि होते, त्याप्रमाणेंच सर्व वेदान्तवाक्यांचें तात्पर्यावधारण समजलें असतां सफल सिद्धि होतात. याकरितां श्रवणाचे ठायीं आदरबुद्धि उत्पन्न होऊन एकाग्रता झाली पाहिजे. ही एकाग्रता जीवन्मुक्तास कशी व्हावी लागते, हें पुढील वचनांवरून लक्षांत येईलः—

दूरे मुंचति बंधुमधमिव यः संगाद्भुजंगादिव ।
त्रासं यो विदधाति वेत्ति सदृशं भोगंच रोगंच यः ॥
स्त्रैणे-यस्तृणवत् घृणां प्रकुरुते मित्रेष्वमित्रेष्वपि ।
स्वान्तं यस्य समं समंगलमिहामुत्रापि मर्त्योऽश्नुते ॥ १

**—योगवासिष्ठ**

याचा अर्थ असा कीं—जो पुरुष वैराग्यबलानें सकल बंधु, मित्र ह्यांचा त्याग करितो व पुत्र, वित्त, गृह, स्त्री यांचा संग केवल सर्पसंगाप्रमाणें मानितो, तो ह्या लोकीं व परलोकीं सुख पावतो. सर्प किंवा व्याघ्रादिक यां-

च्या केवल दर्शनानें जसा त्रास येतो, तसाच स्त्री, पुरुष, वित्त इत्यादिकांच्या संगतीचा त्रास जीवन्मुक्त पुरुष मानितो. तसेंच स्रक्चंदनादिक जितके भोग्य आहेत तितके रोग्याप्रमाणें, असा पुरुष समजतो. तो विषयभोगाकरितां उत्कंठा बाळगीत नाहीं. आणि यदाकदाचित् ते जरी प्राप्त झाले तरी ते काकविष्ठेप्रमाणें मानितो. जीवन्मुक्त पुरुष आत्मलाभानें नित्य संतुष्ट असतो, मग तो विषयभोगाकडे कशाला बरें लक्ष देईल? जो पुरुष अमृतपानानें तृप्त झाला तो कांजीचें सेवन कशाला करील? जो नित्य मिष्टान्न भक्षण करितो तो भाताचा कोंडा कशाला खाईल? त्याप्रमाणें जो परमानंदसमुद्रांत निमग्न असतो तो विषयभोगाची इच्छा कधींहि करणार नाहीं, हें उघडच आहे. साधनदशेमध्यें असतांहि मुमुक्षु विषयभोगाचा त्याग करितो, मग जो पूर्ण ज्ञानी झाला तो विषयभोगाचा कंटाळा करितो यांत कांहीं नवल नाहीं. तसेंच जीवन्मुक्त पुरुष मित्राविषयीं किंवा शत्रूविषयीं सारख्याच रीतीनें वागतो. त्याचे ठायीं आपपरभाव मुळींच असत नाहीं. सर्व वस्तु त्यास ब्रह्मरूपानें दिसूं लागतात. असें ज्याचें वर्तन व सर्वत्र सारखें अंतःकरण तो इहलोकीं व परलोकीं परमानंदाचा अनुभव घेतो यांत कांहीं नवल नाहीं. अशा तऱ्हेचे विचार झाल्यावर सदरीं वर्णन केलेली एकाग्रता प्राप्त होऊन श्रवणास श्रवणपण येतें. आणि मनन व निदिध्यासन यांचीं कार्यें योग्य रीतीनें घडतात.

आर्यतत्त्वज्ञानाचा शिरोभाग म्हटला म्हणजे जीवन्मुक्ति हाच होय; याच अवस्थेचें वर्णन विस्तृतपणें एथप-

र्यंत झालें. त्यावरून पाहतां भरतखंडांतील योगी लोक ज्ञानाच्या उच्च पायरीपर्यंत कसे पोहोंचले होते हें वाचकांच्या ध्यानांत येईलच. ऐहिकविषयक संपत्ति कितीहि प्राप्त झाली, तथापि शाश्वतसुख मिळण्याची आशा नाहीं, हें तत्त्व भारतीय आर्यलोकांना जितकें पूर्णपणें समजलें होतें तितकें कोणत्याहि परधर्मी लोकांना अवगत झालें नाहीं, असें म्हटलें असतां चालेल. विषयसुख टाकून देऊन आत्मसुखाकडे प्रवृत्ति व्हावी, हा आर्यतत्त्वज्ञानाचा मुख्य उद्देश होय. आत्मसुख म्हणजे देहेंद्रियांचें समाधान करणें नव्हें, हें तत्त्व पक्कें मनांत ठसल्याशिवाय आर्यधर्माची महती कळणें अशक्य आहे.

जीवन्मुक्त अवस्था हीच ज्ञानाची सातवी भूमिका होय. ह्या भुमिकेमध्यें ज्ञानी लोक परमानंदाचा अनुभव घेतात. वास्तविक पाहतां आनंद हें आत्म्याचें मुख्य स्वरूप होय. उपनिषदांमध्ये हें तत्त्व सुरेख रीतीनें प्रतिपादित केलेलें आहे. निर्विकल्प समाधि म्हणून जी म्हणतात तिचा अनुभव जविन्मुक्त पुरुष सर्वदा घेत असतात. जीवन्मुक्ताचें लक्षण पुढील वचनांत उत्कृष्ट दिलें आहे.

हृदयात्संपरित्यज्य सर्व दृश्यं प्रशांतधीः ॥
व्योमसौम्यतरो व्यग्रः स मुक्तः परमेश्वरः ॥ १

—योगवासिष्ठ

याचा अर्थ असा कीं—ज्या पुरुषानें सर्व प्रकारचे दृश्य पदार्थ, मग ते स्थूल असोत किंवा सूक्ष्म असोत, यांचा मनापासून त्याग केलेला असतो व आत्मबोधाच्या योगानें ज्याच्या बुद्धीची जळजळ नाहींशी झाली आहे व आकाशापेक्षांहि शांत व ज्याचें मन प्रपंचामध्यें कधींहि

व्यग्र होत नाहीं तोच खरा जीवन्मुक्त होय. असा पुरुष कर्में करो किंवा सर्वदा स्थिर राहो, तथापि तो समाधि-अवस्थेपासून च्युत होत नाहीं. जीवन्मुक्त पुरुषाच्या लक्षणांचा उपसंहार पुढील वचनामध्यें आहे:—

अनात्मन्यात्मधीर्बंध स्तन्नाशो मोक्ष उच्यते ॥
बंध मोक्षौ न विद्येते नित्यमुक्तस्य चात्मनः ॥ १

—योगवासिष्ठ

याचा अर्थ असा आहे कीं—देह, इंद्रियें, पुत्र, मित्र कलत्र इत्यादिक पदार्थ आहेत, ते सर्व अनात्मा होत. फार कशास पाहिजे? श्रुतीमध्यें पुत्र हाच आत्मा असें जें म्हटलें आहे तें देखील वचन व्यावहारिकच समजलें पाहिजे. पुत्र हाच जर आत्मा होऊं लागेल, तर पुत्र मेला असतां नाश झाला पाहिजे; किंवा आपला मृत्यु झाला असतां पुत्राचा नाश अवश्य झाला पाहिजे. परंतु तसें ज्या अर्थीं कांहीं घडत नाहीं त्या अर्थीं पुत्र आत्मा नव्हे हें सिद्ध होतें. पुत्राच्या ठिकाणीं जें आत्मत्व उत्पन्न होतें तें केवळ आत्मसुखाकरितांच होय. हें पुढील बृहदारण्यक उपनिषदांतील वचनावरून स्पष्ट होईल:—

न वा अरे पुत्राणां कामाय पुत्राः प्रिया भवंति ।
आत्मनस्तु कामाय पुत्राः प्रिया भवंति ।
न वा अरे वित्तस्य कामाय वित्तं प्रियं भवति ।
आत्मनस्तु कामाय वित्तं प्रियं भवति ।
न वा अरे ब्रह्मणः कामाय ब्रह्म प्रियं भवति ।
आत्मनस्तु कामाय ब्रह्म प्रियं भवति ।

—बृहदारण्यक

याचा अर्थ असा आहे कीं—आपल्या सुखाकरितांच इतर सर्व पदार्थ रमणीय वाटतात. पुत्रादिकांच्या योगें-करून आपणांस सुख होतें म्हणूनच सर्व लोक पुत्राची इच्छा करितात. खरोखर पाहतां पुत्राला ज्या गोष्टी आवडतात त्या ठिकाणीं आपली आत्मबुद्धि नसते, तर पुत्रच आत्मसुखाला कारण होतो म्हणून तो आपणांस आवडतो. उदाहरणार्थ, पुत्राला अलंकार घातले असतां त्यापासून त्याला कांहीं सुख होत नाहीं. तथापि पुत्रानें अलंकार घातले असतां आपणांस सुख होतें, म्हणून पुत्राला अलंकारानें आपण लेववितों. तसेंच पुत्राचे आपण चुंबन घेतों, पण तेणेंकरून त्यास सुख न होतां उलट तो रडूं लागतो. या सर्व गोष्टीचा सूक्ष्म विचार पाहतां असें कळून येईल कीं, स्त्रीपुत्रादिक हीं केवळ आपल्या सुखाकरितांच उपकरणें होत. म्हणून त्यांस आत्मा म्हणणें अयोग्य आहे. स्त्रीपुत्रादिक जीं आपलींशीं वाटतात त्याचें मुख्य कारण अहंकार होय. आपण साक्षी निर्विकार असून देहादिक, स्त्री, पुत्र वगैरे पदार्थांस आत्मा असें मानणें हाच बंध होय. देहात्मबुद्धीवांचून दुसरा बंधच नाहीं. देहाच्या ठिकाणीं आत्मबुद्धि बाळगणें ह्यासारखा दुसरा अपराध नाहीं.

देहात्मबुद्धिजं पापं न तद् गोवधकोटिभिः ॥

—योगवासिष्ठ

याचा अर्थ असा कीं—आपला देह हाच आत्मा अशी बुद्धि उत्पन्न झाली असतां जें पाप लागतें, तसें कोटिशः गोवध केला असतांहि लागत नाहीं. तेव्हां देहाच्या ठिकाणीं जी आत्मबुद्धि हाच बंध होय. त्याप्रमाणेंच

देहाच्या ठिकाणीं आत्मबुद्धि नसून केवळ आत्म्याच्याच ठिकाणीं आत्मबुद्धि असणें हाच खरा मोक्ष होय. अशा प्रकारचा पुरुष मुक्तच होय व ही स्थिति ज्ञानाची परमावधि होय यांत संशय नाहीं. आत्म्याच्या ठिकाणीं आत्मबुद्धि झाली असतां कृतकृत्यता प्राप्त होते.

वैराग्य, बोध आणि उपरम ह्या तिन्ही गोष्टी जीववन्मुक्तास अवश्य आहेत. ह्या तिन्ही गुणांची जशी जशी पूर्णता होत जाईल, तशी तशी जीवन्मुक्तस्थितीची पूर्णता होत जाते. ब्रह्मलोकाची प्राप्ति झाली असतांहि ती तृणासमान लेखणें ही वैराग्याची परमावधि होय. आत्म्याचे ठिकाणीं आत्मबुद्धि असणें ही बोधाची परमावधि होय. आणि सुषुप्तीमध्यें जसें प्रपंचाचें विस्मरण होतें तसेंच इतर अवस्थांमध्यें होणें ही उपरमाची परमावधि होय. याकरितां ह्या तिन्ही गुणांचें संमेलन होणें फारच अवश्य आहे. ह्या तिन्ही गुणांचें परम सख्य असून तिघेहि एकत्र राहतात. विषयांचे ठायीं दोषदृष्टि झाली म्हणजे वैराग्याचें फल प्राप्त झालें असें समजावें. ब्रह्म सत्य व प्रपंच मिथ्या ही बुद्धि उत्पन्न होणें हें बोधाचें फल होय व या बोधाचें मुख्य कारण श्रवण, मनन, निदिध्यासन इत्यादि होत. स्वस्वरूपाचें ज्ञान होणें व व्यवहाराचा क्षय होणें ही उपरमाची परमावधि होय. ह्या तिन्ही गुणांचें मिश्रण झालें, म्हणजे जीवमुक्तीची प्राप्ति झाली असें समजावें. मोक्ष जो म्हणतात तो कांहीं स्वर्गाच्या वरतीं किंवा पाताळाचे खालीं असत नाहीं. मोक्ष भूतलावर नाहीं. जपतपादिकांत किंवा पंचाग्निसाधनांतहि मोक्ष सांपडत नाहीं. मोक्ष त्रिभुवनांतहि सांपडत नाहीं. व

द्रव्य दिलें असतांहि तो मिळत नाहीं. परंतु सद्गुरुचरणांचा लाभ झाला असतां मोक्ष आयताच प्राप्त होतो. सद्गुरूनीं महावाक्याचा बोध केल्यानंतर सर्व आशांचा क्षय होतो. वासनांचा क्षय झाल्यानंतर मनाचाहि लय होतो व मनोलय झाला असतां मोक्षाची प्राप्ति होते.

वैराग्य, बोध आणि उपरम यांचें परम सख्य असून हे तिघेहि एकत्रच रहातात अशाविषयीं निरूपण झालें. या तीन गुणांविषयीं असा चमत्कार आहे कीं, ते सर्वच सारख्या प्रमाणामध्यें असावे लागतात असें नाहीं. एकादा गुण अधिक असून बाकीचे गुण न्यून असले तरी चालतात. इतकेंच कीं, एक मुळींच नसून बाकीचे दोन असणें अवश्य आहे. सत्त्व, रज, आणि तम या तिन्ही गुणांस हाच नियम लागू पडतो, म्हणजे हे तिन्ही गुण प्रत्येक प्राण्याच्या ठायीं असतात; तथापि एकादा गुण अधिक असून बाकीचे न्यून असूं शकतात. परंतु या तिन्हींपैकीं एकादा मुळींच नसणें हें मात्र संभवत नाहीं. वैराग्य, बोध आणि उपरम यांचें यौगपद्य अशाच तऱ्हेचें आहे. दृढवैराग्य जर मुळींच नाहीं, तर बोध कधींहि उपजणार नाहीं; आणि बोधाशिवाय उपरमाची उत्पत्ति कधींहि होत नाहीं; याकरितां यांची व्याप्ति अशा रीतींची आहे कीं, एक बोध असेल तर वैराग्य आणि उपरम यांचा अभाव घडणेंच नाहीं.

वरील एकंदर विवेचनावरून देहात्मबुद्धि हेंच बंधन व त्या बुद्धीचा नाश तोच मोक्ष होय, ह्या सिद्धांताची प्रतीति होते. देहबुद्धिबंधन सद्गुरूच्या कृपेनें निःशेष तुटून गेलें म्हणजे त्यालाच मोक्ष असें म्हणतात; व या

मोक्षाचा अधिकारी जीवन्मुक्त पुरुषच होय. देहात्मबुद्धि नष्ट होणें ह्या पायावर सर्व वेदान्तशास्त्र रचिलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. एके प्रसंगीं एका योग्यानें आपल्या शिष्यवर्गास केलेला उपदेश एथें निवेदन करणें उचित आहे. त्या योगीमहाराजानीं

को मूर्खः ?

या प्रश्नाचा विचार चालविला व अनेक प्रकारच्या तर्कांचें खंडन करून

देहोऽहं इति यो वदति स मूर्खः ।

ह्या सर्वमान्य मताची सिद्धता करून दाखविली. ह्या बुद्धीचा नाश जीवन्मुक्ताच्या अंतःकरणांत सर्वदा जागृत असतो. किंबहुना हा जीवन्मुक्ताचा महिमाच समजला पाहिजे. नित्यमुक्त जो परमात्मा त्याचे ठायीं लीन होणारा जो जीवन्मुक्त पुरुष, तो आत्माराम होऊन स्वस्वरूपाशीं खेळत असतो.

आत्मक्रीड आत्मरतिः ।

—मुंडक

अशा प्रकारचें जीवन्मुक्ताचें स्वरूप श्रुतीमध्यें पदोपदीं वर्णिलेलें दृष्टीस पडतें. आत्म्याशींच खेळत राहणें म्हणजे आत्म्याचें अद्वितीयत्व व स्वप्रकाशत्व यास साधक श्रुतिवचनांचें प्राबल्य व बाधक श्रुतिवचनांचें दौर्बल्य स्थापित करणें होय असें श्रीमद्विद्यारण्य स्वामींनीं उपनिषद्व्याख्येमध्यें प्रतिपादन केलें आहे. अशा रीतीनें योगी आत्माराम झाला म्हणजे देहात्मबुद्धीची वार्ताहि तेथें संभवत नाहीं. मग देहात्मबुद्धीचा बंध किंवा मोक्ष हें ज्ञान जीवन्मुक्तास होतच नाहीं. जो पुरुष बंध किंवा

मोक्ष यांपैकीं एकासहि जाणत नाहीं, तोच नित्यमुक्त समजावा.

जीवन्मुक्ति प्रकरणाचे उपसंहारार्थ पुढील वचन श्रीमद्वसिष्ठानीं दिलें आहे:—

दृश्यं नास्तीति बोधेन मनसो दृश्यमार्जनम् ॥
संपन्ना चेत्तदुत्पन्ना परा निर्वाणनिर्वृतिः ॥ १

—**योगवासिष्ठ**

याचा अर्थ असा कीं—दृश्य म्हणून जेवढें तें मिथ्या होय, अशा प्रकारच्या ज्ञानानें जेव्हां मन दृश्यविहीन होतें, तेव्हां परमसुखाची प्राप्ति होते, व मोक्षस्थिति अखंड बाणली जाते. वरील वचनांतील निवृति शब्दाचा अर्थ निरतिशय सुख असा करावयाचा. दृश्य पदार्थ मनांतून झाडून टाकणें या अर्थी दृश्यमार्जन हा शब्द योजिला आहे. दृश्य शब्दहि फार व्यापक आहे. म्हणजे केवळ चक्षुरिंद्रियानें ज्याचें प्रत्यक्षज्ञान होतें तेवढेंच दृश्य असें न समजतां कोणत्याहि इंद्रियानें व मनानें ज्या ज्या पदार्थांचें प्रत्यक्ष ज्ञान होतें, तें दृश्य असें जाणावें व हें दृश्य मिथ्याभूत असून दुःखरूप आहे, ह्याकरितां तें मनांतून नाहींसें केलें असतां परमानंदाची प्राप्ति होते. ह्या परमानंदास निर्वाण अशी योगशास्त्रांत संज्ञा आहे, व त्याचें विशेष निरूपण पुढील प्रकरणांत होईलच. मनांतून कोणत्याहि प्रकारचें दृश्य नाहींसें करण्यास मुख्य साधन म्हटलें म्हणजे महावाक्य होय. तत्पद व त्वंपद ह्यांचें संशोधन गुरुमुखानें करून घेऊन तर्कशास्त्ररीत्या अखिल पदार्थांचें परिज्ञान झाल्यानंतर दृश्याचीं बाधा नाहींशी होते. वर सांगितलेली जी निर्वाण-

स्थिति तिचा अनुभव घेण्याचा प्रयत्न केला असतां दृश्याचें कवाड आडवें येतें. तेव्हां त्या दृश्याचा क्षय झाला म्हणजे निवृत्तिक स्थिति आपोआप बनते.

या जगांत सुख म्हणून जें म्हणतात तें आत्मसुखच होय. विषयभोगामुळें जरी सुख प्राप्त झालें, तरी तें आत्मसुखच होय. विषयभोगामध्यें व शुद्ध आत्मसुखामध्यें भेद इतकाच कीं, विषयभोगामध्यें सुख दृश्य विषयाशीं संलग्न झालेलें असतें, आणि म्हणूनच तें फार मर्यादित असतें. परंतु दृश्याचा नाश झाला असतां अपरिमित सुख प्राप्त होतें. जेथें कोणत्याहि दृश्याचें स्फुरण होत नाहीं तेथें अर्थातच द्वैत विरून जातें. मग अद्वैतसुखाची स्फूर्ति होऊन परमानंदाची प्राप्ति होते. अशा प्रकारचा आनंद प्राप्त होण्यास सद्गुरुकृपाच पाहिजे. निर्विकल्प समाधि जी म्हणतात ती हीच. ह्यापेक्षां वरची पायरी कोणतीहि रहात नाहीं. ज्ञानाची सातवी भूमिका म्हणतात ती हीच. याच अवस्थेस निर्वाण असें म्हणतात; व जीवन्मुक्त पुरुष याच अवस्थेचा नेहमीं अनुभव घेत असतो.

आर्यतत्त्वज्ञानांत अत्यंत श्रेष्ठ मानिलेली जी जीवन्मुक्ति तिचें वर्णन एथवर झालें. ही मुक्ति मिळण्यास देहपाताची आवश्यकता मुळींच नाहीं. या परमसुखाचा सोहळा याच देहांत याच डोळ्यांनीं भोगितां येतो. हा सुखसोहळा दूर दिगंतामध्यें नाहीं, किंवा पाताळाखालींहि नाहीं. याच जन्मीं, याच लोकीं, सिद्धपुरुषास त्याचा अनुभव येतो.

सर्वाशासंक्षये चेतः क्षयो मोक्ष इहेष्यते ॥

—योगवासिष्ठ

याचा अर्थ असा कीं—सर्व प्रकारच्या आशांचा नाश झाला असतां चित्ताचाहि क्षय होतो, व याच लोकीं मोक्षप्राप्ति होते. वायुनिरोध करून जे मनाचा निरोध करितात ते सुषुप्तीप्रमाणेंच मूर्छनावस्थेंत पडून राहतात. तेथें विवेकादि संपत्ति नसते. वायुधारण करून जी मूर्छना येते ती नष्ट झाल्यानंतर मन फिरून पहिल्यासारखेंच संकल्प करण्यास तयार होतें. चित्त सावध झाल्यावर विश्वलहरी पूर्वींप्रमाणेंच भासमान् होते. यास उत्कृष्ट दृष्टांत म्हटला म्हणजे लहान बालकांचा होय. खेळांत लहान मुलें दिवस असतांहि रात्र झाली असें मानून झोंप घेतात व लागलींच निजून उठतात. दिवसासच रात्र झाली असें म्हणून डोळे मिटून जेव्हां मुलें निजतात तेव्हां क्षणभर त्यांस दृश्याची बाधा होत नाहीं. परंतु तेवढ्यानें त्यांचें काय समाधान होणार ? खोटे संकल्प करून डोळे झांकले व आपणच उघडले तर त्यापासून काय फळ होणार बरें ? त्याप्रमाणें वायुनिरोधाच्या योगानें मनाचाहि निरोध किंचित्काल जरी केला, तरी त्यापासून कांहीं लाभ नाहीं. सुषुप्तिकालीं मनोनिग्रह आपोआपच होतो व वासनांचा लय होतो. पण तेवढ्यानें मुक्ति प्राप्त होईल काय ? अशा रीतीनें जर मुक्ति मिळेल तर सर्व लोक अहोरात्र निजून राहतील. हें जें अहोरात्र निजून राहणें त्यासारखेंच वायुनिरोध करून चित्ताला निग्रह करणें होय. अशा रीतीनें राजयोगाचें प्राबल्य सिद्ध होतें. राजयोगाच्या रीतीनें ज्ञान संपादन करून वासनेचा क्षय केला असतां मनाचा क्षय आपोआप होतो. मनाचा जो क्षय तोच मोक्ष होय.

आणि पूर्वी वर्णिल्याप्रमाणें त्या मोक्षाचा अनुभव या देहींच घडतो.

मोक्षाचें लक्षण थोडक्यांत समजून घ्यावयाचें असेल तर तें असें जाणावें, कीं, देहाच्या ठिकाणीं आत्मपण जें सर्व जगांत दिसून येतें तेंच आत्मपण आत्म्याचे ठायीं बाणणें हाच **मोक्ष** होय. या जगांत प्रत्येकाची आत्मबुद्धि आत्म्यावर जर दृढ बसेल, तर मग त्या आनंदास पारावरच नाहीं. पण जगाची स्थिति उलट असते. देहादि जितके अनात्म पदार्थ आहेत, त्यांचे ठायीं आत्मबुद्धि दिसून येते. सर्व जगाची रीत अशी आहे कीं, अनुकूल पदार्थांचें ग्रहण करावें व प्रतिकूलाचा त्याग करावा. अनुकूल असे जे स्रक्-चंदन-वनितादि पदार्थ ते भेटले असतां सुखोत्पत्ति होते; व प्रतिकूल जे व्याघ्र, सर्प, विष इत्यादि पदार्थ त्यांपासून दुःखोत्पत्ति होते. ह्या दोन्ही अवस्था टाकून राहिलें असतां आत्म्याच्या ठिकाणीं आत्मबुद्धि बाणते. गुरुकृपा झाली असतां ह्या अवस्थेचा अनुभव याच देहांत येतो. मात्र देहाच्या ठिकाणीं आत्मबुद्धि होतां उपयोगी नाहीं.

---

# प्रकरण पंधरावें

## निर्वाण

मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति ।

—**कठोपनिषद्**

जीवन्मुक्ति प्रकरण संपल्यानंतर वास्तविक पाहतां

पुढें निरूपण करण्यासारखें कांहीं रहात नाहीं. सर्व ग्रंथ सिद्ध होऊन पुढें रचना करण्याचें कामच उरत नाहीं. कारण एथवर ग्रंथाची जी रचना झाली आहे, ती अशा प्रकारची आहे कीं, पायरी पायरीनें संपूर्ण ज्ञान करतलमलकवत् होऊन जातें. ती रचना अशी कीं, प्रथम सर्व ज्ञानाची मूलभूमिका जें वैराग्य त्याविषयीं निरूपण झालें. वैराग्याच्या योगानें सर्व विषय तुच्छ वाटतात, परंतु देहादि प्रपंच जर यथार्थ मासूं लागले, तर वैराग्य कधींहि उपजत नाहीं म्हणून जगन्मिथ्यात्व प्रकरणाचें निरूपण झालें. जगन्मिथ्यात्वपूर्वक वैराग्यस्थिति बाणण्यास वासनाक्षय आणि मनोनाश हीं अंतरंग साधनें होत. ह्या साधनांचा उपयोग केल्याबरोबर स्वप्रकाश जो आत्मा त्याचें परोक्षज्ञान होतें. ही सर्व श्रवणाची संपत्ति होय. यावर मनन अवश्य झालें पाहिजे. मननानंतर निदिध्यासन घडलें पाहिजे; याकरितां, आत्ममनन, शुद्धनिरूपण व आत्मार्चन ह्यांचें निरूपण झालें. यानंतर आत्म्याचें लक्षण पूर्ण समजण्यासाठीं आत्मनिरूपण हें प्रकरण सिद्ध झालें. अशा रीतीची साधनसंपत्ति सिद्ध झाली असतां जीवन्मुक्तावस्था आपोआप प्राप्त होते. आह्मीं त्या अवस्थेचीं लक्षणें मागील प्रकरणांत विस्तृतपणें प्रतिपादिलींच आहेत. ह्या लक्षणांचें परिज्ञान होऊन त्याचा अनुभव घडला असतां परमानंद प्राप्त होतो.

अशा रीतीनें परमसुखाचा मार्ग जरी समजला, तथापि सद्गुरुकृपेवांचून ब्रह्मज्ञान प्राप्त होत नाहीं. ज्याप्रमाणें आपल्या गळ्यांतच मणि असून त्याचा विसर पडून इकडे तिकडे एखादा मनुष्य शोधूं लागतो, त्याप्र-

माणें सद्गुरुकृपेशिवाय साधकाची स्थिति होते. स्वप्रकाश असा जो आत्मा, त्याचें ज्ञान नसलें म्हणजे मनुष्य अ-गर्दीं भांबावून जातो आणि देव देव करीत अनेक तीर्थें, पर्वत-गुहा इत्यादि स्थळीं भटकत फिरतो. ईश्वरप्राप्ती-साठीं साधक दाही दिशा हिंडतो, परंतु त्यास कांहीं देव भेटत नाहीं. याचें मुख्य कारण असें आहे कीं, आपल्या देहांतच देव आहे हें त्यास कळत नाहीं. ज्या आत्म्या-च्या प्रेरणेनें गिरिगव्हरादिक निबिड स्थानें पाहण्याची इच्छा साधकास होते, त्या देवास तो जाणत नाहीं. ज्याच्या प्रेरणेनें आपली हालचाल होते व मुखांतून श-ब्द बाहेर उमटतात, त्याचें ज्ञान साधकास नसतें. फार कशास पाहिजे? या अखिल भूतलावर जितकीं म्हणून देवांचीं व देवींचीं स्थानें आहेत, त्या सर्वांचे ठायीं दे-वत्व ज्याचेमुळें स्थापित होतें, त्याचें अज्ञान नष्ट झालेलें नसतें. परंतु हें सर्व अज्ञान एका सद्गुरूच्या कृपेनें क्षय पावतें. सद्गुरूच्या बोधानें अपरोक्ष साक्षात्कार होऊं लागतो; आणि सर्वत्र आनंदच पसरलेला आहे असा अनुभव येतो.

ही स्थिति प्राप्त होण्यास जे जे उपाय पूर्व निबंधांत सांगितले, त्या सर्वांस मनोनिग्रहाची अत्यंत अवश्यकता आहे. योगाभ्यास साध्य होण्यास मनोलय होणें अवश्य असून तो मनोनिग्रह तर फारच कठिण आहे. ह्यावि-षयीं भगवद्गीतेंत पुढील वचन आहे:—

चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढं ॥
तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करं ॥ १

याचा अर्थ असा कीं—मन इतकें चंचल आहे कीं, त्याचा

निग्रह करणें हें वाऱ्याची मोट बांधण्याप्रमाणें आहे. मनोनिग्रहाकरितां सर्व लोक जन्मापासून मरेपर्यंत एकसारखे कष्ट करीत असतात. तेव्हां हा उपाय जर इतका कठिण आहे, तर त्यांवाचून जीवनन्मुक्तावस्था साध्य होईल कीं नाहीं, किंवा अपरोक्ष साक्षात्कार होईल कीं नाहीं, या शंकेचा निर्णय चालू जें निर्वाण प्रकरण त्यांत केला आहे. या प्रकरणांतील विचारसरणी व ठरविलेले सिद्धान्त फारच मनोरंजक असून सर्व जगास फारच उपकारक आहेत. योगाभ्यासाची खटपट होणें दुर्लभ, अशा समजुतीवर अनेक लोक परमार्थाचा मार्गच टाकून देतात. म्हणून अशा लोकांसाठीं श्री वसिष्ठानीं ह्या प्रकरणांत सहजावस्थेचें निरूपण फारच मनोवेधकरीतीनें केलें आहे. सहजावस्था म्हणजे काय, सहजावस्था बाणली असतां काय चिन्हें होतात, व सहजावस्था प्राप्त झालेला मनुष्य व्यवहारांत कसा वागतो, इत्यादि चमत्कृतिजनक विषय या प्रकरणांत वर्णिले आहेत.

ही सहजस्थिति प्राप्त होण्यास प्राणायाम, आसन, मनोलय, वासनाक्षय, यांची गरज नाहीं. प्राणायाम इत्यादि जर ज्ञानपूर्वक केले जातील, तर जीवन्मुक्तावस्था सहज प्राप्त होईल. परंतु ज्ञानाचे साहाय्याशिवाय जो मन, वासना इत्यादिकांचा क्षय, त्याचे योगानें प्रपंचाचा लय होतो ही गोष्ट खरी आहे, तरी मुख्य अनुभवाची खूण पटत नाहीं. बहुरूपी देखील मनाचा लय करितो व पुष्कळ वेळ तटस्थ राहतो; परंतु त्याच्या समाधीचें व्युत्थान झाल्याबरोबर 'राजा, लवकर बक्षीस दे' असें म्हणतो. खरोखर पाहतां तो दीर्घकालपर्यंत मन व प्राण

यांचें अकर्षण करून राहतो; तथापि त्यामुळें त्याचें अज्ञान नष्ट होतें काय ? यावरून असें सिद्ध होतें कीं, वास्तविक ज्ञान असल्याशिवाय केवळ वासनादि क्षय करून अज्ञानाचा क्षय होत नाहीं. केवळ वायुनिरोधानें मनाचा लय करणें ह्याची योग्यता, सुषुप्ति, मूर्छना, लय इत्यादि अवस्थांमध्यें जी स्थिति होते त्याहून अधिक नाहीं. याकरितां अज्ञानाचा नाश होण्याचें मुख्य साधन म्हटलें म्हणजे आत्मज्ञानच होय. सविलास अशी जी अविद्या हिचा नाश ज्यामुळें होतो तें आत्मज्ञानच होय. याकरितां मोक्षार्थी जे साधक असतील, त्यांनीं आत्मज्ञान करून घेण्याचा प्रयत्न अवश्य करावा. सद्गुरुमुखांतून होणारें महावाक्याचें विवरण साधकांनीं ऐकावें व तद्विषयीं मनन, निदिध्यासन इत्यादि प्रकार केले असतां आत्मज्ञान तत्काळ होतें. आत्मा स्वप्रकाश असून देव आहे हें तत्व जाणतांच प्रपंचाचा लय होतो व मोक्षश्री सिद्ध होते. अशाविषयीं श्रुतिवचन आहेत:—

तमेव विदित्वा अतिमृत्युमेति । नान्यः पंथा अयनाय विद्यते ।

—श्वेताश्वतर

या वचनांतील अतिमृत्यु ह्याचा अर्थ मोक्ष असा आहे. आत्मज्ञान झालें असतां मोक्षप्राप्ति होते. आत्मज्ञानाशिवाय मोक्षप्राप्तीस दुसरा मार्ग नाहीं असा या वरील श्रुतीचा अर्थ आहे. या वचनामध्यें 'मृत्यु' हें केवळ उपलक्षण समजून त्यामध्यें जन्माचाहि अंतर्भाव करावा लागतो.

काकेभ्यो दधि रक्ष्यताम् ।

या वचनाचा शब्दशः अर्थ करूं लागलें असतां 'कावळयापासून दह्याचें रक्षण करावें' असा होतो. पण

याचा अर्थ एवढाच समजावयाचा कीं काय? कावळ्याकडून दहीं खाववूं देऊं नये तर मांजराकडून खाववूं देववावें काय? याकरितां मरण या शब्दामध्यें जन्म या शब्दाचाहि अंतर्भाव होतो हें सिद्ध झालें.

सहजस्थिति प्राप्त होण्यास ब्रह्मवेत्ता होणें अवश्य आहे. शुद्धब्रह्माचें ज्ञान झालें असतां इतर साधनांचा अवलंब करणें व्यर्थ क्लेश होय, याविषयीं प्रमाणभूत श्रुति पुढील होयः—

ब्रह्मविदाप्नोति परम् । —तैत्तिरीयारण्यक

या वचनाचा अर्थ असा आहे कीं, शुद्धब्रह्माचें ज्ञान झालें असतां मोक्षाची प्राप्ति होते.

ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति । —बृहदारण्यक

हें श्रुतिवचन फारच महत्त्वाचें आहे. याचा अर्थ असा कीं ब्रह्मवेत्ता पुरुष ब्रह्मरूपीच होतो. अशा प्रकारचें ब्रह्मज्ञान झालें असतां ज्ञानधारा करण्याचें कारण नाहीं. ज्यास आत्म्याचें अपरोक्ष ज्ञान झालें आहे, त्यास निरंतर मनोजयार्थ यत्न करणें नलगे. उघडच आहे कीं, विधियुक्त व्रतबंधानें जो ब्राह्मण झाला, त्यास ‘ मी ब्राह्मण, मी ब्राह्मण ’ असें अनुसंधान अहोरात्र करण्याची अवश्यकता नाहीं. कारण एकदां व्रतबंध झाला म्हणजे ब्राह्मणत्वाची वज्रमिठीच पडते. हें ब्राह्मणत्व अशा रीतीनें जडतें कीं, तें टाकून देईन म्हटलें तर टाकणें अशक्य आहे. ही जी ब्राह्मणात्वाची स्थिति, तीच आत्मत्वाची होय. ‘ आत्मा म्हणजे काय ? ’ हें समजल्याबरोबर ब्राह्मभाव बनून जातो; मग ज्ञानधारा करण्याचें मुळींच कारण पडत नाहीं.

तमेव विदित्वा अतिमृत्युमेति । —श्वेताश्वतर

या वचनांतील 'एव' या पदानें इतर साधनांचा जसा निषेध केला आहे, तसाच ज्ञानधोरेचाहि केला आहे असें समजावें.

सहजस्थिति म्हणजे अपरोक्ष साक्षात्कार होय. हा साक्षात्कार होण्यास जें ज्ञान अवश्य पाहिजे, तें असंभावना व विपरीत भावना याविरहित असलें पाहिजे. एकदा रज्जु आहे अशी खात्री झाली असतां मग तेथें सर्पभान कधींही होणार नाहीं. रज्जूचें असंदिग्धज्ञान झालें असतां भयकंपादिकाचें पूर्ण भस्म होऊन जातें. अपरोक्ष साक्षात्काराचीहि अशीच गोष्ट आहे. साक्षात्कार झाल्याबरोबर विश्वरूपी स्वप्न कधींहि खरें वाटणार नाहीं. ज्याप्रमाणें जागा झालेला मनुष्य स्वप्नांतील अनुभव कधींहि खरे मानीत नाहीं, त्याप्रमाणें साक्षात्कार झालेल्या पुरुषास विश्वप्रतीति असत्य वाटते. हा साक्षात्कार म्हणजे आत्म्याची पक्की ओळख होय. जीवन्मुक्ताची स्थिति म्हणतात ती हीच. ही स्थिति बाणण्यासाठीं सर्वदा तटस्थवृत्तीचा अवलंब केला पाहिजे असें नाहीं. कोणत्याहि वर्णाश्रमांत असतां या स्थितीचा अनुभव होऊं शकतो. जनक राजा ब्रह्मवेत्ता असून त्यानें राज्यसंपत्तिहि भोगिली होती. वसिष्ठानीं गृहस्थाश्रम पत्करिला होता. तुळाधार हा तर वाणी होता. तेव्हां योगी लोक सहजस्थितीमध्यें राहून सर्व प्रकारचे व्यवहार चालवितात. परंतु बाह्य दृष्टीनें जरी ते व्यवहारांत गुंतलेले दिसले, तरी कर्तृत्व आणि भोक्तृत्व त्यांना असत नाहीं.

सहजस्थिति बाणली असतां अष्टांगयोगाचें कारण राहत नाहीं, व मनोनाश, वासनाक्षय इत्यादिकांचा यत्न

करण्याचीहि आवश्यकता नाहीं. सहजस्थितीमध्यें असतां उघड्या डोळ्यांनींच समाधिसुखाचा अनुभव येतो. कोणताहि व्यापार करीत असतां साधुपुरुषास ब्रह्मानंद होत असतो. सर्व वस्तु ब्रह्ममय आहेत अशी मनाची स्थिति झाली असतां तेथें संकल्प कशाकरितां उठतील? जेव्हां सर्व भूगोल, सर्व खगोल, सर्व देव ब्रह्मरूपी होऊन गेले; सर्व जगांतील शुद्ध व अशुद्ध वस्तु व जितक्या म्हणून बऱ्या-वाईट वस्तु आहेत, तितक्या सर्व ब्रह्मरूपी दिसूं लागल्या; तेव्हां आपल्या देहाचेंहि भान रहात नाहीं. मग कल्पिता व कल्पना हे उरत नाहींत. ह्या स्थितीस **निर्विकल्प स्थिति** म्हणतात. योगी सर्वदा ह्या स्थितीमध्यें असतात. योगी लोक इंद्रियांचें नियमन करोत किंवा न करोत, त्यांची ब्रह्मस्थिति मुळींच ढळत नाहीं. उघडच आहे कीं, दहीं घुसळून एकदां लोणी निघालें म्हणजे तें फिरून ताकांत घातलें असतां त्याशीं संमेलन पावत नाहीं. त्याप्रमाणें ज्याचें मन एकदां प्रपंचांतून निघालें, तो प्रपंचांत जरी असला तरी त्याचें चित्त प्रपंचांत फिरून गुंतत नाहीं. उंसाचा रस काढून तो नानाप्रकारांनीं गाळून त्याची साखर बनवितात, पण फिरून त्या साखरेचा ऊंस करण्याचें मनांत आणणें मूर्खपण होय. त्याप्रमाणें सद्गुरुप्रसादानें देहादिक प्रपंचाचें खरें स्वरूप कळल्यानंतर जो स्वतः ब्रह्मरूपी झाला, त्याला प्रपंचांत असतांहि देहपण पावत नाहीं. दुधाचें मंथन करून घृत निघालें असतां फिरून त्याचें दूध करूं म्हटलें तर जसें अशक्य आहे, त्याप्रमाणेंच ज्याला म्हणून एकदां परमार्थज्ञान झालें, तो कांहीं झालें तरी अ-

ज्ञानी होणार नाहीं. प्रपंचांत ज्ञानी प्रपंचरूप होत नाहीं किंवा समाधींत असतां त्याच्या स्थितींत बदल होत नाहीं. एकादें बहुमोल रत्न नानावेष्टनांनीं बांधून ठेविलें असतां त्याचा रत्नपणा अधिक होत नाहीं, किंवा तें रत्न धुळींत पडलें असतां त्याचा रत्नपणा कमी होत नाहीं, तसेंच निर्विकल्प समाधीचा अनुभव योगी घेवो, किंवा सविकल्प समाधीचा अनुभव घेवो, दोन्ही समाधींत त्याला लाभहानि सारखीच होते.

श्रीमद्भागवतामध्यें, योग्याची स्थिति कशी असते एतद्विषयक निरूपण चाललें असतां श्रीकृष्णानीं उद्धवास असें सांगितलें कीं, इंद्रियें नियमित असोत किंवा नसोत, साधुपुरुषाची स्थिति कालत्रयीं ढळत नाहीं. याविषयीं पुढील वचन आढळतें:—

समाहितैः कः करणैर्गुणात्मभिर्गुणोभवेन्मत्सुविविक्त–धाम्नः ॥
विक्षिप्यमाणैरुत किंनु दूषणम् घनैरुपेतैर्विगतैरवेः किम् ॥ १

—श्रीमद्भागवत

या वचनाचा अर्थ असा कीं—ईश्वरस्वरूपाचा ज्याला अपरोक्ष साक्षात्कार घडला आहे, आणि ज्या पुरुषास असंभावनादिकांचा मळ कधींहि जडत नाहीं, त्यानें इंद्रियें नियमिलीं किंवा न नियमिलीं, कांहीं झालें तरी त्यास फलप्राप्ति एकच होणार. त्रिगुणात्मक जीं इंद्रियें, तीं आपआपले व्यवहार करीत असतां सत्पुरुष ब्रह्मपदापासून खालीं येत नाहीं. सत्पुरुषाचे ठिकाणीं काम, क्रोध इत्यादि लहरी क्षणमात्र जरी दिसल्या तरी ब्रह्मस्फूर्तीनें त्या लागलींच बाधित होतात. यास उत्कृष्ट दृष्टांत म्हटला म्हणजे मेघांनीं व्यापलेल्या सूर्याचा होय. ढगांनीं

सूर्य आच्छादून गेला तरी त्याचें सूर्यपण जात नाहीं, किंवा त्याचा प्रकाशहि कमी होत नाहीं. मेघांच्या आच्छादनानें केवळ लोकांच्या दृष्टीला मात्र प्रतिबंध होतो, परंतु सूर्य प्रकाशमान् जशाचा तसाच असतो. अभ्रें येतात व जातात, परंतु सूर्य जशाचा तसाच तेजोमूर्ति राहतो. त्याप्रमाणें आत्मवेत्ता जो पुरुष आहे तो केवळ साक्षिस्वरूपाचा अनुभव घेतो, म्हणून गुणवृत्यादिकांच्या योगानें त्याचें खरें स्वरूप पालटत नाहीं.

अखिल जगामध्यें अत्यंत प्रकाशमान् जे सूर्यचंद्रादि पदार्थ त्या सर्वांस प्रकाश देणारा जो आत्मा त्याचें आवरण कशानेंहि होत नाहीं. श्रुतीमध्यें असें वर्णन आहे कीं चंद्र, सूर्य, तारा, अग्नि व विद्युल्लता इत्यादिकांस आत्म्यापासून प्रकाश प्राप्त होतो; कारण नेत्रादिकांनीं रूपाचें ज्ञान होतें खरें, परंतु सूर्यचंद्र इत्यादिकांचा प्रकाश नसेल तर नेत्रादिकांचा कांहीं उपयोग होत नाहीं. सूर्यकांत मण्यापासून तेज उत्पन्न होतें, किंवा आरशामध्यें आपलें रूप दिसतें, परंतु हे परिणाम सूर्यप्रकाशाचे अभावीं कधींहि घडणार नाहींत. चंद्रकांत मण्यास जो पाझर सुटतो तो चंद्राच्या तेजाचें फल होय. त्याप्रमाणेंच प्रकाशमान् पदार्थांस प्रकाश देणारा आत्माच होय. आत्म्याचा प्रकाश कोणत्याच गोष्टीनें कमी होत नाहीं. तस्मात् ब्रह्मवेत्ता जो पुरुष, त्याचीं इन्द्रियें समाहित असोत किंवा नसोत स्वस्वरूपापासून त्याची च्युति कधींहि होत नाहीं हें सूर्यदृष्टांतावरून सिद्ध झालें. आतां आकाशदृष्टांतानें आत्मा असंग असून त्याला कशाचाहि मळ लागत नाहीं. कितीहि वारा सुटला तरी गगन शो

षून जात नाहीं, थंडीनें काकडून जात नाहीं, पर्जन्यानें ओलें होत नाहीं, किंवा उष्णानें करपून जात नाहीं. सहाहि ऋतु येतात व जातात परंतु गगन जसेंचें तसेंच अलिप्त राहतें; यावरून पाहतां आकाशास कशाचाहि संग बाधूं शकत नाहीं. हीच गोष्ट आत्म्याची होय. आत्मा शुद्धबुद्ध निर्विकार असून त्यास सत्त्व, रज, तम इत्यादिकांच्या संगानें विकृति घडत नाहीं. मी देह आहें असा भाव झाला असतां सत्त्व, रज, तम या वृत्ति ग्रासून टाकितात; परंतु मी ब्रह्म आहें अशी भावना होतांच त्या वृत्तींचा लय होतो.

देह असून त्याविषयीं भान नसणें हें सहजस्थितीचें मूलतत्त्व होय. देहाभिमान याचेंच रूपांतर अहंकार होय. व्यतिरेक न्यायानें पाहतां देहाभिमान नष्ट झाला कीं अहंकार नष्ट झालाच म्हणून समजावें. हा अभिमान दोन प्रकारचा आहे: सामान्य आणि विशेष. ‘मी मी’ असें म्हणणारा प्रत्येक जीवमात्रांत कोणी तरी असतो, हाच सामान्य अभिमान होय. व ‘मीं अमुक काम केलें’ ‘मी पुन्हां अमुक काम करणार’ अशी हांव बाळगणारें जें जीवमात्रांतील तत्त्व तोच सामान्य अभिमान जाणावा. त्रिगुणवृत्तींमध्यें बहुतकरून हा अभिमान प्रादुर्भूत होतो. या अभिमानाचें स्वरूप श्रीमद्भगवद्गीतेंतील पुढील वचनांत निर्दिष्ट केलें आहे:—

इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् ॥
इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥ १
असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ॥
ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोहं बलवान्सुखी ॥ २

—भगवद्गीता

या वचनाचा अर्थ असा कीं—ही वस्तु मी आज संपादन केली, उद्यां अमुक मनोरथ सिद्धीस नेणार, आज मजपाशीं इतकें धन आहे, कांहीं कालानें हेंच धन वृद्धि पावून अमुक होईल, आज मीं ह्या शत्रूचा नाश केला, उद्यां दुसऱ्याचा नाश करीन, माझ्यासारखा श्रीमंत कोण आहे? माझ्यासारखे भोग कोणास भोगावयास सांपडतात? इत्यादि विचार केवळ अहंकाराचीं प्रतीकें होत. आसुर स्वभावाचे जे लोक, त्यांच्यामध्यें अहंकार अत्यंत प्रबळ असतो. व्यतिरेकन्यायानें पाहतां आसुरवृत्ति जसजशी नष्ट होत जाईल, तसतसा अहंकारहि नष्ट होईल.

एवढा वेळ सामान्य अभिमानाचें वर्णन झालें; आतां विशेष अभिमानाचें स्पष्टीकरण करावयाचें. मी ब्राह्मण, मी क्षत्रिय, मी वैश्य, इत्यादि प्रकारची जी भावना ती विशेष अभिमानाची दर्शक होय. मी गृहस्थ, मी यति, मी भिक्षुक, मी उद्मी, मी गोमान् इत्यादि प्रकारची जी भावना, तीहि विशेष अभिमान जाणावा. सामान्य व विशेष अभिमानाचें स्वरूप नीट समजणें फारच अवश्य आहे. कारण, सर्व विश्व या अभिमानाचे योगानें कळासून गेलें आहे. आपण असें पाहतों कीं, सृष्टींतील सर्व व्यवहार अहंकाराच्याच प्रेरणेनें घडून येतात. ह्या दोन्ही प्रकारचा अभिमान ज्याचा नष्ट झाला त्याची बुद्धि कर्तेपणाला शिवत देखील नाहीं. पापपुण्याचा लेप अशा पुरुषाला कधींहि घडत नाहीं. उघडच आहे कीं जो पुरुष कोणत्याहि कर्माचा कर्ता होईल, तोच पुरुष पापपुण्याचा अधिकारी होईल. जो अहंकारानें गर्क असेल

त्याचीच बुद्धि कर्तेपणाला चिटकून राहील. कर्तृत्व व भोक्तृत्व या भावना ब्रह्मनिष्ठामध्यें राहतच नाहींत. कर्में हातून घडोत किंवा न घडोत, ब्रह्मनिष्ठाची स्थिति बदलत नाहीं. याविषयीं श्रुति आहे:—

एष नित्यो महिमा ब्राह्मणस्य ।
न कर्मणा वर्धते नो कनीयान् ।

—तैत्तिरीय ब्राह्मण

या वचनाचा अर्थ असा कीं—ब्राह्मणाचा ज्ञानमहिमा असा विलक्षण आहे कीं त्यानें कर्में केलीं असतांहि तो महिमा वाढत नाहीं; किंवा त्याचे हातून कर्में घडलीं नाहींत तरी कर्में करून ब्राह्मण काय अधिक होणार आहे ? किंवा कर्में न करून त्यास काय कमीपणा येणार आहे बरें ? कोणत्याहि स्थितींत असतां तो जसाचा तसाच असतो. कारण त्याचा अहंभावच नष्ट झालेला असतो. या ठिकाणीं ब्राह्मण म्हणजे जातीनें किंवा वेषानें जे ब्राह्मण ते नव्हत. ब्राह्मण जातीस विहित कर्में करणारे व केवळ वेषधारी हे सामान्य ब्राह्मण होत. परंतु वरील श्रुतिवचनांत निर्दिष्ट केलेले ते हे ब्राह्मण नव्हत. त्या वचनांतील ब्राह्मण शब्दाचा अर्थ सुरेश्वराचार्यांनीं वार्तिकांत स्पष्ट केला आहे तो असा:—

यस्त्वक्षरपरिज्ञानान्मृत्योर्मृत्युः प्रमीयते ॥
स एव ब्राह्मणो न्यान्यो जगत्यध्यवसीयताम् ॥ १

—वार्तिक

या वचनाचा अर्थ असा कीं—शाश्वत, नित्य, निर्विकार असा जो परमात्मा, त्याच्या परिज्ञानानें संसाराचें भस्म ज्यानें केलें आहे, व संसारांत एका मागून एक ये-

णारे जन्ममरणाचे फेरे परमात्म्याचे अपरोक्षज्ञानानें ज्यानें चुकविले आहेत, त्यासच ब्राह्मण ही संज्ञा योग्य आहे. याहून इतर ते केवळ वेषधारी ब्राह्मण होत.

वरील वचनाचा दुसराहि अर्थ असा होतो कीं, मृत्यूचा मृत्यु—म्हणजे मृत्यूलाहि नष्ट करणारें जें चैतन्य, तें ब्रह्मसाक्षात्कारानें ज्यास सिद्ध झालें आहे, तोच खरा ब्राह्मण होय. सत्कर्मानें आचरण करून जे राहतात ते केवळ ब्राह्मण ही संज्ञा पावतात. याकरितां ब्राह्मण सत्कर्म करो किंवा न करो, तो समाधिस्थ राहो किंवा राज्य करो, किंवा गृहस्थाश्रमांत राहून सर्व व्यवहार करो, तो ब्रह्मरूपच आहे. याविषयीं पुढील वचन अत्यंत महत्त्वाचें आहे:—

योगरतो वा भोगरतो वा । संगरतो वा संगविहीनः ॥
किंचिद्ब्रह्मणि योजितचित्तो । नंदति योगी नंदति धीरः ॥१

—**योगवासिष्ठ**

या वचनाचा अर्थ असा आहे कीं—ज्या पुरुषानें क्वचित्, किंचित्, कदाचित्, परमात्म्याचे ठायीं आपलें चित्त ठेविलें आहे, तो परमानंद पावतो व अखिल विश्व त्यास ब्रह्मरूप दिसूं लागतें. तो पुरुष पाहिजे त्या व्यापारांत असो, तो योग साधून राहो किंवा नानाप्रकारचे भोग भोगून राहो; तो स्त्रीपुत्रादिकांचा संग करो, किंवा निःसंग होऊन वनांत बसो, कोणत्याहि स्थितीमध्यें असतां तो ब्रह्मरूपापासून ढळत नाहीं. तो देही असून देहातीत असतो. संग किंवा असंग जेव्हां बाधूं शकत नाहींत, तेव्हां मनादिकांचा निरोध करणें अवश्य नाहीं, व हीच सहजस्थिति होय. चालतां, बोलतां, व्यवहार

करितां ब्राह्मणरूप असणें ह्यासच **सहजस्थिति** म्हणतात.

सहजस्थितीचें वर्णन या प्रकरणांत परिपूर्ण असून त्याची व्यवस्थाहि श्री **वसिष्ठानीं** उत्कृष्ट रीतीनें केली आहे. प्रथमतः स्वस्वरूपाचें ज्ञान होणें अवश्य आहे, म्हणून तें विशद केलें आहे. स्वस्वरूपाचें ज्ञान झाल्यानंतर असा चमत्कार होतो कीं, कोणत्याहि व्यवहारांत गुंतलें असतां परमात्म्याचें भान सर्वदा होत असतें. तदनंतर ब्रह्मस्थितींत असतां सद्रूप, चिद्रूप, व आनंदरूप याचा अनुभव कसा होतो, याचें दिग्दर्शन केलें आहे. त्यानंतर सर्वत्र ब्रह्मदर्शन कसें होतें हें सांगून सहजस्थितीचें वर्णन केलें आहे. येणेंप्रमाणें या प्रकरणांतील गोषवारा आहे. स्वस्वरूपाचें ज्ञान होण्यास प्रगल्भ बुद्धि पाहिजे. व षड्दर्शनांच्या अभ्यासानें जें कुशाग्रबुद्धित्व प्राप्त होतें, त्याची फार अवश्यकता आहे. न्यायदर्शनांतर्गत पदार्थांचें ज्ञान, त्यांचें विभागकरण व सृष्टींतील पदार्थमात्रांचा परस्परांशीं संबंध, पदार्थज्ञानानें उत्पन्न होणाऱ्या अंतःकरणाच्या वृत्ति, इत्यादि अनेक वस्तूंचें यथार्थ ज्ञान असणें पुढील विषय समजण्यास अगत्याचें आहे. इतका प्रस्ताव करून आर्यतत्त्वज्ञानाचें केवळ शिखर असें जें स्वस्वरूपज्ञान त्याचे वर्णनास आरंभ करितों.

स्वस्वरूपविज्ञान झालें असतां, बोलतां चालतां आत्मानुभव येऊं लागतो. हें आत्म्याचें लक्षण पुढील वचनांत स्पष्ट केलें आहेः—

दृश्यदर्शनसंबंधादुद्भवेत्परमं सुखम् ॥
तदेवैकांतसंवित्या मनोनाशः परम् पदम् ॥ १

—**योगवासिष्ठ**

या वचनाचा अर्थ असा कीं—दृश्यदर्शनांची भेट झाली असतां खरोखर दोन चैतन्यांची गांठ पडते, व तेणेंकरून जें परमसुख उत्पन्न होतें, त्याचा निर्वाह दृश्य आणि दर्शन सोडूनहि केला असतां मनाचा नाश होऊन परमपदाची प्राप्ति होते. प्रिय दृश्याची भेट झाली असतां दर्शनाचा संबंध होऊन सुख उत्पन्न होते, हा अनुभव सर्वांस आहे. हें सुख कां उत्पन्न होतें याचा विचार केला असतां असें दिसून येतें कीं, सर्वत्र असणारें चैतन्य एकच आहे. दृश्य पदार्थांचे ठिकाणीं हें चैतन्य स्वतःसिद्ध राहतें. चित्तवृत्तिरूप जें दर्शन त्यामध्येंहि चैतन्य आहेच. तेव्हां दृश्यदर्शनांची भेट झाली म्हणजे या दोन चैतन्यांची गांठ पडते, व परमानंद प्राप्त होतो. अशा प्रकारचा अनुभव पाहिजे त्या पुरुषास येतो व तसाच एकान्तसंवित्यासहि येतो. वरील वचनांतील एकान्तसंविति हा शब्द कठिण आहे, म्हणून त्याचें विवरण करितों. घटपटादि पदार्थांचें जें ज्ञान तें केवळ स्थूलाचें ज्ञान होय. त्यास लौकिकज्ञान असें म्हणतात. स्थिर असें ज्ञान तें एकान्तज्ञान समजावें. वृत्ति अनेकाकार झाली असतां त्यास लौकिकज्ञान म्हणतात, व तीच ब्रह्माकार झाली असतां **एकान्तसंविति** असें म्हणावें.

दृश्यदर्शनांचा संबंध झाला असतां दोन चैतन्यांची गांठ पडून परमसुख कसें उत्पन्न होतें हें वर सांगितलेंच आहे. ह्यावेळीं होणारा परमानंद अशा प्रकारचा असतो कीं, मन व वासना देखील विरून जातात. हा अनुभव पाहिजे तेव्हां असतो, व एकान्तसंविति असतांहि होतो. दोहोंमध्यें अनुभवाचा फरक एवढाच कीं, घ-

टपटादि स्थूल लौकिकज्ञान निराळें, व वृत्तिरूप ज्ञान निराळें. एकान्तसंवितीची खूण अशी आहे कीं, दृश्य-दर्शनांचे संबंधेंकरून जें ज्ञान व सुख उत्पन्न होतें, त्याचा निर्वाह दृश्यदर्शनाभावीं केला जातो. विषयरूपीं जो उपाधि, त्याचा त्याग करून निर्वाह केला असतां एकान्तज्ञान उत्पन्न होऊन परमसुखाची प्राप्ति होते, आणि चमत्कार असा आहे कीं, मनोनाश आपोआप घडून येतो. मनाचा नाश झाला म्हणजे परमानंदस्वरूपाची प्राप्ति झाली आणि आत्मरूप प्रकट झालें असें समजावें. सकल दृश्यदर्शनांच्या भेटीमध्यें अशा प्रकारची अंतर्दृष्टि स्थिर केली असतां स्वस्वरूपाची भेट होते.

विषयाच्या योगानें जें सुख उत्पन्न होतें, त्याचा निर्वाह जर विषयत्याग करूनहि करितां येईल, तर आत्मसुखास पारावर नाहीं असें समजावें. या पृथ्वीवर सुख म्हणून जें कांहीं बोलतात तें खरोखर आत्मसुखच समजावें. विषयांमध्यें हें सुख परमेश्वरानें अल्प ठेविलें आहे, परंतु त्याचा परिणाम असा झाला आहे कीं, अखिल जीव त्या अल्पसुखाच्या मागें लागून, सुख काय तें विषयांतच आहे असें मानूं लागतात, व शेवटीं फशीं पडतात. ह्यास उत्कृष्ठ दृष्टान्त म्हटला म्हणजे आकाशाचा होय. घटाकाश, मठाकाश, इत्यादि परिच्छिन्न आकाश असतां संपूर्ण सुखांची प्राप्ति होणार नाहीं हें उघड आहे. घटाकाशामध्यें जलादि प्रवाही पदार्थ ठेवितां येतात, घटाकाशामध्यें गृहकर्मादि व्यवहार घडतात. तथापि परिच्छिन्न आकाशामध्यें तितकेंच ( नियमित ) सुख प्राप्त होणार. विषयसंबंधानें आत्मसुखाची तीच स्थि-

ति झाली आहे. विषयासारखें सुख होतें खरें, परंतु वर दिलेल्या आकाश—दृष्टांतावरून तें अपूर्ण होतें हें उघडच आहे. सर्व जगांतील मनुष्यें विषयसुख हें अपूर्ण आहे हें न जाणून त्यामध्येंच निमग्न होतात व आत्मसुखास आंचवतात. परंतु ज्ञानी पुरुष स्वस्वरूपीं स्थिर होऊन आत्मसुखसंपन्न होतात. याकरितां दृश्यदर्शनाच्या संबंधानें जें सुख उत्पन्न होतें त्याचा अनुभव तद्भावीं घेणें ही आत्मसुखाची खूण समजावी.

आत्मसुखाची आणखी एक खूण अशी आहे कीं, ती समजल्याबरोबर पूर्ण ब्रह्मानंद होऊन चित्तास समाधान वाटतें. ही खूण पुढील वचनांत दिली आहे:—

शुद्धं सदसतोर्मध्ये पदं लब्ध्वाऽचलंच तत् ॥
सबाह्याभ्यन्तरं विश्वं मा गृहाण विमुञ्च माम् ॥ १

—**योगवासिष्ठ**

याचा अर्थ असा कीं—या सृष्टीमध्यें घटापटादि अखिल दृश्य पदार्थ जेवढे म्हणून आहेत ते सर्व संत होत, म्हणजे सत्तारूपी होत. या सर्व संत वस्तूंच्या पोटीं जी सत्ता म्हणून आहे तेंच ब्रह्म होय. घटपटादि पदार्थांचें जें आहेपण तेंच ब्रह्म होय. आतां स्वस्वरूपाचें ज्ञान होण्याकरितां घटापटादि पदार्थांचा त्याग करून केवळ सत्तेचा मात्र अनुभव येण्याचा प्रयत्न करावा. त्याचप्रमाणें आकाशपुष्प, वंध्यासुत इत्यादि जे असंत म्हणजे अभावरूपी पदार्थ आहेत, त्यांमध्यें असणारा जो अभाव तो ब्रह्मस्वरूप होय. सर्व पदार्थांचें जें नाहींपण तेंच चैतन्य होय. वर सांगितलेले जे संत व असंत पदार्थ त्यांचे ठायीं अचल, अढळ, बाह्य व अभ्यन्तरीं एकरूप असें

शुद्ध ज्ञान आढळतें. संत वस्तूंच्या योगानें असंत वस्तूंचें ज्ञान करून घेणें, किंवा असंत वस्तूंच्या योगानें संत वस्तूंचें परिज्ञान होणें ही आत्मस्वरूपाची खूणगांठ होय.

सहजास्थितीचें स्वरूप पुढील वचनावरून स्पष्ट होईलः—

द्रष्टृदर्शन दृश्यानि त्यक्त्वा वासनयासह ॥
दर्शनं प्रथमाभासमात्मानं केवलं भज ॥ १

—**योगवासिष्ठ**

याचा अर्थ असा कीं—द्रष्टा, दृश्य, आणि दर्शन, आणि दृश्यपदार्थांविषयीं उत्पन्न होणाऱ्या वासना या सर्वांचा त्याग केला असतां आत्मस्वरूपाची खूण पटते. प्रथमतः अहंकार चैतन्याशीं मिश्रित होतो, तेणेंकरून मनोवृत्ति क्षुब्ध होतात, आणि तदनंतर नेत्रादि जीं इंद्रियें, तीं दृश्यपदार्थास झोंबतात व यासच दर्शन असें म्हणावें. अहंकाराचें मनाशीं जें मिश्रण तेंच **द्रष्टेपण** होय व नेत्रादिकांचें बाह्यपदार्थांशीं जें संमीलन तें **दर्शन** होय. सर्व वासनांसहित द्रष्टा, दर्शन व दृश्य हीं टाकून दिलीं असतां ब्रह्मस्वरूपाचा अनुभव येतो. द्रष्टा दृश्याकार होण्यापूर्वींच जो अंतःकरणामध्यें स्वतःसिद्ध प्रकाश असतो तेंच ब्रह्मस्वरूप होय. नेत्रादि इंद्रियांच्या वृत्ति दृश्य पदार्थास झोंबण्यापूर्वींच जी प्रकाशस्थिति असते, तेंच **चैतन्य** होय. हा स्वतःसिद्ध प्रकाश म्हणजे **आत्मप्रकाश** होय, कारण आत्मा स्वयंप्रकाश आहे हा सिद्धांत श्रुतींमध्यें पदोपदीं आढळतो. नेत्रेंद्रिय रूपास प्रकाशित करण्यापूर्वीं जो स्वयंप्रकाश उत्पन्न होतो तीच परब्रह्माची खूण समजावी. याकरितां द्रष्टा, दर्शन, आणि दृश्य हीं वासनांसहित टाकिलीं असतां चैतन्यस्वरूप प्रकट होतें.

पूर्वोक्त वचनांत आत्म्याचें भजन म्हणून सांगितलें आहे, त्याचें विज्ञान होणें अवश्य आहे. आपणाहून दुसरा कशाचाहि भास न होणें, आपणावांचून अणुमात्राचाहि स्पर्श न होणें, हेंच आत्म्याचें खरें भजन होय. यास उत्कृष्ट दृष्टांत म्हटला म्हणजे कर्पूर आणि अग्नि ह्यांचा होय. कर्पूर व अग्नि यांचा संयोग झाला असतां इतकें सामरस्य होऊन जातें कीं दोहोंपैकीं कांहींच उरत नाहीं. त्याच रीतीनें आत्म्याचें अखिल सृष्टीशीं संमेलन झालें असतां त्यासच आत्मभजन म्हणतात. मुळीं भजन शब्दाचा अर्थच एथें अमंळ चमत्कारिक आहे. चांदण्यानें ज्याप्रमाणें चंद्रास भजावें, साखरेनें गोडीस भजावें, त्याप्रमाणें आत्मभजनाची स्थिति आहे. आत्मभजन म्हणजे पूर्ण सामरस्य होय. सर्वदा ब्रह्माकार असणें व प्रपंच सत्य न भासणें हेंच **आत्मभजन** होय. सर्वदा ब्रह्मरूप असणें आणि देहात्मबुद्धीचा स्पर्श न होणें अशा रीतीनें चैतन्य प्रकट झालें असतां, अभेदबुद्धि उत्पन्न होऊन आत्म्याची ओळख होते.

यानंतर श्रीमत् वासिष्ठानीं सहजस्थितीची एक अद्भुत खूण वर्णन केली आहे. त्या खुणेचा जीवमात्रास अनुभव असतो; परंतु अज्ञानामुळें आत्म्याची ओळख होत नाहीं. ही खूण इतकी सुगम व सोपी आहे कीं ती जाणल्याबरोबर परमानंदाची प्राप्ति होते. ही खूण पुढील श्लोकांत वर्णिली आहे:—

निद्रादौ जागरस्यांते यो भाव उपजायते ॥
तं भावं भावयन्साक्षादक्षय्यानंदमश्नुते ॥ १

—**योगवासिष्ठ**

या वचनाचा अर्थ असा कीं—जागृति अवस्थेच्या अंतीं जेव्हां सुषुप्तीचा प्रवेश होऊं लागतो, त्या संधीस जें सुख प्राप्त होतें तें ब्रह्मरूप होय. कारण ती निर्विकार अवस्था असते. सर्व देहेंद्रियादि प्रपंचाचा व सर्व प्रकारच्या वृत्तींचा उपसंहार ज्या अवस्थेमध्यें होतो, ती निर्विकल्पसमाधीची खूण होय. सर्व प्रपंचाचा नाश होऊन लय, विक्षेप इत्यादि दोष नष्ट होऊन जें उर्वरित राहतें तें ब्रह्म होय. ही स्थिति केवळ आनंदरूपच होय. या स्थितीचा अनुभव आत्मानुभवी जे योगी त्यांसच पूर्ण होतो. जागृति अवस्थेचे शेवटीं व सुषुप्तीचा प्रवेश होण्याचे अगोदर फारच चमत्कार होतो. या अवस्थेंत नैय्यायिक मतानें पुरीतति नामक नाडीमध्यें मनाचा लोप होतो. प्रथम इंद्रियाच्या वृत्ति आपआपल्या इंद्रियांमध्यें प्रवेश करतात; तदनंतर इंद्रियांचा मनामध्यें लय होतो, व मन संकल्प करीनासें होतें. ज्याप्रमाणें अस्तमानकालीं सूर्याचीं किरणें सूर्यमंडळांत प्रवेश करितात व तें मंडळ सूर्यामध्यें समावलें जातें, त्याप्रमाणें ही अवस्था असते. मन, इंद्रियें व इंद्रियांच्या वृत्ति हीं मनुष्यांस चलन देणारीं मुख्य तत्त्वें होत. करचरणविहीन असा अरुण सूर्यरथांत बसला असतां तत्काळ त्रिभुवन हिंडून येतो. तसेंच पवनाचें साहाय्य झालें असतां अग्नि त्रैलोक्य भस्म करून टाकितो, परंतु वायूचा अभाव असतां तोच अग्नि आपणच भस्म होऊन जातो. त्याप्रमाणें मनाचें इंद्रियांस सहाय्य मिळालें असतां त्रैलोक्यहि पुरत नाहीं.

सुषुप्ति अवस्था प्राप्त होऊं लागली असतां काय काय

चमत्कार होतात, याविषयीं एथपर्यंत निरूपण झालें. मन पुरीतति नाडीमध्यें प्रविष्ट झालें असतां इंद्रियांच्या वृत्ति लय पावतात, आणि इंद्रियेंहि मनामध्यें लय पावतात. अर्थात् इंद्रियें व मन ह्यांचा अभाव झाला असतां संकल्पविकल्पांस जागा रहात नाहीं. तेणेंकरून असा चमत्कार घडतो कीं, बुद्धीस स्वस्वरूपाची प्राप्ति होते. मन व इंद्रियें यांच्या प्रेरणेशिवाय कोणताहि व्यापार घडूं शकत नाहीं, याकारितां इंद्रियांचें नियमन करावें असा नियम पदोपदीं भगवद्गीतेमध्यें आढळतो.

तस्मात्त्वमिंद्रीयाण्यादौ नियम्य भरतर्षभ ॥
तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ॥ १

—भगवद्गीता

या वचनाचा अर्थ असा कीं—प्रथमतः इंद्रियांचें दमन करावें, आणि नंतर ज्ञानप्राप्तीची इच्छा करावी, व ज्या पुरुषाचीं इंद्रियें ताब्यांत असतात त्यास उत्तम गति प्राप्त होते. अशा रीतीनें इंद्रियें स्थिर झालीं असतां, सर्व इंद्रियांच्या वृत्तींनीं आपआपला व्यापार टाकिला असतां, आणि मन स्वस्थ झालें असतां, सुषुप्ति नसतांहि परमसुखाचा उपभोग घेणें हें तुरीय अवस्थेचें लक्षण होय. निद्रेमध्यें सुख असतें हें खरें आहे, परंतु त्याचें ज्ञान प्राण्यास असत नाहीं, म्हणून जागृति व सुषुप्ति यांच्या संधीमध्यें परमानंदाचा उल्हास होतो. परंतु हें आत्मसुख गुरुखुणेशिवाय अनुभवास येत नाहीं. या सुखाची महती अशी आहे कीं, या सुखापुढें पृथ्वीवरील सर्व सुखें तुच्छ होत. ह्या सुखाचा आत्म्यानें अनुभव घेणें यासच **साक्षात्कार** किंवा **स्वस्वरूपानंद** म्हणतात.

स्वस्वरूपाची ओळख झाल्यानंतर त्याच स्थितीमध्यें राहिलें असतां, अपूर्व आनंदाचा अनुभव येतो, त्याचें वर्णन पुढील श्लोकांत आहे:—

जडतां वर्जयित्वैकां शिलायां हृदयंच यत् ।।
अमनस्कं महाबाहो तन्मयो भव सर्वदा ।। १
प्रशान्त सर्वसंकल्पा या शिलावदवस्थितिः ।।
जाग्रन्निद्रा विनिर्मुक्ता सा स्वरूपस्थितिः परा ।। २

—योगवासिष्ठ

या वचनाचा अर्थ असा कीं—'अमनस्क' म्हणून जी एक अवस्था आहे, तिजमध्यें सर्व संकल्प विरून जातात व इंद्रियें, मन, अहंकार इत्यादिकांचा भास होत नाहीं. घटपटादि बाह्य पदार्थ किंवा विश्वपरंपरा याचें स्फुरण मनाला घडतच नाहीं. या अवस्थेस उत्तम दृष्टांत म्हणजे शिलेचा होय. जशी एकादी शिला निचेष्ट व संकल्पशून्य असते त्या प्रमाणें बाह्य आणि अभ्यंतरीं अत्यंत शुद्धता प्राप्त झाली असतां ह्या अमनस्क अवस्थेचा अनुभव घडतो.

या अवस्थेमध्यें असतां ज्ञानी पुरुषाचें चित्त पदार्थाकार कधींच होत नाहीं. एक वस्तु घ्यावी, दुसरी वस्तु टाकून द्यावी अशा प्रकारचा संकल्प उत्पन्न न होऊन निर्विकल्पता प्राप्त होते. सामान्य जनाच्या अंतःकरणांत नेहमीं कोणत्या तरी तऱ्हेचे संकल्प एकामागून एक उठत असतात. परंतु ज्ञानी पुरुषाचे सर्व संकल्प मावळून जातात, व त्यास ब्रह्माशिवाय कशाची स्फूर्ति होत नाहीं. या स्वरूपस्थितीमध्यें जागृति, स्वप्न किंवा सुषुप्ति या अवस्थांचा पूर्ण अभाव होतो. सर्व इंद्रियांच्या वृत्ति बाह्य

स्थूल पदार्थांमध्यें जेव्हां गुंतून पडतात तेव्हां जागृदवस्था प्राप्त होते, व यासच **विक्षेप** असें म्हणतात. इंद्रियांच्या वृत्ति लीन झाल्या असतांहि वासनांच्या जोरानें केवळ मनासच जेव्हां पदार्थाकारता भासते तेव्हां स्वप्नावस्था उत्पन्न होते. इंद्रियांच्या वृत्ति व मन या सर्वांचा लय होऊन स्थूल किंवा सूक्ष्म पदार्थांचें ग्रहण जेव्हां संभवत नाहीं, तेव्हां सुषुप्ति असस्था प्राप्त होते. परंतु या तिन्ही अवस्थांहून स्वरूपस्थिति श्रेष्ठ होय.

सर्वसंकल्पसंशांतौ प्रशांतघनवासनं ॥
न किंचिद्भवनाकारं तद्ब्रह्म परमं विदुः ॥ १

**—योगवासिष्ठ**

म्हणजे—स्वरूपस्थितीमध्यें निःशेष संकल्पांचें पूर्ण भस्म होतें, निबिड वासनांचा नाश होतो आणि विपरीताची भावना होत नाहीं. विषयाचें एकदां ग्रहण झालें म्हणजे संकल्प उत्पन्न होतो व या संस्काराच्या योगानें जें पदार्थस्फुरण होतें त्यासच **वासना** असें म्हणावें. आपण दिवसां नानातऱ्हेचे व्यापार करितों, आणि तें ज्ञान सुषुप्तीमध्यें जरी लीन होतें, तरी संस्काररूपानें तें मनांत राहून दुसरे दिवशीं उद्भव पावतें. अशा ज्या वासना त्यांस मर्यादाच नाहीं. म्हणून निबिड हें विशेषण दिलें आहे. अशा निबिड वासना निःशेष लीन झाल्या असतां फिरून विपरीतभावना घडत नाहीं. हीच खूण मनांत दृढ धरून या वृत्तीनें रहाणें तीच ब्रह्मस्थिति होय.

आपलें जें शुद्ध स्वस्वरूप त्यापासून ‘जीवोऽहं’ असें स्फुरण प्रथम होऊन, नंतर ‘मी ब्राह्मण, मी गृहस्थ, मी बहिरा, मी पंगु’ अशा प्रकारचे संकल्प उठतात. ए-

काच ब्रह्माच्या ठायीं स्त्री, पुरुष, अश्व, गज, रथ, अशा तऱ्हेच्या विपरीत भावना उठून त्या भावना दृढ झाल्या म्हणजे वासनांच्या लहरी उत्पन्न होतात, आणि सर्वत्र प्रपंचभान होऊं लागतें. याकरितां संकल्प, भावना आणि वासना या पूर्णपणें लीन झाल्या असतां ब्रह्मस्थिति आपोआप साध्य होते. हीच **निर्विकल्पसमाधि** होय. या अवस्थेहून वरिष्ठ त्रिभुवनांतहि सांपडणें दुर्लभ आहे.

निर्विकल्प समाधीचें साधन करीत असतां अनेक विघ्नांची बाधा साधकास होत असते, त्यांपैकीं चार प्रकार वेदान्तशास्त्रांत मुख्यत्वेंकरून वर्णिले आहेत. हे दोष एकदां नीट समजले असतां अर्थात् त्या वाटेनें साधक जाणार नाहीं. उघडच आहे कीं, अन्न आणि विष एकत्र केलीं असतां, नेणता त्याचें ग्रहण करील, परंतु जाणता तत्काल पानावरून उठून जाईल. याकरितां हे दोष समजणें अवश्य आहे.

अस्य निर्विकल्पस्य लयविक्षेपकषायरसस्वादलक्षणाश्चत्वारो विघ्नाः संभवन्ति ।
**—वेदान्तवाक्य**

याचा अर्थ असा कीं—लय, विक्षेप, कषाय आणि रसास्वाद हीं निर्विकल्पसमाधीस चार विघ्नें आहेत. यांपैकीं

तत्र लयस्तावदखंडवस्त्वनलंबनेन चित्तवृत्तेर्निद्रा ।
**—वेदान्तवाक्य**

हें **लयाचें** लक्षण होय. या अवस्थेमध्यें साधकास बाह्य प्रपंचाचें अनुसंधान जरी सुटलें, तरी स्वस्वरूपाचा आश्रय न मिळाल्यामुळें चित्तवृत्ति अज्ञानांत बुडून जाऊन गाढ निद्रा लागते. चित्ताचा स्वभावच असा आहे कीं, कशाचा तरी आश्रय केल्याशिवाय तें उगीच राहूं श-

कत नाहीं. तेव्हां अर्थात् ध्येयाचा आश्रय सुटल्याबरोबर चित्त मूढ सुषुप्तीमध्यें लीन होतें. हा दोष इतका भयंकर आहे कीं, अनेक साधक याच्या तावडींत सांपडले आहेत. स्वस्थ बसलें कीं झोंप आलीच म्हणून समजावें. शमदमादि कठिण मार्ग क्रमून व क्रोधादि रिपूंस जिंकूनहि अखेरीस साधकावर निद्रा घाला घालिते. हा दोष उत्पन्न होण्याचीं मुख्य कारणें दोन आहेत. एक अभ्यासाचें अल्पत्व आणि दुसरें तमोगुणाचें प्राबल्य. याकरितां अभ्यास रूढ करून व चित्ताचें संबोधन संपादून हा दोष दूर करावा.

निर्विकल्पसमाधीचें दुसरें विघ्न विक्षेप होय. याचें लक्षण पुढील वेदान्तवाक्यांत आढळतें:—

अखंडवस्त्वनवलंबनेन चित्तवृत्तेरन्यावलंबनं विक्षेपः।

—वेदान्तवाक्य

म्हणजे अखंड वस्तु जो परमात्मा त्याचें अनुसंधान चालविलें असतां, वृत्तिरूप ज्ञान चित्तास ग्रासून टाकितें. नंतर मुख्य वस्तु सोडून मन प्रपंचाकार होऊं लागतें. जे विषय टाकून साधक ध्यानस्थ बसतो, त्याच विषयांच्या चिंतनांत तो गर्क होऊन जातो. सर्व विषय दुःखजनक आहेत या तत्त्वाचा पूर्ण अनुभव येऊन देखील साधक आपली ध्यानस्थिति सोडीत नाहीं, तरी कुत्र्याप्रमाणें वांतान्नाचेंच चर्वण करीत बसतो. असो. या दोषास **विक्षेप** असें म्हणतात. वैराग्य पूर्ण बाणलें नाहीं तर हा दोष उत्पन्न होतो आणि विरक्ति दृढ झाली असतां लयास जातो.

तिसरें विघ्न कषाय होय. याचें खरें स्वरूप न सम-

जल्यामुळें या स्थितीसच भ्रमानें लोक समाधि समजतात.

लयविक्षेपाभावेऽपि चित्तवृत्तेः ।
रागादिवासनायाः स्तब्धीभावात् ।
अखंडवस्त्वनलंबनं कषायः ।

—वेदान्तवाक्यानि

याचा अर्थ असा कीं—साधक स्वस्वरूपाकार चित्तवृत्ति करीत असतां, विषयाचे ठायी जी प्रीति संस्काररूपानें रहाते त्या विषयरागानें चित्तवृत्ति स्तब्ध होते. हा विषयराग जरी सूक्ष्म असला, तरी तेणेंकरून स्वरूपानुसंधान घडत नाहीं. वैराग्यबलानें विक्षेप गेला, व अभ्यासबलानें लय बुडाला, परंतु सूक्ष्म विषयप्रीति मनांत राहिल्या कारणानें आत्मानुभव प्राप्त होत नाहीं. प्रपंचाकार चित्तवृत्ति होत नाहीं, निद्राहि येत नाहीं, स्वरूपावस्थान पावत नाहीं, अशी चमत्कारिक तटस्थता उत्पन्न होते. या दोषास **कषाय** असें म्हणतात. याचें मुख्य कारण प्रज्ञामांद्यच होय. तेणेंकरून सूक्ष्म विषयराग राहून निचेष्टपणा अंगीं येतो आणि स्वस्वरूपाचा प्रकाश होत नाहीं. विषयांचे ठिकाणीं दोषदर्शन व दीर्घ अभ्यास केल्यानें हें विघ्न टाळतां येतें.

निर्विकल्प समाधीचें चवथें विघ्न रसास्वाद होय. याचें लक्षण येणेंप्रमाणें आहे:—

अखंडवस्त्वनवलंबनेन चित्तवृत्तेः ।
सविकल्पकानंदास्वादो रसास्वादः ।

—वेदान्तवाक्यानि

म्हणजे—साधक चित्तवृत्ति स्वस्वरूपाकार करीत असतां, अखंड वस्तूचें अवलंबन न घडून, सविकल्प आ-

नंदच भोगतो. या दोषास **रसास्वाद** म्हणावें. एथें अखंड वस्तु म्हणजे काय व सखंड वस्तु म्हणजे काय हें समजणें अवश्य आहे. जेव्हां ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय, किंवा ध्याता, ध्यान, ध्येय इत्यादि त्रिपुटि स्फुरत नाहीं व आपणासहित एकात्मता होऊन भेदभाव नष्ट होतो, तेव्हां अखंड वस्तु साध्य झाली असें जाणावें. जेथें देणें घेणें आनंदाचेंच होतें, आनंदाचा भोग आनंदेंकरूनच होतो, व भोक्ता, भोग्य व भोगाणें उरत नाहीं, तेथें अखंड वस्तु सिद्ध होते. अशा स्थितींत चित्त निरालंब होऊन सर्वत्र ब्रह्मदर्शन घडतें. परंतु अशा रीतीनें जनीं वनीं ब्रह्मावांचून आणुमात्र दुसरें कांहीं नसून, आपण ज्ञाता, वस्तु ज्ञेय, आणि ज्ञान व्यापार, अशी जी विभागकल्पना तीच सखंडता समजावी. या तऱ्हेनें अखंडास त्रिखंड करून टाकिल्यानें, अखंडाचें अनुसंधान तुटतें व साधकास ज्ञातेपणाचे सुखाचा अनुभव येऊन, रसास्वाद दोष उत्पन्न होतो. खरोखर पहातां अखंड वस्तूच्या ठिकाणीं संकल्पमात्राचा उद्भव होऊं शकत नाहीं म्हणून या दशेस निर्विकल्प असें म्हणावें, आणि याखेरीज इतर स्थिति सविकल्प जाणावी. ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय ह्या त्रिपुटीची स्फूर्ति म्हणजे सूक्ष्म संकल्प घडतो, आणि ही त्रिपुटि विरून गेली असतां निर्विकल्प स्थिति पूर्ण होते. ध्येय पदार्थाचा अनुभव होऊन ध्यात्यास हर्षनिर्भर होणें हीच रसास्वादाची विशेष खूण जाणावी.

रसास्वाद या दोषाचा आणखी एक अर्थ करितात तो येणेंप्रयाणें:—आनंद म्हणजे दुःखापासून निवृत्ति होय. जसें, एकाद्या पुरुषाच्या डोकीवर भार असतो तोंपर्यंत

त्यास दुःख होतें, परंतु तो भार खालीं ठेवल्याबरोबर त्या पुरुषास सुखप्राप्ति होते. त्याप्रमाणें साधकास आरंभीं विक्षेपजन्य दुःख होत असतें, परंतु त्या दुःखापासून निवृत्ति झाली कीं जो आनंद होतो त्याचा अनुभव म्हणजे रसस्वाद होय. या आनंदानुभवानेंच जर साधक तृप्त झाला, तर निरुपाधिक ब्रह्मानंदाचा अनुभव त्यास होत नाहीं. याकरितां केवळ दुःखनिवृत्तिजन्य जो आनंदानुभव तो दोष समजावा. हाच रसास्वाद होय.

या चार दोषांची तुलना करून पाहतां, रसास्वाद हा कोमल प्रकार असल्यामुळें यापासून आत्मसुखास फारसा व्यभिचार घडत नाहीं. यामध्यें त्रिपुटीचें स्फुरण होत असतें, एवढीच अपूर्णता रहाते, परंतु लय, विक्षेप आणि कषाय हे फार अनर्थकारक समजले पाहिजेत. रसास्वाद हा दोष जरी कांहीं कालपर्यंत राहिला तरी सावधानपणें अभ्यास केला असतां निर्विकल्प दशा पुरी बाणते.

ह्या चारी दोषांपासून दूर राहिलें असतां ब्रह्मस्थिति सहज प्राप्त होते. या स्थितीसच वर शिळेची उपमा दिली आहे, तथापि ही उपमा केवळ प्रपंचशून्यतेपुरतीच घेतली पाहिजे. एरव्हीं पहातां शिळा कठिण, जड व अप्रकाश आहे, आणि आत्मा अजड व स्वप्रकाश आहे. ह्या स्थितीस वेदान्तशास्त्रांत **अमनस्क** किंवा **उन्मनी** असेंहि म्हटलें आहे, कारण मनाचा पूर्ण लय झालेला असतो. या स्थितींत असतां प्रपंचाची कथा विरून जाते आणि स्वरूपाची प्राप्ति होते.

आतां सर्वत्र पसरलेला जो आत्मा त्याचें लक्षण काय हें पाहूं.

सत्यानंदचिदाकाशस्वरूपः परमेश्वरः ॥
मृद्भाजनेषु मृदिव सर्वत्रास्त्यपृथक् स्थितिः ॥ १

—योगवासिष्ठ

याचा अर्थ असा कीं—सत्ता, आनंद आणि ज्ञान एतद्रूपी तूं असून सर्वांचा नियन्ताहि तूंच आहेस. तुझ्याशिवाय ब्रह्मांडांत कांहींएक नसून, मृत्तिकेपासून जशीं मडकीं तयार होतात त्याप्रमाणें ब्रह्माशिवाय कोणती वस्तु उत्पन्न होत नाहीं.

वाचारंभणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम् ।—छांदोग्य

म्हणजे नाम आणि विकार हा केवळ वाचेचाच विस्तार होय. मूळ मृत्तिका तेवढी खरी, तिजशिवाय घटादि पदार्थ असत्य होत, तद्वत् सर्वत्र एक ब्रह्म असून बाह्याभ्यंतरीं इतर वस्तु मिथ्या आहेत. नामरूपात्मक जें कांहीं दिसतें तें फक्त वाचारंभण होय.

अस्ति भाति प्रियं रूपं नाम चेत्यंशपंचकम् ॥
आद्यत्रयं ब्रह्मरूपं जगद्रूपं ततो द्वयम् ॥ १
निस्तत्त्वे नामरूपे द्वे जन्मनाशयुते च ते ॥
बुद्ध्या ब्रह्मणि वीक्षस्व समुद्रे बुदबुदादिवत् ॥ २

—योगवासिष्ठ

म्हणजे सत्ता, ज्ञान आणि सुख हे तीन अंश मिळून ब्रह्म होतें आणि विश्व नामरूपात्मक आहे. नाम आणि रूप हीं जन्ममरणयुक्त असून मिथ्या होत. समुद्रांतील बुडबुड्याप्रमाणें, सत्यब्रह्माचे ठायीं नामरूप आहेत.

भरिताशेषदिक्कुंभमनंताकाशनिर्भरम् ॥
एकं वस्तु जगत्सर्वं चिन्मात्रं वारि चांबुधिः ॥ १

—योगवासिष्ठ

म्हणजे—त्रैलोक्यांत आंत-बाहेर आकाश भरलेलें

आहे, व त्याशिवाय कांहींएक रिकामें नाहीं. दिशा, विदिशा, गिरि, गुहा, कुंज इत्यादि सर्व ठिकाणीं आकाश पसरलेलें आहे. त्याप्रमाणें सर्व विश्व चिदंशानें भरलेलें आहे. समुद्राच्या लाटा जशा समुद्रच होत, तद्वत् कोणतीहि वस्तु ब्रह्माशिवाय आढळत नाहीं.

निस्तरंगोऽतिगंभीरः सांद्रानंदसुधार्णवः ॥
माधुर्यैकरसाधार एक एवास्ति सर्वतः ॥ १

—योगवासिष्ठ

याचा अर्थ असा कीं—सर्व प्रकारच्या आनंदांहून ब्रह्मानंद श्रेष्ठ होय. विषयरस नानाकार आहेत, परंतु ब्रह्म एकरस व निर्विकार आहे. सर्व गोड पदार्थांपेक्षां ब्रह्मामध्यें अधिक गोडी आहे. ब्रह्मानंद निश्चल असून गंभीर आहे. ब्रह्मानंद वाणीनें व्यक्त कारितां येत नाहीं, त्याचा अनुभव ब्रह्मवेत्तेच जाणतात. ब्रह्माशिवाय कोणताहि पदार्थ नजरेस येत नाहीं.

यदेवं ब्रह्मणो रूपं ततं बुद्धमखंडितम् ॥
तदा निस्तीर्णसंसारः परमेश्वरतां गतः ॥ १

—योगवासिष्ठ

म्हणजे—याप्रमाणें निर्दिष्ट केलेलें अखंड, अनंत, सर्वव्यापक जें परमात्मस्वरूप तें पूर्णपणें जाणिलें असतां संसाराचा नाश होऊन परमेश्वरता प्राप्त होते. स्वस्वरूप ब्रह्माच्या ठिकाणीं अज्ञानाचा लेशहि संभवत नाहीं, मग त्याचें कार्य जो प्रपंच त्याची वार्ता कशास पाहिजे?

समस्तमेव ब्रह्मेति भाविते ब्रह्म वै पुमान् ॥
पीतेऽमृतेऽमृतमयः को नाम न भवेदिति ॥ १

—योगवासिष्ठ

याचा अर्थ असा कीं—हें समस्त जग केवळ ब्रह्मरूप

जो पहातो तो स्वतः ब्रह्ममय होतो यांत कांहीं नवल नाहीं. उघडच आहे, जो अमृताचें प्राशन करितो तो अमृतमय कां बरें होणार नाहीं? कोणताहि पुरुष ज्या वस्तूचें सेवन करितो तद्रूप त्याचें शरीर बनतें, हा तर सिद्धान्त आहे. विषाचें सेवन केलें असतां विषमय होऊन मृत्यु उभा राहतो. याकरितां मी देहरूपी आहें अशी जो भावना करितो तो देहरूपच रहातो, परंतु ब्रह्माची भावना ज्याला साधते तो ब्रह्मरूप बनून जातो.

आतां परमात्मस्वरूपाचा अनुभवच नाहीं तर त्याची भावना कशी होईल? या शंकेचें समाधान पंचदशीमध्यें उत्कृष्ट केलें आहे. तें असें:—

अनुभूतेरभावेऽपि ब्रह्मास्मीत्येव चिंत्यताम् ॥
अप्यसत्प्राप्यते ध्यानान्नित्याप्तं ब्रह्म किं पुनः ॥ १

—**विद्यारण्य**

म्हणजे—अनुभव जरी नसला, तरी 'मी ब्रह्म आहें' असें सर्वदा चिंतन करावें. अशा चिंतनापासून ब्रह्मप्राप्ति कशी होते याविषयीं असें प्रमाण आढळतें कीं, भुंग्याच्या अभ्यासामुळें किड्यास भुंग्याचें रूप प्राप्त होतें, म्हणजे अविद्यमान् वस्तूचा लाभ होतो. असें जर आहे, तर नित्य आपणाजवळ असणारें जें ब्रह्मस्वरूप त्याची प्राप्ति ध्यानानें घडते यांत कांहींएक आश्चर्य नाहीं. याकरितां सर्वत्र ब्रह्म दिसूं लागलें असतां स्वतःचें ब्रह्मरूप होतें याविषयीं यत्किंचित् संशय नाहीं.

यानंतर श्री **वसिष्ठानीं रामचंद्रास** सर्वत्र ब्रह्मदर्शन होण्यास अवश्य साधनें कोणतीं व ब्रह्माभ्यास कसा करावा हें उत्कृष्ट रीतीनें सांगितलें आहे.

भव्योसि चेत्तदेतस्मात्सर्वमाप्नोषि निश्चयात् ॥
नो चेद्ब्रह्मपि संप्रोक्तं त्वया भस्मनि हूयते ॥ १

—योगवासिष्ठ

म्हणजे—हे रामचंद्रा, सर्व जग परमात्माच आहे अशी भावना करून राहिलें असतां परमानंदस्वरूप होशील. तूं भव्य म्हणजे साधनचतुष्टयसंपन्न आहेस, म्हणून सर्व ब्रह्म आहे अशा भावनेनेंच परमात्मता पावशील. स्वतःसिद्ध तूं ब्रह्म आहेसच, तेव्हां ' परमात्मता पावशील ' हें म्हणणें केवळ औपचारिक आहे. साधनचतुष्टयानें चित्तशुद्धि होते, तेव्हां ह्या उपायानें ब्रह्मस्थिति पावते. एवढें वर्म जर समजलें नाहीं, तर सहस्त्रावधि इतर उपाय केले असतांहि राखेंत होम केल्याप्रमाणें व्यर्थ होतात. आरसा जर स्वच्छ असेल, तरच त्यांत मुख दिसेल; आरशाच्या पाठीवर मुख दिसणार नाहीं किंवा त्यामध्यें सूर्यचंद्रांचें प्रतिबिंब पडणार नाहीं. याकरितां सर्वत्र ब्रह्मदर्शनास चित्तशुद्धि हेंच मुख्य कारण होय. साधनचतुष्टयानें अंतःकरणशुद्धि झाली नसेल, तर नानाप्रकारचे उपाय व्यर्थ होतात. चित्तशुद्धीशिवाय गुरूला अगुरुत्व होतें, महावाक्यास अवाक्यत्व येतें. चित्तशुद्धीशिवाय केलेलीं साधनें व्यर्थ कशीं होतात याविषयीं श्री वसिष्ठानीं अनेक दृष्टान्त दिले आहेत. वाळूचें तेल काढणें, विधवेस भूषित करणें, वंध्यापुत्रास आकाशपुष्पांनीं नटविणें, सशाच्या शिंगाचें औषध करणें, आकाशास पायऱ्या बांधणें, कापुराचें काजळ करून मेघास रंगविणें—इत्यादि क्रियांप्रमाणें चित्तशुद्धीखेरीज ब्रह्मप्राप्तीची इच्छा फुकट आहे.

श्री वसिष्ठ म्हणाले कीं, हे रामचंद्रा अखिल विश्व ब्रह्मरूप आहे अशा भावनेनें ब्रह्मप्राप्ति होते हें ज्ञान तुला परिपूर्ण झालें आहे, याकरितां ब्रह्माभ्यास कसा करावा हें सांगतों.

तच्चिंतनं तत्कथमन्योन्यं तत्प्रबोधनम् ॥
एतदेकपरत्वं च ब्रह्माभ्यासं विदुर्बुधाः ॥ १

**--लीलोपाख्यान**

याचा अर्थ असा कीं---तूं जर एकटा असशील, तर एकान्तांत बसून ब्रह्मस्थितीनें रहा; तुझ्याकडे कोणी शिष्य आला असतां त्याला आत्मस्वरूप निवेदन कर; तुजसमान ज्ञानी जर भेटला, तर एकमेकांस ब्रह्मनिरूपण करावें; आणि सर्व पदार्थांचें तात्पर्य एक आहे ही खूण ध्यानांत धरावी. प्रपंचानुसंधान टाकून व हेंच विचाराचें अवस्थान करून ब्रह्मसाधन संपादावें. जर या व्यापारांत विघ्नें येतील, तर मनोनाश, वासनाक्षय इत्यादि पूर्वनिरूपित साधनांचा अवलंब करावा.

हा ब्रह्माभ्यास दृढ कसा करावा हें भगवद्गीतेंत उत्कृष्ट निरूपित केलें आहे.

मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम् ॥
कथयंतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च ॥ १

**—भगवद्गीता**

म्हणजे—साधक एकटा असेल, तर माझ्या स्वरूपीं चित्तवृत्ति घालावी, व अशी स्थिति साधावी कीं बाहेर विषयाकडे चित्त फिरून जाऊंच नये. प्राणावरोध करूनहि जर मन स्थिर न राहील, तर मला प्राण समर्पण करून रहावें. प्राण शब्दाचा अर्थ इंद्रिय असा जर घे-

तला, तर सर्व इंद्रियें आणि मन यांचें नियमन करून माझ्या स्वरूपीं अर्पण करावीं. माझ्या स्वरूपांत मन आणि प्राण समर्पण केले असतां मद्रूप प्राप्त झालेंच असें समजावें. दारा, सुत, गृह, प्राण, मन इत्यादि माझ्या स्वरूपीं अर्पण केल्यावर ब्रह्मप्राप्ति तत्काल होते. या परमानंदाची गोडी अशी आहे कीं, तिजवरून सर्व विषयसुखाचे प्रकार ओंवाळून टाकावे. म्हणून या आनंदाचा अनुभव घेत असतां विश्वाची स्फूर्ति होतच नाहीं. एकांत नसून समान ज्ञानी भेटला असतां परस्परांनीं माझ्या स्वरूपाचें निरूपण करावें, म्हणजे दोघेहि ब्रह्मानंदांत डोलूं लागतील. योगी लोक एकमेकांस मत्स्वरूपाचा बोध करीत असतां देहादि वार्ता विसरून जातात. आणि त्यांच्या आनंदास ब्रह्मांड देखील पुरत नाहीं. अशा व्यापारांत ज्ञानी लोक देहभाव देखील विसरतात आणि त्यांचे बोलहि बंद होतात, मग ब्रह्मानंदांत निमग्न होऊन बाहेर काय चाललें आहे याचें भानसुद्धां त्यांला रहात नाहीं. जर सच्छिष्य भेटला, तर अत्यंत प्रेमानें व उत्साहानें त्याला मत्स्वरूपाचें कथन करावें. माझ्या स्वरूपाचें वर्णन चाललें असतां मीच तेथें प्रकट होतों असें जाणावें. अशा चार प्रकारचा ब्रह्माभ्यास निरंतर करीत असतां माझ्याशिवाय कशाचेंहि भान साधकास होत नाहीं, मजवांचून त्यास कांहींएक दिसत नाहीं, केवळ माझ्याच स्वरूपीं रममाण होऊन देहादिकांची आठवणसुद्धां होत नाहीं.

अशा प्रकारचा ब्रह्माभ्यास निरंतर चालविला असतां ज्ञानी लोक परमानंदांत डोलत असतात व त्यांस बाह्य पदार्थांचें स्मरणहि होत नाहीं. एथें निरंतर शब्दाचा

अर्थ नीट ध्यानांत आणिला पाहिजे. ज्यास अंतर म्हणजे खळ मुळींच नाहीं ती **निरंतर** स्थिति होय. ब्रह्माभ्यास करीत असतां अवकाश घडूं देतां कामा नये व विषयाकडे मन लेशभर लागूं देऊं नये. अशा रीतीनें निरंतर ब्रह्माभ्यास चालला असतां असंभावनादि दोष नष्ट होऊन शुद्ध ज्ञान उत्पन्न होतें. ज्ञानप्राप्तीनंतर आनंदांत निमग्न होऊन साधक ब्रह्ममय होऊन जातो. भगवद्गीतेमध्यें ब्रह्माभ्यासाचें फल उत्कृष्ट वर्णिलें आहे.

तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ॥
ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥ १

**—भगवद्गीता**

याचा अर्थ असा कीं—अत्यंत प्रीतीनें निरंतर जे मला भजतात त्यांला मी असें ज्ञान देतों कीं जेणेंकरून ते मजप्रत पावतील.

श्री **वसिष्ठ** म्हणाले कीं, हे **रामचंद्रा**, याप्रमाणें आत्मतत्त्व जाणून सर्वत्र ब्रह्मदर्शन साध्य होण्याकरितां नेहमीं ब्रह्माभ्यास केला पाहिजे हा विचार चित्तांत असूं दे. हा अभ्यास केला नाहीं तर कोटि उपाय व्यर्थ होत. ब्रह्मप्राप्ति व्हावी असेल तर, मीच ब्रह्म आणि सर्व विश्व ब्रह्म आहे ही भावना करावी. ही भावना पूर्ण झाली म्हणजे मोक्षप्राप्ति होऊन सर्व बंधापासून मुक्ति होते.

अहमेव परंब्रह्म वासुदेवाख्यमव्ययम् ॥
इतःस्यान्निश्चयान्मुक्तो बद्ध एवान्यथा भवेत् ॥ १

**—भगवद्गीता**

म्हणजे अविनाशी असा जो परमात्मा तो मीच आहें असा निश्चय गुरुकृपेनें ज्याचा झाला आहे तो खरा

मुक्त होय, व असा ज्याचा निश्चय झालेला नाहीं तो संसारपाशानें बद्ध समजावा.

यावर श्री रामचंद्रानीं असा प्रश्न केला कीं, परब्रह्माचें ज्ञान कोणत्या उपायानें होईल? प्रत्यक्ष दिसणारा जो देह तो खोटा कसा मानावा? आणि प्रत्यक्ष दृष्टीनें अखिल विश्व भासत असतां परमात्म्याची भेट कशी होईल? तेव्हां श्री वसिष्ठ बोलले कीं, आत्मानुभव पुरता बाणण्यासाठीं पुढील तत्त्व नीट लक्षांत ठेवावें:—

नेति नेतीति नेतीति शेषितं तत्परं पदं ॥
निराकर्तुमशक्यत्वात्तदस्मीति सुखी भव ॥ १

—योगवासिष्ठ

याचा अर्थ असा कीं—'नेति नेति' या श्रुतिवचनानीं दृश्यमात्राचा निषेध केला जातो; म्हणजे जें जें आपण पहातों किंवा ऐकतों तें ब्रह्म नव्हे. तसेंच ज्या पदार्थास आकार प्राप्त झाला आहे, किंवा ज्याला उत्पत्ति व विनाश आहेत तें नश्वर होय. श्रुतींत असें म्हटलें आहे कीं, स्थूलदेह, लिंगदेह इत्यादि सर्व दृश्यपदार्थ नाशवंत होत. पंचमहाभूतांच्या समुदायास **स्थूलदेह** म्हणतात; आणि चक्षु, श्रोत्र, त्वचा, जिव्हा, घ्राण हीं पांच ज्ञानेंद्रियें; कर, चरण, जिव्हा, गुद, उपस्थ हीं पांच कर्मेंद्रियें; प्राण, अपान, व्यान, उदान, समान हें प्राणपंचक; मन व बुद्धि इत्यादिकांचीं सूक्ष्मरूपें मिळून **लिंगदेह** बनतो असें पूर्वीं सांगितलेंच आहे. तेव्हां स्थूल व लिंग शरीरें हीं ब्रह्म नव्हत, परमात्मा केवळ साक्षिस्वरूप होय. उघडच आहे कीं, जो एकाद्या पदार्थाचा द्रष्टा असतो तो स्वतः दृश्यपदार्थ होणार नाहीं. यावरून द्रष्ट

आणि दृश्य हीं भिन्न होत. अशा रीतीनें 'नेति नेति' या श्रुतिवचनानीं सर्व दृश्यपदार्थांचा निरास होऊन स्थूलसूक्ष्माचा साक्षी जो उरतो तो स्वप्रकाश आत्मा होय. याविषयीं पुढील वचन प्रमाण आहेः—

अस्थूलं अनणु अऱ्हस्वं अदीर्घं अचक्षु अश्रोत्रं अपाणिपादं ।

—**बृहदारण्यक**

ज्याच्या अज्ञानानें विश्वाभास होतो व ज्याच्या ज्ञानानेंच सर्वांचा निरास होतो तें परमपद जाणावें. ज्याचें श्रुतीनें निराकरण संभवत नाहीं, इंद्रियें ज्यास जाणत नाहींत, व सर्वांचा निषेध करून उरलेला जो साक्षी तो **परमात्मा** समजावा.

याविषयीं सुरेश्वराचार्यांनीं बृहदारण्यक उपनिषदावरील वार्तिकांत सविस्तर विचार केला आहे.

अध्यात्मादि-पदार्थेभ्यो विरक्तं स्वात्मनि स्थितं ॥
तन्न पश्यंत्यहो कष्टं दौर्भाग्यं दुष्टचेतसाम् ॥ १

—**वार्तिक**

म्हणजे—अध्यात्म, आदिदैव, आधिभूत जे पदार्थ त्या सर्वांहून निराळें, दृश्यमात्राहून निराळें असें निर्मळ आत्मस्वरूप आहे. या स्वरूपाची भेट व्हावी असल्यास कांहींएक साधनांचा अवलंब न करितां फक्त अंतरंगीं आपणच पहावें म्हणजे झालें. आपल्या देहाचे आंत आत्मस्वरूप पहावें म्हणजे लागलींच त्याची भेट होते. असा स्वतःसिद्ध, प्रत्यक्षभूत, स्वप्रकाश आत्मा असून भाग्यहीन लोक त्यास जाणत नाहींत. ही परमदुःखाची गोष्ट आहे. अज्ञानी लोकांचें कसें उफराटें नशीब आहे

तें पहा ! प्रत्यक्ष, निर्विकार असें आत्मस्वरूप टाकून देऊन नश्वर जे जे विषय ते ते गोड मानितात !

प्रत्यक्षगोचरं देवं लोकं चातिप्रमादितं ॥
दृष्ट्वा श्रुतिः शिरस्ताडमनुक्रोशाति दुःखिता ॥ १

—वार्तिक

याचा अर्थ असा कीं—देव प्रत्यक्ष गोचर असतां, लोकांस व्यामोह कसा पडला आहे पहा ! आत्मा स्वयंप्रकाश असून त्यापासून सर्व पदार्थांस प्रकाश प्राप्त होतो. आणखी असा चमत्कार आहे कीं, लोक जें म्हणतात कीं आह्मांस ब्रह्माचें ज्ञान होत नाहीं त्या अज्ञानासहि आत्म्यापासूनच प्रकाश मिळतो. या अज्ञानामध्यें आणि सुषप्तींतील अज्ञानामध्यें फार फरक आहे, तो असा कीं—सुषुप्तींत अज्ञानाचें भान होतच नाहीं, परंतु दुसरें जें अज्ञान त्याचें भान सर्वदा होत असतें, व हें भान ज्याच्या योगानें घडतें तो परमात्मा होय. तेव्हां अशा प्रकारचा प्रत्यक्ष गोचर आत्मा आपणापाशीं असून त्याला मूर्ख लोक जाणीत नाहींत, म्हणून श्रुतींस अत्यंत कळवळा येऊन कपाळ फोडून घेतात. आपणास न जाणून व आत्मसुख टाकून देऊन लोक विषयासक्तींत गुंग होतात हें पाहून 'आतां शरण कोणास जावें' अशीं चिंता श्रुतींस पडते.

प्रत्यक्षतममप्येनं वितमस्कतया स्थितं ॥
अहो कष्टं न पश्यंति कं याम शरणं वद ॥ १

—वार्तिक

म्हणजे, प्रत्यक्ष पदार्थांच्या तीन कोटि आहेतः—एक प्रत्यक्ष, दुसरी प्रत्यक्षतर आणि तिसरी प्रत्यक्षतम होय.

घट, पट, देह इत्यादि प्रत्यक्ष होत; मन बुद्धि हीं प्रत्यक्षतर होत; आणि सर्वांचा साक्षी जो स्वप्रकाश आत्मा तो प्रत्यक्षतम होय. घटपटादि पदार्थ प्रत्यक्ष आहेत हें खरें, परंतु ते जड असून चक्षुरादि प्रमाणानेंच प्रकाशमान होतात. या पदार्थांस स्वयंप्रकाश नसून त्यांपासून इतर वस्तूंसहि प्रकाश मिळत नाहीं म्हणून त्यांस जड असें मानावें; परंतु आत्मा अशा प्रकारचा नाहीं. तो स्वप्रकाश असून इतरांसहि प्रकाशित करितो, व अज्ञानाचा नाश करितो. अशा परमात्म्यास वेडे लोक जाणत नाहींत, तेव्हां 'आम्हीं कोणास शरण जावें, आमचें समाधान कोण करील?' अशा रीतीनें श्रुति दैन्य भाकीत असतात. आपल्या हातांत कंकण असून तें पाहण्याकरितां आरशाची इच्छा करणें, किंवा आपणास जिव्हा आहे किंवा नाहीं हें जिव्हेनेंच लोकांस पुसणें, यासारखेंच स्वयंप्रकाश आत्मा आपणापाशीं असून त्याविषयीं अज्ञानी असणें हें होय. या सर्वांचा मथितार्थ असा आहे कीं, दृश्याचा निरास करून जें उरतें तें आत्मस्वरूप जाणावें.

नंतर संप्रज्ञात समाधीमध्यें जें त्रिपुटीचें भान सर्वदा होत असते त्याचा नाश कसा करावा हें श्री वसिष्ठांनीं उत्कृष्ट निरूपित केलें आहे. ध्याता, ध्येय, ध्यान या त्रिपुटीस सांडून 'मी एक आहें' असा आध्यास केला असतां ब्रह्मरूपता प्राप्त होते.

एकमेवाद्वितीयम् । —बृहदारण्यक

अशा भावनेनें राहिलें असतां साधक परमात्मस्वरूपाप्रत पोहोंचतो. अखंड ब्रह्म एक असून त्रिपुटीची क-

ल्पना करणें हें पाप होय, मग सृष्टीमध्यें अनेक विभाग करणें ह्यांत दोष किती घडतात त्यांची सीमाच नाहीं. अखंड ब्रह्माचे ठायीं ईश्वरत्व कल्पून त्यास ध्येय मानणें व आपणास जीव समजून ध्याता म्हणणें हेंच अखंडाचें खंडपण होय. याकरितां हे रामचंद्रा, तूं अशा प्रकारची कल्पना करूं नको. आपण जो जीवात्मा त्याचें शोधन करून पाहिलें असतां तो परमात्माच आहे असें लक्षांत येतें, व दोहोंमध्यें भिन्नपणा रहात नाहीं. जीव आणि शिव, अथवा जीवात्मा आणि ईश्वर यांचा अभेद सिद्ध करण्यास प्रथमतः दोघांचे विशिष्ट गुण सांडिले पाहिजेत. म्हणजे, परिछिन्नत्व, किंचिज्ज्ञत्व, कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादि जे जीवाचे धर्म आणि सर्वशक्तिमत्व, सर्वज्ञत्व इत्यादि जे ईश्वराचे धर्म ते टाकून दिले असतां शुद्ध जीवशिवांचें ऐक्य प्रत्ययास येतें. मग अशा रीतीनें अनुभवाचा अभ्यास केला म्हणजे आपणच परमात्मस्वरूप आहों असें कळतें. म्हणून हे रामचंद्रा, आपलें ध्यातेपण विसरून ध्येय आणि ध्यान यांची वार्ता सोडून दे. जर ध्यानयोग करणेंच असेल तर तो पुढील प्रकारानें करावा.

सोऽहं चिन्मात्रमेवेति चिंतनं ध्यानमुच्यते ॥
ध्यानस्य विस्मृतिः सम्यक् समाधिरभिधीयते ॥ १

—योगवासिष्ठ

याचा अर्थ असा कीं, समाधि आणि ध्यान यांची लक्षणें येणेंप्रमाणें आहेतः—त्वं पदाचें संशोधन केल्यावर जें निरुपाधिक शुद्ध चिद्रूप उरतें तेंच मी असें जें चिंतन त्याला **ध्यान** म्हणतात. चित्त स्वस्वरूपाकार करणें व तें तेथून उठून जर प्रपंचाचा अध्यास करूं लागलें

तर त्यास फिरून स्वस्वरूपाकार करणें ह्यास ध्यान म्हणावें. ह्या ध्यानाचा विसर पडून स्वस्वरूपांत स्थिर राहतां येणें हेंच **समाधीचें** लक्षण होय.

ब्रह्माकारमनोवृत्ति प्रवाहोऽहंकृतिं विना ।।
संप्रज्ञातसमाधिः स्याद् ध्यानाभ्यासात्प्रकर्षतः ।। १

**—योगवासिष्ठ**

म्हणजे, ध्यानाचा अभ्यास परिपूर्ण झाला असतां, 'मी जीव' हें अनुसंधान सुटून जातें. अहंकाराचा त्याग झाल्यावर तैलधारेप्रमाणें अखंड चित्तवृत्तीचा प्रवाह ब्रह्माकार होऊन त्या अवस्थेमध्यें स्थैर्य प्राप्त झालें असतां संप्रज्ञात समाधीचा अनुभव येतो. मग स्वस्वरूपाकार झालें कीं प्रपंचभान नष्ट होतें आणि ह्याच स्थितीला उन्मनी म्हणतात. संकल्पविकल्प सुटले असतां चित्ताचें चित्तपण हरपून जातें. चित्ताचें अचित्त झालें कीं संसारादि भय नष्ट होतें. चित्तास जर चित्तपण असेल तर दृश्यस्फुरण घडेल आणि शोकमोहादि उत्पन्न होतील.

कामः संकल्पो विचिकित्सा श्रद्धाऽश्रद्धा धृतिरधृति-र्ह्रीर्धीर्भी-रित्येतत्सर्वं मन एव ।

**—बृहदारण्यक**

या श्रुतींत वर्णिलेलीं सर्व मनाचीं स्वरूपें होत. मनाचे योगानें काम, संकल्प, संशय, श्रद्धा, धैर्य, लज्जा, भीति वगैरे वृत्ति उद्भव पावतात, परंतु मनाचा अभाव झाल्याबरोबर या सर्व वृत्तींचा लय होतो. वेदान्तशास्त्रांत निर्दिष्ट केलेली जी अद्भुत अवस्था ती हीच होय, आणि याच अवस्थेमध्यें योगी सर्वदा रममाण होतात.

कल्पान्तवायवो वान्तु यान्तु चैकत्वमर्णवाः ।।
तपन्तु द्वादशादित्या नास्ति निर्मनसःक्षितिः ।। १

**—योगवासिष्ठ**

म्हणजे, कल्पान्तींचा वारा एकत्र मिळून सैरावारा वाजूं लागला, तरी ब्रह्मनिष्ठास त्याचा दरारा वाटत नाहीं. त्रैलोक्याचा गोळा करून वायु अंतराळीं नेऊं लागला तरी अमनस्कास भय वाटत नाहीं. सर्व समुद्र एकवट होऊन त्रैलोक्य बुडवूं लागले तरी योग्यास त्याची क्षिति वाटत नाहीं, कारण त्यास बाह्य वस्तूंचें भानच मुळीं नसतें. बारा सूर्य एक होऊन संपूर्ण तेजानें प्रकाशमान् होऊं लागले व तेणेंकरून ब्रह्मांडाची राखरांगोळी होऊं लागली, तथापि त्याचें भान ब्रह्मनिष्ठास होत नाहीं. मन स्वस्वरूपांत गर्क झालें असतां अशा प्रकारचे विकार घडत नाहींत. दृश्य वस्तूंची प्रतीति मनामुळें होते, चराचरसृष्टि मनामुळेंच सत्य भासते. सर्व प्रपंच मनानेंच उत्पन्न झालेला असतो, व त्यामध्यें उत्तम, मध्यम, कनिष्ठ ह्याहि कल्पना मनानें निर्माण होतात. मग एका पदार्थाची लज्जा वाटते, दुसऱ्या पदार्थापासून भय उत्पन्न होतें, असे प्रकार घडूं लागतात. तेंच मन स्वस्वरूपाकार होऊन मनपणास मुकलें असतां प्रळयाची थोरवी समजणार कोण? अखिल जगांतील विभागकल्पना मनापासून संभवतात, मग मनाचाच क्षय झाला असतां जगाच्या उत्पत्तीचें किंवा प्रळयाचें भान कसें होईल? स्वस्वरूपांत मन विरून गेल्यावर चिदानंद परमात्मा अन्तर्बाह्य भासूं लागतो. ह्या स्थितीस उन्मनी असें म्हणतात.

श्री वसिष्ठानीं याप्रमाणें उन्मनीचें वर्णन करून सांगितलें कीं, हे रामचंद्रा, या जगाची उत्पत्ति केवळ मनापासून होते. तेंच मन उन्मन झालें असतां विश्वभान

होत नाही. याकरितां जग मिथ्याभूत असून सर्वव्यापक ब्रह्म मात्र सत्य होय. सर्व वस्तु ज्ञानरूपी असून विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय हीं ज्ञानाच्या ठायीं व्यक्त होतात. हें आत्मस्वरूप जाणून योगी मुक्तावस्थेंतच सर्वदा राहतात, म्हणून हे रामचंद्रा, तूं याच स्थितींत नेहमीं रहा. मग देह असो किंवा जावो, स्वस्वरूपस्थितींत असतां देहाची आठवण नाहींशी होते. ज्ञानसूर्याचा उदय झाल्यावर देहात्मबुद्धिरूप अंधकार नष्ट होतो आणि आत्मप्रभाव प्रादुर्भूत् होतो. ज्याप्रमाणें एकाद्या रंकाला राज्यपदावर बसविला असतां त्याचें रंकपण लयास जातें, किंवा कीटकी भृंगीपणातें पावली असतां पूर्वीच्या देहाला विसरते, त्याप्रमाणें योगी आत्मस्वरूपांत निमग्न असतां त्याला देहाचा विसर पडतो.

अहिनिर्वलर्नीमहिरात्मतया जगृहे परिमोक्षणतस्तु पुरा ॥
परिमुंचति तामुरगः स्वबिले न निरीक्षति चात्मतया नु पुनः ॥१

**—योगवासिष्ठ**

याचा अर्थ असा कीं,—महासर्प आपल्या देहावरील कात देहच समजून तिचें रक्षण करीत असतो व तिच्या संगानें सुखदुःख पावतो, परंतु ती जेव्हां टाकून देतो तेव्हां तिजवरील त्याचें स्वत्व तत्काल नाहींसें होतें. मग बिळाबाहेर जातां येतां त्यानें ती कात जरी पाहिली, तरी तिचा स्वीकार तो मुळींच करीत नाहीं. तसेंच अज्ञानदशेंत स्वकीय असा मानिलेला जो देह तो आत्मज्ञानाची खूणगांठ पडल्यावर आपला असें कोणी समजणार नाहीं. तेव्हां अर्थात् देहसंबंधी सहा उर्मि आपल्या शिरावर कोणीहि घेणार नाहीं हें उघड आहे. सहा उर्मि म्ह-

टल्या म्हणजे क्षुधा, तृषा, शोक, मोह, जन्म आणि मरण ह्या होत. यांपैकीं क्षुधा व तृषा हे प्राणाचे धर्म, शोक व मोह हे मनाचे धर्म, आणि जन्म व मरण हे देहाचे धर्म होत. ब्रह्मनिष्ठ पुरुष हें षडुर्मियुक्त शरीर आपलें असें मानीत नाहीं, तरी केवळ साक्षित्वरूपानें राहून आत्मप्रीतींत गर्क असतो. देहाचें अनुसंधान सुटल्यावर, देहबुद्धीपासून उत्पन्न झालेल्या मी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, गृहस्थ, यति इत्यादि भावना आपोआप विरून जातात. ज्याप्रमाणें उन्हांतून चालत असतां आपणास आपल्या सांवलीचें भान होत नाहीं, तद्वत् आत्मनिष्ठास देहाची आठवण नसते. ब्रह्मनिष्ठ पुरुष देही असून देहातीत असतो, आणि केवळ साक्षित्वानें रहात असल्यामुळें कर्माचा लेप त्याला घडत नाहीं.

ज्ञानी पुरुषाचा आणखी एक असा चमत्कार आहे कीं, भगवद्गीतेंत निरूपण केल्याप्रमाणें तो कर्माकर्माचा भेद जाणत नाहीं. निषिद्ध कर्म केलें असतां पाप लागेल किंवा विहित कर्म केल्यानें पुण्य जोडेल अशा बुद्धीनें जर कर्माचरण केलें तरच तें फलोत्पादक होतें. बरें-वाईट असें जो जाणतो, विधि-निषेध जो समजतो, तोच कर्माचें फल भोगतो. परंतु ज्ञानी पुरुषाचें वर्तन पुढील वचनांत वर्णिल्याप्रमाणें असतें:—

दोषबुद्ध्याबयातीतो निषेधान्न निवर्तते ॥
गुणबुद्ध्या च विहितं न करोति यथाऽर्भकः ॥ १

—**योगवासिष्ठ**

म्हणजे—ज्याचें स्वस्वरूपांत अवस्थान असतें, त्याला देहाचें अनुसंधान मुळींच रहात नाहीं. लोकदृष्टीनें जरी

देहधारी असला तरी त्याला देहाचा संग बाधूं शकत नाहीं, कारण तो सर्वस्वीं अकर्ता व अभोक्ता असतो आणि केवळ प्रारब्धाच्या योगानें त्याच्या देहास चलन प्राप्त होतें. ज्ञानविक्षेपामुळें जें प्रारब्ध अवशिष्ट राहिलें असतें त्यामुळें त्याचें कर्माचरण घडत असतें. निषिद्ध कर्म केलें असतां दोष जडेल या भीतीनें तो त्या कर्मापासून परावृत्त होत नाहीं, कारण तो कर्तृत्वाभिमानशून्यच असतो. पापकर्म केलें असतां दोष लागेल या बुद्धीशिवायच त्याच्या हातून पाप घडत नाहीं. अनेक पूर्वजन्मांमध्यें नाना साधनांनीं सत्कर्माचें अनुष्ठान व निषेधाचें परिवर्जन घडल्यामुळें अगोदरच त्याचें चित्त सुसंस्कृत झालेलें असतें. व्रतबंध होण्यापूर्वीं कदाचित् निषेधाचरण घडो, परंतु तो संस्कार झाल्यावर द्विजाकडून तसें आचरण घडणें अशक्य आहे. गायत्री मंत्राचा महिमा असा आहे कीं, द्विजत्व एकदां बाणलें म्हणजे त्याचा संस्कार देहपात होईपर्यंत कायम रहातो. तसेंच जन्मांतरींच्या संस्कारामुळेंच ब्रह्मनिष्ठ निषेधाचें परिवर्जन व विहिताचें आचरण करीत असतो. परंतु तो त्यांचे गुणावगुण पहात नाहीं. पूर्वसंस्काराच्या योगानेंच, फलाशा न धरितां स्नानसंध्या, देवतार्चन, यज्ञ, दान वगैरे सत्कर्मानुष्ठान त्याच्या हातून घडत असतें. अमुक केलें असतां दोष जाईल किंवा अमुक केलें नसतां प्रत्यवाय उपजेल, तसेंच अमुक केलें असतां अभीष्ट फल मिळेल, अशा प्रकारचा विचार त्याचे मनांत येत नाहीं. पूर्वप्रवाहानें स्वभावतः त्याचें विहिताचरण होतें आणि निषेधाचें परिवर्जन त्याचेकडून सहजगत्या घडतें. ज्ञानी पुरुष

स्वतः उभयातीत असतो; म्हणजे पापपुण्य, विधिनिषेध हें कांहीं न जाणून स्वभावेंकरून उचिताचें आचरण करितो. जसें एकादें बालक संकल्पविकल्पविरहित असून संस्कारेंकरून बाह्यचेष्टा करितें;——त्यामध्यें कांहीं चेष्टा शुभ असतात, कांहीं अशुभ असतात, परंतु बालक त्याचे गुणदोष जाणत नसतें;—देवाची पूजा केली असतां हित होईल किंवा न केली असतां दोष जडेल हीं दोन्ही बालक नेणून फक्त संस्काराच्याच जोरानें खेळत असतें, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुष इंद्रियांच्या वृत्ति न जाणूनच कर्में करितो व त्याला कर्म आणि अकर्म किंबहुना अखिल विश्व ब्रह्मरूप दिसतें. त्याला ब्रह्मावांचून कांहींच दृष्टोत्पत्तीस येत नाहीं.

सर्वत्र ब्रह्मदर्शन होण्यासाठीं श्री वसिष्ठानीं पुढील निरूपण सुरेख रीतीनें केलें आहे. ब्रह्माच्या पोटीं विश्व सांचलें आहे, ब्रह्माशिवाय जगताची गोष्टच समूळ खोटी समजली पाहिजे. जसा एकादा लांकडाचा खांब सुतारानें कोरावयाच्या अगोदर त्यामध्यें पुतळ्या असतात, फक्त सुतारानें तो कोरल्यावर पुतळीची आकृति दिसून शोभा येते. याचा अर्थ असा कीं, खांबाशिवाय पुतळीचा ठसाच होत नाहीं, तद्वत् सर्व जगत् ब्रह्माचे ठायीं मुरून गेलें असतें. तसेंच आकाशामध्यें सर्वत्र वायु भरलेला असतो, तो हालला म्हणजेच शरीरास अनुभव येतो, एरव्हीं तो नाहींच असें वाटतें. पृथ्वीच्या पोटीं शरावादिक असतात, कापसामध्यें वस्त्रें असतात, सुवर्णामध्यें अलंकार असतात, तद्वत् सकल विश्वाचें अधिष्ठान ब्रह्म होय. जें ज्याचें अधिष्ठान, तें तद्रूप होय असा सिद्धान्त

आहे. उंसामध्यें जशी साखर, गुळामध्यें गोडी, आकाशामध्यें शब्द, शिंपेमध्यें रुपें, त्याप्रमाणें विश्व ब्रह्मामध्यें रहातें व केवळ अज्ञानानें भिन्न दिसतें. याकरितां प्रथम सर्वांचा निरास करावा, नंतर स्वस्वरूप साधावें, म्हणजे सर्वत्र पूर्णब्रह्माचें दर्शन घडतें.

सौम्यांभसि यथा वीचिर्न चास्ति न च नास्ति च ॥
तथा जगद्ब्रह्मणीदं शून्याशून्यपदं गतं ॥ १

--**योगवासिष्ठ**

याचा अर्थ असा कीं--समुद्रामध्यें जल कधीं गंभीर दिसतें, कधीं लहरीमुळें अनेक भासतें. समुद्रावर लाटा असोत किंवा नसोत, सर्वत्र उदक एकच असतें. त्याप्रमाणें विश्व असो किंवा नसो, ब्रह्माशिवाय कशाची प्रतीति होत नाहीं. भेददृष्टीनें विश्व भासतें, परंतु ज्ञानदृष्टीनें ब्रह्मच असतें. आरसा पुढें ठेविला असतां दुसरें मुख; एरव्हीं मुख एकच असतें. आरशांत नवें मुख उत्पन्न होत नाहीं किंवा आरसा हातांत घेतला नसतां मुख लपत नाहीं. यावरून पहातां आरशाच्या उपाधीमुळें एका वस्तूमध्यें द्वैतबुद्धि प्रकट झाली, तद्वत् उपाधीचा त्याग केला असतां निरुपाधिक एकटें ब्रह्म उरतें. अज्ञानोपाधीनें अनेक प्रकारांनीं विश्व दिसलें तरी उपाधिनाशानें ब्रह्म एकच आहे. अनेक अवयव, अनंत रूपें, नाना आकार, भिन्नभिन्न नामें जरी व्यक्त झालीं, तरी अधिष्ठानाच्या ज्ञानानें अखिल भेद नष्ट होतो. या रीतीनें विचार करितां मन, बुद्धि, प्राण, इंद्रियें, देह, इंद्रियव्यापार इत्यादि सर्व ब्रह्मरूपच होत. पाताल, मृत्युलोक, स्वर्ग, दिशा, विदिशा, नभोमंडल वगैरे जगदाभास परमात्माच होय.

स एवाधस्तात्स उपरिष्टात्स पश्चात् स पुरस्तात्स दक्षिणतः स उत्तरतः स एवेदं सर्वमिति । —छांदोग्य

म्हणजे—पुत्रदारादि जिवलग पदार्थ,—देणें, घेणें, चालणें, बोलणें, निद्रा, जेवणें इत्यादि इंद्रियव्यापार परमात्मस्वरूप होत. श्रवण, श्रवणीय, श्रोता,—भोगणें, भोग्य, भोक्ता,—ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान इत्यादि सर्व त्रिपुटि ब्रह्मरूप होत. जें जें आपण पाहतों, ऐकतों, ज्या ज्या पदार्थांचें अवघ्राण करितों, ज्याची चव घेतों ते सर्व परमात्मरूप होत. हातांचें देणें घेणें, चरणांचें चालणें, रतिसुख भोगणें, गुदाचा व्यापार, मनाचें संकल्पन, बुद्धीचें बोद्धव्यपण इत्यादि व्यापार ब्रह्मावेगळे कांहीं नव्हत. उदकामध्यें उदक घालावें, तों अगोदरच तें परिपूर्ण असतें, अशाच तऱ्हेची सर्व व्यापारांची स्थिति आहे.

किं करोमि क्व गच्छामि किं गृह्णामि त्यजामि किं ॥
आत्मना पूरितं सर्वं महाकल्पांबुना यथा ॥ १

—योगवासिष्ठ

याचा अर्थ असा कीं—देह, इंद्रियें, इंद्रियव्यापार इत्यादि सर्व पदार्थ ब्रह्मरूप असल्यामुळें येणें, जाणें, करणें, होणें हीं देखील आत्मरूप होत. प्रलयकालच्या उदकानें अखिल विश्व भरून जातें, त्याप्रमाणें आत्म्यानें सर्व जग व्यापून गेलें आहे, म्हणून सर्व क्रिया ब्रह्मरूप होत. श्री वसिष्ठ म्हणाले, हे रामचंद्रा, याकरितां जसा आहेस तसाच रहा, म्हणजे सहजस्थितीचा सर्वदा अनुभव येईल.

हें ऐकून श्री रामचंद्रास ब्रह्मस्थितीचा पूर्ण अनुभव येऊन देह रोमांचित झाला, प्रेमानें कंठ दाटून गेला,

डोळ्यांतून अश्रुपात चालला, हृदयाकाशांत आनंद न मावून इंद्रियद्वारा व्यक्त होऊं लागला, स्वेदकण शरीरावर दिसूं लागले. शुद्धतत्त्वाचें उत्थान होऊन परमानंदानें शरीर डोलूं लागलें. अद्वैतप्रतीति अशी झाली कीं देहाचा विसर पडला. रामचंद्राचा आनंद त्रिभुवनांत माईना. अशा प्रकारचे अष्टभाव उत्पन्न होऊन सत्त्वगुणांत विरून गेले, सत्त्वशान्तीमध्यें दृश्याचा लोप झाला. ही रामचंद्राची समाधि अवलोकन करून श्री वसिष्ठास परमानंद झाला. उघडच आहे कीं, शिष्य परिपूर्ण झाला म्हणजे गुरूच्या आनंदास पारावरच नाहीं. मग समाधीचें व्युत्थान करवून श्री वसिष्ठानीं रामचंद्रास आलिंगन दिलें आणि सांगितलें कीं, याच स्थितीचा अवलंब कर. हे रामचंद्रा, तूं धन्य आहेस, कारण अतिदुर्घट जी सहजस्थिति ती तुला प्राप्त झाली आहे. तुझ्या भाग्याची गणना नाहीं. असें म्हणून श्री वसिष्ठानीं रामचंद्रास फिरून पोटाशीं धरिलें, आणि दोघेहि एकमेकांच्या पोटीं जिरून जाऊन द्वैतभाव समूळ नष्ट झाला. पुत्रोत्पत्तीनें पित्यास जो आनंद होतो, तो, शिष्यास बोध उत्तम ठसला असतां गुरूस जो आनंद होतो त्यापुढें कस्पटासमान आहे. अशा तऱ्हेनें ऐक्यस्थितींत कांहीं वेळ राहिल्यावर अतिप्रयासानें त्यांची मिठी सुटली. मग श्री रामचंद्र म्हणाले, हे सद्गुरो, मी आनंदसागरांत बुडून गेलों, आतां दृश्याची स्फूर्ति घडत नाहीं, देहाचें अनुसंधान सुटून गेलें. परमात्म्याशिवाय अणुमात्र कशाचेंहि भान होत नाहीं. सर्वत्र आत्मानंद भरून गेला आहे, आपणाशिवाय वेगळें कांहीं उरलें नाहीं. हे सद्गुरो, तुझ्या प्रसादानें मीच

एकटा त्रिभुवनांत राहिलों आहें, माझ्याशिवाय दुसरें कांहीं दिसतच नाहीं, जनीं वनीं मीच एक आहें. क्रिया, कर्म, कारण भासत नाहीं; देहादि इंद्रियें, प्राण सर्व चैतन्यरूप झालीं आहेत. आतां मला कांहीं कर्तव्य उरलें नाहीं. माझ्याशिवाय वेगळी वस्तूच नाहीं. मी व्यापक, चिद्रूप, अनन्त झालों. क्रियादि समस्त व्यवहार माझ्याहून वेगळे भासत नाहींत. असें बोलतां श्री रामचंद्र सद्गदित होऊन समाधीमध्यें निमग्न झाले.

ही स्थिति पाहून श्री वसिष्ठ, विश्वामित्र, दशरथ व सर्व सभासद यांस परम हर्ष वाटला. समाधीचें व्युत्थान झाल्यावर दशरथानें रामलक्ष्मणांस विश्वामित्राचे स्वाधीन केलें, आणि सर्व सभासदांनीं जयजयकार केला.

# प्रकरण सोळावें

## उपसंहार

*-*-*

एक सकळांचा अंतरात्मा । विश्वीं वर्ते जो विश्वात्मा ।
द्रष्टा साक्षी ज्ञानात्मा । मानिती एक ॥ १

—रामदास

लोकमान्य झालेल्या योगवासिष्ठाच्या आधारानें अद्वैतविद्येची एकसारखी संगति दाखविणारा प्रबंध सहापासून पंधरापर्यंत प्रकरणांत संपूर्ण झाला. या प्रबंधावरून श्रुत्युक्त व श्रुतिबोधित जी आत्मविद्या तिचें परिज्ञान वाचकांस उत्कृष्ट होईल असा भरंवसा आहे. वैदिकधतर्मतत्त्वाचा पायाच वैराग्य होय. तीर्थाटनामुळें श्री

रामचंद्राच्या ठायीं वैराग्यवृत्ति परमावधीची बाणून गेली होती व हा अधिकार जाणून श्रीमद्वसिष्ठानीं पायरी पायरीनें आत्मविद्येची भूमिका सिद्ध करीत करीत अखेर शिष्यास अखंडानुभव आणून दिला. श्री रामचंद्रास सर्वत्र ब्रह्मदर्शन घडून अद्वैतरसाची कशी प्राप्ति झाली हें या प्रबंधावरून स्पष्ट होत आहे.

वर्णाश्रमप्रतिपालन, वेदान्तशास्त्राचें श्रेष्ठत्व, पुनर्जन्म, प्रारब्ध, संचित व क्रियमाण हे आर्यतत्त्वज्ञानाशीं व आर्यधर्माशीं संलग्न असलेले जे विषय त्यांचें निरूपण दोनपासून पांचपर्यंत प्रकरणांत केलें आहे.

चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ॥

या गीतावाक्यांत नमूद केल्याप्रमाणें चातुर्वर्ण्याची पद्धति आर्यसमाजाच्या मुळाशींच जखडलेली आहे. या पद्धतीनें श्रमविभाग होऊन अनेक तऱ्हेनें समजाचें कल्याण झालें आहे. यूरोपखंडाच्या इतिहासांत सामाजिक असंतोष (Socialism) नास्तिकपणा (Nihilism) वगैरे जे प्रकार आढळून येतात त्याचा भरतखंडात पूर्ण अभाव होण्यास चातुर्वण्यपद्धतिच मुख्य कारण आहे, असे उद्गार अनेक पाश्चात्य पंडितांनीं काढिलेले आहेत. शिवाय इंग्लंद वगैरे देशांत Poor laws दारिद्र्यविमोचनार्थ उपायांचा आश्रय जसा राज्यकर्त्यांस करावा लागतो तसा भरतखंडांत मुळींच अवश्य नाहीं, कारण एथें गरीब लोकांची तरतूद समाजाकडूनच होत असते. याकरितां सहस्त्रावधि वर्षें चालत आलेली ही घटना कायम राखून निरनिळ्या आश्रमांचा योग्य कालीं अवलंब करून कृतार्थ होणें हें प्रत्येक आर्याचें कर्तव्य होय.

उपोद्घातांत अद्वैतशास्त्राचा व योगशास्त्राचा प्राचीन काळापासून संक्षिप्त इतिहास देऊन वेदान्तशास्त्र हें नांव अद्वैतमतासच कां लागतें व रामानुजादि पंथांस कां लागत नाहीं हें स्पष्ट केलें आहे. वेदप्रतिपादित अद्वैतमत बादरायणानीं सूत्ररूपानें ग्रथित केलें व शंकराचार्यांनीं त्याची प्रसिद्धि आठव्या शतकांत भरतखंडभर केल्यावर अनेक कविवर्यांनीं व साधूंनीं त्याचा फैलाव सर्व प्रकारच्या लोकांत केला, असें जें प्रतिपादन उपोद्घातांत केलें आहे त्याचें आतां समर्थन करूं.

शंकराचार्यांनीं तात्कालीन मतवादींशीं वाद करून व भाष्यादि ग्रंथ लिहून कित्येक मतांचें अद्वैतमतास उपकारकत्व सिद्ध केलें आणि शाक्त, वैष्णव, शैव इत्यादि देवतोपासकांस उपासनेचें पर्यवसान अद्वैतप्रतीतींत कसें करावें हें शिकविलें. तसेंच पंचायतनपूजेचा प्रकार सुरू करून निरनिराळ्या उपासकांमधील द्वेष आचार्यांनीं मोडून टाकिला आणि इतर दर्शनांची वेदान्तशास्त्राशीं संगति दाखवून त्या शास्त्रास पूर्णदशेला आणिलें व त्यालाच सर्व लोकांस समजेल असें रूप देऊन त्याचा राष्ट्रधर्म बनवून सोडिला. ही जी आचार्यांनीं अपूर्व कामगिरी केली त्याचीं लवकरच उत्कृष्ट फळें निदर्शनास आलीं. इसवी सनाच्या नवव्या शतकांत बौद्ध धर्माचा भरतखंडांत बीमोड झाला, आणि बाराव्या शतकापासून पंजाब, बंगाल, उत्तरहिंदुस्थान, महाराष्ट्र वगैरे प्रांतांत अनेक उपदेशक व साधुपुरुष निर्माण होऊं लागले. उत्तरहिंदुस्थानांतील दोन साधु महाराष्ट्र देशांत प्रसिद्ध असून त्यांचीं कवनें या प्रांतांत आबालवृद्धांस विदित आ-

हेत. हे साधु म्हणजे तुळशीदास व कबीर होत. तुळशीदास हा वाल्मिकाचा अवतार व कबीर हा शुकाचा अवतार असें म्हणतात.

इसवी सनाच्या तेराव्यापासून अठराव्या शतकापर्यंत सहाशें वर्षांत महाराष्ट्र देशांत पुष्कळ कवि प्रसिद्ध झाले. साधुत्वाच्या दृष्टीनें पहातां मराठी कवितेचे तीन काल ठरवितां येतात. तेराव्या शतकांतील नामदेव--ज्ञानदेव यांचा काल हा पहिला, सोळाव्या शतकांतील एकनाथांचा काल हा दुसरा, व सतराव्या शतकांतील तुकाराम—रामदासांचा काल हा तिसरा होय. या तिन्ही काळांत भक्तिमार्गाची विलक्षण प्रगति झाली. तुळशीदास, कबीर, निश्चलदास व बहुतेक सर्व महाराष्ट्र कवि साधु असून शांकरमतानुयायी अतएव पूर्ण अद्वैती होते. आद्य महाराष्ट्रकवि जो मुकुंदराज त्याचे 'परमामृत' व 'विवेकसिंधु' हे दोन्ही ग्रंथ शांकरदर्शनाचा आधार धरून रचिले आहेत.

श्रीशांकरोक्तीवरी । मी बोलिलों मराठी वैखरी ॥
म्हणूनि एथ धरावी चतुरीं । शास्त्रबुद्धि ॥ १
ज्यां आपुली निजवाणी । पवित्र केली तिहीं वचनीं ॥
ते प्रीति पावो पिनाकपाणी । श्री मुकुंद म्हणे ॥ २

—मुकुंदराज

ज्ञानेश्वर आपणास—

भाष्यकारातें वाट पुसत ।

जाणारे असे म्हणवीत. रामानुजादि नवे धर्मपंथ उत्पन्न करणारांचीं मतें प्रचलित असून महाराष्ट्र व इतर साधु कवींनीं त्याचा अवलंब न करितां फक्त शंकरा-

चार्यांच्या अद्वैतमताचाच स्वीकार करून फैलाव केला ही गोष्ट फार महत्त्वाची असून त्यावरून शंकराचार्य-प्रतिपादित मताचा श्रेष्ठपणा सिद्ध होतो व सर्व भरत-खंडांतील श्रुतिसिद्धान्तानुरूप प्रवृत्ति कशी होती हें निर्विवाद व्यक्त होतें. ज्ञानेश्वर हे वेदान्ती म्हणजे अद्वैतमताचे असून त्यानींच महाराष्ट्रांत भागवत धर्माचा पाया घातला असें म्हटलें पाहिजे. अद्वैतमताचा भागवत धर्माशीं असणारा अपूर्व मिलाफ आधुनिक पंडितांच्या बुद्धीमध्यें आरूढ होणें अत्यन्त इष्ट आहे. अधुनिक पंडितांची अशी समजूत झालेली दिसते कीं अद्वैतमत कुचकामाचें असून भक्तिमार्ग काय तो श्रेष्ठ होय. या त्यांच्या वेडगळ समजुतीनें नवे नवे धर्मपंथ सुरू करण्याच्या भरीस ते पडत आहेत. परंतु त्यांतहि त्यांची मोठी चुकी होत आहे. ती अशी कीं, निराकार व निर्गुण देवाची एकदम उपासना घडणें अशक्य आहे, व एक धर्मास चिकटून न राहतां भिन्न भिन्न धर्मांचीं प्रमेयें एकवट करून बनविलेल्या देवाचीहि उपासना दुर्घट होय.

वास्तविक पहातां अद्वैताचें द्वैताशीं विलक्षण संमेलन नजरेस येतें व तें तुळशीदास, कबीर, निश्चलदास यांनीं हिंदी भाषेंत व महाराष्ट्र साधु कवींनीं मराठी भाषेंत व्यक्त केलें आहे. अद्वैताचें म्हणजे परमात्म्याचें ज्ञान द्वैताची म्हणजे सगुणाची उपासना केल्याशिवाय प्राप्त होत नाहीं. निर्गुण निराकार असा परमात्मा केवळ स्वसंवेद्य असून त्याचें ज्ञान श्रुतीशिवाय होणें अशक्य आहे, याकरितां परमात्म्याची उपासना बहिरंग साधनांनीं न होतां तो फक्त अनुभवगम्य रहातो. आत्म्याची उपासना म्हणजे

सर्वत्र ब्रह्मदर्शनच होय. उपासना जर करणें आहे तर ती सगुण देवतेची शक्य आहे. नारद एवढे ब्रह्मनिष्ठ असून भक्तीकरितां त्यांस द्वारकेस जाणें भाग पडे. भागवत धर्म जो म्हणतात तो प्रथम नारदानीं सुरू केला हें पुढील उताऱ्यावरून ध्यानांत येईलः—

नारदा तूं भगवद्रूप । तुझे भेटी करी निष्पाप ॥
तुवां कृपा केलिया अल्प । स्वयें चित्स्वरूप ठसावें ॥ १
तुझेनि भक्तिसि महिमा अमूप । तुझेनि वाढला भक्तिप्रताप ॥
तुझेनि भक्ति भगवद्रूप । तूं चित्स्वरूप निजनिष्ठा ॥ २
तूं भक्तिप्रकाशकु दिवटा । कीं भक्तिमार्गींचा मार्गद्रष्टा ॥
नारदा तुझा उपकार मोठा । भक्तींच्या पेठा वसविल्या तुवां॥ ३
मुख्य भागवतशास्त्र पूर्ण । तुवां व्यासासि उपदेशून ॥
प्रकट करविलें दशलक्षण । दीनजन उद्धरावया ॥ ४

—**एकनाथ**

ब्रह्मनिष्ठास सगुणाची आवड असणें ह्यावरूनच उपासनेचें अद्वैतास किती उपकारत्व असतें हें सिद्ध होतें. आणखी असा चमत्कार आहे कीं, अद्वैतशास्त्रांतील जो परमात्मा त्यास भागवतधर्मांत ' श्रीकृष्ण ' अशी संज्ञा दिली आहे. उदाहरणार्थ—

भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यंते सर्व संशयाः ॥
क्षीयंते चास्य कर्माणि तस्मिन् दृष्टे परावरे ॥ १

—**कठोपनिषद्**

हें जें काठकांत वचन आहे त्याचें रूपांतर श्रीमद्भागवतांत येणेंप्रमाणें आढळतें:—

भिद्यते हृदयग्रंथिच्छिद्यंते सर्व संशयाः ॥
क्षीयंते चास्य कर्माणि मयि दृष्टे परावरे ॥ १

—**भागवत**

या ठिकाणीं पूर्व वचनांतील परमात्माबोधक 'तस्मिन्' या पदाचे जागीं, दुसऱ्या वचनांत श्रीकृष्णद्योतक 'मयि' असें पद घातलें आहे. श्रुतींतील आत्मविषयक सिद्धान्त भागवतधर्मांत कृष्णपर केले आहेत.

तुकाराम अद्वैतरसाचा पूर्ण आस्वाद घेणारे होते, हें पुढील अभंगावरून स्पष्ट होईलः—

गोडीपणें जैसा गूळ । तैसा देव झाला सकळ ॥ १
आतां भजों कवणेपरी । देव सबाह्य अभ्यंतरीं ॥ २
उदका वेगळा । नव्हे तरंग निराळा ॥ ३
हेम अलंकारा नाम । तुका म्हणे तैसे आम्ही ॥ ४

—तुकाराम

अशा रीतीनें

एकमेवाद्वितीयम् —छांदोग्य
वाचारंभणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम् ।
—छांदोग्य

या तत्त्वांत जरी तुकाराम निमग्न असत, तथापि केव्हां केव्हां निर्गुणाची उपासना अवघड वाटून सगुण ब्रह्मापुढें प्रेमानें नाचल्याशिवाय त्यांचें समाधान होत नसे. याविषयीं पुढील अभंग मासलेवाईक आहेः—

अद्वैतीं तो माझें नाहीं समाधान । गोड हे चरणसेवा तुझी ॥ १
करूनि उचित देईं हेंचि दान । आवडे कीर्तन नाम तुझें ॥ २
देवभक्तपण सुखाचा सोहळा । ठेवूनि निराळा दावीं मज ॥ ३
तुका म्हणे आहे तुझें हें सकळ । कोणी एके काळीं देईं मज ॥४

—तुकाराम

नामदेव हा उद्धवाचा अवतार मानिला आहे. त्याच्या इतका आवडता भक्त श्री विठ्ठलास कोणीहि नव्हता.

इतकी त्याची उपासना दृढ असून, सद्गुरुप्रसादानें अद्वैतप्रतीति होईपर्यंत तो अपूर्णच राहिला. ह्याबद्दल नामदेवचरित्रांत एक प्रसिद्ध आख्यायिका आढळून येते, ती येणेंप्रमाणें:—

एकदां असें झालें कीं, कार्तिकी एकादशीकरितां संतमंडळी पंढरीस जमली. तींत निवृत्तिनाथानीं असें पाहिलें कीं गुरूस शरण गेला नाहीं असा एक नामदेव मात्र आहे. तर आज ही गोष्ट त्याला कळवावी अशा हेतूनें त्यानीं गोऱ्या कुंभाराकडे पाहून म्हटलें कीं, काका, आपणास कच्च्या—पक्क्या मडक्यांची परीक्षा असेलच! कारण आपला तो धंदा पडला. गोरोबानें तेव्हांच त्यांचा हेतु ओळखून म्हटलें कीं, होय, होय, तें माझें नित्याचेंच काम आहे. निवृत्तिनाथ म्हणाले कीं, बरें, तर मग परीक्षेस आरंभ करा. मग गोरोबानें हातांत थापटणें घेऊन संतांचे डोकीवर हाणूं लागला. तेव्हां प्रत्येकजण मार सहन करून उगीच बसला. नामदेवाची पाळी आल्याबरोबर, तो ओरडून म्हणाला कीं, काका, उगीच का मला मारितां? तें ऐकून संतमंडळी खदखदां हांसूं लागली. हा अपमान सहन न होऊन नामदेव लागलाच त्या मंडळींतून उठला, तो थेट देवळांत गेला आणि मोठ्यानें गळा काढून देवापुढें रडत बसला. तेव्हां देव त्यास म्हणाला कीं, नाम्या, अरे रडतोस का? नामा म्हणाला कीं, देवा! आजपर्यंत तुझी सेवा केली तिचें हें फळ मला मिळालें. संतमंडळीनें मला कच्चा ठरविला. इतकें बोलून नामदेव पुनः मोठ्यानें रडूं लागला. देव हांसून बोलले कीं, खरोखर तूं कच्चाच आहेस. तुला

वाटत असेल कीं मी तुजबरोबर बोलतों, खेळतों, जेवतों, पण हें कांहीं खरें नव्हे. कारण माझें स्वरूप याहून निराळें आहे, व तें सद्गुरूस शरण गेल्याशिवाय कळावयाचें नाहीं.

नामयासि बोले पंढरीनाथ । तुझें माझें एक चित्त ॥
जेवीं पुष्पांमाजी मकरंद । नाहीं द्वैत दोघांसी ॥ १
तेवीं तूं माझा जीवप्राण । नको बोलूं उदास वचन ॥
आतां सद्गुरूस शरण जाऊन । द्वैत खंडन करावें ॥ २

—महीपति

हे देवाचें निर्भीड भाषण ऐकून नामदेव चपापला, आणि शुद्धीवर येऊन म्हणाला कीं, महाराज, आपण म्हणतां त्या अर्थीं मी कच्चा असेन, परंतु आतां गुरु कोणता पाहूं? आपण त्रैलोक्याचे गुरु आहां, तर आपणच मजवर कृपा करून गुरुमंत्र द्यावा. तेव्हां देव म्हणाले कीं, तसें होणें शक्य नाहीं. कारण मला देखील सद्गुरूचेच पाय धरावे लागतात.

अरे नामया ऐक वचन । मीं रामावतारीं जाण ॥
वसिष्ठासि जाऊन शरण । अध्यात्मज्ञान पुसिलें ॥ १
कृष्णावतारीं सांदीपनीसी । शरण गेलों सद्भावेंसी ॥
तेव्हांच आत्मज्ञान मजसी । प्राप्त जाहलें निश्चित ॥ २

—महीपति

मग देवाच्या सांगण्यावरून नामदेव मल्लिकार्जुनाचे देवळांत जाऊन पहातात तों पायतन चढवून दोन्ही पाय महादेवाचे पिंडीवर ठेवून विसोबा खेचर निद्रिस्त झाले होते. हें पाहून नामदेवास परम आश्चर्य वाटलें व तो विसोबांस म्हणाला कीं, साधुसंत म्हणवून हें पाप कसें

करितां? तेव्हां विसोबा म्हणाले कीं, वृद्धापकालामुळें माझ्यानें हालवत नाहीं, याकरितां जेथें शिवलिंग नाहीं अशा ठिकाणीं तूंच माझे पाय उचलून ठेव. मग नामदेवानें जवळ जाऊन आपल्या हातांनीं बिसोबाचे पाय पिंडीवरून उचलिले आणि खालीं ठेवण्याकरितां जागा पाहूं लागला, तों सर्वत्र शिवलिंगें दिसूं लागलीं. जिकडे जिकडे पाय फिरवी तिकडे तिकडे लिंगमय होऊन गेलें. घंटा, मृदंग, दर्शनास आलेले स्त्री-पुरुष सर्व कांहीं लिंगाकार दिसूं लागलें. विसोबाच्या पायांकडे पहावें तों लिंगच, आपणाकडे पहावें तरी लिंगच—याप्रमाणें चमत्कार पाहून नामदेवानें सद्गुरूचे पायांवर मस्तक ठेविलें. नंतर विसोबानें नामदेवास सर्वत्र ब्रह्मदर्शन करवून आत्मविद्येचा उपदेश केला. उपदेशाप्राप्तीनंतर नामदेवानें आपले स्थितीचें वर्णन येणेंप्रमाणें केलें आहे:—

बोलों ऐसे बोल । जेणं बोलें विठ्ठल डोले ॥ १
प्रेम सर्वांगाचे ठायीं । वाचे विठ्ठल रखुमाई ॥ २
नाचूं कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावूं जगीं ॥ ३
परेहूनि परतें घर । तिथें राहूं निरंतर ॥ ४
अवघी सत्ता आली हाता । नामयाचा खेचर दाता ॥ ५

—नामदेव

भक्तकथा सुधारसाप्रमाणें आहे असें जें महीपतीनें म्हटलें त्यांत संशय नाहीं. या एका गोष्टीवरून उपासना पूर्ण असतांहि अद्वैतज्ञानाची अवश्यकता किती आहे हें सिद्ध होतें. तसेंच उपासना सगुण देवतेशिवाय घडत नसून आत्मविद्या सद्गुरुकृपेनेंच लभ्य होय हें प्रमेय उघड होतें.

सद्गुरुकृपा व ईश्वरानुग्रह यांशिवाय भगवद्भक्ति व आत्मज्ञान हीं कधींहि प्राप्त होत नाहींत हा सिद्धान्त अनेक संस्कृत व महाराष्ट्र ग्रंथांत पदोपदीं आढळतो. ईश्वरानुग्रहानें अंगीं वैराग्य बाणतें व साधूंचे ठायीं भक्ति बसते. ईश्वरानुग्रहानें सद्गुरूचा लाभ घडतो व अंतःकरणांत दयेचा पाझर सुटतो, हा सिद्धांत पुढील उताऱ्यावरून स्पष्ट होईलः—

माझी व्हावी चित्तशुद्धी । ऐशी उपजावया बुद्धी ॥
भगवत्कृपा पाहिजे आधीं । तैं साधनें सिद्धी पावती ॥१
साधनीं माझी मुख्य भक्ती । त्यांत विशेषें नामकीर्ति ॥
नामें चित्तशुद्धि चित्तीं । स्वरूपस्थितीं साधकां ॥ २
नामापरतें साधन । सर्वथा नाहीं आन ॥
नामें भवबंधछेदन । सत्य जाण उद्धवा ॥ ३

—**एकनाथ**

ईश्वरकृपेनें भगवद्भक्ति उत्पन्न होऊन आत्मज्ञान कसें होतें याविषयीं पुढील उतारा उत्कृष्ट आहेः—

माझे कृपेवीण निश्चित्तीं । कदा नुपजे माझी भक्ती ॥
माझी झालिया प्राप्ती । अन्यय भक्ति तो करी ॥ १
उद्धवा मी ज्यासि हृदयीं भेटें । तो मी हृदयामाजीं न संठे॥
सर्वात्मा सर्वरूपें प्रकटे । नव्हे धाकुटें स्वरूप माझें ॥ २
ऐसा मी प्रकटलियापाठीं । संसाराचि न पडे दिठी ॥
मावळे गुणेंसि भेदात्रिपुटी । पळे उठाउठीं भवभय ॥ ३
समूळ उपडितां वासनेसि । संशय निमे जीवभावेंसि ॥
जेथ क्षयो झाला कर्मासि । जेवीं रवीपाशीं अंधारें ॥ ४
तेवीं गुण नासती स्वकार्येंसी । अविद्या नासे अज्ञानेंसी ॥
जीव नासे शिवपणेंसी । चिदचिद्ग्रंथींसि अहंकारू ॥ ५
तेथ सोऽहं हंसाची बोलपण । न करितांचि जाहली जाण ॥

भेणें पळालें जन्ममरण । पडलें शून्य संसारा ॥ ६
यापरि भक्तियोगें गहन । माझें करूनियां भजन ॥
भक्त पावले समाधान । निज भजन जाण ऐसें ॥ ७

—**एकनाथ**

तेराव्या शतकांत महाराष्ट्र देशांत पुष्कळच साधु होऊन गेले व त्यांत ब्राह्मण, शूद्र, अतिशूद्र व स्त्रियाहि होत्या. शिवाय चमत्कार असा झाला कीं या वेळीं कांहीं कुटुंबांतील सर्वच मनुष्यें भगवद्भक्त असून कविता करीत. **निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, सोपानदेव** व **मुक्ताबाई** हीं सर्व भावंडें; **नामदेव**, त्याचे आईबाप, त्याचे चवघे मुलगे, त्याची बहीण, त्याची मुलगी, त्याच्या चार सुना, त्याची दासी; **चोखामेळा**, त्याची बायको व कुटुंबांतील मनुष्यें,—हीं सर्वजण भजन करून अभंग रचीत. **ज्ञानदेव, चांगदेव, नामदेव, नागा जगमित्र, सांवत्या माळी, परिसा भागवत, गोरा कुंभार, विसोबा खेचर, चोखामेळा** असे साधु ह्या वेळीं होऊन गेले.

भागवतधर्मरूपी इमारतीचा पाया **ज्ञानदेव—नामदेव** यांनीं घातला, **एकनाथानें** खांब बसविले आणि **रामदास** व **तुकाराम** यांनीं कळस चढविला असें म्हणण्याचा प्रघात असून त्याबद्दल पुढील अभंग आहे:—

संतकृपा झाली । इमारत फळा आली ॥ १
ज्ञानदेवें घातला पाया । उभारिलें देवालया ॥ २
जनार्दन एकनाथ । खांब दिला भागवत ॥ ३
तुका झालासे कळस । भजन करा सावकाश ॥ ४

—**तुकाराम**

**नामदेवानें** शतकोटि अभंग रचण्याचा पण केला व

तो शेवटीं तुकारामाचे मुखानें संपूर्ण झाला. ज्ञानदेवानीं भावार्थदीपिकादि ग्रंथ लिहिले, एकनाथानीं भागवतादि ग्रंथ रचिले, रामदासानीं दासबोधादि ग्रंथ लिहिले व इतर संतांनीं अनेक कवनें केलीं. हें जें त्यांनीं महत् कार्य केलें तें त्यांचें कर्तव्य असून प्रत्येक साधूनें व कवीनें इतर जनांस भक्तिमार्ग लावून देणें हेंहि कर्तव्य मानिलें आहे. तसेंच संपूर्ण ज्ञानाचा उगम जो वेद त्याचा अर्थ बहुजनांस समजावून देणें हें जसें श्रीमत् शंकराचार्य व श्रीमत् विद्यारण्य यांनीं आपलें कर्तव्य मानून तें तडीस नेलें, तद्वत् महाराष्ट्र कविवर्यांनीं व साधूंनींहि तेंच आपलें कर्तव्य मानिलें होतें.

धर्म रक्षावयासाठीं । करणें आटी आह्मासि ॥ १
वाचा बोलों वेदनीति । करूं संतीं केलें तें ॥ २
न बाणतां स्थिति अंगीं । कर्म त्यागी तो लंड ॥ ३
तुका म्हणे अधम त्यासी । भक्ति दूषी हरीची ॥ ४

—**तुकाराम**

तुकारामाची वेदांवरील निष्ठा कशी होती हें पुढील अभंगावरून ध्यानांत येईलः—

मातेचीं जो थानें फाडी । तया जोडी कोण ते ॥ १
वेदा निंदी तो चांडाळ । भ्रष्ट सुतकीया खळ ॥ २
आगी लावी घरा । मग वसती कोठें थारा ॥ ३
तुका म्हणे वर्म । येरा नाचवितो भ्रम ॥ ४

ईश्वरानें मनुष्यास इतकीं बंधनें कां ठेविलीं आहेत, पशूप्रमाणें यथेच्छ आहार-विहारादि करण्यास मोकळीक कां दिली नाहीं, वर्णाश्रमधर्म कशास पाहिजेत, नित्यनैमित्तिक कर्मांचा उपयोग काय,—इत्यादि, परमार्थ-

दृष्ट्या अत्यंत महत्त्वाचे सिद्धान्त श्रुतिशास्त्रांच्या आधारानें एकनाथानीं फारच मनोवेधक रीतीनें प्रतिपादिले आहेत. हें पुढील उताऱ्यावरून स्पष्ट होईल:—

न प्रेरितां शास्त्रें श्रुती । विषयीं स्वाभाविकी प्रवृत्ती ॥
तिची करावया निवृत्ती । माझी वेदोक्ति प्रवर्तली ॥ १
एकाएकीं विषय त्याजन । करावया अशक्त जाण ॥
त्यासि वेद दावी दोषगुण । त्यागावया जाण विषयांसि ॥ २
हे माता हे सहोदर । एथ करूं नये व्यभिचार ॥
हे वेद न बोलतां अधिकार । तैं यथेष्टाचार विषयांचा ॥ ३
जेथवरी स्त्री पुरुष व्यक्ति । तेथवरी कामासक्ति ॥
मी नमितों न वेदोक्ति । तैं व्यभिचारप्राप्ती अनिवार ॥ ४
यापरि म्यां सकळ लोक । स्त्रीकामें अति कामुक ॥
स्वदारगमन देख । केलें वेदमुख वेदोक्तीं ॥ ५
याचपरि म्यां अन्नसंपर्कें । वेदवादें नेमिले लोक ॥
येरवीं वर्णसंकर देख । होतां आवश्यक वेदेंवीण ॥ ६
तो चुकवावया वर्णसंकर । वर्णाश्रमाचा प्रकार ॥
वेद बोलिला साचार । विषयसंचार टाकावा ॥ ७
विषयांची जे प्रवृत्ति । तेचि अविद्या बाधा निश्चिती ॥
जे विषयांची अतिनिवृत्ति । ती नांव मुक्ती उद्धवा ॥ ८
करावया विषयनिवृत्ती । वेदें द्योतिली कर्मप्रवृत्ती ॥
वर्णाश्रमाचार स्थिति । विषयासक्ति छेदकु ॥ ९
नित्यनैमित्तिक कर्मतंत्र । नाना गुणदोष प्रकार ॥
वेदें द्योतिले अधिकार । विरक्त नर व्हावया ॥ १०
स्वकर्में होय चित्तशुद्धि । तेणें वैराग्य उपजे त्रिशुद्धी ॥
वैराग्य विषयावस्था छेदी । गुण कार्यं उपाधि रजतम हे॥११
तेव्हां उरे शुद्ध सत्त्वगुण । तेथें प्रकटे गुरुभजन ॥
गुरुभजनास्तव जाण । ज्ञानविज्ञान घर रिघे ॥ १२
पूर्ण करितां भगवद्भक्ती । तैं गुरुभजनीं अधिकारप्राप्ती ॥
सद्गुरु महिमा सांगो किती । मी आज्ञावर्ती गुरूचा ॥ १३

गुरु ज्यावरी अनुग्रहो करी । त्यासि मी भगवंत उद्धरीं ॥
आदरें वाहूनिया शिरीं । निज ऐश्वर्यावरि बैसवी ॥ १४
स्वाधिकारें स्वधर्मनिष्ठा । हाचि पुरुषाचा गुण मोठा ॥
तेणें फिटे गुणकर्म मळवटा । प्रिय वैकुंठा तो होय ॥ १५
निषेधमुखें करितां त्यागु । वेद त्यागविती विषयसंगु ॥
हें वर्म जाणोनि जो चांगु । तो होय निःसंगु महायोगी ॥ १६
उद्धवा हें वेद गुह्यसार । तुज म्यां सांगितलें साचार ॥
ज्यालागीं शिणताति सुरनर । ऋषीश्वर तपस्वी ॥ १७
परी माझे कृपेंवीण सर्वथा । हें नये कोणाचिये हाता ॥
तें तुज म्यां सांगितलें आतां । तुझे हितार्था निजगुह्य ॥ १८

—**एकनाथ**

**नामदेव-ज्ञानदेवांच्या** काळीं सर्व जातींचे लोक पंढरीची वारी करीत व सारा वेळ भजनांत घालवीत. ब्राह्मणापासून अतिशूद्रापर्यंत सर्वांत भक्तिरसाचा ओघ सारखा वाहूं लागला. ब्राह्मणांत जसे ज्ञानदेव, **सोपानदेव** झाले, किंवा शूद्रांत **नामदेव**, **गोराकुंभार** झाले, तसेंच **चोखामेळ्यासारखे** अत्यंजहि भगवद्भक्त झाले. याविषयींची उपपत्ति खरोखर मनोरंजक आहे. भौतिक वैभव कोणासहि प्राप्त होवो, ज्ञानी स्त्रिया किंवा पुरुष जे जगतांत जन्मास येतात ते सर्व ईश्वराचे किंवा महान् विभूतींचे अवतार होत, अथवा योगभ्रष्ट महापुरुष त्या त्या कुलांत उत्पन्न झाले असें समजावें. **ज्ञानदेव विष्णूचा**, **सोपानदेव शिवाचा**, **नामदेव** उद्धवाचा, असे अवतार प्रसिद्ध आहेत. **मुक्ताबाई आदिमायेचा** अवतार होय, एरव्हीं ज्या वयांत मुलींचा अल्लडपणा देखील जात नाहीं, अशा वयांत संसाराचा तिरस्कार येण्यापुरतें आत्मज्ञान होऊन अत्यंत प्रेमळ भक्ति तिजमध्यें उत्पन्न झालीच न-

सती. मुक्ताबाई सतराव्या वर्षी मृत्यु पावली. ज्ञानेश्वराचा सर्व कारभार बाविसाव्या वर्षींच आटोपला.

बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते ॥
अनेक जन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ १

—भगवद्गीता

इत्यादि सन्मान्य वचनांवरून, आणि पुनर्जन्म, प्रारब्ध, संचित व क्रियमाण या विषयांवरील निबंधांत निर्दिष्ट केलेल्या सिद्धांतांवरून स्पष्ट होतें कीं, अनेक जन्मीं सुकृत केलें असल्यामुळें विविदिषा उत्पन्न होऊन सद्गुरुकृपेनें आत्मज्ञान प्राप्त होतें. ज्ञानी पुरुषाच्या देहादिष्ठित गुणांमुळें किंवा संचित कर्माचे उपभोगार्थ उत्तम, मध्यम किंवा अधम जन्म येतात. एकदां पूर्ण ज्ञान झालें म्हणजे मग जातीची किंवा वर्णाची प्रतिष्ठा रहात नाहीं. याविषयीं पुढील दोहरा विश्रुत आहे:—

संत बीज पलटे नहीं । जाते जूग अनंत ॥
ऊंचा नीचा घर जन्मत है । अखेर संत कीं संत ॥ १

हीन जातींत जन्मास येऊनहि अपूर्व ज्ञान प्रकट झाल्याचीं उदाहरणें दृष्टीस पडतात. नामदेवानें झाडावर कुऱ्हाड मारिली, तेव्हां जो रस गळूं लागला तें रक्त वाहत आहे असें समजून तो रडूं लागला व झाडास कसें वाटलें असेल हें पाहण्याकरितां आपल्या देहावर प्रहार करण्यास चुकला नाहीं. खाटिकाचा व्यापार करण्यास बापानें शेखमहंमदास सांगितल्यावर, त्यानें प्रथम आपलीच अंगुलि कापून घेतली, व ज्या जगांत असे घात करून पोट भरावें लागतें तें सोडून देऊन धंद्याचाहि त्याग केला.

शूद्र व हीन जातींत महापुरुष जन्मास आल्यामुळें या देशाचा विलक्षण फायदा झाला आहे. तेणेंकरून सर्व जातींत एकोपा होऊन वैमनस्य मोडून गेलें. सर्व प्रकारच्या लोकांत भगवद्भक्ति वाढून अद्वैताचा प्रसार झाला. महाराष्ट्रांतील भगवद्भक्त अद्वैतानुभवाशिवाय बहुधा आढळत नाहींत. खेडयांतून हिंडून पहातां महार लोक देखील भक्तिपर व अद्वैतपर अभंग, पदें, दोहरे म्हणतांना व तद्विषयक निरूपण करितांना आह्मीं ऐकिलें आहे. भरतखंडांतील आबालवृद्ध, ज्ञानी, अज्ञानी ह्या सर्व लोकांचें पारमार्थिक वतन हेंच होय. असें वतन जगांतील कोणत्याहि राष्ट्रास प्राप्त झालेलें नाहीं. कशीहि राज्यक्रान्ति होवो, या वतनावर संतुष्ट राहून सर्व लोक सुखानें कालक्रमण करितात. जीवन्मुक्त पुरुष कोणत्याहि वर्णांत जन्मलेले असोत किंवा कोणताहि धंदा करोत, त्यामुळें त्यांस कमीपणा येत नाहीं. महाराष्ट्र कविवर्यांनीं लोकदरास पात्र केलेलें अद्वैतमत सर्व प्रकारच्या लोकांत भगवद्भक्तीशीं सामरस्य पावलेलें दृष्टीस पडतें यांत संशय नाहीं.

ज्ञानेश्वर, एकनाथ या साधूंनीं सर्व जातींच्या लोकांबरोबर भजन केलें, यावरून त्यांनीं चातुर्वर्ण्यपद्धतीची अवहेलना केली असें समजण्याचा कोठें कोठें प्रघात दिसतो, परंतु ती चुकी आहे. भगवद्भक्तीस सर्व प्रकारचे लोक पात्र आहेत एवढेंच यावरून सिद्ध होतें. भागवतधर्म नवीन नसून त्याचा वेदाशीं, वेदान्ताशीं, योगाशीं किंवा पुराणांशीं विरोध नसून उलटें सामरस्य आहे. पाहिजे त्या मनुष्यास भक्तीची पात्रता आहे. ज्ञानेश्वर,

एकनाथ याच्या कृतीनें जातिजातींतलें वैमनस्य घालविलें. या भगवद्भक्तांनीं जातिबंधन मोडून सब् गोलंकार करण्याचा प्रयत्न केला नाहीं. चातुर्वर्ण्यपद्धति आर्यसमाजाच्या मुळाशीं आहे हें त्यांस अमान्य नव्हतें. साधुसंतांनीं एकत्र भजन करून जातिद्वेष बुडविला, जातिभेद नष्ट केला नाहीं. दुसरें, कोणत्याहि भक्तमंडळींत भक्तांची उपास्य देवता भिन्न भिन्न असली तरी चाले. हा चमत्कार श्रीमत् शंकराचार्यांनीं घडवून आणिला हे पूर्वीं विस्तृतपणें निरूपित केलेंच आहे. कोणत्याहि देवतेच्या उपासकाचा भगवद्भक्तांत समावेश होण्यास अडचण नसे. महाराष्ट्रांतील सर्व उपासकांची आपापल्या उपास्याबद्दल काय समजूत असे तें विचारसागरांतील—

अब्धि अपार स्वरूप मम । लहरी विष्णु महेस ॥
रवि विधि चंदा वरुन यम । सक्ति धनेस गनेस ॥ १

या दोहऱ्यावरून स्पष्ट कळेल. या प्रमेयाशीं समर्थक अशीं श्री समर्थ रामदासांच्या ग्रंथांत पुढील वचनें आढळतात:—

एक म्हणति विष्णु थोर । एक म्हणति रुद्र थोर ॥
एक म्हणति शक्ति थोर । सकळांमध्यें ॥ १
ऐसे आपुलालेपरी बोलती । परन्तु अवघेंचि नासेल कल्पान्तीं॥
यत्दृष्टं तन्नष्टं हें श्रुती । बोलतसे ॥ २
आपुलाली उपासना । अभिमान लागला जनां ॥
त्याचा निश्चय निवडेना । साधुविण ॥ ३
साधु निश्चय करिती एक । आत्मा सर्वत्र व्यापक ॥
येर हें अवघेंचि मायिक । चराचर ॥ ४
एवं सकळांमध्यें थोर । तो एकचि परमेश्वर ॥
तयामध्यें हरिहर । होती जाती ॥ ५

भगवद्भक्तांचीं उपास्य दैवतें कशीं भिन्न होतीं तें पुढील वर्णनावरून ध्यानांत येईल. **रामदास, तुळशीदास, कबीर** हे रामभक्त होते; **एकनाथ** व **जयरामस्वामी** कृष्णभक्त; **तुकाराम, चोखामेळा, नामदेव** विठ्ठलभक्त; **नरहरि सोनार** व **नागा जगमित्र** शिवभक्त; **जनार्दनस्वामी** आणि **नृसिंहसरस्वती** दत्तात्रेयभक्त; **मोरया गोसावी** गणपतिभक्त होते. **शंकराचार्यांनीं** सर्वांस पंचपूजारत करून निरनिराळ्या उपासकांमधील द्वेष मोडिला. या कामगिरीचा सुपरिणाम असा झाला कीं या देशांत जे भगवद्भक्त झाले, त्यांच्या उपास्य देवता भिन्न असूनहि ते एकत्र भजन करूं लागले. सर्व भक्त उपास्य दैवत ब्रह्मरूपीच मानीत. तिसरें, साधूसंतांस मूर्तिपूजा असंमत नसे. तें म्हणत कीं आह्मी मूर्तिपूजा करीत नाहीं, तर मूर्तिपूजेच्या द्वारें सगुण उपास्य दैवतेस भजतों. सर्व साधुसंत मूर्तीचे म्हणजे सगुण ब्रह्माचे उपासक होते.

अवघें ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव । प्रतिमा तो देव कैसा नव्हे ॥ १
नाहीं भाव तया सांगावें तें किती । आपुलाल्या मतीं पाखंडिया २
जया भावें संत बोलिले वचन । नाहीं अनुमोदन शाब्दिकांसी ॥ ३
तुका म्हणे संतीं भाव केला वळी । न कळतां खळीं दूषिला देव ॥ ४

**—तुकाराम**

भागवतधर्माचा उत्कर्ष गातांना, उपासनेशीं नित्य संबद्ध जें कर्म त्याची महाराष्ट्र कवींनीं अवहेलना केली असेंहि क्वचित् मानण्याचा प्रघात आहे, परंतु तो चुकीचा आहे. द्विजांनीं कर्म सोडावें असें कोणींहि म्हटलें नसून उलट त्याची प्रशंसाच केली आहे. कारण जीवन्मु-

क्तासहि देहपात होईपर्यंत कर्म सुटत नाहीं. साधुसंतांनीं जी ब्राह्मणाची निंदा केली आहे, त्यांतील एक उद्देश असा कीं ब्राह्मणांनीं शास्त्राज्ञेप्रमाणें वागावें, आणि दुसरा असा कीं भक्तीचा महिमा वाढवावा; कारण भक्तीशिवाय केवळ दंभाकरितां केलेलें अनुष्ठान फुकट होय.

आत्मज्ञानाविषीं । जंव निश्चिती नाहीं निकी ॥
तंव न व्हावें यागादिकीं । उदासीन ॥ १

—ज्ञानदेव

आचार प्रथम ब्राह्मणाचा धर्म । शौच नित्य नेम सत्य वाणी ॥ १
तप शम दम भूतदया पूर्ण । अखंड अनुसंधान स्वस्वरूपीं ॥ २
स्नान संध्या जप होम अध्ययनविधि । देवार्चन सिद्धी करूनि व्हावें
वैश्वदेव आणि अतिथिपूजन । नववें ब्रह्मयज्ञ आवश्यक ॥ ४
संपादुनी हे विधि सारावें भोजन । त्यावरि श्रवण पुराणाचें ॥ ५
सर्वकाळ व्हावें संतुष्ट मानस । असावा विश्वास वेदवचनीं ॥ ६

—नामदेव

धर्म रक्षावयासाठीं । करणें आटी आम्हांसि ॥ १
वाचा बोलों वेदनीति । करूं संतीं केलें तें ॥ २
न बाणतां स्थिति अंगीं । कर्म त्यागी तो लंड ॥ ३
तुका म्हणे अधम त्यासी । भक्ति दूषि हरीची ॥ ४

—तुकाराम

वेदीं जे जे बोलिले धर्म । तें तें आचरावें विहित कर्म ।
ज्याचा जैसा वर्णाश्रम । तोचि तेणें आचरावा ॥ १
स्वानंदभरित होऊनी मनीं । विश्वास असावा वेदवचनीं ॥
तुम्ही तो सर्वज्ञ संपन्न गुणीं । विचारा मनीं निजहित ॥ २
आपुला स्वधर्म टाकिला जर । तरी कैशा रीतीं तरतील नर ॥
जलचरांनीं त्यागितां नीर । तरी तरणोपाय कोणता ॥ ३

—महीपति

दुसरें असें कीं, एका वस्तूची स्तुति करितांना दुसऱ्या वस्तूची साहजिकपणें जी निंदा होते, ती वास्तविकपणें निंदा करण्याच्या हेतूनें केलेली नसून फक्त मुख्य वस्तूची स्तुति करण्याकरितां होय हें तत्त्व विरुद्ध सिद्धान्तांची एकवाक्यता करण्याचें मुख्य प्रमेय होय. प्राचीन पंडितांमध्यें ह्याच तत्त्वावरून विरुद्ध मतांची व्यवस्था लावण्याचा सांप्रदाय आहे.

न निन्दा निंद्यं निन्दितुं प्रवर्तते । अपितु विधेयं स्तोतुम् ।

श्रुति, दर्शनें, भगवद्गीता, महाराष्ट्र कवींचे ग्रंथ इत्यादिकांतील वचनांची जुळणी याच तत्त्वावर केली पाहिजे.

न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्वमानशुः ।

—नारायणोपनिषद्

या वचनाप्रमाणें कर्म सोडावें असें जर मानिलें तर

यज्ञो दानं तपः कर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ॥

—भगवद्गीता

या वाक्याशीं विरोध येतो. तसेंच

नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया श्रुतेन ।

—कठोपनिषद्

या वचनावरून वेदशास्त्रांचा अभ्यास फुकट समजला तर श्रवणमननादि सर्व उपाय निरर्थक होतील. याकरितां साधु कवींच्या ग्रंथांत किंवा इतरत्र कर्माची निन्दा जी दृष्टीस पडते ती केवळ विधेय वस्तूच्या प्रशंसेकरितांच होय असें मानणें भाग आहे.

सोळाव्या शतकांत एकनाथानीं ज्ञानदेवाप्रमाणेंच भागवत धर्मास उत्तेजन दिलें. जनार्दनस्वामीनीं एकनाथास ज्ञानेश्वराचे भावार्थदीपिका, अमृतानुभव वगैरे ग्रंथ

शिकविले. ज्ञानेश्वरीवर एकनाथांचें इतकें प्रेम बसलें होतें कीं, त्यानीं लवकरच अनेक प्रती जमा करून त्यांजवरून एक शुद्ध प्रत तयार केली. श्रुतींचा अर्थ बहुजनांस समजून देणें हें जसें साधुसंत आपलें कर्तव्य मानीत, त्याप्रमाणेंच रामायण, महाभारत, भागवत, भगवद्गीता, योगवासिष्ठ इत्यादि ग्रंथांचें गुह्य महाराष्ट्र कवींनीं मराठी भाषेंत प्रकट केलें आहे. भावार्थरामायण व एकनाथी भागवत हे ग्रंथ केवळ प्रासादिक होत. एकनाथास भागवतधर्मरूपी इमारतीचा खांब असें म्हणतात. देहबुद्धीचा नाश, चित्तशुद्धि, व वासनाक्षय या तिन्ही गोष्टी संसारांत राहूनहि कशा साध्य करून घ्याव्या हें स्वतः-च्या उत्कृष्ट आचरणानें एकनाथानीं सर्वांस शिकविलें.

भक्तिरसाची पराकाष्ठा करण्याकरितांच श्रीमद्भागवत हा ग्रंथ रचिला होता हें सर्वांस विश्रुत आहेच. एकनाथानीं तर नवविधाभक्तींचें वर्णन करण्यांत मूळ भागवतावरहि कडी केली आहे. भरतखंडांत उपासनामार्ग व अद्वैतविद्या यांचें अपूर्व संमेलन झाल्यामुळें महाराष्ट्र कवींच्या ग्रंथांस अत्यंत मोहकपण आलें आहे, या सिद्धान्ताची सत्यता विशेषेंकरून एकनाथी भागवतावरून व्यक्त होते. महाराष्ट्र साधु कवींच्या ग्रंथांत ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत व दासबोध यांस आद्यस्थानीं मानितात, तथापि भक्तिरसाच्या अलोट सिंधूंत मज्जन करणें असेल तर एकनाथी भागवताशिवाय दुसरा मार्गच नाहीं. या ग्रंथांत वर्णिलेला भागवतधर्म श्रुतींत वर्णिलेल्या आत्मैक्यभावनेशीं परम साम्य पावतो. वेदांतील जो परमात्मा तोच भागवतधर्मांतील श्रीकृष्ण होय एतद्विषयीं

कठोपनिषदांतील व श्रीमद्भागवतांतील वचनें पूर्वीं दिलीं-च आहेत. आत्मवित्, ब्रह्मनिष्ठ या श्रुतींतील संज्ञांबद्दल महाराष्ट्र कवींच्या ग्रंथांत साधु, संत हे शब्द योजिले आहेत. योगवासिष्ठांतील जीवन्मुक्ताबद्दल मराठी ग्रंथांत भगवद्भक्त हें पद आढळतें. श्रुतींत व योगवासिष्ठांत निर्गुणब्रह्माचें वर्णन असून भागवतांत सगुणब्रह्माचें वर्णन आढळतें. इंद्रियें व त्यांचे व्यापार आत्मस्वरूप मानावे असें श्रुतींत सांगितलें आहे, त्याबद्दल भागवतांत इंद्रियें व त्याचे व्यापार श्री कृष्णास अर्पण करण्यास सांगितलें आहे. ही तुलना स्पष्ट होण्याकरितां योगाचें पांचवें अंग जो प्रत्याहार तत्प्रतिपादक गोरखनाथांचीं वचनें व एकनाथी भागवतांतलि उतारा खालीं देतों:—

यं यं शृणोति कर्णाभ्यामप्रियं प्रियमेव वा ॥
तं तमात्मेति विज्ञाय प्रत्याहरति योगवित् ॥ १
अस्पर्शमथवा स्पर्शं यं यं स्पृशति चर्मणा ॥
तं तमात्मे[ति] विज्ञाय प्रत्याहरति योगवित् ॥ २
अमेध्यमथवा मेध्यं यं यं पश्यति चक्षुषा ॥
तं तमात्मेति विज्ञान प्रत्याहरति योगवित् ॥ ३
अलौण्यमथवा लौण्यं यं यं स्पृशति जिव्हया ॥
तं तमात्मेति विज्ञाय प्रत्याहरति योगवित् ॥ ४
अगंधमथवा गंधं यं यं जिघ्रति नासया ॥
तं तमात्मेति विज्ञाय प्रत्याहरति योगवित् ॥ ५

**—गोरखनाथ**

जें जें दृष्टी देखे आपण । थोर अथवा सूक्ष्म सान ॥
तें तें हरिरूप संपूर्ण । सहजें भजन अहेतुक ॥ १
जें जें वाचा वदे वचन । तें तें होय हरीचें स्तवन ॥
स्तव्य स्तविता ऊणखूण । हेहि आठवण विसरोनि ॥ २

शब्दीं शब्दातें शब्दविती । ते शब्दरूपें हरीची कथा ॥
शब्द द्योतक ज्या शब्दार्था ॥ ते अर्थग्राहकता हरीची ॥ ३
गंध घ्राणा होतां भेटी ॥ भोक्तेपणीं हरीची उटी ॥
तो घ्रेय घ्राता घ्राण त्रिपुटी ॥ स्वयें घोटी चिदत्वें ॥ ४
रस रसना रसत्व बोध । तेथ निज भोक्ता गोविंद ॥
तो भोग्य भोक्ता भोजन संबंध । परी परमानंद निजबोधें॥५
शीत उष्ण मृदु कठिण । निजांगीं लागतां जाण ॥
तें अंगेंचि होय आपण । मृदु कठिण मिथ्यात्वें ॥ ६
करांची जे कर्तव्यता । तीतें चालवी अकर्ता ॥
यालागीं घेतां देतां । अकर्तात्मता हरिभजन ॥ ७

—एकनाथ

गोरखनाथांच्या वचनांत, जो जो प्रिय अथवा अप्रिय पदार्थ कानांनीं आपण ऐकतों, किंवा डोळ्यांनीं पहातों वगैरे तो तो पदार्थ आत्मरूप मानावा असें म्हटलें आहे. भागवतांत इंद्रियांचे व्यापार हरिरूप समजले आहेत. तसेंच कोणत्याहि अवस्थेंतलि चिद्रूपवृत्तीला नाथानीं हरिभजन म्हटलें आहे.

जागृति स्वप्न सुषुप्ति । चिन्मात्रीं जडली वृत्ती ॥
चित्त चित्तत्वाची विसरे स्फूर्ती । या नांव मद्भक्ती उद्धवा ॥१

—एकनाथ

ही जी तिन्ही अवस्थांमधील चिद्रूपवृत्ति तीच ब्रह्मनिष्ठाची सर्वदा स्थिति असते हें पुढील वचनावरून कळेल:—

स्वप्नेऽपि चिन्मयं पश्येज्जाग्रतीव विशेषतः ॥
ईदृक् चेष्टा श्रुतश्रेष्ठवरिष्ठब्रह्मवादिनाम् ॥ १

अशा रीतीनें भागवतधर्माचीं प्रमेयें योगदर्शनावरून घेतलीं आहेत हें स्पष्ट आहे. म्हणून योगशास्त्राचा व भगवद्भक्तीचा काय संबंध आहे हें निरूपित करणें अ-

वश्य आहे. योगशास्त्राविषयीं असत्य कल्पना पुष्कळ ठिकाणीं आढळून येतात. याचें मुख्य कारण असें दिसतें कीं, योगाचे दोन प्रकार जे हठयोग आणि राजयोग यांचीं स्वरूपें व भेद यांविषयीं सामान्य लोकांस खरें ज्ञान प्राप्त होत नाहीं. किती वेळ प्राणस्पंदनिरोधन करितां येतें या तत्त्वावर हठयोगी अष्टांग बसवितात. अष्टांग योगांतील पहिलीं चार अंगें—१ यम, २ नियम, ३ आसन, ४ प्राणायाम हीं दोन्ही प्रकारांस सारखींच लागू पडतात; परंतु प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि यांचा अर्थ हठयोगी निराळाच करितात. हठयोग्यांचे मतानें प्राणायामांतील कुंभकावस्थेचा काल पाऊण मिनिट धरून त्याचे बारापट म्हणजे सुमारें दहा मिनिटें कुंभकावस्था साध्य झाली म्हणजे प्रत्याहार होतो, त्याचे बारापट म्हणजे दोन तास कुंभक झाला तर धारणा होते, त्याचे बारापट म्हणजे चोवीस तास कुंभकावस्था साध्य झाली म्हणजे ध्यान होतें, आणि त्याच्या बारापट म्हणजे बारा दिवस कुंभक साध्य झाला म्हणजे समाधि प्राप्त होते. राजयोगाप्रमाणें होणारा या अंगांचा अर्थ पूर्वीं दिलाच आहे व या ग्रंथांत सर्वत्र ‘ योग ’ शब्द राजयोगाच्या अर्थीं योजिलेला आहे.

हा ऐकतां अति गोड वाटे । परी करितां काळीज फाटे ॥
परी न साधेचि महा हटें । एथ थकले लाठे सुरनर ॥ १

—**एकनाथ**

या **नाथांच्या** वचनांत निर्दिष्ट केलेला हठयोग होय. **नामदेव**, **तुकाराम** इत्यादि साधूंच्या कवनांत जेव्हां जेव्हां योगाची अवहेलना दृष्टीस पडते, तेव्हां ती हठयो-

गाची असें समजावें. व्यवहारांत देखील योगी म्हणजे हठयोगीच समजतात. योगमार्गानें इंद्रियांचा निग्रह करणें अवघड असें जेव्हां म्हटलें जातें, तेव्हां ती भाषा हठयोगासंबंधानेंच होय.

वास्तविक पहातां योगदर्शनकार जे **पतंजलि** त्यांच्या योगसूत्रांत प्रत्याहारादि शेवटच्या चार योगांगांचा अर्थ राजयोगरीत्या केलेला आहे, व आधुनिककालीं सर्वत्र गुरुसांप्रदाय असाच आहे.

प्राणायाम एवाभ्यासक्रमेण वर्धमानः प्रत्याहारधारणाध्यानसमाधिशब्दैरुच्यते । **—योगवासिष्ठ**

म्हणजे प्राणायामाच्या कुंभकावस्थेंतील कालमानभेदावरून प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि या संज्ञा पृथक् झालेल्या आहेत, परंतु हे चारी प्रकार प्राणायामच होत. अशा तऱ्हेचीं वचनें स्कंदपुराणांत व **गोरख**नाथांच्या ग्रंथांत आढळतात, तथापि हे प्रकार वर्तमानकालीं साध्य नाहींत असें सद्गुरूचें नेहमीं सांगणें असतें. असो, राजयोगरीत्या योग शब्दाचा अर्थ समजून उपासनेचा अंतर्भाव योगांत होतो हें उघड झालें. नित्यनैमित्तिक कर्मानुष्ठानानें चित्तशुद्धि झाल्यावर उपासना साध्य होते, उपासनेनें मनवासनांचा निरोध होऊन आत्मैकभावना सतत होण्याची पात्रता येते, व अशी भावना साहजिकपणें सतत होऊं लागेपर्यंत उपासना केलीच पाहिजे.

आत्मैकप्रत्ययो यावत्स्वभावात्संततो भवेत् ॥
कुर्यादुपासनं तावत्क्षीयंते वासनास्ततः ॥ १

**—वार्तिकसार**

उपनिषदांत अनेक उपासना सांगून शेवटीं आत्म्याची उपासना सांगितली आहे. ही उपासना साध्य झाली म्हणजे आत्मसाक्षात्कार होऊन आत्मवेत्ता किंवा ब्रह्मविद् अशी संज्ञा मिळते. भागवतधर्मांत कर्म, उपासना व ज्ञान ह्या तिहींचा अंतर्भाव उपासनेंतच केला आहे, परंतु सामान्य जनांस हा प्रकार समजत नाहीं. वस्तुस्थिति अशी आहे कीं कर्माचा व ज्ञानाचा अंतर्भाव उपासनेंत जरी केला तरी तेणेंकरून कर्माचा किंवा ज्ञानाचा लोप होऊं शकत नाहीं. कर्माचा उपासनेंत अंतर्भाव होतो याचा अर्थ असा कीं प्रत्येक कर्म भगवंतास अर्पण केल्यामुळें कर्तृत्वभावच नाहींसा होतो, मग कर्म राहील कोठून? तसेंच आपल्या हृदयांत भगवान् असून सर्वत्र व्यापून राहिला आहे अशा भावनेनेंच जर भगवद्भक्ति केली, तर ज्ञान तरी कोठून राहील? अशा रीतीनें पाहतां केवळ उपासना कायम राहून, उपासनेचें मुख्य अंग जें नामस्मरण तेवढ्यानेंच सर्व कार्य होतें. परंतु हें सर्वसंपादक नामस्मरण ज्ञानविज्ञानपूर्वक घडण्यास केवढी तयारी लागते हें विसरतां कामा नये.

याप्रमाणें उपासना किंवा भक्ति परिपूर्ण होऊन आत्मैक्यभावना होऊं लागली म्हणजे अनुभव कसकसे येतात, काय काय खुणा होतात याबद्दल विवेचन करूं. प्रथमतः अद्वैत मतानें, नंतर पौराणिक दृष्टीनें व शेवटीं महाराष्ट्र साधु कवींच्या तऱ्हेनें अनुभवांचा विचार करूं. पंधराव्या प्रकरणांत श्री वसिष्ठानीं श्री रामचंद्रास सर्वत्र ब्रह्मदर्शन करवून समाधिसुखांत निमग्न केलें असतां जी अवस्था प्राप्त झाली तिचें वर्णन झालेंच आहे. एथें हा-

हि विशेष लक्षांत ठेविला पाहिजे कीं, अद्वैतशास्त्रानुरोधानें होणारे अनुभव निर्गुणब्रह्मविषयक असतात. परंतु पौराणिक किंवा महाराष्ट्र कवींच्या दृष्टीनें होणारे अनुभव सगुणब्रह्मविषयक असतात. सगुणब्रह्मविषयक अनुभव पौराणिक व महाराष्ट्र कवींसंबंधी अशा दोन तऱ्हेनें निरूपित करण्याचें कारण असें आहे कीं, श्री **कृष्ण** व **उद्धव** यांतील संबंध श्री **विठ्ठल** व **नामदेव** यांमधील संबंधाहून निराळ्या प्रकारचा वर्णिलेला आहे. **नामदेव** हा **उद्धवाचा** अवतार व **कृष्ण** तोच **विठ्ठल**—अशी जरी वस्तुस्थिति होती, तरी **नामदेवाशीं विठ्ठलाची** वागणूक निराळी होती. श्री **विठ्ठल नामदेवाबरोबर** बोले, चाले, खेळे, जेवी—इतकेंच नव्हे, तर **नामदेवाचा** वियोग सुद्धां **विठोबास** सहन होत नसे.

श्री **कृष्णानीं उद्धवास** श्रुतींतील प्रमेयें व वेदांचा अभिप्राय सांगून त्यांची भागवतधर्माशीं संगति दाखविल्याबरोबर **उद्धवास** समाधिसुखाचा अनुभव आला.

माझी पावावया स्वरूपसिद्धी । मळिणाचिये चित्तशुद्धि ॥
वेदु स्वधर्म प्रतिपादी । त्यागवी निषेधी विषयांतें ॥
तेथ अग्निहोत्रादि विधान । यज्ञांत कर्माचरण ॥
तें चित्तशुद्धीचें कारण । वैराग्य दारुण उपजवी ॥ २
दारुण वैराग्य उत्पत्ती । इहामुत्र विषयनिवृत्ती ॥
तेव्हां साधकासि माझी प्राप्ती । सहजस्थिती स्वभावें ॥ ३
कर्मकांडाचिये ये स्थिती । विधिनिषेध वेदोक्ती ॥
साधका माझी प्राप्ति । जाण निश्चिती या हेतू ॥ ४
विषयीं परम बाधा देखती । परि त्यागीं नाहीं सामर्थ्यशक्ती॥
ऐशिया साधकांप्रती । वेदें मद्भक्ती द्योतिली ॥ ५
अद्वैतबोधें करितां भजन । मी अनंत अपार चिद्घन ॥

भक्तीमाजी आकळे जाण । ये मद्रूपपण मद्भक्तां ॥ ६
तेव्हां भज्य भजक भजन । पूज्य पूजक पूजन ॥
साध्य साधक साधन । अवघा आपण स्वयें होय ॥ ७
हे उपासनाकांड स्थिति । साधकीं करूनि माझी भक्ति ॥
यापरि पावले माझी प्राप्ति । जाण निश्चिती उद्धवा ॥ ८
माया प्रतिबिंबित चैतन्य । त्वंपदार्थें वाच्य जाण ॥
ज्याच्या अंगीं जीवाभिधान । अविद्या जाण उपजवी ॥ ९
जेवीं स्वप्नामाजी आपण । आन असोनि देखे आन ॥
तेवीं अविद्यकत्व जाण । जीवपण एकदेशी ॥ १०
जो मायासंवलित चैतन्य । जो योगजन्य जगत्कारण ॥
जो सर्वद्रष्टा सर्वज्ञ । सदा संपन्न ऐश्वर्यें ॥ ११
ज्याची अकुंठित सहज सत्ता । जो परमानंदें सदा पुरता ॥
ज्यासी ईश्वरत्वें समर्थता । हे जाण वाचकता तत्पदार्थाची १२
जीवाचें सांडोनियां अज्ञानत्व । शिवाचें सांडूनि ईश्वरत्व ॥
दोहींचें शोधित जें लक्ष्यत्व । ऐक्य निजतत्त्व साधिती ॥१३
तत्पद त्वंपद वाच्यार्थ । दोहींचा सांडावा निश्चित ॥
ऐक्यें अंगीकारावा लक्ष्यार्थ । हा ज्ञानकांडार्थ उद्धवा ॥ १४
जीवशिवाचेनि ऐक्यें जाण । माझे चित्स्वरूपीं समाधान ॥
स्वयें पाविजे गा आपण । हें ज्ञानकांड संपूर्ण बोलिलें वेदें ॥१५
वेदा आदि मध्य अवसानीं । मातें लक्षिती कांडें तिन्ही ॥
तोचि अर्थ उपसंहारुनी । ग्रंथावसानीं हरि बोले ॥ १६
तें वेदार्थाचें निजसार । माझें गुह्य ज्ञानभांडार ॥
तुज म्यां सांगितलें साचार । पूर्वापर अविरोधें ॥ १७

—एकनाथ

श्रीकृष्णानीं वर्णिलेला हा वेदांचा अभिप्राय ऐकून उद्धवास अतिशय चमत्कार वाटला व आणखी वेदार्थाचें सार ऐकण्याविषयीं उद्धवास जी उत्सुकता झाली तिचें वर्णन नाथानीं फार मनोवेधक रीतीनें केलें आहे. धार

काढणारा प्रथम गाईस पिण्यास वांसरूं सोडितो व त्याच्या तोंडांत पान्हा सुटतांच त्याला आंखडून धरितो, अशा वेळेस दुधाच्या आवडीनें वांसराची जी तळमळ होते तशी उद्धवाची होऊं लागली. किंवा पक्षिणीच्या तोंडांतून चारा घेण्याकरितां पिलें आपल्या चोंची पुढें करितात, तेव्हां त्यांची जी गडबड उडते, तशी स्थिति उद्धवाची झाली. अशी उद्धवाची विलक्षण उत्सुकता पाहून देव सांगतातः—

नाना शास्त्रीं अतिप्रसिद्ध । त्रिकांडीं वाढला जो वेद ॥
तेथील नाना शब्दीं हाचि बोध । जो मी अभेद परमात्मा ॥ १
त्या मातें धरोनि हातीं । त्रिकांडीं चालिल्या श्रुति ॥
त्या श्रुत्यर्थाची उपपत्ती । यथा स्थिति सांगेन ॥ २
मी कर्मादि मध्य अंतीं । मी कर्मकर्ता क्रियाशक्ती ॥
कर्मफलदाता मी श्रीपती । हा इत्यर्थ निश्चितीं कर्मकांडीचा ॥ ३
मंत्रमूर्ति आणि मंत्रार्थ । तेहि मीचि गा निश्चित ॥
पूज्य पूजक पूजा समस्त । मजव्यतिरिक्त अणु नाहीं ॥ ४
देवें देवोचि पूजिजे । देव होवोनि भजिजे ॥
वेदींचें निज बीज माझें । हेंचि आगमीं बोलिजे मुख्यत्वें ॥ ५
मीच देवो मीच भक्तु । पूजोपचार मी समस्तु ॥
मीचि मातें पूजितु । हे इत्थंभूत उपासना ॥ ६
हें उपासनाकांडीचें निजसार । अगम्य शास्त्रांचें गुह्य भांडार ॥
माझ्यानि भक्तीचें वस्तीचें घर । ते हे साचार उपासना ॥ ७
ज्ञानकांड तें अलौकिक । वेद आपला आपण द्योतक ॥
अवघा संसार काल्पनिक । तेथ वेद नियामक कोणे अर्थी ॥ ८
जेथ मुळीं मुख्य अद्वैतता । तेथ कैंचा वक्ता कैंचा श्रोता ॥
कैंचें कर्म कैंचा कर्ता । मी वेदवार्ता ते कैंची ॥ ९
जंव भेदाची सबळ स्थिति । तंव वेदांची थोर ख्याति ॥
भेद आलिया अद्वैतीं ॥ वेद विराला नेति म्हणोनि ॥ १०

जळ-गार जळीं विरे । तेवीं वेद अद्वैतीं मुरे ॥
हें ज्ञानकांड साचोकारें । तुज म्यां खरें सांगीतलें ॥ ११
शुद्धब्रह्म मी हे स्फुरे स्फूर्ती । तेथ ओंकाराची उत्पत्ती ॥
तोही ब्रह्मरूप निश्चितीं । त्यासी ब्रह्म म्हणती एकाक्षर ॥१२
त्या ओंकारापासोनि गहन । श्रुतिशाखा स्वर वर्ण॥
झालें तें ब्रह्मरूप जाण । एवं वेद पूर्ण परब्रह्म॥१३
जेवीं सोन्याचे अळंकार । पाहतां सोनेंचि साचार ॥
तेवीं श्रुतिशाखा वेदविस्तार । तो अवघा ओंकार मद्रूपें १४
तिहीं कांडीं निजसंबंध । पूर्वापर अविरुद्ध ॥
हा वेदार्थ परम शुद्ध । तुज म्यां विशदा बोलिला ॥ १५
या वेदार्थाची निज खूण । हृदयीं भोगितां आपण ॥
होय जीवशिवा समाधान । ऐसें श्रीकृष्ण बोलिला ॥ १६

—**एकनाथ**

हें सार उद्धवानें ऐकिल्याबरोबर वेदार्थांत निमग्न होऊन त्याचें मन स्वानंदांत बुडून गेलें. चित्त आणि चैतन्य यांची मिठी पडली, कंठ सद्गदित होऊन अंगावर रोमांच उभे राहिले. शरीर डोलूं लागलें, नेत्रांतून अश्रु येऊं लागले. व मूर्छा येऊं लागली. अशी स्थिति कांहीं वेळ झाल्यावर उद्धवानें डोळे उघडून पाहिलें तों मुकुट-कुंडलांनीं अलंकृत, घनसांवळी, आपाद वनमाळा शोभत आहे अशी आनंदरूपी श्रीकृष्णमूर्ति दिसली. तेव्हां नाथानीं असें वर्णन केलें आहे:—

सगुण निर्गुण स्वरूपें दोनी । भोगावया आवडी ज्याचे मनीं ॥
तेही स्थितीच्या गुरुदानीं । कृपाळूपणीं समर्थ ॥ १
ते कृष्णकृपेस्तव जाण । फिटले उद्धवाचें दुर्लभपण ॥
सगुण निर्गुण एक कृष्ण । हे खूण संपूर्ण बाणली ॥ २

—**एकनाथ**

आतां महाराष्ट्र साधु कवींच्या दृष्टीनें विचार करावयाचा. भागवतांत **श्रीकृष्ण** आणि **उद्धव** यांतील जो संबंध वर्णिला आहे त्यापेक्षां अतिनिकट संबंध **श्रीविठ्ठल** आणि **नामदेव** यांमधील दर्शविला आहे. **विठ्ठल नामदेवाबरोबर** बोले, खेळे, जेवी—इतकेंच नव्हें तर **नामदेवाचा** वियोग **विठोबास** असह्य होई. **नामदेव** व **ज्ञानदेव** यांचा एक अपूर्व प्रसंग महीपतीनें वर्णिला आहे, ते वेळीं जीं भाषणें झालीं त्यावरून कर्म, उपासना, ज्ञान या भूमिकांचें स्वरूप विशद होतें. या प्रसंगीं पांडुरंगाचें **नामदेवावरील** प्रेम व्यक्त होतें. व **नामदेवाचे** अनुभव उत्कृष्ट समजतात. एकदां **ज्ञानदेव** पंढरीस गेले व **नामदेवास** म्हणाले कीं तुझ्या संगतीनें सर्व तीर्थें पहावींशीं वाटतात. हें बोलणें ऐकल्याबरोबर **नामदेव** उद्विग्न झाला.

ऐसें वचन ऐकून । नामा उद्विग्न झाला मनीं ॥
म्हणे पंढरिक्षेत्र टाकुनि । तीर्थाटनीं कां जावें ॥ १
सुधारस लवंडोनि दुरी । कांजी मागावी घरोघरीं ॥
कीं अमूल्य टाकुनि कस्तुरी । राख पदरीं कां घ्यावी ॥ २

**—महीपति**

असा निश्चय करून **नामदेव** म्हणाला कीं मी आपल्या स्वाधीन नाहीं, माझा ज्यानें आजपर्यंत प्रतिपाल केला त्या **विठ्ठलाच्या** आधीन सर्वस्वी आहें, म्हणून आपण देवास विचारावें. देवानें जर आज्ञा दिली तर मी येण्यास तयार आहें. मग **ज्ञानदेवानें** देवाच्या पायावर मस्तक ठेवून आपला हेतु कळविला, तेव्हां देव हांसून म्हणाले कीं, **ज्ञानदेवा**, तूं चिद्रूप असून स्फटिकाप्रमाणें निर्मळ आहेस, तूं सर्वसंगविमुक्त असून साक्षात् परमात्मस्वरूप आहेस, तेव्हां तुला तीर्थाटन कशास पाहिजे ?

चंद्रासि शीतळ उपचार । कासया करावे वारंवार ॥
क्षीरसागरासि पाहुणेर । कवण्या अर्थे करावें ॥ १

—महीपति

ज्ञानदेव म्हणाले कीं आपण म्हणतां तें सत्य आहे, परंतु नामदेवासारखा प्रेमळ भक्त भूमंडळावर नाहीं, यासाठीं त्याच्या संगतीचें सुख अनुभवून देहाचें सार्थक करावेंसें वाटतें. मग देव नामदेवाकडे पाहून बोलला कीं, नामदेवा, मूर्तिमंत परब्रह्म जो ज्ञानेश्वर तोच तुझ्या समागमाची इच्छा करीत आहे, तेव्हां त्यासवें जाऊन तीर्थें वंदून लवकर परत ये. हे जिवलगा, आसनीं, शयनीं, चालतांना माझा विसर पडूं देऊं नको. मजवर लोभ असूं दे. कंठ सद्गदित होऊन देव ज्ञानेश्वरास म्हणाले कीं, तूं सर्वज्ञ आनंदस्वरूप आहेस, तथापि एका गोष्टीची आठवण ठेव. नामदेव माझ्या कृपेनें वाढलेला आहे, त्यावर माझें इतकें प्रेम आहे कीं, एक वेळ रुक्मिणी दूर झाली तरी चालेल, परंतु नाम्याचा वियोग मला अगदीं सहन होत नाहीं. तूं संकट घातलेंस, तेव्हां वचन मोडवत नाहीं. नाम्याप्रमाणें प्रिय वस्तु मला कोणतीहि नाहीं. इतकें बोलून देवानें नामदेवाचा हात ज्ञानेश्वराचे हातांत घालून सांभाळ करण्यास सांगितलें.

नामदेव व ज्ञानदेव गेल्यावर देवाच्या नेत्रांतून अश्रुधारा चालल्या व सर्वांगास घाम आला. ही देवाची स्थिति पाहून रुक्मिणीनें कारण विचारिलें, तेव्हां देव म्हणालेः—

मी अव्यक्त निराकार जाण । भक्तालागीं जाहलों सगुण ॥
माझे भक्तास वैकुंठस्थान । बैसावया निर्मिलें ॥ १
माझिया भाग्याचे वांटेकरी । निजभक्तचि जाण अधिकारी ॥

त्यांचिया जीवींचें झडकरी । मीच एक जाणता ॥ २
अहंता टाकूनि सर्वस्वें । मजसी मीनले समरसें ॥
जेवीं दीपक आणि प्रकाश । अभिन्नपणें असती कीं ॥ ३
ऐसे विज्ञानी जे भक्तराज । नामा तयांचा असे चरणरज ॥
त्याचा वियोग जाहला आज । म्हणून मज दुःख वाटे ॥ ४

—**महीपति**

इकडे **नामदेव** व **ज्ञानदेव** वाट चालत असतां **नामदेव** फिरून फिरून मागें पाही व विव्हल होई. आई दृष्टीस पडेनाशी झाली म्हणजे जशी बालकाची अवस्था होते, तशी **नामदेवाची** झाली. हें पाहून **ज्ञानदेव** म्हणाले कीं तुझ्या हृदयांत साक्षात् सगुण देव असतां कष्टी कां होतोस? आपलें आत्मस्वरूप न जाणून वियोग-दुःखानें कां शिणतोस? **नामदेव** म्हणाला कीं विटेवर समचरण जोडून जें साक्षात् सगुणब्रह्म उभें आहे, तें मला दाखवा. जगज्जीवन माझी विश्रांति आहे, तो न भेटल्यामुळें माझे प्राण जाऊं पहात आहेत. **ज्ञानदेव** म्हणाले कीं हे प्रेमळ भक्ता, **विठ्ठलाशिवाय** रतिभर देखील जागा रिकामी नाहीं, याकरितां भेदभाव सोडून हृदयांतील अद्वैतास ओळख म्हणजे झालें. **नामदेव** म्हणाला कीं संपूर्ण जगतांत **विठ्ठल** भरला आहे हें मला खरें वाटत नाहीं. **ज्ञानदेव** म्हणाले कीं, ज्ञानी लोक ज्याची उपासना करितात तें अक्षर व अव्यक्त परब्रह्म तुझ्या हृदयांत आहेच. **नामा** म्हणाला कीं, मला सगुण-रूपाशिवाय दुसरें कांहीं आवडत नाहीं, तें पाहिल्याशिवाय, माझ्या डोळ्यांचें पारणें फिटणार नाहीं. हा निर्धार पाहून **ज्ञानदेव** म्हणाले कीं, तुझा शुद्धभाव अपूर्व आहे,

तरी जेणेंकरून विठ्ठलास आपल्या स्वाधीन केलास तो भक्तिमार्ग मला निवेदन कर. भजन, श्रवण, मनन कशीं करावीं, निदिध्यासन कसें करावें, धृति धारणा कोणती, विश्रांति कशास म्हणावें, हे सविस्तर सांग. या गोष्टी तुला पुसाव्या अशी बहुत दिवस मला उत्कंठा लागली आहे, म्हणून तुला जो अनुभव लाभला आहे तो अवश्य सांगावा. नामदेव म्हणाला कीं, मला शास्त्रव्युत्पत्ति कांहींएक नाहीं, म्हणून तर पांडुरंगानें माझा हात तुमच्या हातांत घातला. मी अगदीं नेणता अजाण आहें. तुम्ही सर्वज्ञ असून लहानपणा घेऊन अध्यात्मज्ञान मलाच विचारितां हें काय? ज्ञानदेव म्हणाले कीं, तूं मनांत कांहींएक विकल्प आणूं नको. द्वैतभावाची रीत सोडून देऊन आपले अनुभव निर्भीडपणें सांग. हे नामदेवा, तुझें रसाळ बोल समुद्राहून खोल भासतात, तुझ्या वाणीमध्यें स्वानंदाची केवळ भरती दिसते,—असे तुझे बोल ऐकण्यास माझे कान क्षुधातुर झाले आहेत, तर त्यांवर ज्ञानामृताचें सिंचन होऊं दे. तूं सकल विश्रांतीचें अधिष्ठान आहेस, म्हणून तर तुझा समागम केला आहे. नामदेवा, प्रत्यक्ष पांडुरंग तूं स्वाधीन केलास, तेव्हां तुझी भक्ति काय वर्णावी? एक प्रेमरस जर नाहीं तर उदंड ज्ञान असून काय उपयोग? सिंह लहान दिसतो खरा, पण त्याचें शौर्यतेज असें असतें कीं, त्याचे समोर प्रचंड हत्ती उभे देखील राहूं शकत नाहींत. यास्तव तुझें ज्ञान अल्प असें कदापि म्हणूं नये. औषधींचे भारे जमविले, तरी अमृताची सर येईल काय? तेव्हां तुझ्या ज्ञानाची बरोबरी महापंडितांस कशी होईल? याकरितां तुझें प्रेमळ भाषण

ऐकण्यास माझे कान उत्कंठित झाले आहेत, म्हणून मौन सोडून माझे हेतु परिपूर्ण कर. हें ऐकून नामदेव म्हणाला कीं ज्ञानेश्वरा, माझा संपूर्ण अनुभव ऐकावा.

अंगीं असावें वैराग्यबळ । सर्वांभूतीं दया अढळ ॥
मीतूंपणाची खळखळ । प्रपंच तळमळ नसावी ॥ १
ऐसी स्थिति होतांच जाण । तयास म्हणावें शुद्ध भजन ॥
अंगीं जरि हें नसेल चिन्ह । तरी व्यर्थ साधन कासया ॥ २
बाह्यात्कारें केलें नमन । अंतरीं आठविले दोषगुण ॥
जेवीं मक्षिकांसमवेत पक्वान्न । अति आदरें जेविला ॥ ३
उत्तम मध्यम नाठवे जाण । तेंचि जाणावें अखंड नमन ॥
अंतरीं स्वानंदाचें जीवन । नाहीं खंडन तयासी ॥ ४
विश्वीं विश्वंभर व्यापला जाण । निश्चल बोधें स्थिरावें मन ॥
याचि नांवें म्हणिजे ध्यान । आनंदघन अक्षयीं ॥ ५
आतां कैसें करावें श्रवण । स्वामीनीं पुसिलें मजकारण ॥
जेवी नादलुब्ध होऊनि हरिण । जाय विसरून देहभाव ॥ ६
तया रीतीं तल्लीन मन । करूनि ऐकावें हरिकीर्तन ॥
श्रवण भक्ति याजकारण । म्हणती सज्ञान अनुभवी ॥ ७
व्यवहारीं ठेवुनियां चित्त । कृपण जैसा द्रव्य सांचित ॥
त्याच रीतीं विचारी स्वहित । मनन निश्चित या नांव ॥ ८
आतां निदिध्यास तो कैशा रीती । जेवीं परपुरुषीं लावूनि प्रीति॥
जारिणी मंदिरीं रहाटती । लौकिक स्थिती सारिख्या ॥ ९
कीं धेनु चरत असतां डोंगरीं । परि लक्ष ठेविलें वत्सावरी ॥
कीं मन ठेवून द्रव्यावरी । कृपण बाजारीं हिंडतसे ॥ १०
कीं कुंभ घेऊनि शिरावरी । मोकळ्या हातें चाले नारी ॥
लक्ष ठेवूनि दुडियेवरी । लोकाचारीं बोलत ॥ ११
कीं चित्त ठेवूनि पुष्पावर । मिलिंद आकाशीं देत गुंजार ॥
तेवीं बाह्यात्कारें करूनि संसार । अंतरीं श्रीधर असावा ॥ १२
सर्वभावें विठ्ठल चित्तीं । रूप पाहावें सर्वांभूतीं ॥

रजतम टाकूनि निश्चितीं । सप्रेम चित्तीं असावें ॥ १३
एकांतीं बैसोनि नित्य नेमानें । करावें श्रीहरिचें कीर्तन ॥
याविरहित केलीं जीं साधनें । तीं बंधनें जाणावीं ॥ १४
कायावाचामनोभाव । म्यां सांगितला आपला अनुभव ॥
हेंही वदविता पंढरीराव । रुक्मिणीनाहो श्रीविठ्ठल ॥ १५

—**महीपति**

यावरून पाहतां निर्गुण ब्रह्माच्या उपासनेपेक्षां सगुण ब्रह्माची उपासना सुलभ असून अधिक प्रिय होते, त्यांतहि बोलत्या चालत्या सगुण ब्रह्माची उपासना अत्यंत चित्ताकर्षक होते, म्हणून भक्तिमार्ग सर्वांस आवडतो.

मोक्षप्राप्ति होण्यास प्रथमतः देहबुद्धीचा नाश, चित्तशुद्धि व वासनाक्षय या गोष्टी अवश्य साध्य करून घेतल्या पाहिजेत. घरदार सोडून अरण्यामध्यें राहिल्यानें ह्या तीन गोष्टी साध्य होतात असें नाहीं. उलटपक्षीं संसारांत राहूनहि त्या साध्य करून घेऊन मोक्ष मिळवितां येतो हें साधुसंतांनीं दाखविलें आहे. बहुतेक सर्व साधूंनीं युक्तियुक्तीनें जनसमाजास स्वहिताच्या खऱ्या मार्गाकडे लावण्याचा प्रयत्न केला आहे. नाथानीं भागवतांत हीच युक्ति दाखविली आहे. बहिर्मुख इंद्रियें अंतर्मुख करण्याचा योगशास्त्रांत निर्दिष्ट केलेला मार्ग जनसमाजास बिकट वाटतो. भागवतधर्माप्रमाणें इंद्रियांचा बहिःसंचार स्थिर करवत नसला तरी हरकत नाहीं, मात्र तीं बहिश्चर इंद्रियें ईश्वराकडे लावावीं म्हणजे कार्यभाग होतो. हा मार्ग धरिला म्हणजे हळूहळू देहबुद्धि नष्ट होते, मीपणा नाहींसा होतो व चित्तशुद्धि होते. आपण जें जें कर्म करितों तें परमेश्वराकरितां आहे, त्याला अर्पण करावयाचें आहे, घरदार बायका-मुलें हीं सर्व ईश्वरार्पण आहेत.

दारा सुत गृह प्राण । करावे भगवंतासी अर्पण ।।
हे भागवतधर्म पूर्ण । मुख्यत्वें भजन या नांव ।। १

—एकनाथ

अशी बुद्धि दृढ होत गेली, म्हणजे मन एकाग्र होऊन वासनाक्षय होतो. ईश्वरसेवेंत काळ जाऊं लागला म्हणजे निश्चयेंकरून पापक्षय होतो.

भगवद्गीतेंत भक्तीचें वर्णन येणेंप्रमाणें आढळतें:—

मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।।
निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ।। १

—भगवद्गीता

म्हणजे, मन आणि बुद्धि केवळ माझ्याच ठिकाणीं असूं दे. असें केलें असतां मत्स्वरूपातें पावशील, यांत संशय नाहीं.

अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।।
मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ।। १

—भगवद्गीता

याचा अर्थ असा कीं—माझ्या ठिकाणीं मन व बुद्धि ठेवण्याचा अभ्यास जर होत नसेल, तर श्रवणकीर्तनादि जीं मदर्थ कर्में त्यांमध्यें एकनिष्ठ हो. श्रवण, कीर्तन इत्यादि रीतीनें भक्ति केली असतां सत्त्वशुद्धि होऊन ज्ञानोत्पत्ति द्वारानें सर्वत्र ब्रह्मभाव बाणून जाईल.

अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ।।
सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ।। १

—भगवद्गीता

म्हणजे, बाह्य विषयासक्ततेमुळें श्रवणादि द्वारा माझी भक्ति होत नसेल, तर मला शरण येऊन विवेकानें सर्व कर्मांपासून होणाऱ्या फलांवर आसक्ति सोडून दे.

या वचनामध्यें भक्तीचे तीन प्रकार वर्णिले आहेत. प्रथम प्रतिमादिकांचे ध्यानाचा अभ्यास करावा; हें जर न घडेल तर श्रवणकीर्तनादि प्रकार करावे; तेहि जर न घडतील तर कर्मफलाची आसक्ति टाकून द्यावी. कर्मफलासक्ति नसणें म्हणजेच सर्वकामत्याग होय, आणि हा उपाय निःसंशय मोक्षकारक होय.

त्याग या संज्ञेमध्यें अपूर्व चमत्कार आहे. याचे अर्थ दोन होतात. एक टाकून देणें किंवा सांडणें व दुसरा, दान. जी वस्तु आपणास अत्यंत प्रिय असते, तिजविषयीं आसक्ति सोडून देऊन ती दुसऱ्यास दान करावी हें तत्त्व निरूपित करण्यांत आर्यतत्त्वज्ञानाची व आर्य धर्माची विलक्षण महती सिद्ध होते. उपास्य देवतांचे नामरूपादि धर्म वर्ज करून त्या केवळ परमात्मारूप-समुद्राच्या लाटा आहेत हें मानून त्या देवतांच्या देवतात्वाचा त्याग करण्यांत धैर्याची पराकाष्ठा करावी लागते.

विषयांची गोडी धरिली तर यातना भोगाव्या लागतात, याकरितां त्यांवर तुटून पडणारीं इंद्रियें आंवरून धरावीं लागतात. इंद्रियें आंवरून धरिलीं व विषय टाकून दिले तरी तीं फिरून फिरून बाधा करितात, यासाठीं हरिभक्ति योजली आहे. इंद्रियांचा आत्म्याशीं संबंध काय आहे हें पुढील वचनावरून ध्यानांत येईल.

आत्मानꣳ रथिनं विद्धि शरीरꣳ रथमेव तु ॥
बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः प्रग्रहमेव च ॥ १
इंद्रियाणि हयानाहुर्विषयाꣳस्तेषु गोचरान् ॥
आत्मेंद्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिणः ॥ २

—कठोपनिषद्

याचा अर्थ असा कीं—प्रवृत्ति किंवा निवृत्ति यांपैकीं कोणत्या तरी एका हेतूकडे जीवात्म्याचा कल असतो. प्रवृत्ति म्हणजे संसार व निवृत्ति म्हणजे मोक्ष. हे हेतु साध्य होण्याकरितां रथाची कल्पना केली आहे. तो रथ शरीर होय, त्याचा धनी जीवात्मा, सारथि बुद्धि, मन लगाम, आणि इंद्रियें हीं घोडे होत. रूपादि जे पांच विषय ते मार्ग होत. शरीर, इंद्रियें, मन इत्यादिकांसहित जो आत्मा त्यास भोक्ता किंवा संसारी म्हणावें. बुद्धिरूप सारथि जर चतुर नसेल तर मनरूपी लगाम नीट खेंचला जात नाहीं आणि इंद्रियरूपी घोडे कह्यांत रहात नाहींत.

भगवद्भक्ति केली असतां विषयासक्ति घडत नाहीं. योग आणि भक्ति या दोहोंमध्यें असा फरक आहे कीं, योगी जीं इंद्रियें केवल परमात्म्याकडे प्रवृत्त करितात, तींच भक्त श्रीकृष्णाकडे लावितात; योगी जे विषय टाकितात, ते, भक्त कृष्णार्पण करितात. योगी जेव्हां विषयांचा त्याग करितात, तेव्हां त्यांस क्लेश होतात.

> क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ॥
> अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ १
>
> —भगवद्गीता

परंतु भक्त जेव्हां विषय ईश्वरार्पण करितात तेव्हां त्यांस समाधान वाटतें. दोन्ही ठिकाणीं त्याग समान आहे. परंतु तो अर्थभिन्नत्वानें घडतो. इंद्रियें ईश्वरार्पण कशीं करावीं याविषयीं पुढील वचन प्रसिद्ध आहे:—

> जिव्हे कीर्तय केशवं मुररिपुं चेतो भज श्रीधरं ।
> पाणिद्वंद्व समर्चयाच्युतकथां श्रोत्रद्वय त्वं शृणु ॥

कृष्णं लोकय लोचनद्वय हरेर्गच्छांघ्रियुग्मालयं ।
जिघ्र घ्राण मुकुंदपादतुलसीं मूर्धन्नमाधोक्षजम् ॥ १

म्हणजे—हे जिव्हे, तूं केशवाचें कीर्तन कर. हे मना, तूं मुरारि जो श्रीकृष्ण त्याचें चिंतन कर. हे हस्तांनो, तुम्हीं श्रीधराची पूजा करा. कर्णहो, तुम्हीं अच्युतकथा श्रवण करा. नेत्रांनो, कृष्णास अवलोकन करा. हे चरणद्वया, तूं हरिमंदिराप्रत जा. हे घ्राणेंद्रिया, मुकुंदपादसंबंधी तुलसीचें अवघ्राण कर. हे मस्तका, तूं अधोक्षजास नमस्कार कर. या श्लोकांत भागवतधर्मानुसार कर्में करण्यासाठीं सर्वेंद्रियांची प्रार्थना केली आहे.

कायेन वाचामनसेंद्रियैर्वा बुद्ध्यात्मना वा प्रकृतिस्वभावात् ॥
करोति यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पये तत् ॥ १
हरिर्दाता हरिर्भोक्ता हरिरन्नं प्रजापतिः ॥
हरिर्विप्रशरीरस्थो भुंक्ते भोजयते हरिः ॥ १
ब्रह्मार्पणं ब्रह्महविर्ब्रह्माग्नौ ब्राह्मणा हुतम् ॥
ब्रह्मैव तेन गंतव्य ब्रह्मकर्म समाधिना ॥ २

या व्यवहारांतील वचनांमध्यें मन, बुद्धि, इंद्रियें इत्यादिकांकडून होणारे व्यापार परब्रह्मास किंवा श्री कृष्णास अर्पण कसे करावे हें सांगितलें आहे. तसेंच भोक्ता, भोज्य, भोग इत्यादि सर्व त्रिपुटी हरिरूप किंवा ब्रह्मरूप होत. येणेंप्रमाणें मन, बुद्धि, इंद्रियें ईश्वराकडे प्रवृत्त करणें व गृह, सुत, दारा व प्राण यांसुद्धां आपला आत्मा परमेश्वरार्पण करणें हेंच भागवतधर्माचें मुख्य लक्षण एकनाथानीं निरूपित केलें आहे.

तुकाराम-रामदासांच्या कालीं अनेक सत्पुरुष निर्माण झाले. रामेश्वरभट्ट, सेना न्हावी, शेख महंमद,

नारायणबावा, प्रेमाबाई, मोरया गोसावी, जयरामस्वामी केशवस्वामी, रंगनाथस्वामी, आनंदमूर्ति, उद्धवस्वामी, कल्याणस्वामी, वामनपंडित इत्यादि प्रसिद्ध आहेत. तुकाराम पहिल्यानें द्वैतमताचे होते, म्हणजे ईश्वर सर्व जगापासून वेगळा आहे असें त्यांचें मत होतें, परंतु पुढें नामदेवाप्रमाणें गुरूपदेश झाल्यानंतर ते अद्वैती झाले. सर्व ब्रह्मांडास व्यापणारा व अव्यक्त असतांहि भक्तसंरक्षणार्थ व धर्माचें परित्राण करण्याकरितां ईश्वर सगुण अवतार धारण करितो असें ते मानीत. चित्त शुद्ध करून सगुण ईश्वराचें नामस्मरण-ध्यान-भजन करावें म्हणजे मनुष्यास सहज ईश्वराची प्राप्ति होईल असा त्यांचा उपदेश असे.

हेंचि माझें तप हेंचि माझें दान । हेंचि अनुष्ठान नाम तुझें ॥
हेंचि माझें तीर्थ हेंचि माझें व्रत । सत्य हें सुकृत नाम तुझें ॥
हाचि माझा धर्म हेंचि माझें कर्म । हाचि नित्य नेम नाम तुझें॥
हाचि माझा योग हाचि माझा यज्ञ। हेंचि जप ध्यान नाम तुझें ॥
हेंचि माझें ज्ञान श्रवण मनन । हेंचि निदिध्यासन नाम तुझें ॥
हाचि कुळाचार हाचि कुलधर्म । हाचि नित्यनेम नाम तुझें ॥
हा माझा आचार हा माझा विचार। हा माझा निर्धार नाम तुझें ॥
तुका म्हणे दुजें सांगायासि नाहीं । नामेंविण कांहीं धनवित्त ॥१

—तुकाराम

येणेंप्रमाणें भगवन्नामस्मरणावर तुकारामाचा फार कटाक्ष असे. तप इत्यादि कर्मांचा भागवतधर्मांत निराळाच अर्थ झाला. सर्वेंद्रियें ईश्वरास अर्पण होऊन अंतर्बाह्य ईश्वरस्वरूप प्रकट होणें हेंच स्नान; दारा, सुत, गृह, प्राण ईश्वरास अर्पण करणें हेंच दान व हाच त्याग; ईश्वरापुढें नम्र होणें हेंच तप; ईश्वरनामसंकीर्तन हेंच

ध्यान; आणि सगुण ईश्वराजवळ असणें हीच मुक्ति—ये णेंप्रमाणें भक्तीचे प्रकार झाले.

तुकारामानीं मानिलेल्या ईश्वराचें स्वरूप

एकमेवाद्वितीयम् —**बृहदारण्यक**

असें होतें. अंतःकरणांतून भेदबुद्धि म्हणजे परकेपणा नाहींसा झाल्याबरोबर आपणच ईश्वर आहों व नंतर ईश्वराची भक्ति करण्याचें कारणच उरत नाहीं, परंतु अज्ञजनांस मोक्षमार्ग सुलभ होण्यास सगुणब्रह्माच्या भक्तीसारखा सोपा मार्ग नाहीं असें त्यांचें मत होतें.

**रामदास** हे इतिहासतत्त्व निरूपण करणारे महाराष्ट्रांतील पहिले ग्रंथकार होत. राष्ट्रीय उन्नति होण्याच्या कालांत त्यांचा जन्म झाल्यामुळें भागवतधर्मप्रसारार्थ जसा त्यानीं प्रयत्न केला तसेंच सामाजिक प्रगतीकडेहि त्यांचें पूर्ण लक्ष होतें. लोकांचे समुदाय कसे बनवावे, राष्ट्राच्या कल्याणाकडे त्यांचें लक्ष कसें लावावें, इत्यादि गोष्टी दासबोधांत फार मनोवेधक रीतीनें वर्णिल्या आहेत.

इतर साधुसंतांप्रमाणें **रामदास** पूर्ण अद्वैती होते, व वेदप्रतिपादित तत्त्वें निरूपित केलेलीं त्यांचे ग्रंथांत सर्वत्र आढळतात.

प्रकटला देव जयाचे अंतरीं । तया नाहीं उरी मीपणाची ॥ १
मीपणाची उरी तूंपणीं भेटतां । आपण पाहतां वाव झाली ॥ २
वाव झाली देव देखतां दाटणी । दास म्हणे वाणी वेडावली ॥ ३

—**रामदास**

**रामदासांच्या** मतीं कर्म व ज्ञान यांचा अंतर्भाव उपासनेंत होतो. कर्म, ज्ञान, उपासना, हे ईश्वरप्राप्तीचेच

पण भिन्न मार्ग आहेत. एकामागून एक ते मार्ग अस्तित्वांत आले असें नसून ते सर्व एककालींच होते असें आढळतें. कर्मांतहि भक्ति आहे, कारण भक्तीवांचून केलेलें कर्म निष्फळ होतें. उपासनेंतहि पूजादि कर्में आहेतच. कर्म व उपासना या दोहोंसहि ज्ञानाची अवश्यकता आहे, म्हणजे दोन्ही 'सोऽहं' या भावनेनेंच करावीं लागतात. यावरून पाहतां कर्म, उपासना व ज्ञान हे मार्ग परस्पराशीं मिश्र आहेत व ते अधिकाराप्रमाणें व परिस्थितीप्रमाणें प्रत्येकास उपयुक्त आहेत. सांप्रतकालीं ब्रह्मनिष्ठाप्रमाणें व भगवद्भक्ताप्रमाणें कर्म सोडणें बहुतेकांस इष्ट वाटतें आणि परमहंसाप्रमाणें अन्न, पेय इत्यादिकांचे निर्बंध नकोतसे वाटतात, परंतु ब्रह्मस्थितीची किंवा भक्तीची किंवा आत्मज्ञानाची मात्र वाण रहाते. वस्तुस्थिति अशी आहे कीं, अनेक जन्मींच्या संचितासाठीं स्थूल देहास कर्मानुष्ठानादि दंड अवश्य पाहिजे, लिंगदेहाकरितां उपासना केली पाहिजे व कारणदेहासाठीं स्वरूपज्ञान अवश्यक आहे.

रामदासानीं प्रतिमापूजेचें तत्त्व उत्कृष्ट प्रतिपादिलें आहे. चित्रावरून जशी व्यक्ति ओळखितां येते, तसें प्रतिमांवरून परमात्मा ओळखिला पाहिजे.

थोर लोक मरोनि जाती । त्यांच्या सुरता करोनि पहाति ॥
तैशीच आहे हीं गती । उपासनेचीं ॥ १
नाना देवांच्या नाना प्रतिमा । लोक पूजिती धरूनि प्रेमा ॥
ज्याच्या प्रतिमा तो परमात्मा । कैसा आहे ॥ २
ऐसें ओळखिलें पाहिजे । ओळखोन भजन कीजे ॥
जैसा साहेब नमस्कारिजे । ओळखिल्या उपरी ॥ ३

पूजा घेताति प्रतिमा । अंगा येतो अंतरात्मा ॥
अवतारी तरी निजधामा । येऊनि गेले ॥ ४
परी ते निजरूपें असती । ते निजरूपें जगज्ज्योति ।
सत्त्वगुण तयेस म्हणती । जाणती कळा ॥ ५
तये कळेच्या पोटीं । देव असती कोटयानुकोटी ॥
या अनुभवाच्या गोष्टी । प्रत्ययें पहाव्या ॥ ६
देहपुरामध्यें ईश । म्हणोन तया नांव पुरुष ॥
जगामध्यें जगदीश । तैसा ओळखावा ॥ ७

शिव, विष्णु, शक्ति हीं परमेश्वराचींच सोपाधिक रूपें आहेत. भक्तिमार्गाकडे त्यांना लावणें आहे, व भक्तिमार्गाचें सर्वस्व आत्मज्ञान होय, असें रामदासांचें मत होतें.

या एकंदर विवेचनावरून पाहतां श्रीमत् शंकराचार्य व श्रीमत् विद्यारण्य स्वामी या सर्वज्ञ विभूतींनीं जो ब्रह्मसूत्रांचा अर्थ केला आहे, तो सर्व महाराष्ट्र साधु कवींस व उत्तर हिंदुस्थानांतील महा साधु तुळशीदास, कबीर, निश्चलदास इत्यादिकांस मान्य असून रामानुजादिकांचीं मतें एकपक्षीय होतीं हें सिद्ध होतें, व प्राचीन कालापासून सांप्रत कालापर्यंत भरतखंडांतील बहुजनसमाजाची एतद्विषयींची प्रवृत्ति कशी आहे हें स्पष्ट दिसतें. याकरितां आर्यांचें पारमार्थिक वतन व भरतखंडाचें लक्षण जी आत्मविद्या तिचें परिशीलन करून सनातन प्रवृत्ति कायम ठेवावी अशी आर्यबांधवांस विनयपूर्वक विनंति आहे. आतां महाराष्ट्र साधु कवींचीं शुद्ध अद्वैतपर कांहीं कवनें देऊन ग्रंथसमाप्ति करितों.

मन हें मुरे । मग जें उरे ( ध्रुपद )
तें तूं कां रे सेविसना ॥ १
ज्याच्यान कळे । तें रे नाकळे ( ध्रुपद )
अजून डोळे उघडिसना ॥ २
दिसते परी । न येचि हातें ॥ ( ध्रुपद )
तें संतांतें पुसेचिना ॥ ३
तेथिल खूण । विरळा जाणे
निवृत्तिप्रसादें ज्ञानदेव बोले ॥ ४

—ज्ञानेश्वर

आर्य लोकांची मन शब्दाची व्याख्या इंग्रजींतील 'mind' या समानार्थक शब्दाहून भिन्न आहे, यामुळें मनोलय याचा अर्थ आधुनिक पंडितांस चांगला समजत नांहीं. इंग्रजींतिल mind हा शब्द व्यापक असून त्यामध्यें मन, बुद्धि, चित्त, अहंकार या चतुष्टयाचा समावेश होतो. मन हें केवळ संकल्पविकल्पात्मक होय. मन लीन झाल्यावर आत्मा प्रकट होतो. पुढील कवनांत तुकारामानें असंप्रज्ञात समाधीचें वर्णन केलें आहे.—

लटिका प्रपंच वांझेची संतति । तत्त्वज्ञा हे भ्रांति बाधूं नेणे ॥ १
सूर्यबिंबीं केवीं अंधारें रिघेल । मृगजळीं तिंबेल नभ काई ॥ २
तैसा दृश्य भास नाढळेचि डोळा । स्वानंदें सोहळा भोगीतसे ॥ ३
भोग भोग्य भोक्ता नाठवेचि कांहीं । चैतन्यविग्रही पूर्णकाम ॥ ४
तुका ब्रह्मानंदीं अहेतूक ब्रह्म । प्रपंचानें नाम न दिसे डोळां ॥ ५

—तुकाराम

धन्य योगीं लाभला ऐसा योग । गुरुकृपें लाधला ज्ञानमार्ग ॥ १
निजानंद जडोनि ठेली दृष्टी । विघरतांचि लयासी गेली सृष्टी ॥ २
आपणाहूनि दूरस्थ देखे देहो । सरला मोह मायिक झाला वावो ॥ ३
स्वभावतां कल्पना जेथें उडे । तेथें आधीं आपण ऐसें दाटे ॥ ४
जाणीव तो जाणीव देखे खेळ । अनिर्वाच्या पैं लावूं निज निर्मळ ॥ ५

त्रिपुटि भान हरुनि घे विश्राम । सदोदित अखंड आत्माराम ॥६

—रामदास

भक्तांसी भगवद्भजनें । भवसागर मृगजळवत् रे ॥ १
चिद्विलास जग नग हेमीं । वस्तुत्वें भेदातित रे ॥ २
अस्ति भाति प्रियरूप आत्मा । तो नामरूप विरहित रे ॥ ३
जाणुनिया अनुभव ऐसा । हरिभजनीं रत अत्यद्भुत रे ॥ ४
जाळिलें संचित समुळीं । ज्ञानाग्नीमाजी निगुति ॥ ५
क्रियमाण पूर्व प्रवाहें । विधिपूर्वक कर्म घडति ॥ ६
निर्हेतुक निरहंकारें । ब्रह्मार्पण सहजचि होती ॥ ७
प्रारब्ध कलेवर भोगी । साक्षी हा ईश्वरमूर्ति ॥ ८

—रंगनाथ

तस्मात् विचार करावा । देव कोण तो ओळखावा ॥
आपला आपण शोध करावा । अंतर्यामीं ॥ १
आत्मा म्हणिजे तो अद्वैत । जेथें नाहीं द्वैताद्वैत ॥
तेथें मीपणाचा हेत । उरेल कैंचा ॥ २
आत्मा पूर्णत्वें पूर्ण । तेथें नाहीं गुणागुण ॥
निखळ निर्गुणीं आपण । कोण कैंचा ॥ ३
निरासितां जीव शिव उपाधी । जीव शिवाचि कैंचे आधी ॥
स्वरूपीं होतां दृढ बुद्धी । आपण कैंचा ॥ ४

—रामदास

मुळींच तें नाहीं तें नाहीं । अनादिसिद्ध मी पाहीं ( ध्रुपद )
माया साच असावी । तरि मग विवेकें निरसावी ॥ १
बंधन मुळींच असावें । तरि मग मुक्त असें म्हणवावें ॥ २
जरि भवरोगि असावें । तरि मग रामरसायण घ्यावें ॥ ३
निजरंगीं रंगेलों । अपुले उगमिं संगम झालों ॥ ४

—रंगनाथ

# भाग दुसरा

## प्रकरण १

### ईश्वरप्रणीत धर्मग्रंथ

सर्वेऽत्र सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः ॥
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद्दुःखमाप्नुयात् ॥

आर्यलोकांचा ईश्वरप्रणीत धर्मग्रंथ म्हटला म्हणजे वेद होय. वेद हे अनादि, अनन्त व नित्य आहेत. सृष्टीच्या उत्पत्तीच्या अगोदर वेद निर्माण झाले हें वैदिक धर्माचें मुख्य प्रमेय होय. वेदांमध्यें सर्व विद्या व सर्व ज्ञान मूलरूपानें भरलेलें आहे, व त्यांपासूनच साक्षात् किंवा परंपरेनें सर्व विद्या उत्पन्न झाल्या व वृद्धिंगत पावल्या आहेत. पृथ्वीवरील सर्व पुस्तकांमध्यें जो सत्याचा अंश आहे त्याचा वेदांशींच परंपरेनें संबंध आहे. वेदांतील विद्या परमेश्वरानें दिल्या आहेत, म्हणून त्यांचें अध्ययन अवश्य झालें पाहिजे.

वेद अनन्त आहेत हें तैत्तिरीय ब्राह्मणांतील भरद्वाज ऋषींच्या कथेवरून स्पष्ट होत आहे. या अनन्त वेदांपैकीं जितके उपलब्ध झाले तितके एकत्र करून ऋक्, यजुस्, साम व अथर्व असे चार भाग श्रीमद्व्यासानीं द्वापारयुगाचे अन्तीं व कलियुगाचे आरंभीं केले व शाखोपशाखा, कांडें इत्यादि त्यांचें वर्गीकरणहि केलें. तेणेंकरून कर्म, उपासना व ज्ञान हे वेदांचे अवयव अत्यन्त महत्त्वाचे असून भारतीय आर्यधर्माचा के-

वळ आत्मा होत; तसेंच सर्व उपनिषदांचें सार जी भगवद्गीता तिजमध्यें हेच प्रविभाग असून ते अनुक्रमें त्वंपदार्थ, तत्पदार्थ व त्यांचें ऐक्य यांचे ज्ञापक होत.

ईश्वरापासून वेदांची उत्पत्ति कशी झाली तें पुढील वचनावरून ध्यानांत येईल:—

तस्माद्यज्ञात्सर्वहुतः ऋचः सामानि जज्ञिरे ॥
छंदांसि जज्ञिरे तस्माद्यजुस्तस्मादजायत ॥

—**पुरुषसूक्त**

याचा अर्थ असा कीं,—त्या सर्वहुत म्हणजे सर्वांस पूज्य अशा पूर्ण पुरुषापासून ऋग्वेद, सामवेद, छंदांसि म्हणजे अथर्ववेद आणि यजुर्वेद हे उत्पन्न झाले. या मंत्रांतील यज्ञ शब्द विष्णूचा वाचक आहे. याविषयीं मुख्य वचन येणेंप्रमाणें:—

यज्ञो वै विष्णुः । —**शतपथ ब्राह्मण**

याचा अर्थ असा:—यज्ञ म्हणजे सर्वव्यापक परमेश्वर होय, कारण " वेवेष्टि व्याप्नोति चराचरं जगत् " अशी विष्णु शब्दाची व्युत्पत्ति आहे. त्या सर्वव्यापक परमेश्वरापासून सृष्टि उत्पन्न झाली आणि अखिल सृष्टीविषयीं विचार करण्यास समर्थ असा जो मनुष्यप्राणी त्यास सहाय होण्याकरितां वेदहि अगोदर निर्माण झाले. ईश्वरापासून वेद उत्पन्न झाले याबद्दल दुसरीं वचनें येणेंप्रमाणें:—

एवं वा अरेऽस्य महतो भूतस्य निःश्वसितमेतद् ।
यदृग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्वांगिरसः ॥

—**शतपथ ब्राह्मण**

अस्य महतो भूतस्य निःश्वसितमेतद् ।
यदृग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्वांगिरसः ॥

—बृहदारण्यक

शतपथ ब्राह्मणांतील वचनाचा अर्थ असा कीं,— याज्ञवल्क्य ऋषि म्हणतात, " हे मैत्रेयि! त्या मोठ्या परमेश्वरापासून श्वासोच्छ्वासाप्रमाणें सहज असे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद प्रकट झाले ". ज्याप्रमाणें श्वास सहज बाहेर पडून पुनः आंत जातो, तद्वत् परमेश्वरापासून सृष्टीच्या अगोदर हे वेद सहज उत्पन्न होऊन प्रलयकालीं त्याच्यांतच लीन होतात. सृष्टीच्या उत्पत्तीच्या अगोदर वेदांची उत्पत्ति झाली या एका गोष्टीवरून ईश्वराचें मनुष्यमात्रावर किती प्रेम आहे हें व्यक्त होतें. " मननान्मनुष्यः " ही मनुष्य शब्दाची व्युत्पति खरोखर मनोरंजक आहे. विचार करण्यास समर्थ, अर्थात् सृष्टींतील घटनाचातुर्याचा भोक्ता व तन्नियामक शक्तींचा ज्ञाता असा मानवी प्राणी अरण्यांत नेऊन ठेविला व तेथें त्याच्या अन्नपाण्याची व्यवस्था केली, परंतु जर कोणाचाहि शब्द आमरणान्त त्याच्या कानीं पडला नाहीं, तर त्याला कशाचेंहि ज्ञान होणार नाहीं. जर वेदांचा उपदेश जगाच्या आरंभीं झाला नसता, तर सृष्टीच्या आरंभापासून आतांपर्यंत सर्व मनुष्यें पशूसारखींच राहिलीं असतीं. सध्यांचें वाङ्मयात्मक व इतर जें ज्ञान दिसत आहे तें वैदिक ज्ञानाच्या उपदेशाचेंच साक्षात् किंवा परंपरेनें फल होय. ईश्वरानें मनुष्यास मन व बुद्धि दिलीं आहेत हें खरें आहे, तथापि धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे जे चतुर्विध पुरुषार्थ आहेत

त्यांची सिद्धि होणें या दोन शक्तींस वेदावांचून दूरापास्त होय. यावरून वेदांचें महत्त्व सहज ध्यानांत येतें व ईश्वरीय ज्ञानाची आवश्यकता दृष्टीस पडते.

मनुष्याचें नैसर्गिक ज्ञान हें डोळ्याप्रमाणें किंवा कानाप्रमाणें परावलंबी साधन होय. जसें डोळे किंवा कान मनाच्या सहायतेवांचून पाहूं किंवा ऐकूं शकत नाहींत, त्याचप्रमाणें मनुष्यमात्राचें स्वाभाविक ज्ञान वैदिक ज्ञानाच्या साहाय्यावांचून चतुर्विध पुरुषार्थ मिळवूं शकत नाहीं. पंच ज्ञानेंद्रियें मनाच्या साहाय्यावांचून विषयांचें ग्रहण करण्यास असमर्थ कशीं होतात हें पुढील वचनांवरून लक्षांत येईल:—

अन्यत्रमना अभूवं नादर्शम् ।
अन्यत्रमना अभूवं नाश्रौषम् ॥

**—बृहदारण्यक**

याचा अर्थ असा कीं—चक्षुरिंद्रियांस ग्राह्य असे विषय असून देखील मला ते दिसले नाहींत; कर्णेंद्रियास ऐकण्यास योग्य असे ध्वनि असून देखील ते मला ऐकूं आले नाहींत; कारण माझें मन अन्य व्यापारांमध्यें गुंतलेलें होतें. मन जर जाग्यावर नसेल किंवा उपाधीमुळें व्यापारविमुख झालें असेल, तर ज्ञानेंद्रियें असून नसल्यासारखींच होतात, हा आत्मविद्येंतील सिद्धान्त फारच चित्तवेधक आहे, व यावरून मनाला सहावें ज्ञानसाधनीभूत इंद्रिय म्हणतात. तेव्हां मनाच्या सहायतेशिवाय जशीं ज्ञानेंद्रियें निरुपयोगी होतात, तसेंच परमेश्वरीय ज्ञानावांचून मन, बुद्धि हीं चतुर्विधपुरुषार्थसंपादक होत नाहींत.

ईश्वराजवळ अनन्त विद्या आहेत व त्या विद्या मनुष्यमात्राच्या हितासाठीं व स्वतः परमेश्वरासाठीं उपयुक्त होतात. परमेश्वर अत्यंत दयाशील आहे. जसा बाप सदय अंतःकरणानें आपल्या मुलांस उपयुक्त ज्ञानाचा उपदेश करितो, त्याप्रमाणें मनुष्यमात्राच्या हितासाठीं परमेश्वरानें वेदांचा उपदेश केला आहे. वेद जर निर्माण झाले नसते, तर उपरिनिर्दिष्ट पुरुषार्थ साधणें अशक्य होऊन कोणालाहि परमानन्दप्राप्ति झाली नसती. ब्रह्मांडांतील इतर पदार्थांपासून होणारा जो आनंद तो—ब्रह्मविद्येपासून होणाऱ्या आनंदाची यत्किंचित्‌हि बरोबरी करूं शकणार नाहीं. अर्थात् ब्रह्मविद्या ही श्रेष्ठ आहे व ती परमेश्वरानें वेदद्वारा मनुष्यास दिली आहे.

ज्या अर्थीं ईश्वरापासून वेदांची उत्पत्ति झाली व परमेश्वराचें सर्व सामर्थ्य नित्य आहे, त्या अर्थीं वेद हे नित्य म्हणजे त्रिकालाबाधित असून त्यांतील सिद्धान्त सर्वव्यापक आहेत. ज्ञानमय ईश्वरीय वेद नित्य आहेत. ते ज्या पानांवर व ज्या अक्षरांनीं लिहिले असतील तीं जरी नाश पावलीं, तथापि वेदान्तर्गत ज्ञान नाश पावत नाहीं; किंवा पठनपाठन—परंपरा लोपली असतां तें ज्ञान नष्ट होत नाहीं; कारण वेदज्ञान ईश्वरापाशीं सदैव विद्यमान आहे. ईश्वरीय ज्ञान नित्य व अव्यभिचारी असल्यामुळें जसे वेदांतील शब्दार्थसंबंध आज आहेत तसे ते पूर्वींच्या कल्पांत होते व तसेच पुढेंहि रहाणार.

सूर्याचंद्रमसौ धाता यथापूर्वमकल्पयत् ।

—पुरुषसूक्त

याचा अर्थ असा कीं—पूर्वींच्या कल्पांमध्यें परमे-

श्वरानें जशी सूर्यचंद्रादिक अखिल सृष्टीची रचना केली होती, तशीच त्यानें या सृष्टीमध्येंहि केली आहे. ईश्वराचें ज्ञान नाश व वृद्धि पावणारें नसल्यामुळें त्याची सृष्टिरूप कृति एकसारखी असते व त्याचें वैदिक ज्ञानहि नेहमीं सारखेंच असतें, म्हणून वेद हे नित्य आहेत. याविषयीं पुढील ब्रह्मसूत्र प्रमाण आहे:—

शास्त्रयोनित्वात् ।

—वेदान्तदर्शन

याचा अर्थ असा कीं—ऋग्वेदादि जे चार वेद आहेत ते सर्व सत्य विद्यांचा प्रकाश सूर्याप्रमाणें करणारे आहेत, म्हणून त्यांचा कर्ता सर्वज्ञ परमेश्वरावांचून दुसरा कोणीहि होऊं शकत नाहीं. व्याकरणादि एकदेशीय शास्त्रें पाणिन्यादि मुनींनीं केलीं, व तसें करणें शक्यहि आहे. कारण कोणताहि जीव संस्कारविशेषानें एकाद्या शास्त्रांत पारंगत होईल, परंतु वेद हे अनन्त विद्यायुक्त असल्यामुळें त्यांचा कर्ता परमेश्वराशिवाय दुसरा कोणीहि नाहीं.—या शांकरभाष्यावरून असें उघड होतें कीं, वेद हे सर्वज्ञईश्वरप्रणीत आहेत, म्हणून ते सर्वार्थज्ञानयुक्त व नित्य आहेत. याविषयीं दुसरें ब्रह्मसूत्र येणेंप्रमाणें:—

अतएव च नित्यत्वम् ।

—वेदान्तदर्शन

याचा अर्थ असा कीं—वेद हे ईश्वरोक्त असल्यामुळें ते स्वतःप्रमाण,: सर्वविद्यायुक्त आणि सर्वकालीं सारखे नित्य आहेत असें मानावें. वेद प्रमाण आहेत हें सिद्ध करण्याकरितां अन्य ग्रंथांचीं प्रमाणें नकोत, का-

रण ते सूर्याप्रमाणें स्वतःप्रमाण आहेत. ज्याप्रमाणें सूर्य स्वयंप्रकाश असल्यामुळें तो जगांतील अणूपासून पर्वतापर्यंत सर्व पदार्थांला प्रकाशित करितो व दर्शवितो, तद्वत् वेद हे स्वयंज्ञानमय असल्यामुळें ते सर्व विद्यांचा प्रकाश करितात असें समजावें. तसेंच युगपरत्वें अथवा प्रलयकालीं वेदांचा लोप झाला असतां त्यांचें पुनरुज्जीवन कसें होतें हें पुढील वचनांत उत्कृष्ट रीतीनें वर्णिलें आहे.

युगान्तेऽन्तर्हितान्वेदान्सेतिहासान्महर्षयः ॥
लेभिरे तपसा पूर्वमनुज्ञाताः स्वयंभुवा ॥

—**वेदव्यास**

याचा अर्थ असा कीं—युगांच्या अंतीं नानार्थ—वादयुक्त मंत्र-ब्राह्मणांचें अन्तर्धान झालें असतां ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें मंत्रद्रष्टे जे ऋषि त्यांस तपःसामर्थ्यामुळें वेदांची प्राप्ति फिरून होते. ऋषि शब्दाची व्युत्पत्ति ‘ऋषति वेदं पश्यति’ अशी आहे.

ऋषिर्दर्शनात्स्तोमान्ददर्शेति औपमन्यवः ।

—**निरुक्त**

म्हणजे, मंत्रांचा अर्थ पहाणारे व साक्षात्कार करून घेणारे ऋषि होत. वेदांचा लोप झाला असतां ईश्वराचें समाधिद्वारा ध्यान करून ऋषींस मंत्रानुग्रह प्राप्त होतो व ईश्वरीकृपेनें वेदमंत्रार्थ जाणल्यानें त्यांतील ऋषिगुणांचा प्रकाश होतो.

वरील सोपपत्तिक विवेचनावरून वेद हे अनादि, अनन्त व नित्य आहेत या प्रमेयाबद्दल कोणासहि शंका रहाण्यास जागा नाहीं. वेदांमध्यें सर्व विद्या मूलरूपानें संकलित आहेत व त्या सर्वांत आत्मविद्या ही मुख्य

होय. शिवाय आत्मा केवळ वेदैकमेय होय हें तत्त्व फारच महत्त्वाचें आहे. आत्मा हा पदार्थ असून अतींद्रिय असल्यामुळें त्याच्या प्रमितीस प्रत्यक्ष प्रमाण संभवत नाहीं. तसेंच तर्कशास्त्रांत ज्यास लिंग ( हेतु ) अशी संज्ञा आहे त्याचा अभाव असल्यामुळें अनुमान प्रमाणासहि जागा रहात नाहीं. लिंग म्हणजे प्रतिज्ञा सिद्ध करण्यास जो हेतु पुढें करितात तो: जसें—

पर्वतो वह्निमान् —**प्रति**
धूमवत्त्वात् —**हेतु**

म्हणजे, पर्वतावर अग्नि आहे, कारण तेथें धूर दिसतो. याठिकाणीं धूमवत्त्व म्हणजे धुराचें अस्तित्व हा जो हेतु त्यास लिंग असें तार्किक म्हणतात. तेव्हां अशा प्रकारचा हेतु आत्मसिद्धीस सांपडत नसल्यामुळें अनुमान प्रमाण येथें लागू पडत नाहीं. त्याप्रमाणेंच सदृश पदार्थ नसल्यामुळें उपमान प्रमाण संभवत नाहीं. म्हणून बाकी राहिलेलें जें शाब्दप्रमाण त्यानेंच आत्मसिद्धि करावी लागते. याविषयीं न्यायसंग्रह येणेंप्रमाणें:—

रूपलिंगादि राहित्यान्नास्य मान्तरयोग्यता ॥
तंत्त्वौपनिषदेत्यादौ प्रोक्ता वेदैकमेयता ॥

—**वैयासिक न्यायमाला**

याचा अर्थ असा कीं—रूपरसादि नसल्यामुळें प्रत्यक्ष प्रमाण नाहीं, लिंग ( हेतु ) नसल्यामुळें अनुमिति नाहीं व सादृश्य नाहीं म्हणून उपमा प्रमाणास जागा नाहीं; म्हणून आत्मा हा केवळ वेदैकमेय होय, म्हणजे फक्त वेदांवरून जाणतां येतो.

नावेदविन्मनुते तं बृहन्तम् —**तैत्तिरीय ब्राह्मण**
तंत्वौपनिषदं पुरुषं पृच्छामि —**बृहदारण्यक**

म्हणने, वेद न जाणणारास बृहत् असा जो आत्मा त्याचें ज्ञान होत नाहीं, व परब्रह्माचें ज्ञान केवळ उपनिषदांवरूनच होतें.

आतां वेद म्हणजे काय, वेदाचें लक्षण संभवतें किंवा नाहीं, वेदांमध्यें कशाचा अन्तर्भाव होतो याविषयीं विचार करूं. भट्ट यज्ञेश्वरविरचित "आर्यविद्यासुधाकर" नामक ग्रंथांत यासंबंधी पुढील उल्लेख आढळतो:—

वेदो नाम वेद्यन्ते ज्ञाप्यन्ते धर्मार्थकाममोक्षा अनेनेति व्युत्पत्त्या चतुर्वर्गज्ञानसाधनभूतो ग्रंथविशेषः । स च किं लक्षण इति चेत् 'मंत्रब्राह्मणयोर्वेदनामधेय'–मिति आगमोक्तं तल्लक्षणं वेदितव्यम् । यो हि अव्यभिचरितस्वरवर्णादि पठनपाठन–क्रमागतः सन्सर्वकालं सर्व देशेषु प्रतिशाखमविभागेन वर्तमानः स एको मंत्रराशिः । अपरस्तु विधिनिंदा प्रशंसा संप्रश्नाख्यानभूतः वाक्यनिचयो ब्राह्मणराशिः । अनयोरेक संग्रहो वेद इत्यभिधीयते । वेदनिबंधेषु मंत्रब्राह्मणभागौ परस्परमसंमिश्रावेव प्रायः पठ्येते । क्वचित्तु ब्राह्मणसंमिश्रितोऽपि मंत्रभागः पठितोऽस्ति । एवमुभयात्मको वेदराशिरेकमूल एक कर्मफलो महावृक्षो वरीवर्ति ।

याचा अर्थ असा कीं—धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे जे चार पुरुषार्थ आहेत त्यांचें ज्ञान होण्यास साधनीभूत असा जो ग्रंथ व जेणेंकरून हे पुरुषार्थ उत्कृष्ट रीतीनें समजले जातात त्या शब्दराशीस वेद अशी संज्ञा आहे. मंत्र व ब्राह्मण यांस वेद म्हणावें असें आगमोक्त वेदाचें लक्षण होय. यांपैकीं एकसारखे स्वर व वर्ण ज्यामध्यें आहेत व जो अखिल भरतखंडांत सर्व काल पठनपाठनक्रमानें सर्व शाखांमध्यें अव्याहत चालला आहे असा एक मंत्ररूप शब्दराशि आहे; व विधि,

निंदा, प्रशंसा, प्रश्न, कथा इत्यादि रूपानें त्या मंत्रांचा विनियोग कसा करावा हें ज्यांत सांगितलें आहे असा बहुतेक उपन्याख्यानात्मक ब्राह्मणरूप दुसरा शब्दराशि आहे; या दोहोंच्या संग्रहास वेद असें म्हणतात. वेद-निबंधांमध्यें वेद व ब्राह्मण निरनिराळे म्हणण्याचा बहुधा सांप्रदाय आहे, क्वचित् दोन्ही मिश्रित म्हणतात. अशा रीतीनें मंत्रब्राह्मणात्मक वेदराशि हा एक महान् वृक्ष पसरलेला आहे आणि त्याचें मूळ एकच असून त्या-पासून कर्मफल एकच प्राप्त होतें.

निरुक्तकारानीं वेद शब्दाची व्याख्या अनेक रीतीनें केली आहे:—

विदन्ति जानन्ति । विद्यन्ते भवन्ति । विन्दन्ति लभन्ते । विन्दते विचारयन्ति । सर्वे मनुष्याः सर्वाः सत्यविद्याः यैर्येषु वा तथा विद्वांसश्च भवन्ति ते वेदाः ।

याचा अर्थ असा कीं—सर्व मनुष्यें ज्यांच्या साहाय्यानें सर्व सत्यविद्या जाणतात, ज्यांमध्यें विद्वान् होऊं शकतात, ज्यांमुळें सत्यविद्यांचें ज्ञान सर्व मनुष्यें प्राप्त करून घेतात व जेणेंकरून सर्व मनुष्यें सत्यविद्यांविषयीं विचार करण्यास समर्थ होतात—ते वेद होत.

श्रीमद् विद्यारण्य स्वामीनीं या विषयाचा ऊहापोह वेदभाष्यांत व इतर ग्रंथांमध्यें अनेक प्रसंगीं केला आहे. एथें एका गोष्टीचा उल्लेख करणें जरूर आहे. माधवाचार्य किंवा सायणाचार्य किंवा विद्यारण्य स्वामी, कोणतेंहि नामाभिधान असलें, तरी ग्रंथकर्तृत्वासंबंधानें एकाच व्यक्तीचा निर्देश केला जातो असें समजलें पाहिजे. इसवी सनाच्या चवदाव्या शतकांत दक्षिण हिंदुस्तानांत

विजयनगरामध्यें **वीरबुक्क** नांवाचा राजा राज्य करीत होता, व तेथें श्री**माधवाचार्य** प्रधान होते. त्यांचे धाकटे बंधु श्री**सायणाचार्य** महान् पंडित होते व त्यांस चतुर्थाश्रम घेतल्यानंतर **विद्यारण्य** ही पदवी प्राप्त झाली होती. खरोखरच त्यांस 'विद्येचें अरण्य' ही संज्ञा अन्वर्थक होती, कारण प्राचीन ग्रीस देशांतील अत्यंत विश्रुत ग्रंथकार जो **ऑरिस्टॉट्ल** त्याप्रमाणें बहुतेक सर्व शास्त्रांवर स्वामीनीं ग्रंथरचना केली आहे. त्यानीं रचिलेल्या ग्रंथांवर वर निर्दिष्ट केलेल्या तीन नांवांपैकीं एक किंवा दोन किंवा तीन हीं नांवें कर्तृत्वासंबंधी आढळतात. अखिल वेदांवरील भाष्यें लिहिण्यास **वीरबुक्क** राजानें **सायणाचार्यांस** जेव्हां अनुज्ञा दिली ते वेळचा उल्लेख पुढील वचनांत आढळून येतो:—

स प्राह नृपतिं राजन्सायणार्यो ममानुज : ॥
सर्वं वेत्त्येष वेदानां व्याख्यातृत्वे नियुज्यताम् ॥ १
इत्युक्तो माधवार्येण वीरबुक्को महीपतिः ॥
अन्वशात्सायणाचार्यं वेदार्थस्य प्रकाशने ॥ २
ये पूर्वोत्तरमीमांसे ते व्याख्यायाति संग्रहात् ॥
कृपालु र्माधवाचार्यो वेदार्थं वक्तुमुद्यतः ॥ ३
ब्राह्मणं कल्पसूत्रे द्वे मीमांसां व्याकृतिं तथा ॥
उदाहृत्याथ तैः सर्वैर्वेदार्थः स्पष्टमीर्यते ॥ ४

**—वेदार्थप्रकाश**

याचा अर्थ असा कीं—अमात्य **माधवाचार्यांनीं वीरबुक्क** राजास अशी विनंति केली कीं, माझा धाकटा भाऊ **सायणाचार्य** सर्वज्ञ आहे, याकरितां अखिल वेदांवर भाष्यें लिहिण्यास त्यास आज्ञा व्हावी. ही विनंति ऐकून राजानें **सायणाचार्यांस** वेदांचें व्याख्यान करण्यास अनु-

ज्ञा दिली. ब्राह्मण, कल्प, सूत्रें, व्याकरण, पूर्वमीमांसा, उत्तरमीमांसा-इत्यादि ग्रंथांतील उदाहरणें घेऊन वेदांचा अर्थ प्रकाशित करण्यास यानंतर आरंभ झाला.

सकल विद्यायुक्त व अतिगंभीर जे वेद त्यांचें यथार्थ ज्ञान होण्यास काय काय सामग्री पाहिजे हें समजून घेणें इष्ट आहे. प्रथमतः वेदार्थोपकारी असे सहा ग्रंथ अत्यंत महत्त्वाचे असून त्यांस वेदांगें अशी संज्ञा आहे. वैदिक धर्मानुष्ठान केलें असतां सकलपुरुषार्थसिद्धि होते हें तर आर्यधर्माचें मुख्य प्रमेय होय. शिवाय वेदवाक्यांचा गूढार्थ समजेल तरच कर्मकांडाचें व ज्ञानकांडाचें तात्त्विक ज्ञान होऊं शकतें. याकरितां शिक्षा नामक ग्रंथांत वेदार्थास वेदांगांचे उपकारकत्व कसें होतें तें रूपकालंकारानें सिद्ध केलें आहे—

छंदः पादौ तु वेदस्य हस्तौ कल्पस्तु पठ्यते ।
ज्योतिषामयनं चक्षुर्निरुक्तं श्रोत्रमुच्यते ॥ १
शिक्षा घ्राणं तु वेदस्य मुखं व्याकरणं स्मृतं ।
तस्मात्सांगमधीत्यैव ब्रह्मलोके महीयते ॥ २

—शिक्षा

याचा अर्थ असा कीं—वेदपुरुषाचे छंद हे पाय होत, कल्प हे हात, ज्योतिष हे डोळे, निरुक्त हे कान, शिक्षा हें नाक, व व्याकरण हें मुख होय. यासाठीं प्रथम या वेदांगांचें अध्ययन करूनच वेदार्थज्ञानास प्रवृत्त व्हावें. शिवाय याज्ञवल्क्य स्मृतींतील पुढील वचनांत चवदा विद्यास्थानें सांगितलीं आहेत आणि तीं वेदार्थ समजण्यास अत्यंत उपयुक्त आहेतः—

पुराण न्याय मीमांसा धर्मशास्त्रांग मिश्रिताः ॥
वेदाः स्थानानि विद्यानां धर्मस्य च चतुर्दश ।

—याज्ञवल्क्य

इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत् ॥
बिभेत्यल्पश्रुताद्वेदो मामयं प्रहरेदिति ॥

—स्मृति

याचा अर्थ असा कीं—अष्टादश पुराणें, न्याय, मीमांसा व धर्मशास्त्र हीं चार उपांगें, शिक्षादि सहा अंगें व चार वेद हीं चवदा विद्यास्थानें धर्माची केवल क्षेत्रभूमी होय. तसेंच वेदार्थ करितांना इतिहासपुराणांचें साहाय्य अवश्य घ्यावें, कारण ज्याचें ज्ञान अल्प आहे असा मनुष्य वेदांचा अर्थ करूं लागला तर हा आपणास मारील कीं काय अशी वेदांस भीति पडते.

वरील याज्ञवल्क्य स्मृतींतिल वचनांत न्याय व मीमांसा हे जे शब्द आहेत त्यांचा अर्थ कळणें अवश्य आहे.

न्यायो नाम गौतमेन कणादेन च मुनिना कृतं
प्रमाणैरर्थ परीक्षणोपदेशकं शास्त्रम् ।

—आर्यविद्यासुधाकर

म्हणजे गौतम व कणाद या ऋषींनीं प्रत्यक्ष, अनुमान इत्यादि प्रमाणांनीं अर्थनिर्णयास उपयोगी असें जें शास्त्र रचिलें आहे त्यास न्यायशास्त्र असें म्हणतात. मीमांसा शास्त्राचे दोन भाग आहेत, एक पूर्वमीमांसा व दुसरा उत्तरमीमांसा. कर्मसाधक श्रुतींचा विचाररूप जो भाग त्यांतील पूर्वापर विरोध दूर होऊन वास्तवार्थ चिकित्सा व्हावी म्हणून भगवान् जैमिनींनीं द्वादशाध्यायांमध्यें जी धर्ममीमांसा केली आहे ती पूर्व-

मीमांसा या नांवानें प्रसिद्ध आहे. तसेंच उपासनाज्ञान-साधक श्रुतींचा विचाररूप जो भाग त्यांतील पूर्वापर विरोध नाहींसा होऊन खऱ्या अर्थाची चिकित्सा व्हावी म्हणून भगवान् व्यासानीं चतुरध्यायामध्यें जी ब्रह्म-मीमांसा रचिली आहे ती उत्तरमीमांसा अथवा वेदान्त या संज्ञेनें प्रसिद्ध आहे.

ये पूर्वोत्तरमीमांसे ते व्याख्यायाति संग्रहात् ।
कृपालुर्माधवाचार्यो वेदार्थं वक्तु मुद्यतः ॥ १

म्हणजे, वेदार्थप्रकाश लिहिण्यापूर्वीं मनुष्यमात्रा-वर उपकार करण्याकरितां बीरबुक्क राजाच्या आज्ञेनें माधवाचार्यानीं अगोदर पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा या दोन्ही दर्शनांची संक्षिप्त माहिती व्हावी म्हणून दोन ग्रंथ रचिले; शाबरभाष्य व भाट्टदीपिका यांतील अत्यंत गहन सिद्धान्त सुलभ करण्याकरितां जैमिनीय न्यायमाला हा पद्यरूप ग्रंथ लिहून त्यावर विस्तराख्य गद्यव्याख्या रचिली; तसेंच, उत्तरमीमांसेंतील गूढ विषय स्पष्ट करण्याकरितां श्री भारतीतीर्थ मुनीनीं रचिलेल्या "वैयासिक न्यायमाला" या पद्यरूप ग्रंथावर विस्तराख्य गद्य व्याख्या लिहिली.

एणेंप्रमाणें वेदांगांमध्यें व उपांगांमध्यें अत्यंत निष्णात व सर्वज्ञ पदवीप्रत पावलेले विद्यारण्यस्वामी यानीं वेदार्थनिर्णायक भाष्यें रचिलीं, हें भारतीय आर्यांचें महाभाग्य समजलें पाहिजे. श्रुतींचा अर्थ व तदन्तर्गत सिद्धान्तांचा समन्वय हें कठिण काम श्रीमत् शंकराचार्य व श्रीमत् विद्यारण्य स्वामी या सर्वज्ञ विभू-तींनीं जर केलें नसतें तर जनसमुदायास श्रुतींचें

रहस्य कधींच कळलें नसतें. आचार्यांनीं फक्त प्रस्थानत्रयीवरच भाष्यें लिहिलीं आहेत, तथापि त्यांतील रहस्यांचें ज्ञानविज्ञान संपादन करून स्वामीनीं अखिल वेदांवर भाष्यें रचिलीं व प्रसंगोपात्त अनेक महत्त्वाचे विषयांवर सुबोध निबंध लिहिले. स्वामीनीं वेदभाष्य केवळ टीकात्मक न लिहितां अनेक प्रसंगीं विविध वैदिक प्रमेयें सामान्य बुद्धीमध्यें आरूढ होतील असाहि त्यानीं प्रयत्न केला आहे. ऋग्वेद, तैत्तिरीयसंहिता, तैत्तिरीय आरण्यकें—इत्यादिकांवरील भाष्यांचे आरंभीं उपोद्घातरूप विस्तीर्ण व प्रगल्भ असे निबंध स्वामीनीं जोडले आहेत. शिवाय जैमिनीय व वैयासिक अधिकरणमालेमध्यें जे सिद्धांत प्रतिपादन केले आहेत ते ब्रह्मसूत्रें, धर्मसूत्रें, उपनिषद्वाक्यें इत्यादिकांशीं कसे जुळतात हें स्वामीनीं उत्तरकांडावरील भाष्यामध्यें उत्कृष्ट रीतीनें विशद केलें आहे. तसेंच श्रुति, युक्ति व अनुभव या तिन्ही प्रकारांनीं विषय सिद्ध करण्याची जी आचार्यांची महनीय विवेचनपद्धति तिचाच अवलंब स्वामीनीं सर्वत्र केला आहे, व एकंदर संस्कृत वाङ्मयावर हा त्यांचा मोठा उपकार मानिला पाहिजे.—तेव्हां वेद म्हणजे काय, वेदाचें लक्षण संभवतें किंवा नाहीं, वेदामध्यें कशाचा अन्तर्भाव होतो—इत्यादि पूर्वोक्त प्रश्नांचा उलगडा स्वामीनीं कसा केला आहे याचे निरूपणास आरंभ करितों.

प्रथमतः स्वामीनीं लक्षणापासून ( Definition ) काय फायदा होतो हें उत्कृष्ट रीतीनें विशद केलें आहे.

ऋषयोऽपि पदार्थानां नान्तं यान्ति पृथक्त्वशः ॥
लक्षणेन तु सिद्धानामन्तं यान्ति विपश्चितः ॥ १

**—पूर्वाचार्याः**

याचा अर्थ असा कीं—प्रत्येक वस्तूचें पृथक् पृथक् ज्ञान करून घेऊं लागलें तर त्याचा अन्त ऋषींसहि लागत नाहीं, परंतु लक्षणयुक्त वस्तूचें ज्ञान झालें म्हणजे सर्व वस्तु जाणल्या जातात. ( Definition ) लक्षण आणि ( Division ) वर्गीकरण हे दोन विषय यूरोपीय तर्कशास्त्रामध्येंहि प्रमुखत्वानें गणिले जातात. यौगिक ( Connotative ) व स्वरूप ( Denotative ) असे लक्षणाचे दोन भेद आहेत. वेदाचें यौगिक लक्षण स्वामींनीं एणेंप्रमाणें दिलें आहे:—

इष्टप्राप्त्यनिष्टपरिहारयोरलौकिकं उपायं यो ग्रंथो वेदयति स वेदः ।

**—वेदार्थप्रकाश**

याचा अर्थ असा कीं—इष्ट वस्तूची प्राप्ति व अनिष्ट वस्तूचा त्याग हे दोन हेतू साध्य होण्याकरितां जो ग्रंथ अलौकिक उपाय शिकवितो तो वेद होय. एथें अलौकिक पदानें प्रत्यक्ष व अनुमिति या दोन प्रमाणांची व्यावृत्ति होते:—

प्रत्यक्षेणानुमित्या वा यस्तूपायो न बुध्यते ॥
एनं विदन्ति वेदेन तस्माद्वेदस्य वेदता ॥ १

**—वेदार्थप्रकाश**

याचा अर्थ असा कीं—प्रत्यक्ष व अनुमान या दोन्ही प्रमाणांनीं जो उपाय कळत नाहीं तो वेदापासून समजतो, आणि तेणेंकरून वेदाचें वेदत्व सिद्ध होतें. हें

यौगिक ( Connotative ) लक्षण देऊन वेदाचें स्वरूप ( Denotative ) लक्षण येणेंप्रमाणें प्रतिपादन केलें आहे.

मंत्रब्राह्मणयोर्वेदनाम धेयम् ।

—**कात्यायन**

म्हणजे, मंत्र व ब्राह्मण यांस वेद अशी संज्ञा आहे. मंत्र व ब्राह्मण हे जे वेदांचे दोन भाग त्यांचीं लक्षणें भगवान् जैमिनी यानीं पुढील सूत्रांत दिलीं आहेतः—

तच्चोदकेषु मंत्राख्या । शेषे ब्राह्मणशब्दः ।

—**पूर्वमीमांसादर्शन**

म्हणजे वेदांपैकीं ज्या अभिधायक वाक्यांचें मंत्र असें समाख्यान सांप्रदायिकांनीं केलें आहे त्यांस मंत्र असें म्हणतात, आणि याहून व्यतिरिक्त असा जो वेद-भाग त्यास ब्राह्मण असें म्हणावें. याविषयीं माधवाचार्य-विरचित न्यायमालेमध्यें पुढील वचनें आढळतात—

याज्ञिकानां समाख्यानं लक्षणं दोषवर्जितम् ॥
तेऽनुष्ठानस्मारकादौ मंत्र शब्दं प्रयुंजते ॥ १
मंत्रश्च ब्राह्मणं चेति द्वौ भागौ तेन मंत्रतः ॥
अन्यद्ब्राह्मणमित्येतद्भवेद् ब्राह्मणलक्षणम् ॥ २

—**जैमिनीय न्यायमाला**

याचा अर्थ असा कीं—याज्ञिक लोक ज्या अभि-धायक वाक्यांचें मंत्र असें समाख्यान करितात ते मंत्र होत. मंत्र व ब्राह्मण असे वेदाचे दोन भाग होतात, तेव्हां मंत्र खेरीजकरून जो वेदभाग उरतो त्यास ब्रा-ह्मण असें म्हणावें. सांप्रदायिक व याज्ञिक लोक ज्यास मंत्र म्हणतात तो मंत्र व त्या व्यतिरिक्त जो वेदभाग तो ब्राह्मण अशीं मंत्रब्राह्मणांचीं लक्षणें प्राचीन भार-तीय आर्य पंडितांनीं, पूर्वीं जीं वेदांगोपांगादि चतुर्दश

विद्यास्थानें सांगितलीं आहेत त्यांस अनुसरूनच केलीं आहेत. याकरितां आधुनिक यूरोपीय व भारतीय विद्वानांनीं वेदांविषयीं ज्या नानाप्रकारच्या कल्पना काढिल्या आहेत त्या सर्वथैव त्याज्य होत.

आतां तैत्तिरीयारण्यकांतील द्वितीय प्रपाठकामध्यें नवव्या अनुवाकांत पुढील वचन आढळतें:—

यद् ब्राह्मणानीतिहासान्पुराणानि कल्पान्गाथा नाराशꣳसीर्मेदाहुत यो देवानामभवन् ।

याचा अर्थ असा कीं—ब्रह्मयज्ञाचेवेळीं ब्राह्मण, इतिहास, पुराणें, कल्प, गाथा, व नाराशंसी यांचें पठण केलें असतां देवांना तीं मांसाहुतीप्रमाणें होतात. या वचनामध्यें ब्राह्मण, इतिहास, पुराण, कल्प, गाथा व नाराशंसी यांचा स्वतंत्र रीतीनें उल्लेख केला असल्यामुळें इतिहासादिक भाग ब्राह्मणाहून निराळे मानावयाचे किंवा नाहीं अशी शंका उत्पन्न होते. त्याचें समाधान स्वामींनीं एणेंप्रमाणें केलें आहे—

नैवम् । विप्रपरिव्राजकन्यायेन ब्राह्मणा
ध्यवांतर भेदानामेव इतिहासादीनां पृथगभिधानात् ।

—वेदार्थप्रकाश

याचा अर्थ असा कीं—ही शंका बरोबर नाहीं. कारण, इतिहास, पुराण, कल्प, गाथा व नाराशंसी हे ब्राह्मणाचेच अवान्तर भेद आहेत आणि ज्या अर्थीं त्याचा पृथक् उपन्यास केला आहे, त्या अर्थीं एथें विप्रपरिव्राजक न्यायाचा उपयोग केला पाहिजे. म्हणजे, विप्रांस या पडवींत बसवा आणि परिव्राजकांस दुसऱ्या पडवींत बसवा—असें म्हटल्यानें परिव्राजक हे ब्राह्मण नव्हत

असें कोणासहि वाटत नाहीं. त्याप्रमाणें या ठिकाणीं इतिहासादिकांचा जरी पृथक् निर्देश केला आहे तरी त्यांचा अन्तर्भाव ब्राह्मणांमध्येंच केला पाहिजे. ब्राह्मण हा वेदभाग मंत्रांचा उपव्याख्यानरूप आहे असें पूर्वीं लिहिलेंच आहे. तेव्हां विधि, निंदा, प्रशंसा, प्रश्न व कथा इत्यादि प्रकारांनीं मंत्रांचा विनियोग कसा करावा हें ब्राह्मणामध्यें सांगितलें आहे. याविषयीं उदाहरणें एणेंप्रमाणें आहेतः—

देवासुराः संयत्ता आसन् ।

—तैत्तिरीय ब्राह्मण

म्हणजे—देव व असुर हे युद्ध करिते झाले. हें इतिहासाचें उदाहरण होय.

आत्मा वा इदमेक एवाग्र आसीन्नान्यत् किंचन मिषत् ।

—ऐतरेय उपनिषद्

म्हणजे—जगाच्या पूर्वीं आत्मा हा एकच पदार्थ होता; आत्म्याशिवाय दुसरें कांहींहि हालचाल करणारें नव्हतें. अशा प्रकारचीं जीं ब्राह्मणांत वचनें आहेत हीं पुराणें होत, कारण यांमध्यें जगाच्या पूर्वींचें वर्णन असून सृष्टीची उत्पत्ति कशी झाली ह्याचेंहि प्रतिपादन केलेलें आहे. म्हणून अशा प्रकारचें ब्राह्मणांतील वचन पुराणाचें उदाहरण होय.

कल्पशब्दाची व्युत्पत्ति 'कल्प्यते समर्थ्यते यागप्रयोगो येन' अशी आहे. म्हणजे, यज्ञाचा प्रयोग ज्यांत वर्णिलेला आहे त्यास कल्प असें म्हणावें.

इषेत्वोर्जेत्वेति वृष्ट्यै तदाह । यदाहेषेत्वोर्जेत्वाति यो वृष्टा दुर्गसो जायते तस्मै तदाह ।

—शतपथ ब्राह्मण

याचा अर्थ असा कीं—वृष्टीविषयीं व झाडांच्या रसाविषयीं इषेत्वोर्जेत्वा या मंत्रांत सांगितलेलें आहे. ज्या ब्राह्मणवचनांत मंत्रांच्या अर्थाचें स्पष्टीकरण केलेलें असतें त्यास कल्प असें म्हणतात, म्हणून हें कल्पाचें उदाहरण होय.

अत ऊर्ध्वं यदि बलिं हरेत् ।

हा मंत्र म्हणून अग्निचयनाचे वेळीं

यम गाथाभिः परि गायति ।

एणेंप्रमाणें विहित जे मंत्रविशेष त्यांस गाथा असें म्हणतात. तसेंच, ज्या ब्राह्मणभागांमध्यें मनुष्यांचे वृत्तान्त कथन केलेले असतात त्यांस नाराशंसी असें म्हणतात.—याकरितां ब्राह्मण हा शब्द इतिहास, पुराण इत्यादि समुदायाचा वाचक समजावा आणि

यद् ब्राह्मणानीतिहासान् पुराणानि कल्पान्<br>गाथा नाराशंसीर्मेदाहुतयो देवानामभवन् ।

—तैत्तिरीयारण्यक

या पूर्वोक्त वचनामध्यें ब्राह्मण हेच—इतिहास, पुराणें, कल्प, गाथा व नाराशंसी—होत असा अर्थ करावा.

या एकंदर विवेचनावरून ब्राह्मणव्यतिरिक्त वेदभाग नसल्यामुळें, मंत्र व ब्राह्मण हेच वेदाचे दोन भाग सिद्ध झाले. आतां ऋक्, यजुस् व साम असे जे तीन प्रकारचे मंत्र आहेत त्यांचा संकर दृष्टीस पडतो, म्हणजे ऋग्वेदांतील मंत्र यजुर्वेदांत व सामवेदांत आढळतात, व सामवेदांतील मंत्र यजुर्वेदांत आढळतात. म्हणून या तिन्ही वेदांचीं निरनिराळीं लक्षणें संभवत ना-

हींत—अशी शंका उत्पन्न झाली असतां तिचें निराकरण माधवाचार्यांनीं एणेंप्रमाणें केलें आहे:—

ऋक्सामयजुषां लक्ष्म सांकर्यादिति शंकिते ॥
पादश्च गीतिः प्रश्लिष्ट पाठ इत्यस्त्वसंकरः ॥

—जैमिनीय न्यायमाला

याचा अर्थ असा कीं—ऋक्, यजुस्, साम या तिन्ही वेदांतील वाक्यें एकमेकांत मिसळलेलीं सांपडतात, तेव्हां त्यांचीं पृथक् लक्षणेंच नाहींत अशी शंका आली असतां तिचें समाधान पुढील सूत्रांत येणेंप्रमाणें केलें आहे:—

तेषामृग्यत्रार्थ वशेन पादव्यवस्था ।
गीतिषु सामाख्या । शेषे यजुः शब्दः ।

—पूर्वमीमांसादर्शन

याचा अर्थ असा कीं—पाद, गीति व प्रश्लिष्ट पाठ यांच्या स्पष्ट लक्षणांवरून या तिन्ही वेदांचीं लक्षणें सिद्ध होतात. तीं अशीं कीं,—पाद व अर्धर्चें या वृत्तांमध्यें जे मंत्र साधलेले असतात ते ऋग्वेदांतील असें समजावें. जे मंत्र गायनास योग्य असतात ते सामवेदान्तर्गत होत. जे मंत्र वृत्तबद्ध किंवा गायनास योग्य नसून फक्त गद्यरूपानें असतात ते यजुर्वेदांतील जाणावे. आतां एका वेदांतील मंत्र दुसऱ्या वेदांत कसे आढळतात याचीं उदाहरणें एणेंप्रमाणें आहेत:—

देवो वः सवितोत्पुनात्त्वच्छिद्रेण पवित्रेण वसोः सूर्यस्य रश्मिभिः ।

हा मंत्र यजुर्वेदामध्यें आढळतो आणि यजुर्वेदांतील ब्राह्मणांत असें म्हटलें आहे कीं ‘सावित्र्यर्चा’ या ऋग्वेदसूक्तांतील तो मंत्र आहे.

एतत्साम गायन्नास्ते ।

असा प्रस्ताव करून सामवेदांतील कांहीं मंत्र यजुर्वेदामध्यें पठन केले आहेत.

ऋक्, यजुस्, साम व अथर्व असा वेदांचा क्रम असून विद्यारण्य स्वामींनी अगोदर यजुर्वेदावर भाष्य लिहून मग ऋग्वेदावर लिहिलें आणि तत्संबंधानें जीं शंकासमाधानें त्यानीं ऋग्वेदभाष्याचे आरंभीं केलीं आहेत तीं बोधप्रद असून फार मनोरंजक आहेत. शिवाय तीं वाचलीं असतां अनेक वादग्रस्त विषयांवर चांगला प्रकाश पडतो, याकरितां आह्मी तीं एथें देतों.

शंका—सर्व वेदांमध्यें ऋग्वेदाचाच प्रथम उल्लेख करितात व अनेक गोष्टींपैकीं अधिक महत्त्वाचीच गोष्ट प्रथम सांगितलेली असते असा सर्वत्र संप्रदाय आहे.

तस्माद्यज्ञात्सर्वहुत ऋचः सामानि जज्ञिरे ॥
छंदांसि जज्ञिरे तस्माद्यजुस्तस्मादजायत ॥

—पुरुषसूक्त

या मंत्रामध्यें ऋग्वेदास प्रथम स्थान दिलें आहे. इतकेंच नव्हे, तर यज्ञांग दृढ होण्याकरितां ऋग्वेदाचाच उपयोग केला जातो. तैत्तिरीय ग्रंथांत पुढील वचन आढळतें:—

यद्वै यज्ञस्य साम्ना यजुषा क्रियते शिथिलम् । तद्यदृचा तद्दृढम् ॥

—यजुर्वेद

याचा अर्थ असा कीं—सामवेद किंवा यजुर्वेद यांच्या आधारानें केलेलें जें जें कांहीं शिथिल रहातें तें तें ऋग्वेदामुळें दृढ होतें. त्याप्रमाणेंच सर्व वेदान्तर्गत ब्राह्मणांमध्यें, सांगितलेल्या गोष्टींवर विश्वास दृढ होण्याकरितां, ऋग्वेदांतील वचनांचीं उदाहरणें दिलेलीं

असतात. तसेंच यजुर्वेदांतलि मंत्रकांडामध्यें अध्वर्यूस उपयुक्त अशीं ऋग्वेदांतील पुष्कळ वचनें गोंविलीं आहेत. सामवेदांतील सर्व वचनें ऋग्वेदांतलिच आहेत हें तर सुप्रसिद्ध आहे. अथर्वसंहितेंतहि बहुतेक वचनें ऋग्वेदांतीलच आहेत.

छांदोग्य उपनिषदांत नारदानीं सनत्कुमारऋषींस असें सांगितलें कीं––

ऋग्वेदं भगवोऽध्येमि यजुर्वेदं सामवेदमाथर्वणंच ।

म्हणजे, भगवन्, प्रथम ऋग्वेद, नंतर यजुस्, साम व अथर्व या क्रमानें मी वेदांचें अध्ययन करितों. मुंडकोपनिषदामध्यें पुढील वचन आढळतें:––

ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्वणः ।

अशा रीतीनें ऋग्वेदाचें प्राथम्य प्रस्थापित झाल्यानें त्याच वेदावर अगोदर भाष्य लिहिणें अवश्य आहे. एणेंप्रमाणें पूर्वपक्ष करून त्याचें समाधान स्वामीनीं पुढील रीतीनें केलें आहे:––

समाधान:––सर्व वेदांचें अध्ययन, त्यांचें पारायण, ब्रह्मयज्ञ, जप इत्यादि गोष्टींमध्यें ऋग्वेदास प्रथम स्थान जरी असलें, तथापि यजुर्वेदावर भाष्य अगोदर लिहिलें पाहिजे. कारण वेदार्थज्ञान यज्ञानुष्ठानाकरितां अवश्य पाहिजे आणि यज्ञानुष्ठान तर यजुर्वेदाशिवाय होणें नाहीं. हें यजुर्वेदाचें प्राधान्य ऋग्वेदामध्येंच स्पष्ट वर्णिलें आहे.

ऋचां त्वः पोषमास्ते पुपुष्वान् ।
गायत्रं त्वा गायेति शक्वरीषु ॥

ब्रह्मा त्वो वदति जातविद्यां ।
यज्ञस्य मात्रां विमिमीत उ त्वः ॥

या ऋचेचा अर्थ निरुक्तकार यास्क यानीं एणेंप्रमाणें केला आहेः—या ऋचेंत ऋत्विजांचे कर्मांचा विनियोग सांगितला आहे. होता ऋग्वेदांतील ऋचा म्हणून सर्व विधींचें नियमन करितो. उद्गाता शक्करी नामक ऋचांचें गायन करितो. तिन्ही वेदांतील कर्में जाणणारा ब्रह्मा प्रणयनादि सर्व कर्मांचे अनुष्ठानास अनुज्ञा देतो. यज्ञाचा मुख्य नायक जो अध्वर्यु तो सर्व यज्ञांगें सिद्धीस नेतो.

यावरून पहातां यज्ञाची सिद्धि होण्यास यजुर्वेदाची अपेक्षा आहे आणि यामुळें यजुर्वेदास अध्वर्युवेद म्हणण्याचा संप्रदाय पडला आहे. ' अध्वरं युनक्ति ' अशी अध्वर्यु शब्दाची व्याख्या आहे. तेणेंकरून यज्ञाचें नेतृत्व अध्वर्यूकडेच असतें.

मंत्रा मननात् । छंदांसि छादनात् । स्तोमःस्तवनात् । यजुर्यजतेः ।

—निरुक्त

अशा प्रकारची यजुस् शब्दाची व्युत्पत्ति यास्क मुनींनीं दिली आहे. यज् म्हणजे यज्ञ करणें या धातूपासून यजुस् शब्द सिद्ध होतो. यजुर्वेदापासून यज्ञशरीर निष्पन्न होतें आणि स्तोत्र व शस्त्र एतद्रूपी जे त्याचे अवयव ते सामवेद व ऋग्वेद यांनीं भरून निघतात. अशा रीतीनें उपजीव्य जो यजुर्वेद त्याचें व्याख्यान प्रथम करावें लागलें. सामवेदांतील वचनें ऋग्वेदान्तर्गत असल्यामुळें ऋग्वेदाचें व्याख्यान करून नंतर सामवेदावर भाष्य रचिलें आहे.

यज्ञ करण्याकरितां वेदार्थज्ञान पाहिजे असें वर

लिहिलें आहे, तेव्हां यज्ञाची अवश्यकता काय आहे याचें निरूपण उपयुक्तता संबंधानें ( Utility ) झालें पाहिजे. वेदांतलि कर्मकांड क्रियाप्रधान आहे. कर्मावांचून विद्याभ्यास व ज्ञानप्राप्ति शक्य नाहींत. मन व बुद्धि हीं बाह्य व आन्तर व्यवहारांत सर्वदा गुंग असतात. या दृष्टीनें पहातां कर्मकांड विशेष महत्त्वाचें आहे. कर्माचे दोन प्रकार आहेतः—१ निष्काम कर्म, २ सकाम कर्म. निष्काम कर्माचें श्रेष्ठफल ईश्वरप्राप्ति होय व अशा प्रकारचें अनुष्ठान करण्यांत स्वभावतः अपूर्व आनंद मिळणारा असतो, म्हणून हें कर्म श्रेष्ठ होय. जें कर्म, लौकिकव्यवहार साध्य होण्यासाठीं धर्मानें, अर्थ व काम मिळविण्याची इच्छा धरून केलें जातें, तें सकाम कर्म होय. या कर्माचें फल जन्ममरण असल्यामुळें निष्काम कर्मापेक्षां तें कमी प्रतीचें होय. सकाम कर्मामध्यें अग्निहोत्रादि सर्व यज्ञांचा अंतर्भाव होतो. या सर्व यज्ञांमध्यें सुगंधित, मिष्ट, पुष्टिकारक व रोगनाशक अशा चार प्रकारच्या व निरनिराळ्या संस्कारांनीं शोधन करून सुसंस्कृत बनविलेल्या द्रव्यांचें ( Materials ) हवन होत असल्यामुळें,—वायु व वृष्टिजल यांची शुद्धि होते व त्यायोगें सर्व जगाला सुख होतें.

सृष्टीमध्यें ईश्वरकृत यज्ञ चाललेलाच आहे. त्याच्या बरोबर मनुष्यकृत यज्ञहि सुरू असलाच पाहिजे. अशा रीतीनें दोन्ही प्रयत्न अव्याहत चालले म्हणजे सर्वांस उत्तम परिस्थिति प्राप्त होते. ईश्वरानें अग्निमय सूर्य उत्पन्न करून त्याच्या द्वारानें पुष्पें, वनस्पति

इत्यादिकांतून सुगंधि व रोगनाशक रस व वायु आकर्षिले जातात. तसेंच या मोठ्या यज्ञाच्या योगानें सुगंधित रसांचें व वायूंचें आकर्षण होऊन दुर्गंधयुक्त रसांची व वायूंची शुद्धि होते. जेथें मनुष्यें कमी आहेत किंवा मुळींच नाहींत, तेथील जल व वायु परमेश्वरीय यज्ञानेंच स्वच्छ होतात. परंतु जेथें मनुष्यवस्ती पुष्कळ आहे तेथें स्वाभाविक होणाऱ्या यज्ञानें काम भागत नाहीं. म्हणून प्रत्येकानें निराळा यज्ञ केलाच पाहिजे. पशुहिंसा मात्र कदापि करूं नये. सत्य भाषण करण्याविषयींची आज्ञा मोडल्यानें जसा मनुष्य दोषी ठरून दुःख भोगतो त्याप्रमाणें ‘ यावज्जीवमग्निहोत्रं जुहुयात् ’ या वचनांतील यज्ञसंबंधी आज्ञेविषयीं समजावें.

अग्नीमध्यें घातलेलें द्रव्य पृथक्करण पावून परमाणुरूपानें सर्व हवेंत मिसळून जातें, म्हणून दुर्गंधादि दोषनिवारक सुगंधादि द्रव्यांचा होम अग्नींत केला असतां त्यापासून वायु व वृष्टिजल यांची शुद्धि होते. ज्यावेळीं एकाद्या घरामध्यें हवन केलें जातें त्या वेळीं त्या घरांतील अशुद्ध वायु अग्नीच्या योगानें हलका होऊन वर आकाशांत जातो व तेथें चाऱ्ही दिशांतून स्वच्छ वायु येतो. त्यामुळें तें घर आरोग्यकारक वायूनें युक्त होतें. तसेंच होमामध्यें घातलेल्या सुगंधादि द्रव्यांच्या मिश्रणानें शुद्ध झालेला वायु वर आकाशांत जाऊन तो मेघादि आकाशस्थ द्रव्यांची शुद्धि करितो व त्यायोगें पाऊसहि जास्त पडतो. अशा रीतीनें शुद्ध पाण्याची वृष्टि जास्त झाल्यानें वनस्पतींची वाढ व त्यांची शुद्धि होते व त्यायोगें सर्वांला सुख होतें. यावरून प-

हातां यज्ञ केल्यानें मनुष्यमात्राला व इतर प्राण्यांला शुद्ध वायु, स्वच्छ पाणी व पौष्टिक अन्न मिळूं शकतात हें सहज ध्यानांत येईल.

ज्या वेळीं हवन केलेल्या वृक्ष, वनस्पति, ओषधि, जल इत्यादि पदार्थांत अग्नि शिरून त्यांतील रसांचें व वायूंचें पृथक्करण करूं लागतो, तेव्हां धूर व वाफ असे मुख्यतः दोन पदार्थ उत्पन्न होतात. भूमींतील जलांशाला वाफ व शुष्क पृथिवीच्या अंशाला धूर असें म्हणतात. हे धूर व वाफ हलके असल्यामुळें वायूच्या आधारानें आकाशांत जातात व तेथें जलसमागम पावून त्यांचीं अभ्रें बनतात आणि त्यांपासून वृष्टि होते. म्हणून अग्नीपासूनच या वनस्पति व ओषधि परंपरेनें उत्पन्न होतात. वनस्पति व ओषधि यांपासून अन्न बनतें व अन्नाचें वीर्य बनतें:—

अन्नाद्रेतः । रेतसः पुरुषः । स वा एष पुरुषोऽन्नरसमयः ।

—**तैत्तिरीयोपनिषद्**

म्हणजे, अन्नापासून रेत व रेतापासून पुरुष उत्पन्न होतो. म्हणून हा पुरुष अन्नरसमय होय.

अन्नाद् ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते ।
अन्नेन जातानि जीवन्ति । अन्नं प्रयन्त्य
भिसंवि शन्तीति ।

—**तैत्तिरीयोपनिषद्**

म्हणजे, सर्व प्राणी अन्नापासून उत्पन्न होतात, अन्नाच्या योगानें जगतात व शेवटीं अन्नामध्येंच लय पावतात. अन्न हें जीवनाचा मोठा आधार आहे. शुद्ध अन्न, जल व वायु यांच्या द्वारानें प्राणिमात्राला सुख

होतें. तेव्हां अन्न, जल व वायु यांच्या शुद्धीकरितां यज्ञ करणें अवश्य आहे, म्हणून यजुर्वेदाचें प्राधान्य सिद्ध होतें.

ब्रह्मयज्ञ प्रकरणामध्यें वेदाचें पठन नित्य करावें असें सांगितलें आहे. प्रथम अशी शंका उत्पन्न होते कीं, फक्त वेदपठन करावें किंवा तदर्थज्ञानहि अवश्य आहे. याविषयीं पुढील वचन फार महत्त्वाचें आहे.

> तेनोभौ कुरुतो यश्चैतदेवं वेद यश्च न वेद । नाना तु विद्याचा विद्याच । यदेव विद्यया करोति श्रद्ध-योपनिषदा तदेव वीर्यवत्तरं भवति ।
>
> —छांदोग्य

याचा अर्थ असा कीं—कोणतेंहि कर्म करण्याचे दोन प्रकार आहेत. एकादा मनुष्य कर्मप्रतिपादक वच-नाचा अर्थ जाणून तें कर्म करितो व दुसरा मनुष्य त्या वचनाचा अर्थ न जाणून तें कर्म करितो. अशा प्रसंगीं कधीं कधीं अर्थ जाणणारास व न जाणणारास एकच फल प्राप्त होतें. जसें बाळहिरडे भक्षण केले असतां रेच होतात हें जाणणारा व न जाणणारा या दोघांसहि ते भक्षण केल्यावर विरेचन होणार. तथापि यावरून कर्माचें सामर्थ्य निश्चितपणें सिद्ध होत नाहीं. कारण, जाणीव व नेणीव अनेक प्रकारचीं असतात. आपण व्यवहारांत नेहमीं असें पहातों कीं पद्मरागादि मणि एकाद्या अडाणी मनुष्याच्या हातीं पडला असतां त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. परंतु तोच मणि जाणत्या व्यापाऱ्याच्या हातीं लागला असतां किमतीस चढतो. यावरून अर्थज्ञ, श्रद्धावान् आणि योगयुक्त अशा

पुरुषानें केलेलें कर्म अधिक फल देतें यांत संशय नाहीं.

शब्दार्थज्ञानाचें इतकें महत्त्व असल्यामुळें वेदार्थ-ज्ञान सर्व जगास अत्यंत उपकारक झालें आहे. प्रथमतः हें ध्यानांत आणावें कीं, उपनयनसंस्कार झाल्यानंतर एका वेदाचें किंवा बुद्धिसामर्थ्य असेल तर एकाहून अधिक वेदांचें अध्ययन केलेंच पाहिजे. याविषयीं याज्ञवल्क्यस्मृतींत पुढील वचन आहे:—

वेदानधीत्य वेदौ वा वेदं वापि यथाक्रमम् ।

म्हणजे, एकाहून अधिक वेदांचें, निदान एका वेदाचें तरी अध्ययन करावें. शिवाय वेदाध्ययन नित्यकर्म समजून करावें व फलाची आकांक्षा धरूं नये. पुरुषार्थानुशासनामध्यें पुढील वचन आढळतें:—

वेदस्याध्ययनं नित्यमनध्ययने पातात् ।

म्हणजे, वेदाचें अध्ययन नित्यकर्मांपैकीं आहे, कारण अध्ययन केलें नाहीं तर ब्राह्मणत्वाची हानि होते.

यस्ति त्याज सचिविदं सखायं ।<br>
न तस्य वाच्यपि भागोऽस्ति ॥<br>
यदीं शृणोति अलकं शृणोति ।<br>
न हि प्रवेद सुकृतस्य पंथाम् ॥

—ऋग्वेद

याचा अर्थ असा कीं—आपणावर उपकार करणाऱ्या मित्राचा जो त्याग करितो त्यास वाणीपासून कांहींएक फल प्राप्त होत नाहीं. त्यानें कांहींहि ऐकिलें तरी तें त्यास नीट ऐकूं येत नाहीं, त्यास पुण्याचा मार्ग समजतच नाहीं. याकरितां सकल देवतांचें, धर्माचें, व साक्षात् परब्रह्म तत्त्वाचें ज्ञान ज्यापासून मिळतें असें

वेदाचें अध्ययन न करितां परनिंदा, असत्य भाषण आणि कलह करण्यांत ज्याच्या आयुष्याचा व्यय होतो त्यास वाणी प्रसन्न होत नाहीं.

नानुध्यायान् बहूञ्शब्दान्वाचो विग्लापनं हि तत् ।

—श्रुति

म्हणजे, काव्यनाटकादि बहुशब्दप्रचुर ग्रंथ जो वाचतो किंवा ऐकतो त्याचा तो व्यापार फुकट जातो; तें केवळ वाणीस दमविणें होय. कारण त्यापासून पुण्याचा मार्ग सांपडतच नाहीं.

अर्थज्ञानाशिवाय नुसती वेदाची घोकंपट्टी करणाराची निंदा सर्वत्र आढळते. वेदार्थज्ञानाकडेच प्रवृत्ति व्हावी एतद्विषयीं यास्कमुनीनीं दोन वचनें दिलीं आहेत तीं एणेंप्रमाणें:—

स्थाणुरयं भारहारः किलाभू
दधीत्य वेदं न विजानाति योऽर्थम् ॥
योऽर्थज्ञ इत्सकलं भद्रमश्नुते
नाकमेति ज्ञान विधूत पाप्मा ॥

—निरुक्त

याचा अर्थ असा कीं—जो मनुष्य वेद घोकून पाठ करितो परंतु त्याचा अर्थ उत्तम रीतीनें समजून घेत नाहीं, अर्थात् जो अर्थ न समजतां नुसती घोकंपट्टी करितो तो लांकडाचा खांब आहे असें समजावें, व तो नुसता भारवाहक होय. त्याला वेदविद्येच्या रसास्वादाची गोडी नाहीं. जो वेदार्थ जाणतो त्याच्या सर्व पापांचा नाश होतो व त्याला सर्व सुख प्राप्त होतें. तो आनंदमय अशा मोक्षस्थानाप्रत जातो. म्हणून वेदाचा अर्थ अवश्य समजून घ्यावा.

यद्‌गृहीतमविज्ञातं निगदेनैव शब्द्यते ॥
अनग्नाविव शुष्कैधो न तज्ज्वलति कर्हिचित् ॥

—निरुक्त

म्हणजे, वेदांचा फक्त पाठ केला पण अर्थ समजून घेतला नाहीं, तर त्यांचा कधींहि प्रकाश पडणार नाहीं. ज्याप्रमाणें वाळलेलीं लांकडें राखेंत पडलीं असतां जळत नाहींत, त्याप्रमाणें अर्थ समजल्याशिवाय पाठ केलेल्या वेदांपासून कांहीं लाभ होत नाहीं. वेदांचें वेदत्त्व मुळीं अर्थज्ञानावरच अवलंबून रहातें—

अलौकिकं पुरुषार्थोपायं वेत्त्यनेन इति वेदशब्दनिर्वचनम् ।

—वेदार्थप्रकाश

म्हणजे—धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे जे चार पुरुषार्थ आहेत त्यांच्या प्राप्तीसाठीं अलौकिक उपाय जेणेंकरून जाणिला जातो तो वेद होय. तेव्हां अर्थ समजल्याशिवाय वेदांचें वेदत्व सिद्ध होत नाहीं.

उत त्वः पश्यन्न ददर्श वाच
मुतत्वः शृण्वन्न शृणोत्येनाम् ।
उतो त्वस्मै तन्वं वि सस्रे
जायेव पत्य उशती सुवासाः ॥

—ऋग्वेद

याचा अर्थ असा कीं—एक पुरुष केवळ वेदांचा पाठ करितो परंतु अर्थ जाणत नाहीं. असा पुरुष वेदरूप वाणीस पहात असून देखील, ती त्याला दिसत नाहीं; तो पुरुष वेदरूप वाणीस ऐकत असून देखील, ती त्याला ऐकू येत नाहीं. ज्याप्रमाणें ऋतुकालीं उत्तम वस्त्रें परिधान केलेली व पतीविषयीं उत्सुक अशी भार्या पतीची इच्छा पूर्ण करिते, त्याप्रमाणें व्याकरणादि अंगें

व पूर्वमीमांसादि उपांगें यांचें अध्ययन करून जो पुरुष वेदांचें तात्पर्य शोधून काढण्यास प्रवृत्त होतो त्यास वेदार्थरहस्य पूर्णपणें समजून येतें.

उत त्वं सख्ये स्थिरपीत माहु
र्नैनं हिन्वं त्यपि वाजिनेषु ॥
अधेन्वा चरति माय यैष
वाचं शुश्रु वा ँ अफलामपुष्पाम् ॥

—ऋग्वेद

याचा अर्थ असा कीं—चतुर्दश स्थानांमध्यें कुशल असा पुरुष वेदरूप वाणीशीं सख्य करून रहातो, म्हणून त्यास स्थिरपीत—म्हणजे वेदार्थज्ञानरूपी जें अमृतपान त्यामध्यें स्थिरपणें निमग्न—असें म्हणतात. अशा पुरुषाचा विद्वान् लोक देखील सभेमध्यें पराजय करूं शकत नाहींत. ही वेदार्थज्ञाची स्थिति झाली. परंतु जो पुरुष अर्थ न समजतां नुसतें वेदपठन करितो, तो फलपुष्पव्यतिरिक्त अशी वाणी ऐकतो आणि—कपटरूपी व दूध न देणाऱ्या—अशा गाईबरोबर जगतामध्यें संचार करितो.

वरील वचनांवरून केवळ वेदार्थज्ञान पाहिजे एवढेंच सिद्ध होत नसून, पूर्ण ज्ञान होण्यास सांगोपांग वेदार्थज्ञानाची आवश्यकता दिसून येते. शिवाय चार वेद, सहा वेदांगें व चार उपांगें—हीं जीं चतुर्दश विद्यास्थानें वर सांगितलीं आहेत—त्यांच्या अध्ययनानें पुष्ट केलेली वेदविद्या ग्रहण करण्यास उत्तम अधिकारीच पाहिजे. अधिकाराशिवाय केवळ हठानें वेद समजून घेण्याचे जितके म्हणून आधुनिक यूरोपीय व भारतीय पंडितांचे प्र-

यत्न झाले तितके अनर्थकारक होऊन त्यांपासून आर्यलोकांस नानाप्रकारचे दुष्परिणाम भोगावे लागत आहेत. वेदार्थ करण्यांत समन्वयाकडे पूर्ण लक्ष पाहिजे. हें तत्त्व एकीकडे ठेवून वाटेल तसे वेदवाक्याचे अर्थ केल्यामुळें धर्मश्रद्धा नाहींशी होऊन नवे नवे पंथ निर्माण करण्यांतच आधुनिक विद्वान् लोकांस भूषण वाटत आहे. नीतीचा व धर्माचा पाया जो कर्ममार्ग त्याविषयीं सुशिक्षित लोकांची अश्रद्धा होत गेल्यानें तरुण पिढीचे लोक धर्महीन बनत चालले आहेत. तेव्हां या गोष्टीचा योग्य वेळीं प्रतिकार न झाल्यास भरतखंडांतील धार्मिक स्थिति भीतिप्रद होत जाईल यांत शंका नाहीं.

वेदविद्या ग्रहण करण्यास कोणास अधिकार पोहोंचतो तें पुढील मंत्रांमध्यें यास्काचार्यांनीं स्पष्ट केलें आहे.

### ( १ ) पहिला मंत्र

विद्या ह वै ब्राह्मणमाजगाम
गोपाय मा शेवधिष्टेऽहमस्मि ।
असूयकायानृजवेऽयताय
न मा ब्रूया वीर्यवती तथा स्याम् ॥

याचा अर्थ असा कीं——विद्याभिमानिनी देवता उपदेश करणाऱ्या आचार्याजवळ येऊन म्हणाली कीं—अनधिकारी जो पुरुष असेल त्याला माझा उपदेश न करशील तर माझें रक्षण होईल आणि मग मी चाऱ्ही पुरुषार्थ निधीप्रमाणें मिळवून देईन. जो विद्यार्थी गुरूवर आणि मजवर वृथा दोषारोप करितो व ज्याच्यामध्यें सरळपणा नाहीं, त्यास माझा उपदेश करूं नको; जो विद्यार्थी स्नानसंध्यादि आचार पाळीत नाहीं, त्या

खोट्या शिष्याला माझा उपदेश करूं नको. हे आचार्या, असा जर वागलास, तर तुझ्या हृदयांत प्रवेश करून मी इच्छितफल देईन.

### ( २ ) दुसरा मंत्र

न आतृणत्त्यावितथेन कर्णा-
वदुःखं कुर्वन्नमृतं संप्रयच्छन् ।
तं मन्येत पितरं मातरं च
तस्मै न द्रुह्येत्कतमच्च नाह ॥

याचा अर्थ असा कीं—जो गुरु सत्यरूप वेदवाणीनें शिष्याचे कर्ण भरून टाकितो, जो गुरु शिष्याच्या बुद्धिसामर्थ्याप्रमाणें व त्याला दुःख न होईल अशा रीतीनें—म्हणजे ऋचेचा चवथा निदान आठवा भाग. कां होईना, थोडा थोडा भाग शिकवून नंतर अर्धी ऋचा किंवा सगळी ऋचा शिकवावयाची—अशा रीतीनें वेद शिकवितो व वेदार्थहि समजाऊन देऊन अमृतत्वाची दीक्षा देतो—अशा गुरूस शिष्यानें मुख्य आईबाप असें समजावें व गुरुद्रोह कधींहि करूं नये.

### ( ३ ) तिसरा मंत्र

अध्यापिता ये गुरुं नाद्रियन्ते
विप्रा वाचा मनसा कर्मणा वा ।
यथैव ते न गुरोर्भोजनीया
स्तथैव तान्न भुनक्ति श्रुतं तत् ॥

याचा अर्थ असा कीं—जे अधम शिष्य अध्ययन झाल्यानंतर वाणीनें, मनानें व आचरणानें गुरूचा आदर करीत नाहींत, अशा शिष्यांवर ज्याप्रमाणें गुरु कृपा करीत

नाहीं, तसेंच गुरूपदिष्ट वेदवाक्यहि त्या खोट्या शिष्यांना फलप्रद होत नाहीं.

### (४) चवथा मंत्र

यमेव विद्याः शुचिमप्रमत्तं
मेधाविनं ब्रह्मचर्योपपन्नम् ।
यस्ते न द्रुह्येत्कतमच्च नाह
तस्मै मा ब्रूया निधिपाय ब्रह्मन् ॥

याचा अर्थ असा कीं—हे आचार्य, जो शिष्य नेहमीं पवित्र, सावधान, बुद्धिमान् व ब्रह्मचारी असतो, जो गुरूची निंदा कधीं करीत नाहीं, अशा शिष्याला विद्यादान कर. कारण असा शिष्य एखाद्या निधीप्रमाणें विद्येचें रक्षण करितो.

एणेंप्रमाणें विद्याभिमानिनी देवतेची प्रार्थना असल्यामुळें गुरूनें अधिकारी शिष्यासच वेदविद्या शिकवावी. तसेंच, वेदमंत्रांचे अर्थ गूढ असल्यामुळें शिक्षादि षडंगें प्रवृत्त झालीं आहेत. वेदार्थज्ञान होण्यास त्यांचा अत्यन्त उपयोग असल्यामुळें त्यांस "अपरा विद्या" असें मुंडकोपनिषदांत म्हटलें आहे—

द्वे विद्ये वेदितव्ये इति हस्म यद् ब्रह्मविदो वदन्ति । पराचैवापराच । तत्रापरा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्ववेदः । शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छंदो ज्योतिषमिति । अथ परा यया तदक्षरमाधिगम्यते ।

याचा अर्थ असा कीं—विद्या दोन प्रकारच्या आहेत. त्यांपैकीं एकीस 'परा विद्या' व दुसरीस 'अपरा विद्या' असें म्हणतात. ऋग्वेदादि चार वेद आणि शिक्षादि सहा अंगें यांस अपरा विद्या असें म्हणतात, कारण सर्वसाधन-

भूत जो धर्म त्याचें ज्ञान सहा वेदांगांसहित कर्मकांडावरून होतें, परम पुरुषार्थ जें ब्रह्म त्याचें ज्ञान उपनिषदांवरून होतें, म्हणून ज्ञानकांडांतर्गत जी विद्या तीस "परा विद्या" असें म्हणतात.

आतां शिक्षादि सहा वेदांगें व पूर्वमीमांसादि चार उपांगें यांच्या अध्ययनापासून वेदार्थज्ञानास कसा उपयोग होतो तें कांहीं उदाहरणांनीं स्पष्ट करूं. शिक्षा म्हणून जें वेदांग आहे त्यापासून वर्ण, स्वर, मात्रा इत्यादिकांचें उत्कृष्ट ज्ञान होतें. यामध्यें जर चूक झाली तर अर्थाचा अनर्थ कसा होतो हें पुढील वचनावरून कळेल:---

मंत्रो हीनः स्वरतो वर्णतो वा
मिथ्या प्रयुक्तो न तमर्थमाह ।
स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति
यथेंद्रशत्रुः स्वरतोऽपराधात् ॥

याचा अर्थ असा कीं—ज्या मंत्रामध्यें वर्ण चुकलेला असतो किंवा उदात्तादि स्वर देण्यांत चूक झालेली असते, तो मंत्र भलताच होतो व त्यापासून इष्ट अर्थ निघत नाहीं. इतकेंच नव्हे, तर असा मंत्र वाणीरूप असला तरी तो वज्र होऊन यजमानाचा नाश करितो. उदाहरणार्थ—

इंद्रशत्रुर्वर्धस्व

या मंत्रामध्यें इंद्रशत्रु या सामासिक पदाचा अर्थ 'इंद्राचा शत्रु' असा जर विवक्षित असेल तर तत्पुरुष समास होऊन

समासस्य

---अष्टाध्यायी

या सूत्राप्रमाणें अंत्यपदावर उदात्त स्वर द्यावयास पाहिजे. परंतु येथें पूर्व पदावर उदात्त स्वर दिला असल्या कारणानें

बहुव्रीहौ प्रकृत्या पूर्वपदम्

—अष्टाध्यायी

या सूत्राप्रमाणें बहुव्रीहि समास होऊन 'इंद्र आहे शत्रु ज्याचा' असा अर्थ झाला. तेणेंकरून 'इंद्राचा शत्रु' असा अर्थ न होऊन 'इंद्र ज्याचा घातक' असा त्या सामासिक पदाचा अर्थ झाला. स्वरभेदानें असा अर्थभेद होत असल्या कारणानें स्वरांचा उच्चार नीट व अर्थानुकूल झाला पाहिजे. नाहीं तर वाईट रीतीनें केलेले उच्चार भिन्न अर्थ दाखवितील आणि अर्थाचा अनर्थ होईल.

वेदार्थज्ञानास पूर्व मीमांसेची आवश्यकता किती आहे हें पुढील उदाहरणावरून ध्यानांत येईलः—

यावतोऽश्वान्प्रति गृह्णीयात्तावतो
वारुणांश्चतुष्कपालान्निर्वपेत् ।

—**पूर्व मीमांसा**

या वचनाचा अर्थ—केवळ व्याकरणरीत्या केला असतां असा होतो कीं—घोड्याचें दान जो स्वीकारतो त्यानें सांगितलेलें प्रायश्चित्त घ्यावें; परंतु पूर्व मीमांसेचें ज्यास ज्ञान आहे तो तत्काल असें सांगेल कीं जो घोड्याचें दान देतो त्यानें विवक्षित प्रायश्चित्त करावें.

व्याकरणशास्त्राचा शुद्ध वेदपठनास फारच उपयोग होतो. व्याकरणशास्त्रांतर्गत एकवचन बहुवचनादिकांचें ज्ञान जर झालें नाहीं तर वेद म्हणणारास शुद्ध पाठ ठरविणें अशक्य आहे.

वायुमेव स्वेन भागधेयेनोपधावति
स एवैनं भूतिं गमयति ।
आदित्यानेव स्वेन भागधेयेनोपधावति
त एवैनं भूतिं गमयन्ति ।

या दोन वचनांपैकीं दुसऱ्या वचनांत ‘ स ’ चे जागीं ‘ त ’ आणि ‘ गमयति ’ याचे ठिकाणीं ‘ गमयन्ति ’ असे शब्द-प्रयोग घालणें व्याकरणाचें ज्ञान असल्यावांचून सर्वथैव अशक्य होय.

वररुचि ऋषींनीं व्याकरणशास्त्राचें प्रयोजन काय आहे तें पुढील वार्तिकांत स्पष्ट केलें आहे:—

रक्षोहागमलघ्वसंदेहाः प्रयोजनम् ।

याचा अर्थ असा कीं—( १ ) रक्षा, ( २ ) ऊह, ( ३ ) आगम, ( ४ ) लघु आणि ( ५ ) असंदेह—हीं व्याकरणशास्त्राचीं प्रयोजनें भगवान् पतंजलींनीं महाभाष्यांत एणेंप्रमाणें प्रतिपादिलीं आहेत:—

( १ ) रक्षा—वेदांचें रक्षण व्हावें एतदर्थ व्याकरण शिकावें; कारण वर्णांचा लोप केव्हां होतो, आगम केव्हां लावतात, वर्णांस विकार कशामुळें होतो, हें ज्यास ठाऊक असेल तोच वेदांचें रक्षण करील व त्यांचा अर्थ जाणूं शकेल.

( २ ) ऊह—वेदमंत्रांमध्यें सर्व लिंगें व विभक्ति यांचा उपयोग नेहमीं केलेला नसतो. यज्ञाचे वेळीं प्रसंगास अनुरूप अशा लिंगविभक्तींची योजना मंत्रांमध्यें करावी लागते. ती योजना व्याकरणाचे ज्ञानाशिवाय करतां येणें अशक्य आहे.

( ३ ) आगम—शास्त्रांत असें सांगितलें आहे कीं—

ब्राह्मणेन निष्कारणो धर्मः षडंगो वेदोऽध्येयोज्ञेयश्च ।

याचा अर्थ असा कीं—ब्राह्मणानें फलाशा न धरितां धर्माचरण करून षडंगयुक्त वेदाचें अध्ययन करावें व वेदार्थ समजून घ्यावा. व्याकरण हें वेदांगांपैकीं प्रधान अंग होय, म्हणून याविषयीं जितका प्रयत्न करावा तितका फलद्रूप होईल.

( ४ ) लघु—भाषेंतील सर्व शब्दांचें ज्ञान थोडक्यांत होण्याकरितां व्याकरणाचें अध्ययन करावें. याविषयीं एक आख्या येणेंप्रमाणें आहे. बृहस्पति इंद्रास एका मागून एक असे संस्कृत भाषेंतील संपूर्ण शब्द शिकवूं लागला. देवांचीं सहस्र वर्षें अध्ययन चाललें होतें, तथापि शब्दांचा अन्त लागेना. बृहस्पतीसारखा गुरु, व इंद्रासारखा शिष्य अशी जोडी जमली असून देवांचीं सहस्र वर्षें अध्ययन होऊन देखील शब्दांचा अन्त लागला नाहीं. सांप्रत तर मनुष्याचें आयुष्य शंभर वर्षें आहे. तेव्हां सर्व शब्द कधीं संपणार व त्यांच्या प्रयोगाचें ज्ञान कधीं होणार याचा नियम सांगणें अशक्य होय. याकरितां व्याकरणशास्त्र शिकणें जरूर आहे.

( ५ ) असंदेह—म्हणजे, शंका दूर होण्याकरितां व्याकरणशास्त्राचें अध्ययन करावें. याज्ञिकांचा असा सिद्धान्त आहे कीं—

स्थूल पृषतीमग्निवारुणीमनड्वाहीमालभेत ।

या वचनामध्यें

स्थूलानि पृषंति यस्याः सा

किंवा

स्थूला चासौ पृषतीच

या दोन समासांच्या विग्रहांपैकीं शुद्ध कोणता हें ठरवावयास व्याकरणाचें ज्ञान अवश्य आहे. वैयाकरण जो आहे तो लागलींच म्हणेल कीं—सामासिक शब्दाचें अन्त्यपद जर उदात्त असेल तर तो कर्मधारय समास होईल, येथें पूर्वपद उदात्त स्वरित असल्यामुळें बहुव्रीहि समास होतो.

व्याकरणशास्त्र शिकल्यापासून वेदार्थज्ञानास जे अनेक फायदे होतात त्यांचीं उदाहरणें पातंजल महाभाष्यांत दिलीं आहेत; त्यांपैकीं मुख्य वचनें एणेंप्रमाणें आहेत.

(१) यस्तु प्रयुंक्ते कुशलो विशेषे
शब्दान्यथावद्व्यवहारकाले ॥
सोऽनंतमाप्नोति जयं परत्र
वाग्योगविद् दुष्यति चापशब्दैः ॥ १

याचा अर्थ असा कीं—जो कुशल पुरुप प्रत्येक व्यवहारांत शब्दांचा योग्य रीतीनें उपयोग करितो तो स्वर्गलोकामध्यें चिरकाल जय पावतो. असा पुरुप जर अपशब्दांचा उपयोग करील, तर त्याचा नाश तत्काल होईल.

(२) अविद्वांसः प्रत्यभिवादे
नाम्नो येन प्लुतिं विदुः ॥
कामं तेषु तु विप्रोष्य
स्त्रीष्विवायमहं वदेत् ॥ १

याचा अर्थ असा कीं—आपणास कोणीं नमस्कार केला असतां उलट नमस्कार करितांना प्लुत स्वराचा उपयोग करावा. हें जो जाणत नाहीं, असा अविद्वान् पुरुष भेटला असतां स्त्रियांप्रमाणें ‘ मी आहें ’ इतकेंच

म्हणावें. तेव्हां, लोकांनीं आपणास स्त्रियांप्रमाणें वागवूं नये असें जर मनांत असेल, तर व्याकरणाचें अध्ययन करावें.

( ३ ) एकः शब्दः सुप्रयुक्तः सम्यग्ज्ञातः ।
स्वर्गे लोके च कामधुग्भवति ॥

याचा अर्थ असा कीं—भाषेंतील एकच शब्दाचा प्रयोग जर उत्तम प्रकारचा करतां आला व समजला, तर तो एकच शब्द स्वर्गलोकीं व इहलोकीं संपूर्ण इच्छा सिद्धीस नेतो.

( ४ ) चत्वारि शृंगा त्रयो अस्य पादा
द्वे शीर्षे सप्त हस्तासो अस्य ।
त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति
महो देवो मर्त्यां आविवेश ॥

याचा अर्थ असा कीं—एक मोठा देव मनुष्यमात्रामध्यें प्रवेश करिता झाला. त्या वृषभरूपी पुरुषास चार शिंगें आहेत ( नाम, क्रियापद, उपसर्ग व अव्यय ); तीन पाय आहेत ( वर्तमान, भूत, भविष्यत् हे काळ ); दोन डोकीं आहेत ( सुप् प्रत्यय व तिङ् प्रत्यय ); सात हात आहेत ( सात विभक्ति ). छाती, कंठ व डोकें या तीन ठिकाणीं बांधलेला, असा हा वृषभ मोठ्यानें शब्द करितो. या देवास वृषभ म्हणण्याचें कारण असें आहे कीं ' कामान्वर्षति ' म्हणजे सकल इच्छा जो पूर्ण करितो अशी वृषभ शब्दाची व्युत्पत्ति आहे. तेव्हां अशा मोठ्या देवाशीं आपलें तादात्म्य व्हावें, म्हणून व्याकरणशास्त्राचें अध्ययन करावें.

( ५ ) चत्वारि वाक्परिमिता पदानि
तानि विदुर्ब्राह्मणा ये मनीषिणः ।
गुहा त्रीणि निहिता नेंगयन्ति
तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति ॥

याचा अर्थ असा कीं—वाणीमध्यें चार प्रकारचे शब्द उमटतात, आणि ते शब्द ज्ञानसंपन्न मनुष्यांस अवगत होतात. यांपैकीं तीन ( परा, पश्यन्ती, मध्यमा ) प्रकार अन्तर्भूत असून त्यांचा उच्चार होत नाहीं, चवथा प्रकार ( वैखरी ) मात्र मनुष्यमात्राच्या वाणीमध्यें व्यक्त होतो.

( ६ ) सक्तुमिव तितउना पुनन्तो
यत्न धीरा मनसा वाचमक्रत ।
अत्र सखायः सख्यानि जानते
भद्रैषां लक्ष्मीर्निहिताधि वाचि ॥

याचा अर्थ असा कीं—चाळणीनें जसे सातु शुद्ध करितात, त्याप्रमाणें विद्वान् लोक बुद्धिसामर्थ्यानें भाषेंतील सर्व पदांचें संशोधन करितात. सौहृदांचें वर्म सुहृदच जाणतात. असे जे भाषेशीं सख्य करणारे पुरुष —वैयाकरण-त्यांच्या वाणीमध्यें कल्याणकारक ऐश्वर्य भरलेलें असतें.

( ७ ) सुदेवो असि वरुण यस्य ते सप्त सिंधवः ।
अनुक्षरन्ति काकुदं सूर्म्यं सुषिरामिव ॥

याचा अर्थ असा कीं—हे वरुणा, तूं फार वैभवशाली आहेस. लोहमय स्तंभांतून जसे सात समुद्र वहावे तशा सात विभक्ति तुझ्या कंठांतून बाहेर निघतात.

या एकंदर विवेचनावरून असें लक्षांत येईल कीं,

भारतीय आर्यांचा ईश्वरप्रणीत ग्रंथ वेद होय. विचार करण्यास समर्थ असा जो मनुष्यप्राणी त्यास ज्ञानप्राप्ति व्हावी आणि उत्तम प्रकारचें सुख व्हावें एतदर्थ सृष्टीच्या अगोदरच ज्ञानमय वेदाची उत्पत्ति झाली. अशा रीतीनें वेदाच्या भक्कम पायावर रचलेला आर्य धर्म सकल पुरुषार्थसिद्धीस साधन झाला हें अगदीं स्वाभाविक होय.

धारणार्थकाद् धृधातोः धर्मशब्दः पंकजादिवद् योगरूढः। तत्र पततो जनानाश्रयो भूत्वा धरतीति धर्म शब्दस्य योगार्थः। रूढयर्थस्तु अनिष्टाननुबंधि इष्टफलसाधनमित्याकारकः । येन अनुष्ठीयमानेन अनिष्टपरिहार इष्टफललाभश्च भवति स धर्मः।

**—आर्यविद्यासुधाकर**

याचा अर्थ असा कीं—ज्याप्रमाणें, ‘ पंकजापासून झालेलें ’ असा योगार्थ असून, पंकज शब्दाचा ‘ कमल ’ हा रूढार्थ बनलेला आहे, त्याप्रमाणें धारणार्थक धृ धातूपासून उत्पन्न होऊन, पतन पावणाऱ्या लोकांस आश्रय होऊन जो त्यांचें रक्षण करितो तो धर्म होय, असा धर्म शब्दाचा यौगिक अर्थ झाला, आणि अनिष्टाचा परिहार करून इष्ट फलप्राप्ति करून देणारा असा रूढार्थ बनला आहे. तात्पर्य, ज्यास अनुसरून वागलें असतां सकल अर्थसिद्धि होते तो धर्म होय. अशा धर्म शब्दाच्या व्याख्येशीं अन्वर्थक आर्यधर्म हा सर्वज्ञ परमेश्वराची साक्षात् आज्ञा असल्यामुळें, सर्व आर्य लोकांस प्राणाहूनहि प्रियकर व्हावा, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. पृथ्वीवरील सर्व धर्म वैदिक धर्मापासूनच साक्षात्

किंवा परंपरेनें निर्माण झाले आहेत. बौद्ध धर्म हा वैदिक धर्मांतील कांहीं श्रेष्ठ मतें घेऊन त्यांवर स्थापित झाला आहे हें प्रसिद्ध आहे. तसेंच ख्रिस्ती धर्म व महम्मदी धर्म हे तर बौद्ध धर्मावरून प्रचारांत आले हा सिद्धान्त विश्रुत आहे. प्राचीन आलेक्झांड्रिआ शहरांत जो प्रचंड ग्रंथसमूह दग्ध झाला तो जर मनुष्यमात्रास उपलब्ध झाला असता, तर या सिद्धान्ताचें सत्यत्व उघड झालें असतें.

एथें अशी शंका उत्पन्न होते कीं—जर परमेश्वर सकल मनुष्यांस निर्माण करितो, तर त्याची आज्ञा सर्वांस एकच असली पाहिजे. तेव्हां अनेक मतान्तरें ज्यांत दृष्टीस पडतात असे भिन्न धर्म एकाच परमेश्वराची आज्ञा कशी होऊं शकतील ? या शंकेचें समाधान असें आहे कीं—मनुष्यत्वाच्या दृष्टीनें मानवी प्राणी जरी सारखे असले, तरी निरनिराळया देशांतील लोकांची परिस्थिति व विशेषेंकरून बुद्धिसामर्थ्य हीं भिन्न प्रकारचीं असतात. म्हणून लोकांच्या बुद्धिसामर्थ्याप्रमाणें त्यांस अवगत होतील अशीं व भिन्न भिन्न परिस्थितीला अनुरूप अशीं जीं तत्त्वें आहेत, तेवढ्याच तत्त्वांचे संग्राहक धर्म त्या त्या देशांत निर्माण झाले. या गोष्टीवरून ईश्वराचें मनुष्यमात्रावरील प्रेम व अगाध चातुर्य हीं पूर्णपणें नजरेस येतात. अद्वैत मतांतील उदात्त तत्त्वें व त्यांचा उपासनेशीं किंवा भागवत धर्माशीं व्यक्त होणारा अपूर्व मिलाफ हीं केवळ भारतीय आर्यांसच आकलन होणारीं असल्यामुळें, आशिया खंडांतील कांहीं

इतर देशांतील लोकांकरितां सामान्य नीतितत्त्वांचा संग्राहक असाच धर्म भगवान् शाक्य मुनीस निर्माण करावा लागला. तसेंच, विषयोपभोगाचीं साधनें वृद्धिंगत करून देहपुष्टि संपादन करावी, आपणाहून दुर्बल व कमी धूर्त अशा बांधवांवर आपलें वर्चस्व स्थापित करावें, जगांत ज्या उत्तमोत्तम वस्तु असतील त्या दुसऱ्याच्या हातून बुचाडून घ्याव्या—अशा तऱ्हेच्या वासनांनीं ग्रस्त झालेल्या यूरोपीय राष्ट्रांतील लोकांकरितां ख्रिस्ती धर्म उत्पन्न झालेला आहे. तेव्हां निरनिराळ्या मानसिक वृत्तींचे पोषक व परिस्थितीस योग्य असे भिन्न धर्म निर्माण होणें अगदीं स्वाभाविक आहे. यास उत्कृष्ट दृष्टांत म्हटला म्हणजे वैद्यकशास्त्रांतील एका प्रमेयाचा होय. सर्व प्रकारच्या रोगांवर एकच औषध मिळणें कितीहि इष्ट असलें तरी जसें दुर्घट होय, तसेंच सर्व तऱ्हेच्या लोकांस एकच धर्म असणें फार अवघड आहे. दुसरा दृष्टांत अगदीं व्यावहारिक होय. निरनिराळ्या अंगलोटाप्रमाणें आणि भिन्न भिन्न हवेस व रुचीस अनुरूप असेच अंगरखे घालण्याचा रिवाज सर्व देशांत असतो जर कोणी म्हणेल कीं एकाच सांच्याचा व एकाच रंगाचा अंगरखा सर्व मनुष्यांनीं घालावा, तर हें म्हणणें कोणासहि रुचणार नाहीं. त्याप्रमाणेंच, देशांतील हवेस मानवेल, लोकांच्या भिन्न मनोवृत्तींस व रुचीस साजेल आणि आध्यात्मिक उन्नतीस शोभेल, अशाच धर्माचा त्या त्या देशांत विस्तार होणें सृष्टिनियमास अनुसरून आहे. या कारणामुळें

आर्य धर्माचीं उदात्त तत्त्वें इतर देशांतील लोकांस आकलन होत नाहींत आणि आर्य लोकांचा ईश्वरप्रणीत ग्रंथ जो वेद त्यास नांवें ठेवण्यास मात्र ते लोक तयार होतात.

अशी वस्तुस्थिति असल्यामुळें अत्यन्त श्रेष्ठ जो वेद त्यावरील श्रद्धा वृद्धिंगत व्हावी व तदन्तर्गत उच्च तत्त्वें सर्वांस समजावीं हें या निबंधाचें मुख्य प्रयोजन होय. वेद म्हणजे केवळ ज्ञान होय, वेद हे सूर्याप्रमाणें स्वतः प्रकाशमान असल्यामुळें स्वतःप्रमाण होत. सर्व जगांतील भाषांपैकीं अत्यंत नियमबद्ध आणि प्रगल्भ अशा संस्कृत भाषेंत जितकें म्हणून वाङ्मय उपलब्ध आहे त्या सर्वांत अत्यंत उदात्त ( Sublime ) आणि सुंदर ( Beautiful ) असें वेदाप्रमाणें दुसरें आढळत नाहीं. वेदांतील मुख्य विषय ईश्वरी ज्ञान होय. या विषयामध्यें तृणापासून परमेश्वरापर्यंत यच्चयावत् पदार्थांचा बोध होत असल्यानें हा विषय श्रेष्ठ मानिला जातो. सर्व पदार्थांमध्यें परमेश्वर प्रधान आहे, म्हणून सर्व वेदांचा इत्यर्थ ईश्वराचें ज्ञान होणें हाच आहे.

> सर्वे वेदा यत्पदमामनन्ति तपांसि सर्वाणि
> च यद्वदन्ति । यदिछन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति
> तत्ते पदं संग्रहेण ब्रवीम्योमित्येतत् ।
>
> —काठक

याचा अर्थ असा कीं—सर्व वेद ज्या आनंदमय व दुःखरहित पदाचें वर्णन करितात, कृच्छ्रचांद्रायणादि सर्व तपें ज्या पदाच्या प्राप्तीसाठीं लोक करितात आणि ज्या पदाची इच्छा करून सत्यधर्मानुष्ठानरूपी आचरण लोक

करितात—तें पद थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे प्रणव होय. प्रणव म्हणजे ओंकार होय. ओंकार हा ईश्वर-वाचक आहे, कारण प्रणव आणि ईश्वर यांमध्यें वाच्य-वाचकसंबंध नेहमीं रहातो. हा अनादि संबंध असून, ओंकाराचा विधिपूर्वक जप करून त्याच्या अर्थाचें चिंतन करणें हें ईश्वराचें परम आराधन होय.

---

## प्रकरण दुसरें
### भारतीय आर्ष महाकाव्यें



यद्यद्विभूतिमत्सत्वं श्रीमदूर्जितमेव वा ।
तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥ १

कोणत्याहि राष्ट्रांतील लोकांस एकसमयावच्छेदेंकरून आनंद, ज्ञान, ईर्ष्या किंवा उत्साह देणारें प्राचीन महाकाव्यासारखें दुसरें साधन सांपडणें कठिण आहे. अशा काव्यास इंग्रजी भाषेमध्यें Epic Poetry असें म्हणतात. Epic Poetry ह्या इंग्रजी शब्दांचें ‘ वीररस प्रधान काव्य ’ असें कित्येक भाषान्तर करितात, पण आमच्या मतें हें भाषान्तर बरोबर नाहीं. जुना सांप्रदाय पाहिला असतां अशा प्रकारच्या ग्रंथास महाकाव्य अशीच संज्ञा दिलेली आहे, आणि कालिदासादि कवींनीं केलेल्या काव्यापासून त्याचा भेद दाखविण्याकारितां त्याच्या मागें ‘ आर्ष ’ हें विशेषण लाविलेलें आढळतें. खुद्द महाभारतांत पहिल्या अध्यायांतच

यश्चैनं शृणुयान्नित्यं आर्षं श्रद्धासमन्वितः ।

असा आर्ष पदानें महाभारताचा उल्लेख केला आहे. इंग्रजी भाषेमध्यें ज्यांस Epic Poetry असें म्हणतात त्याचा अर्थ मराठी भाषेंत आर्ष महाकाव्य या शब्दांनींच चांगला व्यक्त होतो, म्हणून आर्ष महाकाव्य ही संज्ञा प्राचीन असल्यामुळें रामायण व महाभारत हीं जीं आर्य लोकांचीं Epic काव्यें आहेत त्यांस अधिक अन्वर्थक रीतीनें लागू पडते.

इतिहास History, वक्तृत्व Oratory, तत्त्वज्ञान Philosophy, काव्य Poetry हे वाङ्मयाचे सर्वमान्य विभाग आहेत. इतिहासकार नानाप्रकारची माहिती देतो, वक्ता श्रोत्यांचें मन वळवितो, तत्त्ववेत्ता उपदेश करितो. या सर्वांचा प्रत्यक्ष संबंध मनुष्याच्या बुद्धीशीं असतो; पण कवीचीं मुख्य कामें म्हटलीं म्हणजे आनंदजनकत्व व अन्तःकरणजागृति हीं होत. म्हणून कवीचा प्रत्यक्ष संबंध प्रतिभेशीं Imagination व मनोविकाराशीं Passions असतो. कवीच्या ग्रंथांत विविध ज्ञान आणि नीतिशिक्षण हीं आहेतच. पण हा उद्देश कवीला अप्रत्यक्ष रीतीनें सिद्धीस न्यावा लागतो, म्हणजे अन्तःकरणामध्यें मनोविकार जागृत करून आनंद व चमत्कृति उत्पन्न करावीं लागतात. कवीचें हृदय प्रतिभाप्रकर्षानें किंवा उत्कट मनोविकारांनीं उचंबळून जातें, तेणेंकरून त्याची भाषा जोरदार व मर्मभेदक होऊन वाचकांचें किंवा श्रोत्यांचें हृदय भेदून टाकिते. अशा प्रकारचा हृदयवेध करण्याचें कवीचें सामर्थ्य अ-

सल्यामुळें उत्कृष्ट प्रकारचें काव्य पृथ्वीवरील सर्व लोकांस आवडूं लागतें.

महाकाव्य हा काव्याचा मुख्य प्रविभाग होय. काव्याच्या किंवा महाकाव्याच्या रचनेस व गुणविवेचनास प्रतिभा Imagination व अभिरुचि Taste या शक्तींची अत्यन्त अवश्यकता आहे, म्हणून प्रथम या शक्तींची माहिती देऊन त्यांचा काव्यग्रंथांशीं निकट संबंध कसा पोहोंचतो हें स्पष्ट करितों.

सृष्टपदार्थ किंवा कृत्रिम पदार्थ यामध्यें व्यक्त होणाऱ्या उदात्त स्वरूपापासून Sublimity किंवा सौंदर्यापासून Beauty आनंद देणारी जी शक्ति मनुष्यमात्रास ईश्वरानें अर्पण केली आहे त्या शक्तीस अभिरुचि असें म्हणतात. ईश्वरनिर्मित वस्तु, स्थलें, देखावे किंवा मनुष्यकृत वस्तु, यंत्रें, गृहें यांतील सौष्ठव किंवा मोहकपणा ओळखण्याचें सामर्थ्य प्रत्येक मानवी प्राण्यास आहे. बुद्धि Reason म्हणून जी शक्ति ईश्वरानें मनुष्यास दिली आहे ती अभिरुचीहून अगदीं निराळी आहे. उपपत्तीच्या विषयांत तत्त्वान्वेषण करणें आणि व्यवहार विषयांत कार्यकारणांची योग्यता ठरविणें हीं बुद्धींची कामें होत. यावरून बुद्धि ही अभिरुचि नव्हे हें उघड झालें. मनोहर गायनापासून, सुंदर चित्रापासून, रम्य देखाव्यापासून किंवा गोड काव्यापासून जो आल्हाद होतो तो तर्कवादामुळें किंवा प्रज्ञाशक्तीमुळें होत नाहीं. सुंदर चित्रापासून किंवा हृदयंगम काव्यनाटकादिकांपासून होणारा आनंद केवळ ने-

सर्गिक असतो व तो कां होतो हें सुद्धां अनेक प्रसंगीं सांगतां येत नाहीं. हा आनंद बुद्धिप्रभावाचें फल नसून मोठ्या तत्त्ववेत्त्यांस किंवा गांवढळ मनुष्यास सारखाच होतो.

पदार्थांतील, चित्रांतील, देखाव्यांतील किंवा काव्यांतील सौंदर्य ओळखण्याची पात्रता सर्व मनुष्यांमध्यें स्वतःसिद्ध असते. सुव्यवस्थित, सप्रमाण, नियमबद्ध, भव्य, सुस्वर, तेजस्वी—अशा पदार्थांची गोडी प्राणिमात्रांस असते. अभिरुचीचीं मूलतत्त्वें लहान मुलांच्या अंगांत भिनलेलीं असतात. सप्रमाण पदार्थ, चित्रें, मूर्ति सर्व प्रकारच्या अनुकरणात्मक वस्तु—या पाहिल्याबरोबर मुलांस आल्हाद वाटतो. अगदीं अडाणी खेडवळ घेतला तरी लावण्या, पोवाडे, मनोरंजक कथा ऐकून किंवा पृथ्वीवरील व आकाशांतील विविध देखावे पाहून संतुष्ट होतो. तसेंच नवीन वस्तु पाहिली म्हणजे सर्वांस आवडते, आश्चर्यचकित करणारी गोष्ट हवीशी वाटते, असामान्य वृत्ति दृष्टीस पडल्या म्हणजे विस्मय होतो, अलौकिक आचरणाचें नवल वाटतें, अद्भुत लीलांविषयीं कौतुक उत्पन्न होतें—ह्या मानवी स्वभावास अनुसरूनच काव्यावर आणि महाकाव्यावर मनुष्यमात्राची उडी पडते.

त्याप्रमाणेंच प्रतिभा Imagination म्हणून दुसरी शक्ति ईश्वरानें मनुष्यमात्रास दिली आहे. या शक्तीच्या योगानें अनेक प्रकारच्या कल्पनांचा असा संयोग केला जातो कीं, तो ध्वनिरूपानें, चित्ररूपानें,

मूर्तिरूपानें, गृहरूपानें किंवा काव्यनाटकादिरूपानें व्यक्त झाला असतां आनंद, विस्मय, चमत्कृति इत्यादि भिन्न-भिन्न मनोविकारांचा प्रादुर्भाव सहज होऊं शकतो. प्रतिभाशक्तीचा ज्या कलांमध्यें पूर्ण प्रभाव दृष्टीस पडतो त्यांस अभियुक्त कला Fine Arts असें म्हणतात. चित्र, गायन, वादन, शिल्प, काव्य ह्या सर्व अभियुक्तकला असून अनुकरणात्मक Imitative आहेत, म्हणजे ह्या सर्व कलांमध्यें भिन्नभिन्न साधनांनीं सृष्टींतील पदार्थांचें, ध्वनींचें, देखाव्यांचें, चमत्कारांचें अनुकरण करण्याचा प्रयत्न केलेला असतो. गवईलोक कंठांतलि निरनिराळ्या सुरांनीं व आलापांनीं, आणि बजवय्ये लोक नाना प्रकारच्या वाद्यांनीं सृष्टींतील नाना ध्वनींचें अनुकरण करितात. चित्रकार भिन्न रंगांनीं व शिल्पकार निरनिराळ्या मातीच्या प्रकारांनीं, दगडांनीं अथवा धातूंनीं सृष्टींतील देखावे उतरतो. त्याप्रमाणें कवि अन्तःकरणांतील नाना तरंग व वृत्ति शब्दरूपानें वठवितो. चित्रकार कलम आणि रंग या साधनांनीं जें करितो तेंच शब्दरूपी साधनांनीं कवि करितो. कवित्वशक्ति अथवा जीस अलंकारशास्त्रवेत्ते प्रतिभा असें म्हणतात ही तर खरोखर परमेश्वराची अमोलिक देणगी होय. सहृदयांच्या अन्तःकरणांत आनंद व चमत्कृति उत्पन्न करणारा जो वाक्यसमूह त्यासच काव्य असें म्हणावें, मग तो पद्यरूपी असो वा गद्यरूपी असो. एक प्रसिद्ध कवि म्हणतो कीं—अत्युत्कट मनोविकारांचा जो नैसर्गिक प्रादुर्भाव त्यास काव्य असें म्हणावें. अर्थात्

अशा प्रकारच्या प्रादुर्भावांत चमत्कृतिजनकत्व असाव-याचेंच. साधारण प्रतीच्या किंवा अडाणी लोकांत जसें विनोदपर भाषण तसें विद्वान् लोकांत काव्य होय. म्हणून मनुष्यमात्राच्या मनोविकारांचें अप्रतिम ज्ञान, सृष्ट पदार्थांमधील सादृश्यप्रतीति, हृदयद्रावक वर्णन करण्याची किंवा कोणताहि वस्तुनिर्देश करण्याची शक्ति--हे असामान्य गुण कवीच्या अंगीं असावे लागतात.

वर दिलेल्या माहितीवरून, अभिरुचि Taste आणि प्रतिभा Imagination या शक्तींचें स्वरूप व प्रकृत विषय जो महाकाव्य त्याशीं यांचा संबंध--हीं वाचकांच्या लक्षांत आलींच असतील. अभिरुचि आणि प्रतिभा या शक्तींनीं मनुष्यास सुसंस्कृत करण्यांत ईश्वराचें अगाध चातुर्य नजरेस येतें. ज्यास गायनकला अवगत असते त्यास ईश्वरानें नवीन इंद्रिय दिल्याप्रमाणेंच आहे——अशी एका भाषेंत म्हण आहे. तद्वत्, अभिरुचि व प्रतिभा या दोन देणग्या देऊन ईश्वरानें मनुष्याच्या आटोक्यांत खरोखर अगणित सुखाचीं साधनें ठेविलीं आहेत. डोळ्यांनीं पदार्थ पाहणें व कानांनीं ध्वनि ऐकणें एवढ्याच शक्ति ईश्वरानें नेत्रेंद्रियांत व कर्णेंद्रियांत ठेविल्या असत्या, तरी या इंद्रियांवर अवलंबून रहाणारीं व्यवहारांतील सर्व कार्यें सिद्धीस गेलीं असतीं. तथापि नानाविध सृष्ट पदार्थ, सृष्टिव्यापार, कृत्रिम पदार्थ आणि कृत्रिम व्यापार——यांमध्यें नेत्रेंद्रियास व कर्णेंद्रियास गोचर होणाऱ्या सौंदर्यापासून व उदात्त स्वरूपापासून आपणास सूक्ष्मसंवेदना होऊन जो विशुद्ध

विस्मयानंद प्रत्ययास येतो तो साध्य करून देण्यांत ईश्वराचें अगाध दयालुत्व व मनुष्यमात्रावरील अखंड प्रेम--हीं दृष्टीस पडतात. मनुष्यास सुख देण्याकरितां सृष्टीमध्यें हें जें शोभासंपन्नत्व व वैभवशालित्व अधिक निर्माण केलें आहे, त्या योगें ईश्वराचे मनुष्यावर असंख्य उपकार झाले आहेत यांत संशय नाहीं. मनुष्याच्या निर्वाहास जेवढीं म्हणून साधनें अवश्य पाहिजेत तेवढीं सर्व निर्माण करूनहि ईश्वराची तृप्ति झाली नाहीं, तरी अखिल पदार्थांमध्यें व व्यापारांमध्यें नानाविध प्रकारांनीं चमत्कृतिजनकत्व हा धर्म ठेवून त्याची मनुष्यास संवेदना होईल अशी शालीनता त्यामध्यें उत्पन्न केली आहे. सर्व वस्तूंमध्यें व व्यापारांमध्यें ईश्वरानें अशी माया भरून ठेविली आहे कीं, मनुष्यानें त्यांचें अवलोकन केल्याबरोबर त्याचें हृदय मोहित होऊन आनंद व आश्चर्य यांमध्यें तो निमग्न होऊन जातो. सुंदर वस्तु नेत्रास रम्य वाटतात, मनोहर शब्द कानास गोड लागतात, तेव्हां ध्वन्यात्मक काव्य मनुष्यमात्रास अखंड सुख देतें यांत नवल तें काय ?

एथपर्यंत सृष्टपदार्थ व कृत्रिम पदार्थ यांमध्यें प्रतीतीस येणाऱ्या उदात्त स्वरूपाचें Sublimity व सौंदर्याचें Beauty आविष्करण झालें. आतां ग्रंथामध्यें व विशेषेंकरून महाकाव्यामध्यें जें सौंदर्य व उदात्तत्व दृष्टीस पडतें त्याचें विवेचन करूं. बुद्धि आणि प्रतिभा यांपासून जे विचार व ज्या कल्पना उत्पन्न होतात त्याचे ग्रंथ हे निधी होत. प्रगल्भ विचार कोणते, सुंदर कल्प-

ना कोणत्या—हें जाणणें असेल तर महाकाव्याची कास धरावी. मनुष्यमात्रास काय आवडतें, कोणत्या वस्तु सुंदर वाटतात, कोणते व्यापार गोड दिसतात, कोणतें आचरण आल्हाद्कारक होतें, मनुष्याचें कल्याण कशानें घडून येतें, उत्तम काव्य कोणतें, गद्यापेक्षां पद्य अधिक मनोहर कशानें होतें—इत्यादि अनेक प्रश्नांचें समाधान करून घेण्यास महाकाव्यासारखें योग्य स्थल मिळणें कठिण आहे. कालिदासादिकांचीं काव्यें प्रौढ पद्धतीचीं व अलंकारांनीं मंडित असल्यामुळें तीं विद्वान् लोकांसच प्रिय होतात, परंतु रामायण व महाभारत हीं सर्व वयाच्या, सर्व प्रकारच्या, सर्व दर्जाच्या लोकांस सारखींच आवडतात. जितेंद्रियता, तितिक्षा, साहस, अचाट शक्ति, अद्भुत सामर्थ्य—वगैरे असामान्य गुणांचा हीं काव्यें सागरच होत. देश, काल इत्यादि सामान्य परिच्छेद या महाकाव्यांस बाधूं शकत नाहींत. सर्व देशांत, सर्व कालीं, सर्व जातीच्या मनुष्यांस हे ग्रंथ प्रिय होतात. या चमत्काराचें बीज असें आहे कीं, मनुष्यमात्राच्या हृदयास गुंफणारी एक तार आहे व तिला कोठेंहि चालना मिळाली तरी यच्चयावत् मनुष्यांच्या हृदयांत एकदम कंप होतो. त्याप्रमाणेंच, संपूर्ण विश्वांत असें एकजातीय सौंदर्य भरलें आहे कीं, त्याची सूक्ष्म संवेदना तत्काल मनुष्यमात्रास होते.

भरतखंड हें सर्व तऱ्हेनें उत्कर्षाचें स्थान होय. भौतिक, मानसिक व आध्यात्मिक या सर्व शाखांचा उत्कर्ष एथें दृष्टीस पडतो. एकीकडे पहावें तों, प्रचंड हि-

माद्रि कड्यावर कडा असा चढत जाऊन बर्फानें व मेघसमुदायानें आच्छादून गेलेला आहे व प्राचीन युगांच्या अविनाशी खडकाची आठवण करून देत आहे. दुसरीकडे पहावें तों, पूर्वेकडील व दक्षिणेकडील भूप्रदेश मैलांचे मैल पसरून क्षितिजास भेटत आहेत आणि या देखाव्याची समता मोडण्यास एकहि उंचवटा गोचर होत नाहीं. पूर्वेकडे पहावें तों, वर्षाकालीं पूर आल्यामुळें भरून चाललेल्या महानद्या अर्णवाकडे जोरानें धांवत आहेत. पश्चिमेकडे पहावें तों, सुवर्णाच्छादित दिसणारे उदकहीन वालुकामय प्रदेश योजनेंच्या योजनें पसरलेले आहेत. लोकांच्या बुद्धीचें व प्रतिभेचें केवळ आदर्शभूत अशा वाङ्मयामध्यें आपणांस अशाच प्रकारें वैचित्र्य दिसून येतें. ज्यांच्या योगानें मनुष्यास अनंत व अगाध ईशशक्तीच्या द्वारापर्यंत प्रवेश होईल अशी अध्यात्मिक उत्तुंग शिखरें भारतीय वाङ्मयामध्यें निर्माण झालीं आहेत. एथें अत्यंत जोराचा व सोसाट्याचा बुद्धिप्रवाह पुढें येणाऱ्या सर्व वस्तूंना धुडकावून लावीत आहे, काव्य व साहित्य यांच्या रम्य तीरांमधून तोच बुद्धिप्रवाह व प्रतिभाप्रवाह शांतपणानें वहात वहात सर्वेंद्रियांस संतोष देऊन अत्यंत उदात्त व सुंदर असे विचार आणि कल्पना उत्पन्न करीत आहे. वेदांमध्यें व पुराणांमध्यें जसा आध्यात्मिक काव्यप्रकर्ष नजरेस येतो तसा पृथ्वीवरील वाङ्मयांमध्यें कोठेंतरी सांपडतो काय? भारतीय आर्ष महाकाव्यांमध्यें प्रतीतीस येणारे उदारचरिताचे अथवा स्वभावसुंदर काव्यरसाचे

उत्कृष्ट नमुने कोणत्याहि राष्ट्रांत किंवा देशांत आढळतात काय? गायनशास्त्र, वैद्यक, गणितशास्त्र व अनेक इतर शास्त्रें—ज्यांच्या योगानें पाश्चात्य सुधारणेला मदत झाली आहे व ज्यांच्या योगानें मनुष्यमात्राची भौतिक, मानसिक व नैतिक उन्नति झाली आहे—तीं शास्त्रें व कला प्रथम भरतभूमींतच उगम पावल्या. पुराणसंशोधकांनीं असें सिद्ध केलें आहे कीं, कल्याणकारक सुधारणासूर्य देखील भौतिकसूर्याप्रमाणेंच प्रथम पूर्वेकडे उगवला. पाश्चिमात्य राष्ट्रांचें धर्मभोळेपणाच्या व अज्ञानाच्या बंधनापासून ज्या थोर विभूतीनें संरक्षण केलें, त्या विभूतीस म्हणजे पौर्वात्य शास्त्रकलांच्या नूतन बालकास पौर्वात्य ऋषींनींच आशीर्वाद दिले. अशी ही भरतभूमी सांप्रत जरी ग्रंथिक संन्निपातादि रोगांनीं व्याप्त, दुर्भिक्षोपहत, व अनेक विपत्तींनीं ग्रस्त असली, तथापि ती प्राचीन कालापासून वैभवशिखरास चढलेली असून साक्षात् किंवा परंपरेनें पाश्चात्य उन्नतीस व अभ्युदयास सहाय्य होऊन गेलेली आहे. भरतभूमीनें प्राचीन कालापासून सर्व जगाच्या भरभराटीस हातभार लाविला आहे व पाश्चात्य राष्ट्रांस ज्ञानवान् व समृद्ध करण्यास तीच कारणीभूत झाली आहे.

भारतीय महाकाव्यसमुद्र नीलवर्ण महासागराप्रमाणेंच अफाट आहे. आकाराच्या दृष्टीनें पाहतां रामायण व महाभारत हीं दोन आर्ष महाकाव्यें इतर कोणत्याहि भाषेंतील महाकाव्यांचें वैभव झांकून टाकतील. या दोहोंपैकीं आर्य लोकांच्या मतें प्राचीनतर अस-

लेल्या रामायणाच्या सात कांडांमध्यें मिळून एकंदर ४८००० पंक्ति आहेत व महाभारताच्या अठरा पर्वांमध्यें मिळून एकंदर २२०००० पंक्ति आहेत. व इताली देशांतील व्हर्जिल या कवीनें रचिलेल्या इनिअड नामक महाकाव्याच्या बारा अध्यायांत मिळून एकंदर ९८७८ पंक्ति आहेत. महाभारतामध्यें आनुषंगिक व पोषक कथानकें, आख्यानें, उपाख्यानें वगैरे जीं प्रकरणें मागाहून जोडलेलीं आहेत, तीं वजा जातां बाकी राहिलेल्या मुख्य कथाभागांतच २०००० पंक्ति आहेत. अर्वाचीन काळांतील संस्कृत भाषेंतील महाकाव्यें—रघुवंश, कुमारसंभव, किरातार्जुनीय, शिशुपालवध व नैषध—आणि प्राकृत भाषांतील महाकाव्यें—हीं मिळविलीं असतां, भारतीय महाकाव्यसंग्रहास दिलेली महार्णवाची उपमा यथार्थ आहे असें वाचकांच्या सहज लक्षांत येईल.

काव्यांतील मुख्य कथाभाग एकच असून, त्यास नानाप्रकारचीं व परस्परांत संमिश्र झालेलीं असंख्य आनुषंगिक कथानकें, आख्यानें, उपाख्यानें पोषक असावीं; त्यांतील मुख्य पात्रें उन्नत व उच्च दर्जाचीं असून त्यांचें सुंदर व स्वाभाविक वर्णन असावें; सर्व ग्रंथास व्यापून असणारें धार्मिक व नैतिक तत्त्व असावें; पात्रांचे संवाद, आत्मगत विचार व वृत्तकथन—हीं सर्व याच तत्त्वास अनुसरून पाहिजेत; सृष्टपदार्थांवर व मनुष्यमात्रावर धर्मतत्त्वाचा जो शुभकारक परिणाम घडतो त्याचें चित्तवेधक हुबेहुब वर्णन असलें पाहिजे.—ही जी महाकाव्याची व्याख्या केली आहे ती लावून

पहातां रामायण व महाभारत यांस जगांतील एकंदर महाकाव्यांत अग्रस्थान मिळेल यांत संशय नाहीं. तसेंच वरील व्याख्येंतील सर्व गोष्टी या ग्रंथांस एकंदर वाङ्मयांत अत्युच्च ठिकाणीं बसवितील, कारण या गोष्टी महाकाव्याच्या सारभूत आहेत. या काव्यापासून पुराणसंशोधकांस झालेली मदत, इतिहाससंशोधकांस त्यांपासून होणारा मोठा उपयोग, अचाट शारीरशक्ति, धैर्य, तेज, नीति, शील वगैरे गुणांचे यांतील अत्युच्च नमुने वारंवार आर्य लोकांपुढें राहून भरतभूमीचें झालेलें कल्याण—या सर्व गोष्टी जरी क्षणभर एका बाजूस ठेविल्या, तरी केवळ काव्यकलेचे नमुने एवढ्याच दृष्टीनें पाहिलें असतां हीं महाकाव्यें पहिलें स्थान पटकावितील. या सरोवरांपासून शेंकडों नाटकांना व संगीत काव्यांना स्फूर्तीचे झरे उत्पन्न झालेले आहेत. या महाकाव्यांस व्यापून टाकणारीं प्रासंगिक कथानकें अनेक गद्य व पद्य ग्रंथांचीं संविधानकें बनलेलीं आहेत. आर्यभूमींतील पुराणकथांचा हीं काव्यें सागरच बनून राहिलेलीं आहेत; यांतील अनेक प्रसंगांवरून अनेक चित्रकारांनीं व कारागिरांनीं असंख्य चित्रपट, मूर्ति, देखावे तयार केलेले आहेत, अनेक कलाभिज्ञांनीं सौंदर्याचे, अंगसौष्टवाचे, परिपूर्णतेचे नमुने बनविलेले आहेत आणि शब्दसृष्टींतील चित्रपट किती झाले असतील याची गणनाहि होणें कठिण आहे. इतकें होऊन देखील हीं काव्यें जशींच्या तशींच अभंग राहिलीं आहेत व पूर्वींप्रमाणेंच सांप्रतहि लोकांच्या मनावर तीं आपलें वर्चस्व व अधिकार गाजवीत आहेत, आणि पुढेंहि तसेंच क-

रितील. सदाचार व ईश्वरनिष्ठा यांमध्येंच सर्वदा निमग्न अशा पुरुषांस जन्मभर ध्येय करण्याकरितां व तदनुरूप वागण्याकरितां अत्यंत मनोवेधक, चित्ताकर्षक व केवळ ईश्वरतुल्य अशीं किती तरी परम पवित्र उदार चरित्रें या काव्यांत सांपडलीं असतील ? एकुलत्या एक पुत्राच्या वियोगानें संतप्त झालल्या मातेच्या अन्तःकरणांत सुप्रभाताप्रमाणें शान्ति कशानें निर्माण केली आहे ? निःशक्तपणानें व पापाचरणानें थरथर कांपणारीं पावलें कशामुळें स्थिर झालीं आहेत ? अठरा विश्वे दारिद्यानें गांजलेल्या हतभागी प्राण्यांस जीविताची आशा कशानें उत्पन्न झाली ? मानवी स्थितींमधील विषमता व सर्व आशांचा भंग हीं कशामुळें सहन झालीं ? या सर्व अद्भुत प्रश्नांचें उत्तर एकच असून, तें रामायणमहाभारतांचें अलौकिक सामर्थ्य हें होय.

दशरथ राजाचा पुत्र श्री रामचंद्र प्रशान्त व रमणीय अयोध्या नगरीमध्यें जन्म पावून हजारों वर्षें लोटलीं असतील. सरयू नदीच्या घों घों वहाणाऱ्या प्रवाहाच्या कांठीं रामानें बंधूसहवर्तमान ज्या बाललीला केल्या त्या वाल्मीकीनें अजरामर करून सोडल्याला हजारों वर्षें झालीं असतील. रामचंद्रानें या मृत्युलोकांतील सुखदुःखें अनुभविल्यास हजारों वर्षें गेलीं असतील. जें सर्वदा मानवी कल्पनेला मागें टाकितें व उत्कंठेनें हातांत घट्ट धरूं म्हटलें तर जें तत्काल सुटून जातें— मग त्यास अपरिहार्य प्रारब्ध कर्म किंवा आनुवंशिक परिणाम किंवा यदृच्छा, कांहीं कां म्हणाना—असें जें कांहीं गूढ तत्त्व सर्व जगास व्यापून आहे, त्याच्या कृपेचीं

अथवा अवकृपेचीं फळें रामानें अनुभविल्यास हजारों वर्षें झालीं असतील. आज यौवराज्यप्राप्तीची आशा, तर लागलीच सावत्र आईच्या मत्सरामुळें व कपटामुळें अरण्यवास—अशा गोष्टी रामाच्या आयुष्यांत घडल्यास हजारों वर्षें लोटलीं असतील. तथापि त्या महापुरुषाचें जीवनचरित्र इतकें लखलखित आहे व त्याचा व्यामोह इतका जबरदस्त आहे, कीं आपण त्या गतकालीन मंद पण दिव्य प्रकाशांत संचार करीत आहों कीं काय असा भास होतो. जगत्पावक श्रीराम अरण्यांत पुढें चालले आहेत, अत्युत्तम स्त्रीत्वाची केवळ प्रतिभा अशी महा पतिव्रता सीता मागें चालली आहे व तिच्या मागून परम-भक्त लक्ष्मण चालला आहे असा आपणांस अजून भास होत आहे. आपणांस क्षणभर असें जरी वाटलें कीं, रामाचें अन्तःकरण उद्विग्न झालें असेल, आशाभंगामुळें छाती उडत असेल, व त्याची स्थिति केवळ कष्टमय झाली असेल—तथापि आपण कर्तव्याला जागलों, पित्याचें प्रिय केलें, वचन पाळिलें या समाधानांत गर्क राहून विशुद्ध पत्नी व परमदक्ष भ्राता यांच्या साहचर्यानें सर्वकाल उल्हासित असे श्रीराम होते. चवदा वर्षें घोर वनवासांत घालविल्याशिवाय परतावयाचें नाहीं अशा निश्चयानें तिघेजण निघाले होते. गंगा उतरून मध्य-हिंदुस्थानांतील दऱ्याखोऱ्यांतून व अरण्यांतून तिघांनीं संचार केला. कंद, मूल, फलांवर त्यांचा निर्वाह होई, वृक्षांखालीं बसून शीतल सुगंध वायुस्पर्शानें त्यांचे श्रम परिहार होत, निर्मल निर्झरोदकानें त्यांची तृषा शांत होई. उघडच्या मैदानांत अथवा वृक्षाखालीं तृणशय्येवर

त्यांस निद्रा लागे. एकमेकांवर अत्यन्त प्रेम, एकमेकां-करितां प्राणहि देण्यास तयार—अशा स्थितींतच तीं तिघें सर्वदा संतुष्ट होतीं. त्यांस कांहीं उणें वाटत नव्हतें. प्रवासांत त्यांस अनेक आश्रम लागत, ऋषींशीं व ऋषिपत्न्यांशीं त्यांचा परम स्नेह जमत असे. अरण्यांत एकांतवासामध्यें आश्रम करून भार्येसह मुनि राहत असत यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण भरतखंडांत विवाहसंबंध केवळ विषयोपभोगाकरितां व लौकिक व्यव-हारांकरितां घडत नाहींत, तर धर्माचरणाकरितां दोन हृदयांचें जें दृढसंमीलन तोच विवाह मानिला जातो व म्हणूनच भार्येस धर्मपत्नी म्हणण्याचा सांप्रदाय आहे. या देशांत स्त्रीपुरुष विषयोपभोगाच्या लालसेनेंच वि-वाह करीत नाहींत, आणि म्हणूनच केवळ स्वधर्मानु-ष्ठानाकरितां बिवाहसंबंधानें रहाणारीं असंख्य जोडपीं आढळण्यांत येतात. असो. अत्रि व अनसूया यांचें आदरातिथ्य स्वीकारून श्रीरामानीं दंडकारण्यांत प्रवेश केला. अनेक तपस्विजनांचा सत्कार घेऊन श्रीरामानीं विराध राक्षसाचा वध केला. नंतर शरभंग व सुतीक्ष्ण या तपोधनांचा सत्कार व निरोप घेऊन राम अगस्त्य-मुनींच्या आश्रमीं गेले व त्या ऋषींच्या अनुज्ञेनें पंच-वटीमध्यें पर्णशाला बांधून तेथें त्यानीं वास केला.

पंचवटीमध्यें रहात असतां, हरिण, पक्षी, वृक्ष, पाषाण यांच्या साहचर्यांत जगन्माता महासाध्वी सीता वनवासदु:ख विसरून गेली. पण ही अवस्था फार वेळ टिकली नाहीं. लंकाधिपति रावण सीतासौंदर्यानें मोहित

झाला व दोघे राघव दूर अरण्यामध्यें गेलेले पाहून सीतेला उचलून पळून गेला.

सीताहरणामुळें रामानें अत्यंत क्लेश भोगले व दारुण यातना सहन केल्या. क्लेश व यातना हीं जणूं-काय उदात्त आर्यधर्माचरणाचा एक पवित्र अंशच बनून राहिलीं आहेत. चवदा वर्षें भोगलेल्या विपत्ती-मुळें श्रीरामाचें हृदय शुद्ध झाल्यावर त्यास सिंहासनाचा लाभ झाला. प्राचीनकाळीं स्वधर्मरक्षक आर्यपुत्राला अशा प्रकारचें शासन अवश्य होतें. भरतखंडांत प्रत्येक द्विजाला आठव्या वर्षीं आईबापाला सोडून बारा किंवा चोवीस किंवा छत्तीस वर्षें गुरुगृहीं वास करावा लागे. तेथें मृगचर्म व वल्कलें परिधान करून व ब्रह्मचर्याश्रमा-मध्यें भिक्षा मागून त्यास शिष्यवृत्तीनें गुरुशुश्रूषा करावी लागे. नानाप्रकारचीं अरण्यवासांतील दुःखें सोसून वेदशास्त्रांचें अध्ययन करणें हें प्राचीनकाळचें आर्य-पुत्रांचें व्रतच होतें. पित्राज्ञापालन, सत्यवादित्व, एक-पत्नीत्व हे गुण आणि अनेक वर्षें भोगलेले कायिक व मानसिक क्लेश—यांमुळें श्रीराम भारतीय आर्यांच्या हृद-यांत मूर्तिमंत बिंबून गेला आहे. इतक्या विपत्ति सोसल्या-नंतर रामाला प्रिय भार्येची व राज्याची प्राप्ति झाली. यावरून कर्तव्यतत्परता व स्वधर्मनिष्ठा असली म्हणजे अनेक संकटें सोसल्यावर इच्छित फलाची प्राप्ति पर-मेश्वर करून देतो—हें तत्त्व प्रत्येक आर्यपुत्राच्या अन्तःकरणांत बिंबून रहातें. हेंच रामायण हें भारतीयांस इतकें प्रिय होण्याचें कारण होय.

सीतेस परत आणण्याच्या प्रयत्नांत श्रीरामानीं प्रथम

सुग्रीवादि वानरांशीं सख्य केलें आणि ज्ञानसंपन्न भगवद्भक्त जो मारुति त्याच्या साहाय्यानें व बिभीषणाच्या अनुमतीनें, राम रावणवध करून व सीतेस घेऊन अयोध्येस परत आले. श्रीरामाच्या पादुका पुढें ठेवून व अखंड रामनाम स्मरण करून चवदा वर्षें चालविलेलें राज्य भरतानें श्री रामाच्या स्वाधीन केलें. रामचंद्रास सीतेसहवर्तमान राज्याभिषेक झाला. रामानीं सर्व पराक्रमशाली वीरांस आभरणें दिलीं व राजनिष्ठ सेवकांस पारितोषिकें समर्पण केलीं.

एथवर रामचरित्राचा पहिला भाग झाला. रामानीं दहा हजार वर्षें पृथ्वीवर राज्य केलें, त्यांच्या कारकिर्दींत विधवेला रडण्याची पाळी आली नाहीं, साप व रोग यांचें भय कोणाला माहीत नव्हतें, चोराचें नांव म्हणून राहिलें नाहीं, कोणावर कोणत्याहि प्रकारचा अनर्थ ओढवला नाहीं व म्हाताऱ्यांना मुलांचीं प्रेतकार्यें करण्याची पाळी आली नाहीं, जिकडे तिकडे आनंदीआनंद असून रामाकडे पाहून सर्व धार्मिकपणानें राहून कोणी कोणाला पीडा देत नव्हते. ते हजार हजार वर्षें जगून, हजारों मुलांमध्यें रोगराई व दुःख ठाऊक नसून सुखांत होते. झाडांना फुलें व पुष्पें लगटून रहात, पाऊस पाहिजे तेव्हां पडत होता व वारा हवा तसा वहात होता. स्वकर्मांत संतुष्ट राहून लोक आपआपलीं कर्में करीत व धर्मामध्यें गढून होते. हें द्वापरयुगांतील रामराज्य होय.

अशा रीतीनें धर्म, कीर्ति वगैरे सर्व विलोभनीय परिस्थिति संपादन करून देखील श्रीरामाचें नष्टचर्य सं-

पळ नव्हते. अजून प्रारब्धकर्माचा अवशेष म्हणून आणखी एक मोठें संकट श्रीरामावर यावयाचेंच होतें. राज्याभिषेक होऊन पुत्रवत् प्रजेचें प्रतिपालन करून राम विश्रांति घेत आहेत, तों सहा महिने रावणाच्या घरीं राहिल्यामुळें सीतेच्या पातिव्रत्याबद्दल प्रजाजन साशंक दिसूं लागले तेव्हां सीतेचा त्याग करावा लागला. प्रजेच्या संतोषाकरितां स्वसुखाविषयीं निरपेक्ष राहून पत्नीवियोगाचें संकट रामास सहन करावें लागलें. कर्तव्ययज्ञामध्यें आत्मसुखाची आहुति द्यावी लागली. हा जो श्रीरामानें यज्ञ केला—प्राणाहूनहि प्रियकर भार्येचा गरोदरपणीं त्याग केला—यांतच रामचरित्राचें सर्व बीज आहे. सर्व भरतखंडनिवासी लोक 'हा राम, हा राम!' म्हणून जो नामघोष करितात त्यांतील तत्त्व हेंच होय. रामानें चवदा वर्षें वनवास भोगून, एवढे पराक्रम करून हजारों वर्षें भरभराटीमध्यें राज्यशकट सुरक्षितपणें चालवून देखील प्रारब्धाची तृप्ति झाली नाहीं. अयोध्येंत राजवाड्यांतील सुखविलासाला लाथ मारून, पतिसेवेकरितां मोठमोठीं संकटें सोसून जी अरण्यवासिनी झाली, जिनें अग्निप्रवेश करून देवगंधर्वांसमक्ष आपला शुद्धभाव प्रकट केला, त्या साध्वी पतिव्रतेचा त्याग केल्याशिवाय प्रजाजनांचा संतोष झाला नाहीं. अखेरीस सीता गर्भवती असतांहि तिला लक्ष्मणानें वनामध्यें एकटी सोडून दिली असतां मुनिश्रेष्ठ वाल्मीकींनीं तिचा आदर केला. ऋषींच्या पवित्र आश्रमांतच सीतेला कुश आणि लव हे पुत्र झाले. वाल्मीकींनीं या मुलांकडून रामायण पाठ करविलें. हीं मुलें ऋषींच्या पवित्र

आधारांतून रामायणांतील कथाभाग म्हणून दाखवून सर्वांस आनंदवीत असत.

इकडे अयोध्येमध्यें श्री रामानीं अश्वमेधास आरंभ केला. नैमिषारण्यांत गोमतीच्या काठीं यज्ञमंडप उभारिला होता. वसिष्ठ, वामदेव, जाबालि, कश्यप वगैरे ऋषि, देशांतरींचे महा तपोधन ब्राह्मण व राजे, सुग्रीवादि वानरसमूह, बिभीषणादि कामचारी राक्षस यज्ञमंडपांत हजर होते. गरोदरपणीं त्याग केला असतांहि जिचें प्रेम ढळलें नाहीं अशा पवित्र भार्येच्या अभावीं रामानीं तिचीच सुवर्णप्रतिमा करून अश्वमेध चालविला होता. हा अलौकिक यज्ञ चालू असतां भगवान् वाल्मीकि आपल्या शिष्यांसह त्या ठिकाणीं आले. या वेळेस यज्ञांतील मुख्य चमत्कार म्हटला म्हणजे कुशलवांचें रामचरित्रगायन होय. आदिकविनिर्मित ' रामायण महाकाव्य ' लवकुश म्हणत असतां घेतल्या जाणाऱ्या निरनिराळ्या ताना, त्यांचें कंठमाधुर्य, द्रुत—मध्य—विलंबितादि म्हणण्याच्या वेळचे प्रकार, वीणेच्या सुराशीं मिळून गेलेला त्यांचा तो सूर——हीं सर्व त्या मुलांच्या तोंडून ऐकून श्री रामाला मोठें कौतुक वाटलें. यज्ञसभेमध्यें गायन चाललें असतां मोठमोठे ऋषि, राजे, व्यापारी, पुराणिक, शब्दज्ञान असलेले वयोवृद्ध द्विज, स्वरांचें ज्ञान असणारे, सामुद्रिक जाणणारे, चरणांतले ह्रस्वदीर्घादि स्वर जाणणारे, छंदःशास्त्र जाणणारे, स्वरांच्या ज्या मात्रा त्यांचे भेद जाणणारे, ज्योतिःशास्त्रामध्यें पारंगत, क्रिया व कल्पसूत्रें जाणणारे, व्यवहारांत युक्ति लढवून देण्यांत पटाईत, तर्कशास्त्रज्ञ, बहुश्रुत,

वेदवेत्ते, पुराण जाणणारे, नानाप्रकारच्या चित्रकला जाणणारे, धर्मशास्त्रानुरोधानें सदाचरण ओळखणारे, सूत्रें माहित असलेले, गायन व नृत्यकलेंत निष्णात— अशा विविध जनांनीं त्या मुलांची वाहवा केली. तें अलौकिक गोड गंधर्वगायन चाललें असतां श्रोत्यांना तृप्ति मुळींच वाटेना. वीस सर्गांपर्यंत पहिल्या दिवशीं गायन झाल्यावर, रामाच्या आज्ञेनें अठरा हजार सुवर्ण-मुद्रिका भरत त्या मुलांस देऊं लागला असतां तीं विस्मय दाखवून म्हणालीं—" रानांतलीं फलमूलें खाऊन वनांत राहणाऱ्या आह्मांला हें सोनें घेऊन काय करावयाचें आहे ? वनांत याचा काय आह्मांला उपयोग ? " असें त्यांना बोलतांना पाहून श्रीरामाला व तेथें जमलेल्या मंडळीला पराकाष्ठेचें नवल वाटून ते अगदीं थक्क झाले.

याप्रमाणें राम पुष्कळ दिवसपर्यंत मुनि, वानर, राजे व इतर लोक यांबरोबर त्या मुलांचें मनोहर गायन ऐकत असतां हे कुशलव सीतेचे मुलगे आहेत असें त्याला कळून आलें.

ज्या जनापवादाच्या भयामुळें सीतेचा त्याग करावा लागला तो घालविण्याकरितां रामानें वाल्मीकि ऋषींना असा निरोप पाठविला कीं, सीतेनें आपला शुद्धपणा सिद्ध करण्याकरितां भर सभेंत येऊन स्वतः निर्दोष असल्या-बद्दल शपथ घ्यावी. दुसरे दिवशीं वाल्मीकि मुनि लगेच सीतेला बरोबर घेऊन त्या ठिकाणीं आले. हात जोडून, डोळे पाण्यानें भरून येऊन, केवळ रामाकडे लक्ष लावून, खालीं तोंड घालून येतांना सीतेला पाहून एकच धन्यवाद जिकडे तिकडे उठून राहिला. सर्वांमध्यें ए-

रून गडबड उडाली. दुःखज्ञानेत महाशोकानें ग्रस्त झालेल्या लोकांपैकीं कांहींच्या तोंडून ' शाबास ! रामा !' तर कांहींच्या तोंडून ' शाबास ! सीते ! ' म्हणून उद्गार निघत असून, कांहीं लोक दोघांचीहि वाहवा करीत होते.

सीतेची शपथ ऐकण्याला उत्कंठित होऊन तेथें मंडळी जमली असतां अलौकिक गंधानें युक्त असा मनोहर शुद्ध वारा वाहूं लागला, व तेणेंकरून अपूर्व आनंद चोहोंकडे भरून गेला. पूर्वीं कृतयुगांत घडणाऱ्याप्रमाणें तो एकाएकीं घडलेला विलक्षण चमत्कार पाहून सर्व समुदाय थक्क झाला. लागलींच भगवें वस्त्र परिधान केलेली सीता हात जोडून, खालीं तोंड घालून म्हणाली, ' हे भूमाते, मी रामचंद्रावांचून दुसऱ्या कोणाला मनांत देखील न आणितां कायावाचामनानें जर त्यांना भजलें असेन व त्यांच्यावांचून दुसरा कोणी प्रियकर मला माहित नसेल, तर तूं मला आपल्या पोटांत घे. ' याप्रमाणें ती शपथ घेत असतां आणखी एक विलक्षण चमत्कार घडून आला. नाना अलंकार घातलेल्या अतुल पराक्रमी नागांनीं आपल्या मस्तकावर घेतलेलें एक मोठें तेजस्वी सिंहासन भूमींतून वर आलें. भूमातेनें सीतेचें स्वागतपूर्वक अभिनंदन करून हातांनीं धरून त्यांत बसविलें. याप्रमाणें त्यांत बसून तिला रसातळाकडे चाललेली पाहून, वरून तिच्यावर एकसारखी पुष्पवृष्टि झाली व गंधर्वांमध्यें तिच्या संबंधानें एकच धन्यवाद उठून राहिला. यज्ञमंडपांत जमलेले सर्व मुनि व राजे, आकाशांतले व

पृथ्वीवरील स्थावरजंगम भूतमात्र, हे सर्व विस्मय करीत राहिले. सीतेला पृथ्वीमध्यें शिरतांना पाहून क्षणभर जग वेडें बनल्यासारखें दिसत होतें.

एथें रामायणांतील मुख्य कथाभाग संपला. कथेंतील कोणते प्रसंग वाचून लोकांच्या मनास चटका लागतो हें समजण्याकरितां इतक्या गोष्टी एथें सांगितल्या आहेत. आदिकवि वाल्मीकीनीं हें काव्य हुबेहुब स्वभाववर्णनांनीं व अप्रतिम सृष्टिसौंदर्यवर्णनांनीं अजरामर करून ठेविलें आहे. पंपा सरोवराचें व आजूबाजूच्या देखाव्याचें वर्णन, किष्किंधेचें व अशोकवनिकेचें वर्णन, समुद्राचें वर्णन—हीं कितीतरी मनोहर वठलीं आहेत ! निरनिराळ्या कांडांतील सहाहि ऋतूंचीं वर्णनें मनाला फार आल्हादजनक असून तीं वाचीत असतांना आपण क्षणभर त्या त्या ऋतूचाच अनुभव घेत आहों कीं काय असें वाटतें. स्वभावोक्ति अलंकारानें काव्यवधूला नटविण्यांत वाल्मीकीचा हातखंडाच आहे. प्रतिभाशक्ति, विचारगौरव, नैसर्गिक प्रौढी, वर्णनशैली इत्यादि गुण आदिकाव्यामध्यें ओतप्रोत भरलेलेच आहेत.

मनुष्याच्या अन्तःकरणांत संचार करणाऱ्या विरुद्ध वृत्ति, मानवी आयुष्यांत घडणाऱ्या अद्भुत गोष्टी, उदात्त दृष्टीनें होणारें सर्व प्रसंगांचें परीक्षण या व अशा चमत्कारांवरून रामायण हें अति उत्कृष्ट काव्य होऊन बसलें आहे. आपला जन्म ऐहिक सुखोपभोगासाठीं नसून दुःखांत व नानाप्रकारच्या विपत्तींमध्यें आपलें कर्तव्य बजावून लोकांपुढें उदात्त व मनोरम उदाहरण ठेवून आपली जीवनयात्रा संपवावी—ही आयुष्याच्या

कर्तव्याची दिशा राम व सीता यांच्या अद्भुत चरित्रावरून उघड होते. लक्ष्मणाचें बंधुप्रेम व भरताची रामावरील भक्ति हीं तर अपूर्वच आहेत. पित्राज्ञापालन, सत्यवादित्व, एकपत्नीव्रत, आणि प्रजावात्सल्य—या थोर गुणांनीं श्रीराम हजारों वर्षेपर्यंत अखिल भारतीय लोकांच्या अन्तःकरणांत बिंबून राहिला आहे, व त्याच्या नामोच्चारणानें ज्याचें हृदय आनंदभरित होत नाहीं असा आर्यबांधव सांपडणें कठिण आहे. अनेक प्रसंगीं पातिव्रत्य ढळूं न देतां पतीच्या इच्छेसाठीं प्राणाकडे सुद्धां न पहाणारी व संकटांना हार न जातां गरोदरपणीं अरण्यांत त्याग केला असतांहि ' जन्मोजन्मीं रामचंद्रासारखा पति मिळण्यासाठीं मी काय करणार नाहीं ? ' असे उद्गार काढणारी महासाध्वी संपूर्ण भरतखंडनिवासी जनांच्या हृदयांत कायमची वस्ती करून राहिली आहे यांत काय आश्चर्य आहे ? जगन्माता सीतेपेक्षां अधिक उदार, मनोहर, व पवित्र स्त्री जातीची कल्पनाच आर्यलोकांत नाहीं. प्रत्येक आर्यमाता आपल्या मुलीस सीतेचेंच अनुकरण करावयास सांगते.

भरतखंडांत शेंकडो लोक रामायणाचे एक दोन तरी अध्यायांचा नित्य पाठ करणारे आहेत. हे लोक रामायणास वेदाप्रमाणेंच धर्मग्रंथ समजतात व श्रीरामास साक्षात् विष्णूचाच अवतार मानितात. पित्राज्ञापालन, अरण्यवास, सेतुबंध, रावणवध, लंकेंतून सीतेचें पुनरागमन, प्रजेच्या व सर्व जगाच्या कल्याणाकरितां स्वार्थत्याग, पत्नीवियोग—ह्या व इतर अनंत गोष्टी अवतारकृत्याचीच साक्ष देतात. अशा महात्म्यांचीं चरित्रें दिग-

वच्छिन्न किंवा कालावच्छिन्न मुळींच होऊं शकत नाहींत. सर्व भरतखंडांत सर्व कालीं सीतारामाचें भजन-पूजन चाललेलें असतें; अनंत युगींचे खडक बुडत्यास हात देतात, तद्वत् भवसमुद्रांतून तरावयास रामसीतारूप नौका सर्व देशांत सर्वकाल तयार आहेत.

वाल्मीकीनें नारदाला विचारिलें कीं—

कोन्वस्मिन्सांप्रतं लोके गुणवान्कश्च वीर्यवान् ॥

म्हणजे, सांप्रत काळीं पृथ्वीवर अत्यंत गुणवान् व शक्तिमान् कोण आहे? ह्या प्रश्नाचें उत्तर नारदानीं पुढील रीतीनें दिलें—

इक्ष्वाकुवंशप्रभवो रामो नाम जनैः श्रुतः ॥

म्हणजे, इक्ष्वाकु कुलांत जन्मास आलेला श्रीरामचंद्र या नांवानें सर्व लोकांत प्रसिद्ध असून अत्यंत गुणवान् आणि शक्तिमान् आहे. अशा प्रकारानें रामाची ख्याति असून त्याच्याविषयीं व पतिव्रता स्त्रियांमध्यें अग्रगण्य जी सीतादेवी तिच्याविषयीं—ऐकूं देखील नये असा जनापवाद प्रसार व्हावा, तेव्हां अन्य पामराची कथा काय? विद्यारण्यकृत जीवन्मुक्तिविवेक नामक ग्रंथांत या गोष्टीची उपपत्ति येणेंप्रमाणें केली आहे:—सर्व लोकांनी आपली नेहमीं स्तुतिच करावी व निंदा कधींहि करूं नये अशी इच्छा करणें ही मलिन वासना होय, तेव्हां अशी मलिन वासना तृप्त करण्यास जो झटतो, त्यास तसेंच फल मिळणें साहजिक आहे. कारण, लोक बहुमुखी असल्यामुळें त्यांच्या तोंडास हात लावण्यास कोण समर्थ आहे? ही गोष्ट सामान्य मनुष्याची झाली. प्रजारंजन अथवा लोकसं-

तोष हें तर श्रीरामाचें व्रतच होतें, म्हणून मलिन वासनेचीच शान्ति केली असा आविर्भाव दाखवून अवतारकृत्याची समाप्ति करणें श्रीरामास अवश्य होतें.

आदिकवि वाल्मीकीनें आपलें रामायण हुबेहुब स्वभाववर्णनांनीं व अप्रतिम सृष्टिसौंदर्यवर्णनांनीं अजरामर करून ठेविलें आहे. त्याप्रमाणेंच, महाभारत हा नानाविध दिव्य रत्नांचा महोदधि असून अनेक राजांसंबंधानें घडलेला हा इतिहास भगवान् व्यासानीं रचून त्याची उपयुक्तता वाढविण्यासाठीं त्यांत निरनिराळ्या प्रसंगांनीं निरनिराळे विषय आणून, चारी वेद यांत ओतून हा पांचवा वेदच निर्माण केला आहे. व्यासानीं आपल्या ग्रंथाचें जें वर्णन ब्रह्मदेवाजवळ केलें आहे, तें फारच समर्पक आहे. व्यास म्हणाले "भगवन् ब्रह्मदेवा, मीं अत्यन्त श्रेष्ठ असें काव्य रचिलें असून त्यांत अनेक विषयांचें प्रतिपादन केलें आहे. वेदांचें रहस्य, त्यांतील इतर विस्तार, सांगोपांग उपनिषदें, इतिहास, पुराणें, कालाची त्रिविध स्थिति, धर्माधर्मविचार, आश्रमांचीं लक्षणें, चातुर्वर्ण्य, तपश्चर्या व ब्रह्मचर्य यांचें यथास्थित विवेचन, पुराणांतील कथानिर्देश, पृथ्वी व युगें, चंद्र व सूर्य, ग्रह व नक्षत्रें आणि इतर तारका यांचें प्रमाण, ब्रह्मज्ञान, न्याय, शिक्षा, चिकित्सा, दान, पाशुपतमाहात्म्य, पुण्यतीर्थें, पवित्र देश, नद्या, पर्वत, वनें व समुद्र, महान् महान् नगरें, धनुर्वेदान्तर्गत शस्त्रास्त्रविचार, लोकाचाराचें निरूपण करणारें नीतिशास्त्र, आणि सर्वव्यापक परब्रह्म या सर्वांचें मीं आपल्या काव्यांत प्रतिपादन केलें आहे."

महाभारताच्या मूळ कथाभागांत जे दोन पक्ष दाखविले आहेत, त्यांपैकीं एका पक्षांत महाधनुर्धर, अत्यन्त बलाढ्य, जितेंद्रिय, व स्वार्थत्यागी असे पुरुष असून त्यांचा सहाय वृंदावनींचा राणा भगवान् श्रीकृष्ण झाला होता. विरुद्ध पक्षांत अत्यन्त नीच, स्वार्थसाधु, लोभी, दुष्ट व घातकी असे पुरुष असून ते बलिष्टहि होते. कौरव व पांडव या दोन भावाभावांच्या कुलांमध्यें लहानपणापासूनच द्वेष माजत चालला होता. पांडवांचा वडीलपणामुळें राज्यावर हक्क होता, तथापि दुर्योधनानें त्यांस राज्यावरून मुकविण्याचे अनेक प्रयत्न केले, व त्या सर्वांचा शेवट घोर युद्धामध्यें होऊन त्यांत कौरवांचा समूळ नाश झाला. अंध धृतराष्ट्राच्या हातांत कांहीं कालपर्यंत संपूर्ण सत्ता गेल्यामुळें दुष्ट पुत्रांच्या प्रोत्साहनानें त्यानें अन्यायाचा मार्ग स्वीकारिला होता.

महाभारतांत व्यासानीं मानवी आयुष्यांत घडणाऱ्या ठळक व्यावहारिक गोष्टींचेंच वर्णन केलें आहे. राज्यपदाकांक्षी बंधूंचा बाळपणापासून वृत्तांत दिला आहे. परस्परांमध्यें असणारा लहानपणींचा द्वेष वाढत जाऊन त्याचा प्रचंड वृक्ष कसा झाला इकडे वाचकांचें लक्ष वेधून जातें. भारतीय युद्धाचें आदिकरण पाहूं गेलें असतां मयसभेंत झालेली दुर्योधनाची फजिती आणि राजसूय यज्ञाचे वेळीं लोकोत्तर पांडववैभवदर्शनानें त्याच्या अंतःकरणांत उत्पन्न झालेला द्वेष व मत्सर हीं होत. राजसूय यज्ञाचे वेळीं अनेक राजांनीं खंडणी म्हणून नजरनजराण्यांच्या रूपानें आणलेलें द्रव्य व रत्नें मोजून घेण्याच्या कामावर दुर्योधनाची योजना अस-

त्यामुळें पांडवांकरितां आणिलेलें उत्तमोत्तम द्रव्य पाहून त्याची छाती दडपून गेली आणि त्याचें देहभान जाग्यावर राहिलें नाहीं. तें युधिष्ठिराचें अनुपमेय ऐश्वर्य अवलोकन केल्यापासून दुर्योधनाच्या अन्तःकरणांत पराकाष्ठेचा संताप होऊन त्याच्या वेदना असह्य झाल्या. अशा वेळीं, शेक्स्पीअर कवीच्या ऑथेल्लो नामक नाटकांतील यागोप्रमाणें भारतांतील केवळ कपटाची मूर्ति असे जे शकुनि मामा त्यांचें त्यास साहाय्य मिळालें. पांडवांची संपत्ति हरण करण्यासाठीं व त्यांचा संपूर्ण नाश करण्याकरितां मामानीं अजब युक्तीची योजना केली. कोणत्याहि जडजोखमांत न पडतां, युद्धामध्यें तोंडाला तोंड न देतां अथवा अंगाला एक जखम सुद्धां करून न घेतां, पांडवांचा समूळ घात करण्याची ही युक्ति होती. ही युक्ति म्हणजे अक्षविद्या होय. अक्षविद्येंत मामांचें नैपुण्य अप्रतिम होतें, याकरितां अजातशत्रु जो धर्मराज त्यास द्यूतक्रीडेसाठीं दुर्योधनाचें प्रिय करण्याकरितां धृतराष्ट्रानें आव्हान केलें. तेव्हां व्यासानीं पूर्वीच भविष्यकथन केल्याप्रमाणें, द्यूताची अनर्थाकडे व कलह उत्पन्न करण्याकडे प्रवृत्ति सर्वदा असते हें तत्त्व ठाऊक असून देखील, सर्व बंधु, सेवक, व द्रौपदी आदिकरून सर्व स्त्रिया बरोबर घेऊन, धर्मराज द्यूत खेळण्यास निघाले. जगाचा नियमच असा आहे कीं, वीज चमकली म्हणजे डोळे दिपून जाऊन ज्याप्रमाणें झापड पडत, त्याप्रमाणें मनुष्य दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडला म्हणजे त्याची बुद्धि कुंठित होऊन तोहि पाशांत बद्ध केल्याप्रमाणें दुर्दैवा-

च्या अधीन होतो. जें आपल्याला कळत नाहीं तें दैव असून त्याचे परिणाम कोणासहि टाळतां येत नाहींत. परिणाम घडेपर्यंत जें आपल्या दृष्टीआड असतें अशा दैवाशीं झगडण्यास कोण समर्थ आहे? सुख, दुःख, भय, राग, लाभ, हानि, जन्म, मोक्ष यांसंबंधी ज्या कांहीं अतर्क्य गोष्टी घडतात त्याला दैव हेंच मूळ कारण आहे. हातीं घेतलेल्या कामाला अडथळे येणें किंवा अकल्पित गोष्टींचा उद्भव होणें हा सर्व दैवाचा खेळ आहे.

द्यूतास आव्हान केलें असतां माघार घ्यावयाची नाहीं हें युधिष्ठिराचें व्रत असल्यामुळें, सभास्थानीं बसल्यानंतर त्यानें शकुनि मामास प्रथम असें सांगितलें कीं, पापाला कारणभूत असलेलें द्यूत म्हणजे निवळ वंचना होय, त्यांत कांहीं क्षात्रपराक्रम नाहीं किंवा खरी नीतिहि नाहीं. द्यूत खेळणाऱ्या लोकांना कोणी मान देत नाहीं किंवा चांगलेंहि म्हणत नाहीं. तेव्हां नीचाप्रमाणें आडमार्गांत शिरून भल्या माणसास जिंकण्याची इच्छा कधींहि करूं नये. यावर कुटिलनीतिज्ञ मामानें उत्तर दिलें कीं, द्यूत खेळण्याचें ज्याला ज्ञान आहे तोच द्यूत खेळण्यास समर्थ होतो; द्यूत हें पातकास मुळींच कारण नाहीं. कारण, पण जिंकणें किंवा हुकणें हें सर्वस्वीं फांशावर अवलंबून आहे; तो पण अर्थात् कोणाच्या तरी पराभवास कारण होणारच, म्हणून द्यूतामध्यें जो दोष होतो तो फाशांच्या आधीन असलेल्या पणामुळें होतो व त्या दोषाचा खेळणाराकडे कांहींएक संबंध पोहोंचत नाहीं. यावर सत्यवादी युधिष्ठिरानें फिरून बजावलें कीं, कपटानें द्यूत खेळणें हें पातक होय, व ज-

याकरितां द्यूताचें अवलंबन करणें अयुक्त आहे. कपटानें सुख किंवा द्रव्य मिळविणाऱ्या द्यूतकारांचें वर्तन अत्यंत निंद्य मानिलें जातें. यावरहि कपटपटु मामानें उत्तर दिलें कीं, विजयाची इच्छा ही जर नीच मानिली तर विद्वान् विद्वानाला जिंकतो तोहि नीचकर्मानेंच जिंकतो असें म्हटलें पाहिजे. परंतु वादामध्यें पराजय करण्याच्या कृतीला कोणी कपट किंवा नीचकर्म म्हणत नाहींत; ज्या कपटाचें अवलंबन करून अक्षविद्यानिपुण पुरुष द्यूतामध्यें निपुण नसलेल्या पुरुषाला जिंकतो, त्याच कपटानें विद्वान् अविद्वानांचा पराभव करितो; त्या विद्वानाच्या कृतीला जर कपट म्हणत नाहींत, तर द्यूतकाराच्या कृतीला तरी कपट काय म्हणून म्हणावें ?

एणेंप्रमाणें वादविवाद झाल्यानंतर, भगवान् व्यासानीं भविष्य कथन केल्याप्रमाणें दैव हें बलवत्तर असून आपण सध्यां त्याच्याच तावडींत सांपडलों आहों असें जाणून धर्मराजानें द्यूतास आरंभ केला. सुवर्णानें भरलेल्या पेट्या, रत्नें, घोडे, हत्ती, दास, दासी, राज्य वगैरे सर्व संपत्ति ईर्ष्येला चढून धर्मराजानें हारविली. कपटविद्येमध्यें प्रवीण झालेल्या शकुनीनें पणास लाविलेल्या सर्व वस्तु एकामागून एक जिंकून घेतल्या. द्यूताचा अंमल चढल्यामुळें शेवटीं युधिष्ठिर आपणासकट सर्व बंधूंस व द्रौपदीस पणास लावून गमावून बसला. पुढें दुःशासनानें भर सभेंत द्रौपदीची विटंबना केली. तेणेंकरून कौरवपांडवांमधील द्वेषरूपी विषवृक्षाला चांगलाच अंकुर फुटला. पांडवांचें सर्वस्व हरण करूनहि दुष्ट दुर्योधनाची तृप्ति झाली नाहीं. त्यानें सत्यवचनी

युधिष्ठिरास फिरून बोलाविलें आणि जो हरेल त्यानें बारा वर्षे वनवासांत राहून एक वर्ष अज्ञातवास करावा असा पण लाविला. हा पण लाविल्याबरोबर सभेमध्यें हाहाःकार उडाला. नानाप्रकारचे लोकापवाद कानांवर पडत असतां, मी गेलों नाहीं तर लोक मला काय म्हणतील याची लाज बाळगून धर्मराज फिरून द्यूतास प्रवृत्त झाला. सोन्याचा मृग कधीं कोणीं ऐकिलाहि नाहीं व पाहिलाहि नाहीं, असें असतांहि रामाला त्याचा लोभ उत्पन्न झाला. ह्यावरून विनाशकाल आला असतां पुरुषाच्या बुद्धीला विपर्यास पडतो. शिवाय वनवासांतहि सत्समागम, तीर्थाटन वगैरे धर्मच होण्याचा संभव आहे असें मनांत आणून व कौरवांचा विनाशकाल जवळ आला आहे असें मनांत म्हणत म्हणत युधिष्ठिर फाशांनीं खेळूं लागला. या द्यूतामध्येंहि पूर्वीप्रमाणेंच शकुनिमामांचा जय झाला.

तदनंतर पराजित झालेले पांडव व द्रौपदी मृगाजिनें कमरेला गुंडाळून वनवासास निघालीं ते वेळीं प्रजाजन शोकानें अत्यंत पीडित होऊन दीनवाण्या स्वरानें भयंकर आक्रोश करूं लागले. अरण्यामध्येंहि कांहीं साग्निक व कांहीं निरग्निक ब्राह्मण आपले शिष्यगण व बांधव यांसह प्रेमानें त्यांचे पाठोपाठ आले व वेदवचनास महत्त्व येईल अशा प्रकारचें संभाषण करून धर्मराजाचें मनोरंजन करूं लागले. एथपासून पुढील सर्व काव्यांत धर्मनिष्ठेशिवाय कांहींएक गोचर होत नाहीं. पांडवांचा वनवास म्हणजे तपश्चर्या, दिव्य सामर्थ्य, धर्मानुष्ठान इत्यादि आध्यात्मिक ज्ञानाचा

सागरच होऊन गेला होता. काम्यक, द्वैतवन, हिमालय, कैलास, बदरीकाश्रम, कुरुक्षेत्र, गंधमादन ह्या अत्यंत पवित्रस्थानांमध्यें त्यांनीं संचार केला. धौम्य, शौनक, व्यास, पुलस्त्य, मार्कंडेय—वगैरे हे मुनि पांडवांची भेट घेऊन त्यांस नानाप्रकारचे उपासनामार्ग शिकवीत, व प्राचीन काळचीं अनेक कथानकें सांगून रिझवीत असत. अजगर व यक्ष यांशीं झालेल्या युधिष्ठिराच्या संवादांत धर्मज्ञान व नीति यांचा अपूर्व संग्रह दृष्टीस पडतो.

व्यासांच्या अनुज्ञेनें दिव्यास्त्रप्राप्तीसाठीं अर्जुनानें जें साहस केलें तें खरोखर आश्चर्यकारक होय. हिमालयाच्या पृष्ठभागीं राहून प्रथम अर्जुनानें उग्र तपश्चर्या केली व श्रीशंकरास युद्धामध्यें संतुष्ट करून त्यापासून पाशुपतास्त्राची सिद्धि संपादन केली. इंद्राच्या मंदिरांत राहून उपसंहारासहवर्तमान महाध्वनियुक्त दिव्य अस्त्रांची प्राप्ति करून, चित्रसेन गंधर्वापाशीं गायन, वादन व नृत्य या कलांचाहि अर्जुनानें अभ्यास केला. या सर्व विद्यांचा अभ्यास करीत असतां अर्जुनाचें ब्रह्मचर्यव्रत अढळ होतें. एकदां त्यास एकान्तांत गांठून उर्वशी म्हणाली, हे निष्पापा शत्रुदमना, तुझ्या गुणांच्या योगानें अन्तःकरण आकृष्ट झाल्यामुळें मी मदनाच्या अधीन होऊन गेलें आहें. हे वीरा, तुझी सेवा करावी असा माझा फार दिवसांचा हेतु आहे. तेव्हां अर्जुनानें उत्तर दिलें:—" सुंदरी, तूं मला सांगतेस म्हणून मीं आपलें शास्त्राध्ययन मलिन करून टाकूं कीं काय? हे सुमुखी! तूं मला खास गुरुस्त्रीसारखी आहेस, मजविषयीं तूं भलत्याच प्रकारची कल्पना करूं

नको. हे सुंदरी! मी तुझ्या पायांवर मस्तक ठेवितों, तूं मला मातेप्रमाणें पूज्य आहेस. " हें अर्जुनाचें भाषण श्रवण करून उर्वशीचें देहभान नाहींसें झालें! तिनें भिवया चढविल्या आणि अर्जुनास शाप दिला. हा शाप व चित्रसेनाशीं केलेला नर्तनाचा अभ्यास अज्ञातवासामध्यें अर्जुनास सर्वस्वीं उपयोगीं पडला.

तैत्तिरीय संहिताभाष्यांत सायणाचार्यांनीं असें म्हटलें आहे कीं, उपनयनविधि ज्यांचा झालेला असतो त्यांसच वेदाध्ययनाचा अधिकार पोहोंचतो आणि म्हणूनच भगवान् व्यासानीं महाभारत रचिलें.

> स्त्रीशूद्रद्विजबंधूनां त्रयी न श्रुतिगोचरा ॥
> इति भारतमाख्यानं कृपया मुनिना कृतं ॥ १

—धर्मसिंधु

याचा अर्थ असा कीं—स्त्रिया, शूद्र लोक आणि पतित ब्राह्मण यांस वेदाध्ययनाचा अधिकार नाहीं, याकरितां अशा लोकांविषयीं दयालु होऊन भगवान् व्यासानीं भारत नांवाचा ग्रंथ केला. या दृष्टीनें पहातां महाभारतामध्यें वैदिक धर्माचीं तत्त्वें सर्वत्र आढळून येतात. याकरितां सनत्सुजात पर्वामध्यें वेदविद्येची जी अपूर्व माहिती सांगितली आहे ती फारच उपयुक्त असल्यामुळें पुढें देतों.

परमात्म्याचे ठिकाणीं वेदहि प्रवेश करूं शकत नाहीं. परमात्मा शब्दातीत असून सर्व शब्दांचें कारण आहे. वेद शब्दाची देखील व्युत्पत्ति या परमात्म्यापासूनच झाली. समुद्रावर तरंग उठावा तसा वेद शब्द त्या ज्ञानोदधीचे ठिकाणीं उठला. आतां मन, वाणी, अन्यें-

द्रिय या कोणाचाच जर रिघाव परमात्मरूपाचे ठिकाणीं होत नाहीं, तर मग याची ओळख पटते कशी? याचा थांग लागतो कसा? अशा शंकेचें समाधान असें आहे कीं, परमात्मा ज्ञानमय असून केवळ प्रकाशमयत्वानें प्रतीयमान होतो, असा सिद्ध पुरुषांचा अनुभव आहे.

वेदविद्येचे अधिकारी कोण होतात याविषयीं मागील प्रकरणांत पुढील वचन दिलें आहे:—

विद्या ह वै ब्राह्मणमाजगाम ।
गोपाय मा शेवधिष्टेऽहमस्मि ।
असूयकायानृजवेऽयताय ।
न मा ब्रूया वीर्यवती तथा स्याम् ॥

या वचनांत असें सांगितलें आहे कीं, स्नानसंध्यादि धर्माचरण जो करीत नाहीं त्याला वेदविद्येचा मुळींच अधिकार नाहीं. तीनहि वेद जरी कोणी पढला, परंतु त्याचें आचरण धड नाहीं, तर तें नुसतें अध्ययन पापापासून त्याचा बचाव करीत नाहीं पुरुष जर मनाचा खोटा आहे आणि धर्माचें आचरण केवळ कपटानें व दांभिकपणें करितो, तर त्याच्या देहांत वेद वास करीत असले तरी त्याचें तारण करूं शकत नाहींत. त्याचा मरणकाल जवळ आला म्हणजे, पंख फुटलेले पक्षी आपलें घरटें सोडून जसे दूर उडून जावे, तसे सर्व वेद त्या मायिक पुरुषाला सोडून जातात, व त्याचें कांहीं-एक कल्याण करीत नाहींत.

निषिद्धाचरण किंवा पापाचरण करणाराला वेदपठण पापापासून तारीत नाहीं हें जरी खरें आहे, तरी तेवढ्यानें वेदाभ्यास निरर्थक आहे किंवा वेदाची योग्यता

सामान्य आहे असें मात्र समजणें चुकीचें आहे. वेदांची योग्यता खरोखरच अनन्यसाधारण व अलौकिक आहे. कारण वेद म्हणजे परमात्मस्वरूपाचें ज्ञान करून देणारें अति उत्कृष्ट साधन आहे. स्वर्गादिकांहून इतर जो मोक्ष नामक पुरुषार्थ तेंच वेदांचें खरें प्रमेय होय. वेदांत कर्ममार्ग व उपासना यांचें निरूपण केलें आहे खरें, पण त्याचा हेतु तरी काम्यकर्माला प्रोत्साहन किंवा प्राधान्य देण्याचा नव्हे. मोक्षसिद्धीला हेतुभूत जें ज्ञान तें प्राप्त होण्याची पात्रता चित्तशुद्धि आल्यावांचून पुरुषाचे ठिकाणीं येणें शक्य नाहीं; आणि ही चित्तशुद्धि निष्कामकर्म व उपासना यांच्या बलावांचून होत नाहीं, असें असल्यामुळें वेदांना कर्म व उपासना या मार्गांचें कथन करावें लागलें. परंतु तेवढ्यावरून वेदांचें कर्मपरत्व किंवा उपासनापरत्व न समजतां अव्यभिचारि मोक्षपरत्वच सिद्ध आहे. कारण, कर्म व उपासना हीं मोक्षहेतुभूत ज्ञानाचीं साधनें या दृष्टीनें वेदांनीं त्यांचा आदर केला आहे. स्वर्गादिकांचें जरी श्रुतींत वर्णन आहे तरी स्वर्गादि लोक परमपुरुषार्थ नाहींत, ते आनंदशून्य आहेत असें स्पष्ट सांगितलें आहे; व आत्मवेत्त्याला मोक्षप्राप्ति होते आणि आत्मज्ञानशून्याला आत्मविनाश व अनर्थप्राप्ति होतात म्हणून स्पष्ट सांगितलें आहे. अर्थात् वेदांचा कटाक्ष आत्मज्ञान करून देण्याकडेच आहे. सारांश, मोक्षरूप परमपुरुषार्थाची प्राप्ति व संसाररूप अनर्थाची निवृत्ति करून देणारे वेदच आहेत.

दुसरी गोष्ट अशी कीं, वेदांत अध्यारोप व अपवाद

या दोन युक्तींनीं परमात्मस्वरूपाचेंच वर्णन आहे. परमेश्वराच्याच मायाकल्पित नामादि विशेष रूपांनीं हें विश्व भासमान होत आहे. हें मूर्तामूर्त जगत् परमात्म्याचेंच स्वरूप आहे. आकाशापासून पृथ्वीपर्यंत हें पंचतत्त्वात्मक विश्व त्याचेंच कार्यरूप आहे. इत्यादि श्रुतींनीं अध्यारोप प्रसंगीं विश्वाचें ब्रह्मत्व प्रतिपादित करून, मग अपवादप्रसंगीं ' नेति नेति ' इत्यादि वाक्यांनीं परमात्म्याचें विश्वाहून वैलक्षण्य कथन करून त्याच्या खऱ्या खऱ्या स्वरूपाची ओळख करून दिली आहे; व वेदांनीं हें जें आत्मस्वरूपाचें वैलक्षण्य सांगितलें आहे, तें अनुभवसिद्ध आहे असें महानुभाव मुनींचेंहि म्हणणें आहे. सारांश, असले वेद अनादरास कधींहि पात्र नव्हत, हें उघड आहे. त्यांचें पठण करणारे त्यांचा यथार्थ उपयोग करून घेत नाहींत, हा वेदांचा दोष किंवा कमीपणा नव्हे.

वेदांमध्यें कृच्छ्र चांद्रायणादि तपें व ज्योतिष्टोमादि याग यांचें वर्णन केलें आहे, त्याचा तरी हेतु हाच कीं, हीं कर्में ईश्वरार्पण करून तद्द्वारा पुण्य संपादावें, व ह्या पुण्यबलानें पापक्षय होऊन पुरुष प्रकाशमय ब्रह्मरूपाला जावा; म्हणजे पुरुषाला संसाराचे घोटाळ्यांत घालण्याचा वेदांचा उद्देश नसून मोक्षप्राप्ति करून देण्याचाच आहे. परंतु, पुष्कळ लोक या साधनांचा दुरुपयोग करितात. केवळ ईश्वरार्पणबुद्धीनें विहितकर्मांचा अवलंब न करितां, इंद्रियभोग्य फलाकांक्षेनें ते त्यांचें अनुष्ठान करितात. मग अर्थात् वासना तशीं फळें या लौकिकी न्यायाप्रमाणेंच ते यज्ञादि कर्म बरोबर घेऊन स्वर्गादि-

कांचे ठिकाणीं इंद्रियोपभोग भोगून पुनरपि अवशिष्ट कर्मबलानें संसारांत येऊन पडतात, ही गोष्ट खरी आहे. पण हा दोष त्या साधनांचा किंवा साधनें सांगणारांचा नव्हे. अर्थात्, हा वेदांचा दोष नसून उपयोगकर्त्यांचा आहे.

अशा रीतीनें वेदाविद्येचें रहस्य महाभारतांत सर्वत्र आढळून येत असल्यामुळें त्यास पांचवा वेद म्हणण्याचा सांप्रदाय आहे. वनपर्व, उद्योगपर्व आणि शांतिपर्व यांमध्यें तर अध्यात्मज्ञान ओतप्रोत भरलेलें सांपडतें. शिवाय भगवद्गीता, सावित्रीचें आख्यान, सुलभासंवाद वगैरे अनंत उपयुक्त व मोक्षोपयोगी प्रकरणें आढळतात. यावरून महाभारतांत नाहीं तें जगांत नाहीं असेंहि म्हणण्याची चाल आहे.

सर्व भरतखंडांतील शहरांत व खेड्यापाड्यांत महाभारताचा गंधहि नाहीं असा मनुष्य क्वचितच आढळेल. यांतील कथानकांचीं व आख्यानांचीं नाटकें, ललितें इत्यादि रूपांनीं अनेक प्रयोग होत असून ते पहाण्याला प्रेक्षकांचे थवेच्या थवे जमत असतात. अनेक देवळांतून त्यांचें पठण चालू असतें आणि लक्षावधि स्त्रीपुरुषांच्या हृदयांत त्यांतील कथाभाग सतत जागृत असतो. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात कीं, सूर्यतेजानें जसें जग देदीप्यमान दिसतें, तसें महाभारत व्यासबुद्धीनें प्रकाशित झालेलें आहे. सोन्याच्या लगडी अलंकाररूपानें तयार झाल्या म्हणजे शोभा देतात, त्याप्रमाणें व्यासवाणीनें प्रकाशित व्हावें अशी ईर्ष्या धरून सर्व कथानकांनीं महाभारताचा आश्रय केला आहे. यामुळेंच सर्व जगत् व्यासोच्छिष्ट मानिलें आहे.

रामायण व महाभारत या आर्ष महाकाव्यांचा भरतखंडांत इतका सार्वत्रिक प्रचार आहे कीं, गुहांमध्यें, देवळांत, घरांतील किंवा देवळांतील किंवा झोंपडींतील भिंतींवर, तांब्याच्या किंवा पितळेच्या भांड्यांवर, जिकडे पाहिजे तिकडे या दोन ग्रंथांतील गोष्टींचीं चित्रें काढलेलीं दृष्टीस पडतात. घरांतील वडील बायका संध्याकाळीं मुलांस रामायणमहाभारतांतील गोष्टी सांगतात व मुली सावित्रीची, सीतेची किंवा इतर साध्वीची कथा ऐकतात व अशा साध्वींच्या जन्मदिवशीं उपोषणें करितात. वृद्धलोक मुलांशीं किंवा तरुणांशीं संभाषणें करितांना वसिष्ठ, भीष्म, विदुर, मैत्रेय वगैरे महात्म्यांचीं वचनें म्हणून दाखवितात.

कौरवपांडवांच्या इतिहासप्रसिद्ध युद्धसंबंधी कथा, आख्यानें, उपाख्यानें मिळून मूळचें व्यासकृत भारत पुढें महाभारत झालें. अयोध्याधिपति दशरथाच्या पुत्रांची हकीकत रामायणांत सांगितली आहे. महाभारतांतील पात्रें तेजस्वी असून पराक्रमी पुरुषांचे गुणदोष त्यांमध्यें नजरेस येतात; रामायणांतील पात्रें सत्यप्रियता, एकपत्नीत्व, बंधुप्रेम, पातिव्रत्य इत्यादि गुणांनीं मंडित आहेत. महाभारतांत कवीनें युद्धाचें वर्णन सुरस काव्यांत केलें आहे, रामायणांत कवीनें आर्यलोकांस प्रिय असें स्त्रीपुरुषांचें व कुटुंबांतील मनुष्यांचें प्रेम वर्णिलें आहे. महाभारतांत खऱ्या वीरांचें वर्णन आहे, रामायणांत नित्य व्यवहारांतील सात्त्विक वृत्तींचा परिपोष वर्णिला आहे. दोन्हीं काव्यांतील कांहीं प्रसंगांचीं उदाहरणें देऊन हे भेद स्पष्ट करूं. द्रौपदीच्या स्वयं-

वरांत धनुर्धरांचें शौर्यपरीक्षण होऊन पुढें झालेल्या विवाहसमारंभाशीं तोलून पाहतां राम व सीता यांचे विवाहाची हकीकत अगदीं साधी दिसते. भीम व दुर्योधन, कर्ण व अर्जुन यांचा बालपणापासून वाढलेला द्वेष व मत्सर यांच्या मानानें रामरावणांमधील किंवा लक्ष्मण व इंद्रजित यांमधील वैर अगदीं कमी प्रतीचें वाटतें. द्रौपदीची भर सभेंत विटंबना झाली असतां तिनें केलेली पतींची निर्भत्सना वाचून पाहतां, रावणानें जेव्हां सीतेस उचलून नेलें तेवेळचें तिचें भाषण फार सौम्य दिसतें. युद्धास आरंभ होण्यापूर्वी युधिष्ठिरानें जें मंत्रिमंडळ जमा केलें होतें त्यामधील जोरदार भाषणें पहातां, रावणानें युद्धापूर्वी भरविलेल्या सभेंतील भाषणें पोकळ वाटतात. धृतराष्ट्रापुढें केलेली कृष्णशिष्टाई आणि ' सुईच्या अग्राइतकी देखील जमीन देणार नाहीं ' हें दुर्योधनाचें निर्वाणीचें उत्तर—यांमध्यें जी तेजस्विता दिसते, त्या मानानें रावणाच्या सभेंत युद्ध न करण्याबद्दल बिभीषणानें केलेली विनंति आणि रावणाचें तिरस्कारयुक्त उत्तर हीं अगदीं मंद वाटतात. अनेक वीरांनीं मिळून केलेला अभिमन्युवध, अर्जुनाची प्रतिज्ञा, कर्णार्जुनांचें किंवा भीमदुर्योधनांचें युद्ध—हे प्रसंग इतके हृदयद्रावक व अंतःकरणास घरें पाडणारे आहेत कीं, त्यांच्या तोडीचे रामायणांत मुळींच नाहींत असें म्हटलें असतां चालेल. रामायणाचा सर्व झोंक शांतीचा व धर्मनिष्ठेचा असून महाभारताचा शौर्याचा व तेजस्वितेचा आहे. महाभारतामध्यें सर्वत्र वीर्य व तेज यांचाच प्रादुर्भाव नजरेस येतो. रामायणांत सात्त्विक व गूढ वृत्तींचा वि-

कास आढळतो आणि याच वृत्ति नित्य व्यवहारांत असून यांनींच सर्व जग व्यापून टाकिलें आहे.

हीं दोन्ही आर्ष महाकाव्यें आर्यलोकांना कां प्रिय झालीं आहेत व सर्वांवर त्यांची इतकी छाप कां बसली आहे, हें आतां वाचकांच्या लक्षांत पूर्णपणें आलेंच असेल. कोणताहि प्रतिभाविशिष्ट ग्रंथ चिरकाल लोकांच्या निष्ठेस पात्र होण्यास त्यामध्यें अविनाशी सत्याचा छाप असून आनंद व चमत्कृति उत्पन्न होतील अशा रीतीनें मानवी मनोवृत्तींचें, जीवितकर्तव्यांचें व धर्मनिष्ठेचें खरें स्वरूप वर्णिलेलें असलें पाहिजे. महाभारतांत भरतखंडांतील प्राचीन राजकारणविषयांचें स्वरूप दर्शविलें आहे, म्हणून त्यामध्यें शौर्य, महत्त्वाकांक्षा, उदात्त वीरवर्तन हीं दृष्टीस पडतात. रामायणांत प्राचीन काळचें प्रापंचिक व धार्मिक चरित्र वर्णिलें आहे, म्हणून त्यामध्यें तितिक्षा, बंधुप्रीति, पातिव्रत्य हीं नजरेस येतात. तेव्हां हीं महाकाव्यें भिन्न भिन्न कार्य करीत असून दोन्ही मिळून प्राचीन आर्यांची खरी राजकीय, प्रापंचिक, व धार्मिक स्थिति दर्शवितात.

---

# प्रकरण तिसरें

## अमरत्व

ज्ञानामृतेन तृप्तस्य कृतकृत्यस्य योगिनः ॥
नैवास्ति किंचित्कर्तव्यमस्ति चेन्न स तत्त्ववित् ॥

अमरत्व किंवा अमृतत्व म्हणजे मृत्यूचा अभाव किंवा नाश होय. याकरितां अमरत्वाचा बोध होण्यास मृत्यु

म्हणजे काय हें समजणें अवश्य आहे. मृत्यु म्हणजे प्राणिमात्राचा नाश अशी जी सर्वसाधारण कल्पना आहे ती चुकीची असून, ज्या अवस्थेस मृत्यु असें म्हणण्याचा सांप्रदाय आहे ती अवस्था म्हणजे लिंगदेहाचा स्थूल देहापासून होणारा वियोग इतकेंच समजावयाचें. मृत्यु हें केवल जीवात्म्याचें एक स्थित्यन्तर होय.

आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति ।

—बृहदारण्यक

म्हणजे, आपली इच्छा तृप्त होते म्हणून सर्व पदार्थ आपणाला आवडतात—या न्यायानें मृत शरीराचा इतःपर उपयोग होण्याचा संभव नसल्यानें तदितर प्राण्यांस अत्यन्त दुःख होतें एवढ्या गोष्टीवरून मृत्यूचें अवडंबर केलेलें असतें. शिवाय, मृत मनुष्याचे कर्मानुसार हा वियोग घडत असतो, तथापि त्या स्थूल देहांत वासना पूर्ण होण्याचा संभव नाहींसा झाल्यानें त्या मनुष्यासहि अशा वियोगकालीं पराकाष्ठेचें दुःख होतें. एवंच, जीवात्म्याचा स्थूलदेहापासून जो नैसर्गिक वियोग होतो, त्यापासून केवल स्वार्थबुद्धीनें मृत मनुष्यास व इतर प्राण्यांस होणाऱ्या दुःखातिशयामुळें मृत्यूची मोठी भीति उत्पन्न होऊन ती सर्वकाल सर्व प्राण्यांमध्यें जागरूक रहाते. तेव्हां अशा प्रकारचा सर्व प्राण्यांस भयप्रद जो मृत्यु त्याचें खरें स्वरूप समजण्याचा प्रयत्न करणें अवश्य असून, मृत्यूचें भय नाहींसें करणारा म्हणजे अर्थात् अमरत्वप्राप्तीचा उपाय वेदशास्त्रांत सांगितला असल्यास तो शोधून काढणें फारच हितावह होईल यांत शंका नाहीं.

प्राण्यास मरण आल्यानंतर जी अवस्था प्राप्त होते तीस अनुलक्षून श्रुतींत "सांपराय" (Here after) अशी संज्ञा योजिली आहे. वेदभाष्यांत सांपराय शब्दाची व्युत्पत्ति एणेंप्रमाणें आढळते:—

सम्यक् परे काले देहपतनादूर्ध्वं ईयते गम्यते
इति संपरायः परलोकः तत्प्राप्तिप्रयोजनः
साधनविशेषः सांपरायः।

याचा अर्थ असा कीं—देहपतन झाल्यानंतर परलोकप्राप्ति करून देणारा जो मार्ग तो सांपराय होय. या सांपरायाविषयीं नचिकेतस् आणि यम या दोघांमध्यें झालेला अद्भुत संवाद कठोपनिषदांत वर्णिलेला आहे. या संवादांत सांपरायाची व अमरत्वाची सिद्धि उत्कृष्ट रीतीनें केलेली आहे. तसेंच महाभारतांतील सनत्सुजातपर्वामध्यें मृत्यूचें स्वरूप व अमरत्वप्राप्तीचा मार्ग याविषयीं अत्यन्त उपयुक्त व बोधप्रद प्रतिपादन आढळतें. याकरितां कठवल्ली आणि सनत्सुजातपर्व या दोहोंवरील श्रीमच्छंकराचार्यांच्या अत्युत्तम भाष्याच्या अनुरोधानें प्रकृत विषयाचें विवेचन करण्याचें आम्हीं योजिलें आहे.

नचिकेतसानें यमधर्मास विचारिलें कीं—' मनुष्य मृत झाला असतां, त्याची कोणती स्थिति होते ? कोणी म्हणतात तो सर्वस्वीं नष्ट होतो, कोणी म्हणतात तो कायम राहतो. तेव्हां यांतील खरें मत कोणतें, तें सांगा.' या प्रश्नाचें उत्तर देतांना यमानें सांपरायासंबंधी विस्तृत माहिती दिली आहे. कठवल्लीमध्यें सांपरायाचें

व अमरत्वाचें सत्यत्व स्थापित करितांना नैतिक, अध्यात्म व तात्त्विक या तिन्ही पद्धतींचा अवलंब केला आहे.

वेदान्तदर्शनांत नीतीचा विचार मुळींच नसतो आणि कृतकर्माबद्दल मनुष्याची नैतिक जबाबदारी मानिली जात नाहीं—असा आक्षेप कोणी कोणी या दर्शनावर घेतात. या आक्षेपास समर्पक उत्तर असें आहे कीं, वेदान्तदर्शनामध्यें अमरत्वाच्या पायावरच नीतीची सर्व इमारत रचिलेली आहे. नचिकेतसाच्या वरील प्रश्नास उत्तर देतांना यमानें असें म्हटलें आहे कीं—

न सांपरायः प्रतिभाति बालं
प्रमाद्यन्तं वित्तमोहेन मूढम् ।
अयं लोको नास्ति पर इति मानी
पुनःपुनर्वशमापद्यते मे ॥

—काठक

याचा अर्थ असा कीं—‘ अविवेकी मनुष्याच्या मनांत परलोकाची कल्पनाच येत नाहीं, कारण तो स्वस्वरूपास मुळीं जाणत नाहीं आणि संपत्तीच्या मदानें सर्वकाल मूढ झालेला असतो. असा मनुष्य म्हणतो कीं, सर्व कांहीं याच जगांत आहे, दुसरा लोक मुळींच नाहीं. मग अर्थात् तो माझ्या तडाख्यांत येऊन वारंवार जन्ममरणाचे फेऱ्यांत सांपडतो. ’ सर्वदर्शनसंग्रह नामक माधवाचार्यांच्या ग्रंथांत देहात्मवादी चार्वाकाचें मत अशाच प्रकारचें दिलें आहे.—

यावज्जीवेत्सुखं जीवेद् । ऋणं कृत्वा घृतं पिबेत् ॥
भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः ॥ १

—सर्वदर्शनसंग्रह

म्हणजे, जिवंत आहों तोंपर्यंत सुखानें रहावें, कर्ज झालें तरी चिंता नाहीं पण स्निग्ध खाण्यास कमी करूं नये, कारण एकदां देहाचें भस्म झालें म्हणजे फिरून तो मिळण्याची आशाच नाहीं. जर मेल्यानंतर पुढें कांहींच नाहीं, तर जिवंत आहों तोंवर यथेच्छ खावें, प्यावें, चैन करावी, कारण केव्हां मरूं याचा नेम नाहीं आणि मेल्यानंतर कसलाहि उपभोग मिळणार नाहीं—हाच काय तो स्वाभाविक आचरणाचा मार्ग उरला. यावरून असें स्पष्ट होतें कीं, जो परलोक मानितो आणि आत्मा अमर आहे अशी दृढ श्रद्धा बाळगितो, तोच पुरुष निश्चयानें नीतिसंपन्न होऊं शकतो.

नीतीनें वागलें असतां मनुष्याचें कल्याण होतें, म्हणून त्यानें नीतिमान् व्हावें—अशा अनुमानानें उपयुक्ततावादी (Utilitarians) नीतिशास्त्राचें समर्थन करितात. तसेंच पदार्थविज्ञानवादी (Scientists) म्हणतात कीं, अखिल मानवजातीचें कल्याण जेणेंकरून होतें ती नीति होय. परंतु उपयुक्ततावादानें किंवा बहुजनकल्याणवादानें नीतिशास्त्राची सिद्धि समाधानकारक होत नाहीं. कारण चांगलें कोणतें, वाईट कोणतें, मनुष्याचें कल्याण कशानें होतें—या प्रश्नाचा निकाल जोंवर जगांतील सामान्य व्यवहारासच अनुलक्षून केवळ बुद्धीच्या किंवा विचारशक्तीच्या जोरावर केलेला असतो, तोंवर नीतिशास्त्राचा पाया असाच डळमळित रहाणार यांत संशय नाहीं. मनुष्याचें कल्याण कशानें होते हा प्रश्न फार महत्त्वाचा असून त्याचा निकाल खरोखर उदात्त दृष्टीनेंच केला पाहिजे. जगांतील सामान्य व्यवहारांत चांगलें

कोणतें व वाईट कोणतें हें ठरविण्यांत बुद्धीची किंवा विचारशक्तीची कशी चूक होत असते तें सूक्ष्मपणें अवलोकन करणाराच्या ध्यानांत सहज येतें. सामान्य अनुभव असा आहे कीं, हरएक प्रसंगीं बऱ्यावाईटाचा निकाल वैयक्तिक स्वार्थबुद्धीवर Interest किंवा पूर्वग्रहांवर Prejudices बहुधा अवलंबून रहातो.

नीतीचा पाया जें सदाचरण त्याविषयीं भारतीय आर्यांनीं फार सूक्ष्म विचार केलेला आहे. प्रथमतः चांगलें कोणतें व वाईट कोणतें याचा ऊहापोह पुढील वचनांत उत्कृष्ट रीतीनें आढळतो:—

अन्यच्छ्रेयोऽन्यदुतैव प्रेय
स्ते उभे नानार्थे पुरुषं सिनीतः ।
तयोः श्रेय आददानस्य साधुर्भवति
हीयतेऽर्थाद्य उ प्रेयो वृणीते ॥ १
श्रेयश्च प्रेयश्च मनुष्यमेत
स्तौ संपरीत्य विविनक्ति धीरः ।
श्रेयो हि धीरोऽभिश्रेयसो वृणीते
प्रेयो मंदो योगक्षेमाद् वृणीते ॥ २

—काठक

याचा अर्थ असा कीं—सर्व वस्तूंचे परिणाम पाहून त्यांचे दोन वर्ग करावे लागतात, एक श्रेयस व दुसरा प्रेयस. आत्म्याचें कल्याण जेणेंकरून होतें ती श्रेयस, आणि केवळ देहास जेणेंकरून सुख होतें ती प्रेयस वस्तु समजावी. दोन्ही वस्तूंचीं प्रयोजनें भिन्न असून त्या वस्तु मनुष्याला बद्ध करूं शकतात. जो श्रेयसाची निवड करितो त्याचें सर्वस्वीं कल्याण होतें व जो प्रेयस वस्तूंचाच संग्रह करितो त्याचा परमार्थ नष्ट होतो. प्र-

त्येक मनुष्यापुढें दोन्ही प्रकारच्या वस्तु सिद्ध असतात. शहाणा मनुष्य त्यांचे परिणाम ओळखून आत्म्याचें कल्याण ज्यानें होतें तेवढेंच घेऊन बसतो, पण मूर्ख मनुष्य विषयवासना तृप्त करण्याकरितां श्रेयस सोडून प्रेयसाचीच आवड धरितो. यावरून पहातां आत्मलाभ जेणेंकरून होतो तो सदाचार होय आणि केवळ देहाला सुखकारक अशा वस्तूमुळें आत्मनाश होतो हें स्पष्ट होतें.

आतां आत्मा व देह यांची तुलना करून पहातां उघड होतें कीं, आत्मा नित्य व शाश्वत असून, देह हा अनित्य व विनाशी आहे. म्हणून, आत्मलाभ करून घ्यावयाचा असेल तर अशाश्वत वस्तूंचा संग्रह करून कांहीं उपयोग नाहीं.

नह्यध्रुवैः प्राप्यते ध्रुवं तत् ।

—काठक

म्हणजे, अध्रुव अथवा अशाश्वत साधनांनीं ध्रुव किंवा नित्य असा परलोक कधींहि प्राप्त होणार नाहीं. अर्थात् अनात्म वस्तूंचा आश्रय करून शाश्वत सुख मिळणार नाहीं. सर्व जग मिळालें पण आत्मा हरवला असा व्यापार कोणासहि आवडणार नाहीं. सर्व जग मिळवावयाचें आणि आत्मलाभहि करून घ्यावयाचा—हा प्रकार बहुधा अशक्य होय. याकरितां परलोकाचें अस्तित्व आणि आत्म्याचें अमरत्व या भक्कम पायावर स्थापिलेली नीतिमत्ता सुप्रतिष्ठित होय यांत संशय नाहीं.

अविनाशि आत्म्याचा लाभ व्हावा अशी इच्छा करणारानें आत्म्याचें अमरत्व व साक्षिस्वरूप प्रतिपादन करणाऱ्या श्रुतिवचनांचें मनन व निदिध्यास ह्या व्यापा-

रांत सर्वकाल निमग्न रहावें. याविषयीं कठवल्लींतील मुख्य वचनें एणेंप्रमाणें आहेत—

न जायते म्रियते वा विपश्चि
न्नायं कुतश्चिन्न बभूव कश्चित् ।
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो
न हन्यते हन्यमाने शरीरे ॥ १
हन्ता चेन्मन्यते हन्तुँ
हतश्चेन्मन्यते हतम् ।
उभौ तौ न विजानीतो
नायँ हन्ति न हन्यते ॥ २

—काठक

याचा अर्थ असा कीं—ज्ञानसंपन्न आत्मा कधीं उपजत नाहीं व मरत नाहीं. आत्मा कशापासून होत नाहीं व त्यापासूनहि कांहीं होत नाहीं. आत्मा पुराण असून अज, नित्य व शाश्वत आहे. शरीराचा नाश झाला असतां आत्मा नाश पावत नाहीं. वध करणारा पुरुष जर म्हणेल कीं, मीं वध केला आणि वध झालेला पुरुष म्हणेल कीं माझा वध झाला, तर दोघांनाहि कांहीं कळत नाहीं. कारण आत्मा कोणाला मारीत नाहीं व कोणाकडून मारिला जात नाहीं.

कठोपनिषदांत अध्यात्म पृथक्करणाच्या पद्धतीनें आत्म्याची सिद्धि येणेंप्रमाणें केली आहे—

इंद्रियेभ्यः पराह्यर्था अर्थेभ्यश्च परंमनः ।
मनसस्तु परा बुद्धिर्बुद्धेरात्मा महान्परः ॥ १
महतः परमव्यक्तमव्यक्तात्पुरुषः परः ।
पुरुषान्न परं किंचित्सा काष्ठा सा परागतिः ॥ २

—काठक

याचा अर्थ असा कीं——इंद्रियांहून संवेदनात्मक विषयज्ञान थोर आणि संवेदनेहून मन थोर होय, कारण इंद्रियनिष्ठ शक्तीनें विषयसंवेदना घडते व मनाच्या साहाय्यावांचून संवेदना Sensation होत नाहीं. मनाहूनहि बुद्धि थोर होय, कारण पदार्थांचें प्रत्यक्ष ज्ञान झाल्यानंतर मनाच्या संकल्पविकल्पादि ज्या वृत्ति उठतात त्यांचें वर्गीकरण बुद्धीमुळें घडतें. बुद्धीहूनहि जीवात्मा थोर होय, कारण प्रत्यक्षज्ञान, संवेदना, मनोविकार आणि निश्चयात्मक वृत्ति या सर्वांची अन्तर्व्यवस्था जीवात्म्यामुळें घडून येते. जीवात्म्याचें स्वरूप पुढील वचनांत उत्कृष्ट रीतीनें विशद केलें आहे:——

येन रूपं रसं गंधं शब्दान्स्पर्शां ऽश्च मैथुनान् ।
एतेनैव विजानाति किमत्र परिशिष्यते ॥ १
स्वप्नान्तं जागरितान्तं चोभौ येनानुपश्यति ।
महान्तं विभुमात्मानं मत्वा धीरोऽनुशोचति ॥ २

**—काठक**

याचा अर्थ असा कीं——रूप, रस, गंध, शब्द व स्पर्श इत्यादिकांचें व यांशिवाय जें उर्वरित रहातें त्याचें ज्ञान ज्याच्या योगानें होतें तो आत्मा जाणावा. जागृति व निद्रा या दोन्ही अवस्थांमध्यें ज्याच्यामुळें सूक्ष्म ज्ञान प्राप्त होतें तो सर्वव्यापक महान् आत्मा मचि आहे असें जो बुद्धिमान् पुरुष जाणतो तो शोकापासून अलिप्त रहातो. जागृतीमध्यें जीवात्मा सर्व व्यापारांचा साक्षित्वानें अनुभव घेतो व गाढ निद्रेतून जागा झाल्यावर ‘ मला चांगली झोंप लागली होती ’ अशी प्रतीति जीवात्म्यास होते. सर्व ज्ञप्तिसंपन्न जीवास महत्तत्व

व्यापून रहातें, म्हणून अखिल जीवात्म्याचें एकीकरण ज्यामुळें होतें तेंच महत्तत्व होय. महत्तत्वाहूनहि प्रकृति थोर, परंतु प्रकृति अव्यक्त असल्यामुळें चैतन्यावांचून तिच्यापासून जगाची उत्पत्ति घडत नाहीं. प्रकृति कार्य-कारणरूप शक्ति असून तिलाच माया अशी संज्ञा आहे. प्रकृतीहूनहि पुरुष थोर होय. पुरुष हाच परमात्मा असून अत्यन्त श्रेष्ठ होय आणि त्याहून कांहींच थोर उरलें नाहीं. म्हणून पुरुष ही शेवटची मर्यादा असून संपूर्ण ज्ञानाचें व सृष्टीचें आदिकारण होय.

वर सांगितलेल्या अध्यात्म पृथक्करणाच्या उलट क्रमानें ह्याच आदिकारणापासून क्रमानें उत्पत्ति होऊन स्थावरजंगमात्मक जगत् आविर्भूत होतें. सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वी परमात्मा एकटाच असतो, तो सर्व जीवांचें स्वरूप व स्वामी होय. मायेचा निरोध झाल्यामुळें तो एकटाच प्रकाशमान असून त्याची शक्ति अदृश्य असते, पण चैतन्य मात्र जागृत रहातें. ह्या साक्षिरूप परमात्म्याची जी कार्यकारणरूप शक्ति तिलाच माया किंवा प्रकृति असें म्हणतात. सर्वव्यापक परमात्मा तिच्या योगानें जग निर्माण करितो. परमात्म्याच्या अंशेंकरून उत्पन्न झालेल्या पुरुषाच्या योगानें प्रेरित झालेल्या अव्यक्त प्रकृतीपासून महत्तत्त्व उत्पन्न होतें. हें महत्तत्त्व ज्ञप्तिसंपन्न असून आपणामध्यें समाविष्ट असणाऱ्या जीवास प्रकट करितें. महत्तत्त्वापासून अहंकार-तत्त्व उत्पन्न होतें. अहंकाराचे सात्त्विक, राजस व तामस असे तीन प्रकार आहेत. सात्त्विक प्रकारापासून मन, बुद्धि आणि इंद्रियांच्या देवतारूप शक्ति निर्माण होतात व

त्याच्या योगानें इंद्रियांस आपआपल्या विषयाचें ग्रहण करितां येतें. राजस अहंकारापासून ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें निर्माण होतात व तामस अहंकारापासून शब्दाची उत्पत्ति होऊन त्या शब्दापासून आकाश या क्रमानें पृथ्वीपर्यंत पंचमहाभूतें निर्माण होतात.

आतां कठोनिषदांत तात्त्विक पद्धतीनें जी अमरत्वाची सिद्धि केली आहे ती फार मनोरंजक असून केवळ अनुभवात्मक आहे. या पद्धतीचें बीज असें आहे कीं, अन्तर्दृष्टीनें व अध्यात्म योगानें आत्मरूपी पदार्थाचा साक्षात्कार होऊं शकतो. अगोदर हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, इंद्रियें जरी ज्ञानसाधनें असलीं तरी त्यांस आत्म्याचें दर्शन मुळींच घडत नाहीं:—

> पराञ्चिखानि व्यतृणत्स्वयंभू
> स्तस्मात्पराङ् पश्यति नान्तरात्मन् ।
> कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्ष
> दावृत्तचक्षुरमृतत्वमिच्छन् ॥
>
> —काठक

याचा अर्थ असा कीं—केवळ बाह्य विषयांचें ग्रहण करण्याकरितांच ईश्वरानें इंद्रियें उत्पन्न केलीं आहेत, म्हणून तीं बहिर्मुख असतात आणि अन्तरात्म्याचें विज्ञान सहसा त्यांस घडत नाहीं. सहस्रामध्यें असा एखादा पुरुष निर्माण होतो कीं, जो अमरत्वाची इच्छा धरून व इंद्रियें अन्तर्मुख करण्याचा अभ्यास करून आत्म्याच्या साक्षात्काराचा अनुभव घेतो. हा जो इंद्रियांना उलट गति देण्याचा प्रयत्न त्यासच योग अशी संज्ञा आहे.—

यदा पंचावतिष्ठन्ते ज्ञानानि मनसासह ।
बुद्धिश्च न विचेष्टति तामाहुः परमां गतिम् ।
तां योगमिति मन्यन्ते स्थिरामिंद्रियधारणाम् ॥

—काठक

याचा अर्थ असा कीं—जेव्हां पांच ज्ञानेंद्रियें आप-आपल्या विषयांपासून परावृत्त होतात, मन संकल्पविकल्पादि व्यापार सोडून देतें, आणि बुद्धि कांहींच करीत नाहीं, ती श्रेष्ठ स्थिति जाणावी. ह्या इंद्रियांच्या अचल स्थितीस योग असें म्हणतात.

इंद्रियाणां पृथग्भावमुदयास्तमयौ च यत् ।
पृथगुत्पद्यमानानां मत्वा धीरो न शोचति ॥

—काठक

याचा अर्थ असा कीं—इंद्रियें अन्तर्मुख झालीं असतां, जागृति व निद्रा या अवस्थांमध्यें तीं उत्पन्न कशीं होतात व त्यांचा लय कसा होतो हें जाणून आत्मस्वरूपाहून त्यांचें वैलक्षण्य अनुभवास येतें. इंद्रियें विषयांपासून परावृत्त झालीं म्हणजे उत्पत्तीच्या दृष्टीनें तीं आत्म्याहून निराळीं आहेत आणि त्यांचें स्वरूप आत्मस्वरूपाहून भिन्न आहे असा अनुभव येतो. इंद्रियें आपला व्यापार करूं लागलीं असतां आणि त्यांचा लय झाला असतां त्यांची स्थिति कशी असते हें प्रत्ययास येतें. इंद्रियांपासून होणारें प्रत्यक्ष ज्ञान आणि अध्यात्मयोगानें होणारा साक्षात्कार हीं अनुभवास आलीं असतां आत्म्याचें शुद्ध विज्ञान सहज प्राप्त होतें.

अध्यात्मयोगानें हा जो साक्षात्कार होतो त्याची प्राप्ति दुर्लभ आहे आणि तर्कशास्त्रांतील अनुमानाहून व

सामान्य व्यावहारिक ज्ञानाहून हें अनुभवजन्य ज्ञान अगदीं निराळें आहे. जो पुरुष साधनचतुष्टयसंपन्न असतो तोच या ज्ञानाचा खरा अधिकारी होतो.

नाविरतो दुश्चरितान्नाशान्तो नासमाहितः ।
नाशान्तमानसो वापि प्रज्ञानेनैनमाप्नुयात् ॥ १

—काठक

याचा अर्थ असा कीं—निषिद्ध जीं पापकर्में त्यांपासून जो अलिप्त झाला नाहीं, ज्यानें इंद्रियें जिंकिलीं नाहींत, मनाचें ऐकाग्र्य ज्याला साधलें नाहीं, ज्याच्या चित्ताचें समाधान झालें नाहीं, अशा पुरुषास आत्म्याच्या स्वतंत्र उपासनेनेंच होणारा आत्मलाभ कधींहि घडत नाहीं.

मनुष्यास अमरत्वप्राप्तीचा खरा उपाय म्हटला म्हणजे अध्यात्मयोग होय. कारण तो योग प्राप्त झाला असतां संसारदुःखाची व विषयसुखाची निवृत्ति होते. आत्म्याला बंध किंवा मोक्ष प्राप्त होण्याला कारण अन्तःकरण होय. तें विषयांवर आसक्त झालें तर बंधाला कारण होतें आणि परमात्म्याच्या ठिकाणीं रत झालें तर अमरत्वाची प्राप्ति होते. अहंकार आणि ममता ह्या दोन प्रकारच्या अभिमानापासून उत्पन्न झालेले काम, क्रोध, लोभ इत्यादि विकार नष्ट होऊन जेव्हां तें अंतःकरण शुद्ध होतें, तेव्हां तें सुखदुःखरहित होऊन शांत रहातें. वैराग्यबलानें व अध्यात्मयोगानें इंद्रियांचा निग्रह करून व अन्तःकरण स्वाधीन ठेवून सदाचरणी पुरुष आपल्या देहांतच अमरत्वाची प्राप्ति करून घेतो. ही श्रेष्ठ स्थिति कशी मिळवावी याचें निरूपण कठोपनिषदांत रथकल्पनेनें उत्कृष्ट रीतीनें केलें आहेः—

आत्मानꣲ रथिनं विद्धि शरीरꣲ रथमेव तु ।
बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः प्रग्रहमेवच ॥ १
इंद्रियाणि हयानाहुर्विषयाꣲस्तेषु गोचरान् ।
आत्मेंद्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिणः ॥ २
यस्त्वविज्ञानवान्भवत्ययुक्तेन मनसा सदा ।
तस्येंद्रियाण्यवश्यानि दुष्टाश्वा इव सारथेः ॥ ३
यस्तु विज्ञानवान्भमवति युक्तेन मनसा सदा ।
तस्येंद्रियाणि वश्यानि सदश्वा इव सारथेः ॥ ४
यस्त्वविज्ञानवान्भवत्यमनस्कः सदाऽशुचिः ।
न स तत्पदमाप्नोति सꣲसारं चाधिगच्छति ॥ ५
यस्तु विज्ञानवान्भवति समनस्कः सदा शुचिः ।
स तु तत्पदमाप्नोति यस्माद्भूयो न जायते ॥ ६
विज्ञान सारथिर्यस्तु मनः प्रग्रहवान्नरः ।
सोऽध्वनः पारमाप्नोति तद्विष्णोः परमं पदम् ॥ ७

—काठक

याचा अर्थ असा कीं—प्रवृत्ति किंवा निवृत्ति यांपैकीं कोणत्या तरी एका हेतूकडे जीवात्म्याचा कल असतो. प्रवृत्ति म्हणजे संसार व निवृत्ति म्हणजे अमरत्व होय. हे हेतु साध्य होण्याकरितां रथाची कल्पना केली आहे. तो रथ शरीर होय, त्याचा धनी जीवात्मा, सारथि बुद्धि, मन लगाम आणि इंद्रियें घोडे होत. रूपादि जे पांच विषय ते मार्ग होत. शरीर, इंद्रियें, मन इत्यादिकांसहित जो आत्मा त्यास भोक्ता किंवा संसारी म्हणावें. ज्या मनुष्यास विज्ञान नाहीं, त्याचें मन स्वाधीन रहात नाहीं आणि दुष्ट घोड्यांप्रमाणें त्याचीं इंद्रियें बेफाम होतात. ज्या मनुष्यास विज्ञान आहे, त्याचें मन स्वाधीन रहातें आणि वळीव घोड्याप्रमाणें त्याचीं इंद्रियें कह्यांत असतात. ज्यास विज्ञान नाहीं, ज्याचें

चित्त सर्वदा योगयुक्त नसतें, व जो सर्वदा अपवित्र रहातो—त्यास परमपद प्राप्त न होऊन, तो जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडतो. जो विज्ञानसंपन्न असतो, ज्याचें चित्त सर्वदा योगयुक्त असतें व जो सर्वकाल पवित्र असतो—तो जन्ममरणाच्या कचाटींतून सुटून अमरत्वपदाप्रत जातो. बुद्धिरूप सारथि जर चतुर असेल तर, मनरूपी लगाम नीट खेंचला जातो आणि इंद्रियरूपी घोडे हुकुमांत रहातात; नंतर रथाचा स्वामी जो जीवात्मा तो आपला मार्ग सुखानें क्रमून जातो आणि अमरत्वाच्या श्रेष्ठ स्थानाप्रत पोहोंचतो.

वर सांगितल्याप्रमाणें पवित्र आचरण ठेवून, इंद्रियें जिंकून, मनानें एकाग्रच साधून आणि चित्तानें समाधान राखून जो पुरुष अध्यात्मयोगानें आत्म्याची स्वतंत्र उपासना करितो, त्याच्या प्रत्ययास असें येतें कीं, जीवात्मा व परमात्मा यांचा परस्परसंबंध छाया—तपाप्रमाणें म्हणजे सावली व ऊन्ह याप्रमाणेंच आहे. असत्य अशा सावलीवरून सत्य उन्हाचें जसें ज्ञान होतें त्याप्रमाणें जीवात्म्यावरून परमात्म्याचा अनुभव येतो, आणि परमात्मा सत्य एतएव अमर अशी प्रतीति होते.

य इमं मध्वदं वेद आत्मानं जीवमन्तिकात् ।
ईशानं भूतभव्यस्य न ततो विजुगुप्सते ॥

—काठक

याचा अर्थ असा कीं—कर्माचें बरें-वाईट फल अनुभवणाऱ्या जीवात्म्याशीं अभेदरूपानें राहणारा आणि भूतभव्यादि कालत्रयाचा स्वामी जो परमात्मा त्यास जाणल्यानें, साधक पुरुष अभयपदास पोहोंचतो.

य एष सुप्तेषु जागर्ति
कामं कामं पुरुषो निर्मिमाणः ।
तदेव शुक्रं तद्ब्रह्म
तदेवामृत मुच्यते ।
तस्मिँल्लोकाःश्रिताः सर्वे
तदु नात्येति कश्चन ॥

—**काठक**

याचा अर्थ असा कीं—आपणास गाढ झोंप लागली असतां जो अंतर्यामीं जागृत राहून नानाप्रकारचे सुंदर देखावे निर्माण करितो तोच प्रकाशमय आणि अमर असा परमात्मा होय. सर्व लोक त्याचाच आश्रय करून राहिले आहेत व त्याला सोडून कोणीहि राहूं शकत नाहीं.

एको वशी सर्व भूतान्तरात्मा
एकं रूपं बहुधा यः करोति ।
तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीरा
स्तेषां सुखं शाश्वतं नेतरेषाम् ॥ १
नित्यो नित्यानां चेतनश्चेतनाना-
मेको बहूनां यो विदधाति कामान् ।
तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीरा-
स्तेषां शान्तिः शाश्वती नेतरेषाम् ॥ २

—**काठक**

याचा अर्थ असा कीं—सर्व भूतांचे अंतर्यामीं रहाणारा व एका रूपास नानातऱ्हेचे आकार देणारा असा एक सत्ताधारी आहे. अशा परमात्म्याचा हृदयकमलामध्यें ज्यांस साक्षात्कार होतो त्यांस मात्र शाश्वत सुखाचा अनुभव येतो. विनाशी वस्तूमध्यें अविनाशी रू-

पानें रहाणारा, सचेतन पदार्थांमध्यें चेतना उत्पन्न करणारा, जो एक असून अनेकांच्या कामना पूर्ण करितो, अशा परमात्म्याचा साक्षात्कार ज्या बुद्धिमान् पुरुषांस होतो, ते धन्य होत. विषयासक्त व अविवेकी मनुष्यास हा लाभ घडत नाहीं.

यदेवेह यदमुत्र यदमुत्र तदन्विह ।
मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति ॥

—**काठक**

म्हणजे जडसृष्टीमध्यें जें प्रतीयमान होतें, तेंच परमात्म्यामध्यें रहातें. जें परमात्म्यामध्यें असतें तेंच जडसृष्टीमध्यें अनुभवास येतें. म्हणून, जो पुरुष परमात्मा आणि सृष्टि यांमध्यें भेद पहातो, तो जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडतो.

नैव वाचा न मनसा प्राप्तुं शक्यो न चक्षुषा ।
अस्तीति ब्रुवतोऽन्यत्र कथं तदुपलभ्यते ॥ १
अस्तीत्येवोपलब्धव्यस्तत्व भावेन चोभयोः
अस्तीत्येवोपलब्धस्य तत्वभावः प्रसीदति ॥ २ ॥

—**काठक**

याचा अर्थ असा कीं—वाणीनें, नेत्रानें किंवा मनानें परमात्मा प्राप्त होऊं शकत नाहीं. सर्व जगाचें आदिकारण परमात्मा आहे असें जो मानितो त्यासच अमरत्वाचा साक्षात्कार होतो. परमात्मा व जडसृष्टि यांच्यामध्यें अभेदभावानेंच परमात्म्याचा लाभ घडतो, व जगाचें आदिकारण परमात्मा आहे असें जो मानितो, त्यास अमरत्वाचा अनुभव येतो.

एथवर कठोपनिषदांतील अपूर्व सिद्धांतांचें विवेचन

झालें. आतां सनत्सुजात पर्वावरील शांकरभाष्यानुरोधानें प्रकृत विषयाचे निरूपणास आरंभ करितों.

मृत्यु म्हणजे खरोखर कांहीं नाहीं, यामुळें त्याचें अस्तित्व व नास्तित्व या दोन्ही केवळ कल्पना आहेत व त्या निरनिराळ्या दृष्टीनें खऱ्या आहेत. जे कोणी ज्ञाते मृत्यु आहे असें म्हणतात त्यांचे बोलण्याचा अर्थ तरी मृत्यु म्हणजे कोणी मूर्तिमान् पदार्थ असा नसून, देहादि अनात्म वस्तूंचे ठिकाणीं आत्मत्व भासविणारा जो मोह तोच मृत्यु असा आहे, आणि या मोहापासून जे दूर असतात त्यांना अर्थातच मृत्यु नाहीं. पण, अनात्म वस्तूंचे ठायीं आत्मत्वबुद्धिरूप मोह हाच मृत्यु—अशी जी व्याख्या पंडित लोक करितात ती बरोबर नाहीं. खरी व्याख्या अशी आहे कीं, मृत्यु म्हणजे प्रमाद होय. जीवाचा जो सच्चिदानंदलक्षण सहजस्वभाव त्यापासून ढळणें किंवा च्युति पावणें हा मृत्यु होय. कारण पंडितांच्या मतानें जो अनात्म्याचे ठिकाणीं आत्मभावरूप मोह—त्याचेंहि मूळ कारण हाच प्रमाद होय. जीवांना देहादि अनात्म वस्तूंचे ठिकाणीं जो आत्मभास होतो, तो जीवांची ह्या मूळस्वरूपापासून दृष्टि चळली, म्हणून होतो. ती दृष्टि जर न चळतां सच्चिदानंदस्वरूपीं स्थिर राहील, तर हा मोहच उत्पन्न होणार नाहीं. सारांश, हा मोह या प्रमादाचें कार्य होय. प्रमाद झाला तेथेंच मृत्यु झाला. प्रमाद हाच मृत्यु होय, आणि घटाचा प्रतियोगी जसा घटाभाव, तसा प्रमादाचा प्रतियोगी अप्रमाद म्हणजे स्वस्वरूपाचे ठिकाणीं अढळ स्थिति

तोच अमृत्यु किंवा अमरत्व होय आणि त्यासच श्रुतीमध्यें स्वरूपावस्थान असें म्हटलें आहे.

असु म्हणजे प्राण किंवा इंद्रियें, आणि त्यांचे ठिकाणीं जे रमतात ते असुर होत. अर्थात् असुर म्हणजे आत्मज्ञानविहीन व विषयासक्त असे प्राणी होत. सुर म्हणजे स्वरूपामध्यें रमणारे, म्हणून आत्मवेत्ते होत. असुर हे प्रमादामुळें नाश पावतात. सुर हे अप्रमादामुळें म्हणजे स्वरूपास धरून राहिल्यामुळें परमपदाप्रत जातात. हाच मृत्यु आणि हेंच अमरत्व होय. कारण, मृत्यु हा कांहीं एकादे वाघासारखा कोणी शरीरी असून तो प्राण्यांना गट्ट करितो, अशांतला प्रकार नाहीं. तो केवळ कार्यानुमेय असून, त्याचें खरें स्वरूप समजतच नाहीं. आत्म्याविषयीं अज्ञान हाच मृत्यु आणि आत्मस्वरूपावस्थान हेंच अमरत्व, एवढें काय तें म्हणतां येतें. यावरून मृत्यूचा निरास किंवा मोक्षप्राप्ति कर्मसाध्य नाहीं हें उघड आहे. निष्काम किंवा फलत्यागयुक्त कर्माचें अथवा उपासनेचें सामर्थ्य चित्तशुद्धिद्वारा ज्ञानप्राप्तीची योग्यता आणून देणें एवढेंच आहे. म्हणजे, उपासना किंवा कर्म मोक्षप्राप्तीसाठीं प्रत्यक्षपणें समर्थ नसून, परंपरेनें उपकारक होतें. हें सामर्थ्य निवळ ज्ञानाचें म्हणजे आत्मज्ञानाचें आहे, म्हणून आत्मज्ञान हाच मोक्ष किंवा अमरत्व होय.

मृत्यूविषयीं लोकांत विलक्षण मतें प्रचलित आहेत. कोणी म्हणतात कीं मृत्यु म्हणजे यम, आणि तो मरणरहित व स्वस्वरूपाचे ठिकाणीं संचार करणारा असून, जीवांचे बुद्धीचे ठायीं लीन असतो. कोणी म्हण-

तात कीं, मृत्यु म्हणजे वैवस्वत यम, आणि तो पितृलोकाचें राज्य करीत असून, चांगल्यास चांगले रीतीनें वागवितो आणि वाईटास शिक्षा करितो. पण हें कांहीं नव्हे, तरि वर सांगितल्याप्रमाणें प्रमाद म्हणजे स्वस्वरूपाविषयीं अनवधान किंवा दुर्लक्ष असून, तोच खरा मृत्यु होय. हा प्रमाद प्रथम अहंकार रूपानें परिणत होतो, म्हणजे स्वस्वरूपाचा विसर पडून देहादि अनात्म वस्तूंकडे दृष्टि वळल्यानें त्या देहादिकांबद्दलच अहंभावना उत्पन्न होते. हा अहंकार म्हणजे स्वस्वरूपाविषयीं दृढावलेलें अज्ञान होय. हा अहंकार बळकट झाला म्हणजे त्याचें कामरूपानें रूपान्तर होतें, किंवा हा अहंकारच कामरूप बनतो. या कामाचाच विषयांशीं संबंध घडला असतां, प्रसंगपरत्वें त्यांतून क्रोध, लोभ, मोह हे निपजतात. उदाहरणार्थ, कामाला व्यत्यय आला किंवा अपाय झाला म्हणजे त्याचे इच्छे आड कांहीं आलें कीं मनुष्याला क्रोध येतो, क्रोधापासून मोह होतो, आणि अखेरीस मनुष्याचा नाश होतो. अशा रीतीनें अहं स्वरूपाप्रत पावलेला प्रमाद म्हणजे स्वरूपविषयक अज्ञान.—मी ब्राह्मण, मी क्षत्रिय, मी स्थूल, मी कृश, मी अमक्याचा पुत्र, अमका माझा नातू इत्यादि प्रकारानें मी व माझें याचा नाद लावून पुरुषाला रागद्वेषादिकांच्या गोत्यांत घालितें आणि मग अशा पुरुषाचे हातून श्रुतिस्मृतीविरुद्ध आचरण घडून तो घसरत जातो व आत्मस्वरूपाची प्राप्ति न होतां नाश पावतो.

याप्रमाणें अहंकार व तज्जन्य विकार या रूपानें परिणत होणाऱ्या प्रमादरूपी यमाच्या किंवा मृत्यूच्या

तावडींत प्राणी मूढ होऊन सांपडले म्हणजे चौऱ्याय-शीच्या फेऱ्यांत पडतात. कारण, इहलोकीं त्यांचें देहा-वसान झालें म्हणजे धूमादि मार्गानें परलोकीं जाऊन तेथें कर्मफलाचा जोर संपेपर्यंत ते वास्तव्य करितात. कर्मफलाचा जोर संपतांच, आकाशादि क्रमानें—

आकाशाद्वायुः । वायोरग्निः । अग्नेरापः ।
अद्भ्यः पृथिवी । पृथिव्या ओषधयः ।
ओषधिभ्योऽन्नं । अन्नाद्रेतः । रेतसः पुरुषः ।

—तैत्तिरीयोपनिषद्

म्हणजे, आकाश, वायु, अग्नि, जल, पृथ्वी, ओषधि, अन्न, रेत आणि पुरुष—या क्रमानें खालीं येऊन, ते नवीन देह धारण करण्यासाठीं या मृत्युलोकीं येऊन पडतात. या अवस्थेंत देव म्हणजे इंद्रियें त्यांच्याभोंवतीं जमा होतात आणि त्या इंद्रियांच्या संगतीनें पुनः विषयास-क्ति प्रबल होऊन पुनः त्यांस मृत्यु झपाटतो. याप्रकारें प्राण्यांची या फेऱ्यांतून सुटका न होतां पुनःपुनः त्यांस गोतेच बसतात. सारांश, आत्मस्वरूपाचे अज्ञानामुळें हा संसार उद्भवतो, व समुद्रांत पडलेल्या पुरुषाला ज्या-प्रमाणें नक्रादि जंतु इतस्ततः ओढूं लागले असतां तो व्याकूळ होऊन जातो, त्याप्रमाणें संसारांत पडलेल्या पुरुषाची हे रागद्वेषादिक रिपु त्रेधा उडवून अखेर त्याला खाडय़ांत घालितात आणि याप्रमाणें हें चक्र अखंड चालू रहातें.

आतां कर्मयोगानें मृत्यूचा निरास होऊन अमरत्व कसें प्राप्त होतें तें पाहूं. बहुधा प्रवृत्तींतील जीवांचीं सर्व कर्मे फलाकांक्षेनें केलीं असल्यामुळें, मृत्युलोकीं

त्यांचें देहावसान झालें तरी हा कर्मबंध व मृत्यु चुकत नाहींत. ह्या लोकीं जिवंत असतां केलेल्या कर्मांचीं फलें भोगण्यासाठीं त्यांना स्वर्गादि लोकाकडे जावें लागतें. तेथें तें फल भोगून झालें म्हणजे क्षीणपुण्य होऊन पुनः या लोकीं ते येतात. असें रहाटगाडगें चालू रहातें. यामुळें या कर्मबंधनांतून सुटून मृत्यूचे पार होणें म्हणजे अमरत्व किंवा मोक्ष मिळणें हें त्यांचे वांटयास येत नाहीं. कारण, अमरत्वप्राप्तीला अवश्य जो अध्यात्मयोग किंवा सच्चिदानंद परमात्म्याचें अपरोक्ष ज्ञान, तें त्यांना घडत नसल्यामुळें, ते देहधारी मूढ राहून विषयोपभोगाचे इच्छेनें आकृष्ट होऊन सर्वदा भ्रमत राहतात. अंधळा मनुष्य ज्याप्रमाणें उच्च, नीच, सकंटक अशा प्रदेशांतूनहि फिरतो, त्याप्रमाणें हे विवेकहीन जीव, उच्च, नीच, दुःखमय अशा योनींमध्यें फेऱ्या करितात. हा सर्व घात होण्याला कारण विषयांविषयीं सत्यबुद्धि आणि तत्संबंधी लालसा हीं होत. परंतु विषयच ज्याला असत्य वाटतात, त्याचे इंद्रियांची विषयांचे ठिकाणीं प्रवृति होत नाहीं आणि इंद्रियें विषयपराङ्मुख असलीं म्हणजे तीं आत्माभिमुख सहजच होतात. इंद्रियें आत्माभिमुख झाल्यानें मोहाची निवृत्ति होऊन अपरोक्षानुभव सहजच प्राप्त होतो. परंतु जे कोणी विषय सत्य मानितात अशांचीं इंद्रियें सर्वदा विषयाभिमुख असल्यानें हे महामोहग्रस्त होतात व प्रत्यग्भूत आत्मस्वरूपाचें स्मरणहि नाहींसें झाल्यामुळें आणि केवल शब्दादि मिथ्याभूत विषयसंयोगानें मन ग्रस्त झाल्यामुळें या विषयांचेच चिंतनांत सर्वदा

निमग्न होऊन विषयसेवनांतच ते सदा गुंतून राहतात. कारण, विषयांच्या उपभोगानें विषयेच्छा तृप्त न होतां घृतयुक्त अग्नीप्रमाणें अधिकाधिकच भडकत जाते व तेणेंकरून तो पुरुष अविद्याकल्पित शब्दादि विषयांनीं अधिकाधिक बद्ध होतो व अर्थात् त्याच्या संसाराच्या येरझारा संपत नाहींत.

पुरुष विषयासक्त होण्याचें मूळ कारण पाहूं जातां असें दिसतें कीं, विषयसंसर्ग आणि विषयचिंतन हीं पुरुषाचा प्रथम घात करितात. कारण, विषयांचें ध्यान करितां करितां त्यांचे ठायीं आसक्ति जडते, आसक्ति जडलीं कीं तद्विषयक काम त्या पुरुषाला विषयासन्निध नेऊन गिरकींत घालितो. कामाचे तावडींत गेल्यावर क्रोधहि आपला डाव साधून घेतो. अशा रीतीनें विषयध्यान, काम व क्रोध या तिहींचे दाढेंत सांपडलेल्या मूर्ख मनुष्यांना हे तिघे मृत्यूचे गर्तेंत फेंकून देतात. परंतु जे कोणी विवेकी पुरुष विषयांचें मिथ्यात्व ओळखून त्यांपासून अलिप्त राहतात, ते असा विचार करितात कीं, विषय हे अनित्य, अशुचि व दुःखमय आहेत. असें ध्यानांत वागलें म्हणजे ते मूढाप्रमाणें विषयांचे गुलाम न होतां स्वतंत्र राहतात आणि मृत्यूचा अंमल त्यांवर मुळींच चालत नाहीं. उलट ते मृत्यूचेहि मृत्यु किंवा काळाचेहि काळ बनतात, आणि मृत्यु जसा इतरांना भक्षण करितो, तसे ते मृत्यूलाच गिळून टाकितात. अशा पुरुषांना विद्वान्, आत्मवेत्ते, कवि अशा संज्ञा आहेत.

आतां विषयानुसक्त कामानुसारी पुरुष नाश कसे

पावतात तें पाहूं. दृढ ध्यानाचे योगानें अशा पुरुषांचें विषयांशीं अग्निकाष्ठाप्रमाणें तादात्म्य होऊन जातें. परंतु काष्ठनाशाबरोबर तद्वत अग्नि जसा नाश पावतो, तद्वत् विषयानुसारी हे कामी जीव नश्वर विषयांचे संगतीनें आपणहि नाश पावतात. उलटपक्षीं, जो पुरुष विवेकबुद्धीचे जोरावर विषयांना लाथेनें तुडवून देतो, त्याचेमागचा सर्वच कर्मांचा तगादा नाहींसा होतो. इहजन्मीं किंवा जन्मांतरीं केलेल्या पुण्यपापादि सर्व कर्मांचा उच्छेद करून तो पुरुष स्वतंत्र व सर्वदुःखातीत होतो. खरोखर पाहतां प्राणिमात्रांचा हा देह अविद्याकल्पित असून विष्ठा, मूत्र, कफ, पूय, शोणित इत्यादिकांनीं भरला असल्यामुळें प्रत्यक्ष नरकच होय. असें असतांहि मूढ जीव, देह मोठा सुंदर व मनोहर आहे अशी कल्पना करून त्याचा लोभ करितात, आणि त्या लोभामुळें त्याच्यामागें धांवत सुटून अंधळा खाड्यांत पडावा त्याप्रमाणें ते नरकगर्तेत पडतात.

स्त्रियादिकांचे देहाचे ठिकाणीं सुखबुद्धि ठेवून जे विषयांध पुरुष त्यांमागें धांवतात आणि विषयातिरिक्त स्वात्मभूत परमात्म्याला जाणीत नाहींत किंवा त्याचें ज्ञान करून देणाऱ्या अध्यात्मशास्त्राचें अध्ययन करीत नाहींत, अशांचा देह अगदीं फुकट आहे यांत संशय नाहीं. इतकेंच नव्हे, तर अशा विषयासक्त जीवांचा अन्तरात्मा क्रोधानें, मोहानें, लोभानें, भयानें व्याप्त झालेला असल्यामुळें, तो अन्तरात्माच त्यांचा प्रत्यक्ष मृत्यु होतो; आणि अशा प्रकारें क्रोध, लोभ, मोह, भयादिकांनीं ग्रस्त झालेल्या पुरुषांचे हृदयांत मृत्यु सतत जागृत रहातो. या-

प्रमाणें कामक्रोधादिरूपानें परिणत होणारा व जीवांस जन्ममरणाचे अनर्थपरंपरेंत ढकलणारा प्रमादच मृत्यु आहे हें ओळखून मुमुक्षूनें कामक्रोधादिकांचा परित्याग करावा व सच्चिदानंदरूप स्वरूपावस्थितीनें रहावें, म्हणजे त्याला मृत्यूचें भय वाटणार नाहीं. इतकेंच केवळ नव्हे, तर मृत्यूचे आटोक्यांत आलेले जीव ज्याप्रमाणें नाश पावतात, त्याप्रमाणें असल्या ज्ञानी पुरुषाचे आटोक्यांत गेल्यानें मृत्युच स्वतः मरण पावतो.

कर्ममार्ग परंपरेनें मोक्षाला उपकारक होतो म्हणून वेद हे कर्मानें श्रेष्ठ सुख व मोक्ष प्राप्त होत असल्याचें सांगतात व अज्ञानी लोक त्या मार्गानें जातात. परंतु कर्माचे अंगीं साक्षात् मुक्तिहेतुत्व नसून केवळ क्रममुक्तित्व आहे, याकरितां त्या मार्गानें किंवा उपासनादि आडमार्गांनीं न जातां ज्ञानी लोक आपणच परमात्मा आहों असें ज्ञानानें व अनुभवानें जाणून परब्रह्मरूपच होऊन रहातात व पुनः या सृष्टींत येत नाहींत. कर्म व उपासना यांची जी महती वेदांनीं गाईली आहे, ती फक्त इंद्रियांस विषयांपासून पराङ्मुख करून चित्तशुद्धि संपादन करण्याकरितांच होय असें समजलें पाहिजे. यावत् वेदांचा कटाक्ष मोक्षाकडे किंवा अमरत्वप्राप्तीकडे आहे. ब्रह्मव्यतिरिक्त सर्व कांहीं अनित्य, अशुचि, असुखरूप असल्यामुळें पुरुषार्थ या संज्ञेस पात्र होत नाहीं. हें वेदांनीं पुरें ओळखिलें असल्यानें, वेद अशा गोष्टीविषयीं तात्पर्य न ठेवितां अमरत्व प्रतिपादनाकडेच ओढ घेतात. यासाठीं परमपुरुषार्थरूप, परमपुरुषार्थसाधक

व परमपुरुषार्थप्रतिपादक या तीनहि रूपांनीं वेदच मोक्ष-प्राप्तीला आधारभूत किंवा प्रमाणभूत आहेत.

आत्मप्राप्तीस अवश्य लागणारी जी चित्तशुद्धि तिचें काम धीरानें व नेटानें करावें लागतें. ज्यामध्यें अनुकूल-प्रतिकूल असे संकल्पविकल्पात्मक अनेक तरंग क्षणांत उठतात असें जें आन्तरिंद्रिय मन त्याचा निश्चयरूपी बुद्धीचे ठिकाणीं लय केला पाहिजे. म्हणजे, विषयसंगतीनें होणारें मनाचें चांचल्य साफ नाहींसें करून तें अन्तर्मुख करून निश्चयरूप बनविलें पाहिजे. याप्रमाणें मन मुरून किंवा मारून निश्चयात्मक बुद्धीचा उदय झाला असतां आत्मप्राप्तीचें पहिलें साधन हातीं आलें असें समजलें पाहिजे. कारण, आत्मा हा पदार्थ अखंड चिंतनावांचून मिळणारा नव्हे, आणि जोंपर्यंत मन विषयाच्या थपडा खात इतस्ततः हेलकावत आहे, तोंपर्यंत अखंड चिंतनाला लागणारा आणि सतत एकाच दिशेला नेटानें वहाणारा असा चित्ताचा प्रवाह संभवत नाहीं. यासाठीं प्रथम मनाचा बळी बुद्धिरूप देवीपुढें अर्पण करून तिला प्रसन्न केली पाहिजे. ती देवी प्रसादोन्मुख झाली असतां अखंड चिंतनाचें सामर्थ्य अंगीं येतें. हें सामर्थ्य प्राप्त झालें म्हणजे चित्तशुद्धि संपादन झाली असें मानण्यास हरकत नाहीं.

आतां, आपणच परमात्मा आहों असें जाणून रहावें म्हणून वर सांगितलें, त्यावर अशी शंका येते कीं—परमात्मा स्वतंत्र असून त्यास जन्ममरणादि विकार मुळींच नाहींत, जीवात्मा तर आकाशादि क्रमानें जन्ममरणरूप संसारामध्यें फिरणारा असून कर्मतंत्र आहे, शिवाय पर-

मात्मा क्लेशरहित असून जीव तर दुःखानें गांजलेला आहे. इतकें जीव व परमात्मा यांमध्यें विरुद्धधर्मत्व असून जीव हाच परमात्मा कसा जाणावा? या शंकेचें समाधान असें आहे कीं, जीवात्मा व परमात्मा भिन्न नाहींत हीच गोष्ट खरी आहे व जो या दोहोंमध्यें भेद मानितो तो महापातकी होतो असें श्रुतींत स्पष्ट म्हटलें आहे. जीव हा परमात्माच खरा, परंतु तो अनादि मायारूप उपाधीमुळें नानारूप दिसतो व त्याच उपाधीमुळें अनंत दुःखें भोगतो. यास दृष्टान्त एणेंप्रमाणें:—अनेक जलपात्रें भरून ठेविलीं असतां अनेक ठिकाणीं चंद्रबिंबें दिसतात, व पात्रांतील जल प्रचलित झालें असतां तीं बिंबें कंपित होतात. तथापि या सर्व बिंबांना मूळभूत जो आकाशस्थ चंद्र तो एकच आहे आणि पात्रगतबिंबकंपनानें तो कंप पावत नाहीं, या दोनहि गोष्टी निर्विवाद आहेत. त्याप्रमाणेंच मायोपाधिगत परमात्म्याचें जें जीवरूपानें नानात्व किंवा दुःखात्मकत्व भासतें तें, मूलभूत परमात्म्याच्या अद्वितीयत्वाचें किंवा क्लेशराहित्याचें बाधक होत नाहीं. हें सिद्ध झालें. माया ही परमात्म्याचे ठिकाणीं असणारी अनादिसिद्ध शक्ति आहे. हिच्या योगानें परमात्मा हें विश्व निर्माण करितो, किंबहुना परमात्मा कांहींच करीत नसून ही त्याची मायाशक्तिच हें सर्व जग उत्पन्न करिते. असा वेदांचा अभिप्राय आहे. मात्र ही माया परमेश्वराचाच आश्रय करून आहे, तद्भिन्न नाहीं, हेंहि वेदांनीं सांगून ठेविलें आहे, आणि मायोपाधिकृत नानात्व मानण्यांत परमेश्वराचें सामर्थ्य

कांहीं कमी होत नाहीं व जीवपरमात्म्यैक्याच्या कल्पनेलाहि धक्का पोहोंचत नाहीं.

आत्म्याचें यथार्थ ज्ञान संपादन करणें हें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य आहे. अत्यंत सूक्ष्म, अचल, शुद्ध, सच्चिदानंदलक्षण असा आत्मा असतांना, त्यास यथार्थदृष्टीचा न ओळखून, जो त्याला कर्ता, भोक्ता, सुखी, दुःखी, स्थूल, कृश, अमक्याचा पिता, अमक्याचा नातू इत्यादि प्रकारें समजतो, तो मोठा अपराधी होय. म्हणून शहाण्यानें देहेंद्रियादिक अनात्मवस्तु आहेत, असें ओळखून परमात्म्याचे ठिकाणीं लय लावून रहावें. देहद्वय व इंद्रियें यांचें जो आत्मत्वानें ग्रहण करीत नाहीं, त्याला एक तर संसाराचे क्लेश होत नाहींत. दुसरें, त्याचे अन्तःकरणांत कामक्रोधादिकांचा उद्भव होत नाहीं. आणि तिसरें, तो अमरत्वास पोहोंचतो. शिवाय, आत्मप्राप्तीसाठीं कोठें जावें लागत नाहीं. बसल्या बैठकीं जर कोणी ज्ञानार्जनाचा केवळ हेतु मनांत धरून गुरुप्रतिपादित मार्गानें वेदांचें पद्धतवार परिशीलन करील, आणि वेदांत सांगितलेल्या वादांचें अध्यारोप आणि अपवाद या दोन्ही दृष्टींनीं, पायरी पायरीनें मनन करील, तर कालगतीनें त्याचें ज्ञान परिपक्व होऊन त्यास निखालस एथच्या एथें अमरत्वप्राप्ति होईल.

आत्मज्ञानी पुरुष अध्यात्मयोगानें हृदयकमलामध्यें ज्या परमात्म्याचा लाभ करून घेतात तो केवल शुद्ध म्हणजे अविद्यादि दोषरहित असून वस्तुजाताचा प्रकाशक असल्यामुळें स्वतः ज्योतिःस्वरूप आहे. हा

अध्यात्मयोग साध्य होण्यास योगशास्त्राचें अध्ययन केलें पाहिजे. इतर शास्त्रें केवळ वाणीचे विकार आहेत, असें समजावें. योगशास्त्र मोठें यशस्य म्हणजे यशोरूप जें ब्रह्म त्याची प्राप्ति करून देणारें आहे. ज्ञात्यांचें म्हणणें असें आहे, कीं सर्व कांहीं योगाधीन आहे, आणि हें रहस्य जे जाणतात ते अमर होतात. जरा आणि मरण हे जरी देहाचे धर्म असले तरी त्यांपासून देह जेणेंकरून निर्मुक्त होईल अशा मार्गाचें अवलंबन करण्याकडेच योगशास्त्राचा भर असलेला पदोपदीं नजरेस येतो. आपलें मानवी जीवित सर्वस्वीं शुक्रावर म्हणजे रेतावर अवलंबून आहे, आणि तें शुक्र चित्तावर अवलंबून आहे. म्हणून शुक्र आणि मन हीं ज्या ज्या प्रयत्नांनीं रक्षण करितां येतील ते ते प्रयत्न करण्याकडे योग्याचें सर्वकाळ लक्ष लागलें पाहिजे. वायुस्थैर्य, मनःस्थैर्य आणि बिंदुस्थैर्य हीं तिन्ही संपादन करण्याकडे योगशास्त्राचा सर्वदा ओढा असतो. शरीररक्षणाचा मुख्य पाया जो प्राण, तो आपल्या स्वाधीन करून घेण्याकरितां, नियमित आहारविहार आणि एकान्तवास यांचा आश्रय करणें अवश्य आहे. तसेंच मनाची अन्तर्मुखता पूर्णपणें साध्य करून शुक्राची तेजस्विता संपादन केली पाहिजे. यावियीं पुढील वचनें अत्यन्त महत्त्वाचीं आहेतः—

चित्तायत्तं नृणांशुक्रं शुक्रायत्तंच जीवितम् ।
तस्मात् शुक्रं मनश्चैव रक्षणीयं प्रयत्नतः ॥ १
मनःस्थैर्ये स्थिरो वायुस्ततो बिंदुः स्थिरो भवेत् ।
बिंदुस्थैर्ये सदा सत्वं पिंडस्थैर्यं प्रजायते ॥ २

सुगंधो योगिनो देहे जायते बिंदुधारणात् ।
यावद् बिंदुः स्थिरो देहे तावत्काल भयं कुतः ॥ ३
एवं संरक्षयेद् बिंदुं मृत्युं जयति योगवित् ।
मरणं बिंदुपातेन जीवनं बिंदुधारणात् ॥ ४

—हठयोगप्रदीपिका

याचा अर्थ असा कीं——मनुष्याचें शुक्र केवळ मनाच्या स्वाधीन रहातें, आणि जीवित तर शुक्रावर अवलंबून असतें, याकरितां अनेक प्रयत्न करून शुक्र आणि मन यांचें रक्षण केलें पाहिजे. मन स्थिर झालें असतां प्राणवायु स्थिर होतो आणि प्राणवायु स्थिर झाला असतां आपला बिंदुहि स्थिर होतो. बिंदु स्थिर राहिला असतां देहामध्यें बल उत्पन्न होऊन स्थैर्य प्राप्त होतें आणि जीविताविषयीं भय म्हणून कसें तें राहत नाहीं. याकरितां बिंदूचें रक्षण करून योगी लोक मृत्यूला जिंकून टाकितात. बिंदुपात होणें हेंच मरण असून, बिंदूचें उत्तम प्रकारें रक्षण करणें, हेंच अमरत्व होय.

आतां, सनत्सुजातपर्वावरील शांकरभाष्याचे आरंभीं जो सुंदर उपोद्घात लिहिला आहे त्याचा सारांश देऊन हें प्रकरण संपवितों.

खरोखर पहातां, जीवात्मा सच्चिदानन्दरूप अद्वितीय ब्रह्मरूपच असतो, परंतु त्याला धरून असणारी जी अविद्या तिच्या योगानें हा जीवात्मा आपल्या नैसर्गिक ब्रह्मस्वरूपास मुकतो आणि देहादिकांचेच ठिकाणीं आपलेपणा मानूं लागतो, तेणेंकरून एकाहि पुरुषार्थाची प्राप्ति न होऊन सर्व तऱ्हेचे अनर्थ मात्र त्याजवर येऊं लागतात. असें झालें असतां तो लौकिक किंवा वैदिक उपाय

योजूं लागतो. परंतु हे सर्व उपाय अविद्या, वासना आणि कर्म यांनींच कल्पिलेले असल्यामुळें, परमपुरुषार्थ जो मोक्ष किंवा अमरत्व तें हातीं न येतां, रागद्वेषादि रिपु त्याला जन्ममरणरूप संसारसमुद्रांत लोटून देतात. मग तो भांबावून जाऊन भोंवऱ्यांत सांपडलेल्या वस्तूप्रमाणें, देव, मनुष्य पशु, पक्षी इत्यादि नानाविध योनींमध्यें पुनःपुनः गिरक्या मारूं लागतो. अशा गिरक्या खातां खातां त्याच्या पदरीं जर पुण्याचा संग्रह असेल, तर त्यायोगें तो थोडासा शुद्धीवर येतो, आणि मग काम्यकर्माची वांछा सोडून देऊन वेदाज्ञेला अनुसरून केवल ईश्वरार्पणबुद्धीनें विहितानुष्ठान करूं लागतो. मग त्या अनुष्ठानबलानें त्याचे रागद्वेषादि मल दूर होऊन त्याची दृष्टि शुद्ध होते. आणि भोग्य विषयांचें क्षणभंगुरत्व लक्षांत येऊन ऐहिक व पारलौकिक भोगांविषयीं त्याची अप्रीति होते. नंतर उपनिषत्प्रतिपादित जीवात्म्याचा ब्रह्मभाव अनुभविण्याकरितां विविदिषा उत्पन्न होऊन तो निवृत्तिमार्गाला वळतो आणि शमदमादि साधनसंपन्न होऊन ब्रह्मवेत्त्या गुरूचा आश्रय करितो. तेथें श्रवणमननादि मार्गांनीं त्याला आपले ब्रह्मस्वरूपाची ओळख होऊन अविद्या व तिचीं कार्यें हीं या जवळून पळून जातात. आणि तो केवळ ब्रह्मरूप होऊन रहातो. एवढें त्यानें केलें म्हणजे कर्तव्याची परम सीमा होऊन अमरत्व हातीं आलें असें समजावें.

---